# संपूर्ण बंकिमचंद्र.

---

४९

## दुर्गेशनंदिनी.

५०

## आनंदमठ.

५

## मृणालिनी.

भारत-गौरव-ग्रंथमाला पुष्प—४९—५०—५१

# संपूर्ण बंकिमचंद्र.

## ( द्वितीय खंड )



नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण.

अनुवादक.

**श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे,** बी. ए.

सन १९२३



साधी प्रत तीन रुपये —किंमत— कापडी प्रत साडेतीन रुपये.

Publisher,
P. S. BHASE,
Manager,
Bharat Gourav Granth Mala,
Girgaon--Bombay

—:o:—

Printed by
M. N. Kulkarni,
at the
Karnatak Press,
434 Thakurdwar, Bombay.

# प्रकाशकाचे दोन शब्द.



संपूर्ण बंकिमचंद्राचा हा द्वितीय खंड भगवान श्रीकृष्ण कृपेनें तयार झाला असून तो आम्ही आश्रयदात्यांच्या हातीं प्रेमपूर्वक देत आहों. हा खंड वेळेवरच प्रकाशित झाला असून यापुढचे खंडहि असेच वेळेवर आश्रयदात्यांच्या हातीं पडतील अशी आम्हांस उमेद आहे.

पहिला खंड आम्ही भीतभीत प्रकाशित केला. पूर्वी एकदां बंकिमचंद्राच्या कांहीं कादंबऱ्या मराठींत प्रकाशित झाल्या होत्या; तेव्हां त्या दृष्टीनें हा आमचा प्रयत्न साहसाचाच होता; परंतु हें कळविण्यास फार आनंद वाटतो कीं महाराष्ट्रीयांस हा आमचा प्रयत्न आवडला असून आश्रयदात्यांकडून बरेंच प्रोत्साहनहि मिळालें आहे आणि त्याचमुळें हा दुसरा खंड पहिल्या खंडापेक्षां अधिक चांगल्या रीतीनें प्रकाशित करतां आला.

पहिला खंड सर्वांगसुंदर करण्यासंबंधानें आम्ही आश्रयदात्यांना बरींच अभिवचनें दिलीं होतीं; परंतु त्याप्रमाणें तो सुंदर झाला नाहीं; याची आश्रयदात्यांनीं क्षमा करावी. तो खंड सुंदर व्हावा अशी इच्छा होती आणि त्या दृष्टीनें आम्ही पैसाहि खर्च केला; परंतु पुण्यास छापत असलेल्या पुस्तकावर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें बाहेरगांवीं राहून नजर टाकतां आली नाहीं. त्यामुळें मजकुरांत थोडे दोष राहून छपाईहि व्हावी तशी झाली नाहीं. कागदहि दोन रंगाचा वापरला गेला व पृष्ठसंख्येचाहि थोडा घोटाळा झाला. असें असतांहि त्या खंडाची आश्रयदात्यांनीं प्रशंसा करून योग्य तें प्रोत्साहनहि दिलें, याबद्दल त्यांचे आभार कोणत्या शब्दांनीं मानावेत हें आम्हास कळत नाहीं.

हा दुसरा खंड आश्रयदात्यांच्या हातीं आहेच. तो पहिल्या खंडापेक्षा किती सर्वोत्कृष्ट झाला आहे, हें सांगण्याचें कारण नाहीं, पुढील खंड ह्यापेक्षांहि सुंदर करण्याची उमेद आहे. आश्रयदात्यांनीं नवीन आश्रयदाते मिळवून देण्याची थोडी कृपा केल्यास पुढील खंड ह्यापेक्षां अधिकसुंदर तर होतीलच, पण पांचपन्नास पृष्ठांचा मजकूरहि अधिक देतां येईल.

आश्रयदात्यांकडून नवीन वर्गणीदारांची मदत या वेळीं मोठ्या प्रमाणांत झाल्यास ग्रंथमालेची स्थिति सुधारण्यास फार उपयोग होईल. पुढील खंडासाठीं ह्यापेक्षांहि चांगला कागद आणविण्याचा विचार आहे. चित्रेंहि थोडीं अधिक

देऊन आणखीहि कांहीं सुधारणा करण्याचें योजिलें आहे. जों जों आश्रय अधिक असावा, तों तों असल्या सुधारणा करणें शक्य असतें, याचा विचार करून आश्रय-दात्यांनीं नवीन वर्गणीदार मिळवून देण्यास आळस व हयगय करूं नये, अशी त्यांना विनंति आहे.

हा खंडहि रा. वासुदेवराव आपटे यांनीं फार काळजीपूर्वक लिहून दिला याबद्दल त्यांचे आम्ही आभारी आहों. या खंडांतलीं पद्यें प्रो. लक्ष्मण गणेश शास्त्री लेले व रा. रा. हर्षे, वाङ्मयविशारद, या उभयतांनीं करून दिल्याबद्दल ग्रंथमाला त्यांची फार ऋणी झाली आहे. त्यांचे आभार मानावेत तितके थोडेच आहेत.

कार्तिक शु॥ १ शके १८४५
निरगांव-**मुंबई.**

सर्वांचा नम्र साहित्यसेवक,
**प्रभाकर श्रीपत भस्मे.**



आयषनें ती विषाची आंगठी किल्ल्याच्या खंदकांत टाकून दिली. (१७१)

# दुर्गेशनंदिनी.



## खंड पहिला.



### प्रकरण पहिलें.

### देवालय.



वंगाब्द ९९७ ( इ. स. १५९१ ) सालची गोष्ट. उन्हाळा संपत आला होता. अशा वेळीं एके दिवशीं एक पुरुष घोड्यावर स्वार होऊन विष्णुपुराहून मांदारणाकडे चालला होता. सूर्य अस्तास जाऊं लागलेला पाहून त्यानें घोडा वेगानें चालविला होता. समोर विस्तीर्ण मैदान होतें; तेव्हां न जाणो, यदाकदाचित् कालधर्मानुसार संध्याकाळचे वेळीं तुफान वारा सुटून पावसानें झोडपलें, तर मैदानांत कोठें निवाऱ्याची जागा न मिळाल्यामुळें बेसुमार हाल होतील या भयानें त्यानें घोडा भरधांव सोडला होता. मैदान ओलांडून तो जातो न जातो, तोंच सूर्यास्त झाला. हळूहळू आकाश नीलवर्ण मेघांनीं व्याप्त होऊं लागलें. रात्रीच्या सुरुवातीलाच इतका घोर अंधकार पडला कीं घोडा चालविण्याचें काम मोठ्या मुष्किलीचें झालें. मधून मधून विजा चमकत, त्यांच्या प्रकाशानें रस्ता थोडाबहुत दिसे. त्या धोरणानें आमचा घोडेस्वार कसा तरी कष्टानें मार्ग क्रमण करीत होता.

लवकरच घों घों असा प्रचंड नाद करीत सोसाट्याचा वारा वाहूं लागला आणि त्याच्या बरोबरच जोराच्या पर्जन्यधाराहि पडूं लागल्या. त्यामुळें घोडेस्वाराची दिशाभूल होऊन आतां कोठें जावयाचें तें त्याला सुचेना. त्यानें हातांतली लगाम ढिली सोडल्यामुळें घोडा मनास वाटेल तिकडे जात होता. अशा रीतीनें कांहीं वेळ गेल्यानंतर एके ठिकाणीं त्या घोड्याच्या पायाला कांहीं कठीण पदार्थ लागून तो ठेचाळला. याच वेळीं वीज चमकल्यामुळें तिच्या

प्रकाशानें घोडेस्वाराला समोर कांहीं तरी एक जंगी, पांढऱ्या रंगाचा पदार्थ चमकतांना दिसला. हा पांढरा विशाल पदार्थ म्हणजे घर असावें, असें वाटून घोडेस्वार घोड्यावरून उडी मारून उतरला. तेव्हां घोड्यानें ज्या जागीं ठोकर खाल्ली त्या जागीं दगडाच्या पायऱ्या आहेत, असें त्याला आढळून आलें. जवळच आसऱ्याला जागा आहे असें पाहून त्यानें घोड्याला सोडून दिलें आणि अंधेरांत जपून पायऱ्या चढून तो जाऊं लागला. इतक्यांत पुनः वीज चमकली. तिच्या उजेडानें त्याला दिसलें कीं तो इमारत म्हणजे एक देवालय आहे. सावधगिरीनें तो त्या देवालयाच्या छोट्याशा दारापाशीं जाऊन पोंचला. पहातो तों दार बंद ! हातानें चाचपून पाहिल्यावर त्याला कळून आलें कीं, दाराला बाहेरून कडी नाहीं. या निर्जन प्रदेशांतल्या देवालयाला अशा वेळीं आंतून कोणीं बरें कडी लाविली असेल ? असा विचार मनांत येऊन त्याला जरा विस्मय वाटला. डोक्यावर जोराच्या पर्जन्यधारा कोसळत असल्यामुळें आंत कोणी का असेना, त्याचा विचार मनांत न आणतां तो दारावर हातानें जोराजोरानें धक्के मारूं लागला. पण कोणीहि दार उघडण्यास येईना. तेव्हां एकदां त्याच्या मनांत आलें कीं लाथ मारून दार उघडावें; पण तसें केल्यानें देवालयाची अमर्यादा घडेल असा विचार करून त्यानें तसें केलें नाहीं. तथापि त्याच्या हाताच्या जोराच्या धक्क्यांपुढें देवालयाच्या लाकडी दाराचा निभाव लागला नाहीं. लवकरच दाराची आंतली कडी निघाली. दार उघडून आंत जातांच तेथें कोणी तरी कुजबुजल्याचा ध्वनि त्यांच्या कानीं पडला. दार उघडें असल्यामुळें त्यांतून जोराचा वारा आंत येऊन त्यानें तेथला मंद मंद जळत असलेला दिवाहि मालवला. अर्थातच त्या देवालयांत कोण माणसें आहेत, आणि कोणत्या देवांच्या मूर्ति आहेत हें त्या मुशाफराला कांहींच दिसलें नाहीं. आपली अशी अवस्था झालेली पाहून त्या धीट तरुणानें किंचित् हास्य करून प्रथम मंदिरांतल्या अदृश्य देवमूर्तीला भक्तिभावानें साष्टांग नमस्कार घातला, आणि नंतर उठून ‘ येथें देवालयांत कोण आहे ?’ असा अंधेरांतच प्रश्न केला. त्याच्या प्रश्नाला उत्तर मिळालें नाहीं; पण कंकणासारख्या अलंकाराचा ध्वनि मात्र त्याच्या कानीं पडला. ज्यास्त बोलण्याच्या नादीं लागण्यांत अर्थ नाहीं, असा विचार करून वारा आणि पाऊस यांच्या बंदोबस्तासाठीं त्यानें दार लावून घेतलें, आणि दाराची कडी निखळून पडली होती म्हणून तिच्या ऐवजीं आपली पाठच दाराला टेकून म्हटलें, ‘ जे कोणी मंदिरांत असतील त्यांनीं ऐकावें. हा मी दरवाज्यापाशीं हत्यारबंद बसलों

आहें. माझ्या विश्रांतींत कोणीं विघ्न करूं नये. केल्यास, विघ्न करणारा पुरुष असेल तर त्याला त्याच्या कर्माचें फळ मिळाल्यावांचून राहणार नाहीं. जर स्त्री असेल तर तिनें निश्चितपणें झोंप घ्यावी. रजपुताच्या हातांत जोंपर्यंत ढालतलवार असेल तोंपर्यंत तिच्या पायाला एखादें कुसळसुद्धां बोचण्याची भीति बाळगायला नको.'

यावर त्या मंदिरांतून ' आपण कोण आहां ? ' असा प्रश्न स्त्रीच्या स्वरानें निघाला. तो ऐकून मुशाफर विस्मित होऊन म्हणाला, ' हा प्रश्न स्त्रीचा असावा असें आवाजावरून दिसतें. मी कोण तें कळल्यापासून तुम्हांला कोणता लाभ होणार आहे ?'

मंदिरांतून उत्तर आलें, 'आम्ही फार भ्यालों आहोंत.'

तरुण म्हणाला, 'मी कोणी का असेना ? आपण कोण आहों तें सांगण्याची आमची वहिवाट नाहीं. पण मी हजर असतां स्त्रीजनाला कसलेंहि भय बाळगण्याचें कारण नाहीं, येवढें मात्र खास सांगतों.'

स्त्रीनें उत्तर केलें, "आपलें बोलणें ऐकून आम्हांस धीर आला आहे. एवढा वेळ आम्ही भयानें मेल्यासारखे झालों होतों. अजूनहि माझी सखी अर्धी बेशुद्ध पडली आहे. आम्ही संध्याकाळीं या शैलेश्वर महादेवाच्या पूजेसाठीं आलों होतों. इतक्यांत पाऊस पडूं लागल्यामुळें आमचे नोकरचाकर आम्हांला सोडून कोणीकडे निघून गेले तें कळत नाहीं."

तो तरुण म्हणाला, "कांहीं काळजी करूं नका. आपण स्वस्थ विश्रांति घ्या. उद्यां प्रातःकाळीं मी तुम्हांला तुमच्या घरीं पोंचवीन."

ती स्त्री म्हणाली, "शैलेश्वर आपलें कल्याण करो.''

मध्यरात्रीं वारा व पाऊस बंद झाल्यावर तरुण म्हणाला, "तुम्ही थोडा वेळ असाच धीर धरून येथें रहा. मी जवळच्या गांवीं जाऊन दिवा घेऊन येतों."

हें ऐकून, जी स्त्री बोलत होती ती म्हणाली, "महाराज ! दिव्यासाठीं गांवांत जाण्याची जरुरी नाहीं. या मंदिराचा एक गुरव जवळच राहतो. चांदणें पडलें आहे. मंदिराबाहेरून त्याची झोंपडी दिसेल. तो या मैदानांत एकटाच राहतो. म्हणून त्याच्या घरांत शेकोटी करण्याचें सगळें साहित्य तयार असतें.''

तिच्या सांगण्यावरून तो तरुण मंदिराबाहेर आला, आणि चांदण्याच्या साह्यानें पाहूं लागला, तों गुरवाची झोंपडी त्याला दिसली. त्यानें तिकडे जाऊन

गुरवाला उठविलें. गुरवानें भयामुळें दार न उघडतां प्रथम आंतूनच कोण आला आहे तें पाहिलें. मुशाफराच्या चर्येवर लुटारूपणाचें लक्षण त्याला दिसलें नाहीं. विशषतः मुशाफरानें त्यास मोहोरेची लालूच दाखविली, तेव्हां तिचा मोह त्याला आवरेना. त्यामुळें हो ना करतां करतां गुरवानें दार उघडून दिवा लावून दिला. मुशाफरानें दिवा आणून मंदिरांत पाहिलें, तों एक शुभ्र पाषाणाची शिवमूर्ति त्याला दिसली. त्या मूर्तीच्या मागें दोन स्त्रिया उभ्या होत्या. त्यांत जी वयानें लहान होती, तिनें दिवा पहातांच तोंडावर बुरखा घेऊन नम्रपणानें खालीं मान घातली. पण तिच्या उघड्या हातांतील हिऱ्याचीं कांकणें, सुंदर कशिदा काढलेलें तिच्या अंगावरचें वस्त्र, आणि अंगावरचे रत्नाचे अलंकार हीं पाहून त्या मुशाफराला वाटलें कीं ही हीन कुळांतली खास नाहीं. दुसऱ्या स्त्रीच्या हलक्या पोशाखावरून ती दासी असावी असें त्यानें ताडलें. तथापि तिचा वेष दासीप्रमाणें अगदींच हलका नव्हता. तिचें वय सुमारें पसतीस वर्षांचें असावें असें दिसलें. आपण जें बोललों, तें या मोठ्या स्त्रीशीं असें मुशाफरानें सहजच ताडलें. त्या स्त्रियांचा पोशाख आपल्या देशांतल्या स्त्रियांच्या पोशाखासारखा नसून हिंदुस्तानी थाटाचा होता, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. योग्य स्थळीं दिवा ठेवून तो त्या स्त्रियांच्या पुढें उभा राहिला. दिव्याचा उजेड त्याचे अंगावर पडल्यामुळें त्या स्त्रियांना सहज दिसून आलें कीं, त्याचें वय पंचवीस वर्षांपेक्षां फारसें वर नव्हतें. त्याचा बांधा उंच होता; पण छाती विशाल असून सर्व अंग पुष्ट असल्यामुळें ती उंची त्याला वैगुण्य न आणतां उलटी अलौकिक शोभा देणारीच झाली होती. त्याची कांति पर्जन्यकालांत जमिनीवर उगवलेल्या हिरवळीसारखी अत्यंत मनोज्ञ होती. वसंत ऋतूंतल्या झाडांच्या नवपल्लवीच्या वर्णाप्रमाणें त्यानें शरिरावर धारण केलेलें कवच व रजपूत वीराचा पोशाख शोभायमान दिसत होता. कमरेला म्यानांत घातलेली तरवार लटकत होती. त्यानें आपल्या लांब हातांत एक लांब भाला घेतला होता. डोक्याला मंदिल बांधला होता. त्यावर हिऱ्याचा शिरपेंच झळकत होता. कानांत मोत्यांचीं कुंडलें व गळ्यांत रत्नहार होता.

परस्परांना पाहून उभयपक्षीं परिचय करून घेण्याविषयीची उत्सुकता उत्पन्न झाली. पण प्रथम विचारण्याचा असभ्यपणा पत्करण्यास कोणी तयार होईना.

---

## प्रकरण दुसरें.

# संभाषण.

प्रथम, तरुणानें स्वतःची जिज्ञासा तृप्त करण्याविषयींची उत्कंठा प्रकट करून थोरल्या स्त्रीला म्हटलें, 'जगाच्या अनुभवावरून मला वाटतें कीं आपण कोणा भाग्यवंताच्या घरच्या स्त्रिया आहां. पण आपलीं नांवें विचारण्यास माझ्या मनाला संकोच वाटतो. तथापि मला स्वतःचें नांवगांव सांगण्यास जशी हरकत आहे, तशी आपणांस नसेल. म्हणून विचारण्याचें धैर्य मी करीत आहें.'

त्या स्त्रीनें उत्तर केलें, 'स्त्रियांनीं आपली ओळख कशी द्यायची ? ज्यांना कुळाचें नांव सुद्धां धारण करतां येत नाहीं, त्यांनीं आपली ओळख कोणत्या प्रकारें द्यावी ? अंतःपुरांत गुपचिप पडून राहणें हाच ज्यांचा धर्म त्या स्वतःची ओळख कशी काय देणार ? ज्या दिवशीं पतीचें नांव मुखावाटे उच्चारण्यास विधात्यानें स्त्रीला मनाई केली, त्या दिवशींच स्वतःची ओळख करून देण्याचा मार्ग आम्हांला बंद झाला आहे.'

यावर तरुणानें कांहीं एक उत्तर केलें नाहीं. त्याचें चित्त दुसरीचकडे होतें. धाकटी स्त्री मोठया स्त्रीच्या आडून तोंडावरचा बुरखा किंचित् बाजूला सारून त्या तरुणाकडे टक लावून पाहत होती. बोलतां बोलतां त्या तरुणाचीहि दृष्टि सहज तिच्याकडे गेली, ती मागें फिरली नाहीं. त्याच्या नेत्रांना वाटलें कीं असें अलौकिक लावण्य पुनः कोठेंहि पाहण्याला मिळणार नाहीं. तरुणीच्या नजरेशीं तरुणाची नजर भिडली, त्याबरोबर ती खालीं पाहूं लागली. आपल्या भाषणावर कांहीं उत्तर आलें नाहीं, असें पाहून थोरली स्त्री त्या तरुणाच्या चर्येकडे पाहूं लागली. त्याची दृष्टि कोणीकडे आहे, तेंहि तिनें अवलोकन केलें. आपल्या जवळ उभी असलेली तरुणी त्या तरुणाकडे उत्कंठित नेत्रांनीं पाहत आहे हेंहि तिच्या लक्षांत आलें. म्हणून ती त्या धाकटया स्त्रीला म्हणाली, 'कायग ! शंकराला साक्ष ठेवून तूं स्वयंवर कां करीत आहेस ?'

तरुणीनें आपल्या सखीची अंगुली दाबून तिच्याच सारख्या हलक्या स्वरानें म्हटलें, 'भलतेंच कांहीं तरी बोलत्येस' ! तिची सखी चतुर होती. ती हा प्रकार पाहून मनांत म्हणूं लागली कीं दिसत असलेल्या लक्षणांवरून असें वाटतें कीं या

अपरिचित तरुणाचें तेजःपुंज शरीर व कांति पाहून माझ्या हातीं सोपलेली ही कन्या मदनशरानें पीडित झालेली आहे. यापासून दुसरा कांहीं परिणाम न झाला तरी हिच्या मनाची शांति कायमची ढळेल, म्हणून हा प्रकार आतांच्या आतांच बंद केला पाहिजे. पण हें कसें बरें घडवून आणितां येईल ? या तरुणाला कांहीं इशारतीनें किंवा बहाण्यानें अन्य स्थळीं पाठवितां येईल. तेव्हां तसेंच करावें. असा विचार करून स्त्रीच्या अंगच्या चातुर्यानें तिनें म्हटलें, 'महाराज ! स्त्रियांची अब्रू इतकी नाजूक असते कीं तिला दुसऱ्याच्या अंगावरून आलेलें वारेंसुद्धां सहन होत नाहीं. आज या तुफानांत रक्षण होणें फार मुष्कील झालें होतें, म्हणून आम्ही येथें थांबलों होतों. आतां वारापाऊस थांबला आहे. तेव्हां घरापर्यंत पायांनीं चालून जाववतें कीं नाहीं तें पाहूं म्हणतों.'

तरुणानें उत्तर केलें, 'आपण अशा निर्जन प्रदेशांतून अंधेरांत पायीं जाणार असलां तर आपल्या रक्षणासाठीं मी पोंचवायला येतों. आतां आकाश निवळलें आहे. मी मघांच आपल्या मार्गाला लागणार होतों; पण आपल्या या सुंदर सखीला रक्षणावांचून सोडून जाणें बरें नाहीं, म्हणून आतांपर्यंत थांबलों.'

स्त्रीनें उत्तर केलें, 'आपण आमच्याविषयीं जी ही दया प्रकट केली आहे ती पाहिली म्हणजे आपले आभार किती मानावे तें कळत नाहीं, आणि न मानिले तर आम्हांला अकृतज्ञ समजाल कीं काय अशी भीति वाटते. सगळ्या गोष्टी मला बोलून दाखवितां येत नाहींत. महाराज ! आमच्या दुर्भाग्याची कहाणी आपणास कोठवर सांगावी ? आम्ही स्त्रिया स्वभावतःच अविश्वासी आहों. आपण आम्हांला पोंचवायला आलांत, तर आमचें सुदैव समजूं. पण आमचे मालक-या मुलीचे वडील-विचारतील कीं कोणाबरोबर तूं आलीस ? तर हिनें काय उत्तर द्यावें ? "

तरुणानें थोडा वेळ विचार करून म्हटलें, 'त्यांनीं सांगावें कीं महाराज मानसिंहाचा पुत्र जगत्सिंह याच्या बरोबर मी आल्यें.'

त्या क्षणीं त्या मंदिरांत वज्रपात झाला असता तरी देखील त्या स्त्रिया इतक्या चकित झाल्या नसत्या, इतकें त्याचें नांव ऐकून त्या चकित झाल्या. धाकटी स्त्री तर शिवमूर्तीच्या आडच झाली. बोलण्यांत चतुर अशी ती थोरली स्त्री नम्रतेनें उभी राहिली आणि हात जोडून म्हणाली, "युवराज ! मी नकळत आपले सहस्र अपराध केले आहेत. अज्ञान स्त्रीजन म्हणून माझ्या अपराधांची क्षमा करावी.'

राजपूत्र हंसून म्हणाला, 'असल्या मोठ्या अपराधाला क्षमा नाहीं. तरी पण तुम्हीं आपलें नांव गांव सांगितल्यास क्षमा करीन. न सांगितल्यास मात्र योग्य शिक्षा होईल.'

नम्र शब्दांनीं रसिकांना नेहमींच हिंमत येत असते. त्या स्त्रीनें किंचित् हंसून म्हटलें, 'शिक्षा सांगावी. आम्ही ती भोगण्यास तयार आहों.'

जगत्सिंह हंसून म्हणाला, "मी तुमच्याबरोबर येऊन तुम्हांस तुमच्या घरीं पोहोंचवीन. हीच ती शिक्षा.'

त्या स्त्रीला वाटलें कीं, हें एक नवेंच संकट प्राप्त झालें ! कांहीं विषेश कारणामुळें ती धाकटी स्त्री कोण आहे, तें दिल्लीच्या सेनापतीला सांगण्यास ती राजी नव्हती. तो त्यांच्याबरोबर रक्षणासाठीं जाणार होता, या गोष्टीलाच तिची हरकत होती. मग तिची ओळख करून देण्याची गोष्ट तर दूरच ! अशा अडचणींत सांपडल्यामुळें ती खालीं मान घालून मुकाट्यानें उभी राहिली.

इतक्यांत मंदिरापासून जवळच घोड्यांच्या टापा ऐकूं येऊं लागल्या. राजपुत्रानें मंदिराच्या बाहेर येऊन पाहिलें तों शंभराहूनहि कांहीं जास्त घोडेस्वारांचें सैन्य जात असलेलें त्याला दिसलें. स्वारांच्या पोषाखावरून ती आपलीच रजपूत सेना आहे, असें त्याला कळून चुकलें. हा युवराज युद्धसंबंधीं कामासाठीं विष्णुपुराहून त्वरेनें हे घोडेस्वार घेऊन आपल्या पित्याकडे जात होता. त्या दिवशीं दोनप्रहरीं तो एकटाच पुढें गेला होता. मागून त्याचें लष्कर येत होतें. पण त्यांची चुकामुक झाल्यामुळें राजकुमार एकटा त्या मैदानांत वारा आणि पाऊस यांच्या सपाट्यांत सांपडून संकटांत पडला होता. आतां त्यानें आपल्या सैन्याला पुन्हां पाहिलें. पण सैन्यांतल्या लोकांनीं आपणास पाहिलें कीं नाहीं, तें जाणण्याकरितां तो मोठ्यानें म्हणाला, 'दिल्लीश्वरकी जय !' हें ऐकतांच एक घोडेस्वार त्याच्यापाशीं आला. राजकुमार त्याला पाहून म्हणाला, 'धर्मसिंह ! मोठ्या पावसाच्या सपाट्यांत सांपडल्यामुळें मी येथें थांबलों होतों.'

धर्मसिंह नम्रभावानें मुजरा करून म्हणाला, ' आम्हीं युवराजांचा फार शोध केला. शोध लागेना, तेव्हां शेवटीं घोड्याच्या पावलांचा माग काढीत काढीत इकडे आलों. आपला घोडा पलीकडल्या वडाच्या झाडाखालीं सांपडला. त्यालाहि धरून आणिलें आहे.

जगत्‌सिंह म्हणाला, ' घोडा धरून तुम्ही येथें उभे रहा, आणि दोन माणसें शेजारच्या गांवाला पाठवून एक म्याना व भोई बोलावून आणवा. बाकीच्या लष्कराला पुढें जाण्यास सांगा.'

हा हुकूम ऐकून धर्मसिंहाला अंमळ आश्चर्य वाटलें; पण धन्याच्या हुकमावर प्रश्न विचारणें बरें नव्हे हें जाणून 'जशी आपली आज्ञा' इतकें बोलून तो लष्करांत गेला, आणि युवराजाचा हुकूम त्यानें सर्वांना कळविला व म्यानाबद्दलचा मजकूर ऐकून कांहीं जण हंसले, आणि आपापसांत बोलूं लागले कीं, 'आज कांहींतरी नवीनच प्रकार दिसतो आहे.' त्यावर दुसरें कोणी म्हणाले, ' अहो ! यांत काय नवल ? रजपूत राजांना शंभर शंभर राण्या असतात !'

इकडे युवराज बाहेर गेला असतां ती संधी साधून धाकटी स्त्री बुरखा बाजूला सारून आपल्या सखीला म्हणाली, ' विमले ! आपलें नांव गांव राजपुत्राला सांगण्यास तूं इतके आढेवेढे कां घेतलेस ?'

विमला म्हणाली, ' याचा जबाब मी तुझ्या पित्यापाशीं देईन, बरें पण, ही गडबड कसली ऐकूं येत आहे ? '

तरुणी म्हणाली, ' मला वाटतें राजपुत्राच्या शोधासाठीं त्याचें सैन्य आलें असावें. या ठिकाणीं स्वतः युवराज असल्यावर आपणाला काळजी करण्याचें काय कारण ? '

जे घोडेस्वार म्याना व भोई आणण्यासाठीं गेले होते, ते परत येण्यापूर्वींच या स्त्रियांना पावसाचे वेळीं मंदिरांत सोडून आश्रयासाठीं गांवांत गेलेले भोई म्याना घेऊन आले. दुरून त्यांना पाहून राजपुत्र त्या स्त्रियांना म्हणाला, ' हत्यारबंद शिपायासह भोई म्याना घेऊन येत आहेत. तीं आपलींच माणसें कीं काय तें बाहेर येऊन पाहावें, ' विमला बाहेर येऊन पाहूं लागली, आणि म्हणाली, ' होय. आमचींच माणसें आहेत. '

तेव्हां राजकुमार म्हणाला, ' असें आहे तर मी आतां येथें उभा रहात नाहीं, मी त्यांच्या दृष्टीस पडलों, तर कदाचित कांहीं अनिष्ट परिणाम घडेल. ह्मणून मी जातों. शैलेश्वरापाशीं येवढेंच मागतों कीं, तुम्ही घरीं सुरक्षित पोहोंचावें. तुम्हांलाहि माझी एवढीच विनंति आहे कीं, तुमची व माझी भेट झाली होती, ही गोष्ट एक आठवडापर्यंत कोणालाहि कळवूं नका. माझें तुम्हांला विस्मरण होऊं नये, माझी आठवण राहावी, म्हणून ही एक लहानशी वस्तु देतों, ती आपल्या जवळ ठेवा. तुमच्या धन्याच्या कन्येशीं माझा परिचय अखेर झाला

नाहीं, ही गोष्ट मात्र माझ्या अंतःकरणांत सदोदित जागृत राहील.' इतकें बोलून त्यानें मंदिलांतून एक मोत्यांचा हार काढून तो विमलेच्या मस्तकावर टाकला. तिनें तो बहुमोल हार आपल्या मस्तकावर धारण करून आणि राजकुमाराला नम्र भावानें प्रणाम करून म्हटलें, 'युवराज! मी नांवगांव सांगितलें नाहीं म्हणून मला अपराधी समजूं नका. त्याला तसेंच कांहीं कारण आहे आपली जिज्ञासा फारच प्रबळ असली तर आजपासून पंधरा दिवसांनीं आपली भेट कोणत्या ठिकाणीं होईल तेवढें कृपा करून सांगावें.'

जगत्सिंह थोडा वेळ विचार करून म्हणाला, 'आजपासून पंधरा दिवसांनीं रात्रींच्या वेळीं याच ठिकाणीं माझी भेट होईल. ती न झाली तर मात्र पुनः केव्हांहि होणार नाहीं.'

'देव आपलें रक्षण करो' इतकें बोलून विमलेनें त्याला पुनः एकदां प्रणाम केला. जातां जातां राजकुमारानें अतिशय तृष्णातुर दृष्टीनें त्या स्त्रीकडे पुन्हां पाहिलें, आणि मग घोड्यावर बसून तो चालता झाला.

---

## प्रकरण तिसरें.

# मोंगल व पठाण.

रात्रीं जगत्सिंह शैलेश्वराच्या मंदिरांतून निघून गेला. त्याची किंवा मंदिरांत कांहीं काळपर्यंत वास करणाऱ्या ह्या मनमोहिनी स्त्रियांची पुढील हकीकत जाणण्याविषयींची वाचकांची उत्कंठा आमच्यानें इतक्यांतच तृप्त करवत नाहीं. जगत्सिंह हा जातीनें रजपूत होता. तो बंगाल्यांत कशासाठीं गेला होता व त्या मैदानांतून एकटाच जाण्याला त्याला काय कारण झालें, हें कळण्यासाठीं प्रथम त्या कालच्या बंगालच्या राजकारणी घडामोडीसंबंधानें थोडेंसें सांगणें अवश्य आहे. अर्थात् हें प्रकरण इतिहासविषयक आहे. वाचक फारच अधीर असल्यास त्यांनीं पाहिजे तर हें प्रकरण सोडून द्यावें. पण अशी अधीरता चांगली नाहीं, येवढेंच ग्रंथकाराचें म्हणणें आहे.

बंगाल्यांत बख्त्यार खिलजीनें मुसलमानांची जयपताका प्रथम फडकाविल्यानंतर तेथें पठाणांनीं कित्येक शतकेंपर्यंत अबाधितपणें राज्य केलें. पुढें सुप्रसिद्ध

सुलतान बाबर हा दिल्लीचा बादशहा इब्राहिमलोदी याचा युद्धांत पराभव करून त्याचे सिंहासनावर बसला. तथापि बंगालप्रांत त्यावेळीं तैमुरलंगाच्या वंशजांच्या हातांत गेला नव्हता.

जोंपर्यंत मोगलवंशाचा कुलतिलक बादशहा अकबर याचा अभ्युदय झाला नव्हता, तोंपर्यंत बंगाल्यांत पठाणराजे स्वतंत्रपणें राज्य करीत होते. पण कोणा कुमुहूर्तावर स्वस्थपणें निजलेल्या सिंहाच्या अंगावर हात टाकण्याची दुर्बुद्धि मूर्ख बेट्या दाऊदखानाला झाली, आणि त्याच्या कर्माचें फल त्याला मिळालें. अकबराचा सेनापति मनाइमखान याच्या हस्तें त्याचा पराभव होऊन तो राज्यभ्रष्ट झाला. दाऊद ओरिसाप्रांतांत पळून गेला, आणि बंगालप्रांत मोगलांच्या हातांत गेला. पठाणांनीं ओरिसांत राज्य स्थापिलें. तेथें त्यांचा उच्छेद करण्याचें काम मोंगलांना जड गेलें. पुढें दिल्लीच्या बादशहाचा प्रतिनिधि खानजहाखाँ यानें पठाणांचा पुनः पराभव करून ओरिसाप्रांतावर आपल्या प्रभूची सत्ता स्थापित केली. यानंतर एक मोठी गडबड झाली. अकबर बादशहानें बंगाल्यांत करवसूलीची जी एक नवी पद्धति सुरू केली होती, तिच्यामुळें जहागिरदार वगैरे जमीनदार लोकांत फार असंतोष उत्पन्न झाला व आपापल्या हक्कांच्या संरक्षणार्थ त्यांनीं शस्त्र उचललें. सहज न मोडतां येणारें असें हें बंड उठलेलें पाहून पठाणांनींहि यावेळीं उचल खाल्ली, आणि कतलूखान नांवाच्या एका पठाणाला आपला नायक करून त्यांनीं ओरिसाप्रांत पुनः हस्तगत केला. मेदिनीपूरहि त्यांनीं घेतलें.

राजकार्यधुरंधर राजप्रतिनिधि अजिमखाँ व त्याच्या मागून आलेला शाहाबाजखाँ या दोघांनाहि शत्रूंच्या हातीं गेलेला प्रांत परत मिळवितां आला नाहीं. अखेर या कठीण कामगिरीवर एका हिंदु योद्धयाची योजना होऊन त्याला पाठविण्यांत आलें.

अकबर बादशाहा त्याच्या पूर्वींच्या बादशाहाहून फार अधिक बुद्धिमान् व शाहाणा होता. त्याच्या मार्मिक बुद्धीला तत्काळ दिसून आलें कीं या देशांतले राज्य संपादन करण्याचे कामीं एतद्देशीय लोकच विशेष कुशल आहेत; परदेशीय लोक तसे नाहींत. त्यांतहि पुनः रजपूत लोक या कामीं विशेष निपुण आहेत. म्हणून अशा कामगिरीवर तो एतद्देशीयांची विशेषतः रजपूतांची योजना करीत असे.

आमच्या कथानकाच्या काळीं जे रजपूत उच्चपदावर होते, त्यांत महाराजा मानसिंग हा अग्रगण्य होता. हा स्वतः शहाजादा सेलीम याचा श्यालक होता. ओरिसा प्रांत जिंकण्याचे कामीं अजिमखाँ व शाहवाज खाँ यानीं हात टेकल्यावर या मानसिंहालाच अकबर बादाशाहानें बंगाल व बहार प्रांतांचा सुभेदार करून पाठविलें होतें.

मानसिंहाची नेमणूक झाल्यावर तो पाटणा येथें जाऊन पोंचला. त्यानें प्रथम कांहीं किरकोळ बंडें मोडिलीं व नंतर ओरिसा प्रांत जिंकण्याच्या हेतूनें त्या प्रांतावर स्वारी केली. मानसिंह प्रथम पाटण्यास आला, त्या वेळीं तेथें राहाण्याचा विचार करून त्यानें बंगाल प्रांतीं सैय्यदखांला आपला प्रतिनिधि म्हणून पाठविलें होतें. त्याप्रमाणें राज्यभार शिरीं घेऊन बंगालची त्या काळची राजधानी तंडा येथें सैय्यद खाँ राहात होता. याच वेळीं मानसिंहानें युद्धाला निघण्याच्या हेतूनें सैन्य घेऊन वर्धमान येथें आम्हांला येऊन भेट, असें सय्यदखांला लिहिलें होतें.

वर्धमान येथें राजा मानसिंह येऊन पाहातो तों सैय्यदखां आलेला नव्हता. मात्र त्याच्या कडून एक दूत आला होता व त्याच्या हातीं निरोप आला होता कीं सैन्याची वगैरे तयारी करून येण्यास थोडा विलंब लागेल. तोंपर्यंत पावसाळा सुरू होईल. तेव्हां पावसाळा संपेपर्यंत राजेसाहेबांनीं कोठें तरी सुस्थळीं छावणी करून राहावें. पावसाळा संपतांच मी फौज घेऊन येतों. राजानें त्याच्या सांगण्याप्रमाणें दारुकेश्वराजवळ छावणी केली, आणि सैय्यदखांची वाट पाहत तो बसला.

तेथें छावणी करून मानसिंह राहिला असतां लोकांकडून कळलें कीं कतलूखानाला त्यांची दिरंगाई पाहून मोठी हिंमत वाटली आणि मांदारणापासून जवळच तो सैन्य घेऊन आला असून लूटमार करीत आहे. तें ऐकून राजाचें चित्त उद्विग्न झालें, आणि शत्रूचें बळ किती आहे आणि त्याचा बेत काय आहे वगैरे गोष्टींची बातमी काढणें योग्य जाणून त्या कामावर एका मोठ्या सेनापतीची योजना करण्याचें त्यानें ठरविलें. मानसिंहाबरोबर त्याचा प्रिय पुत्र जगत्सिंह हाहि लढाईवर निघाला होता. जगत्सिंहाचीहि धाडसाचें काम अंगावर घेण्याची उत्सुकता दिसल्यावरून मानसिंहानें बरोबर शंभर घोडेस्वारांची तुकडी देऊन त्यालाच शत्रूच्या छावणीकडे पाठविलें. राजकुमार लवकरच ही कामगिरी उरकून परत

जाण्यास निघाला होता. तो कामगिरी संपवून आपल्या छावणीकडे परत जात असतांना वाटेंत मैदानांत वाचकांशीं त्याचा परिचय झालाच आहे.

---

प्रकरण चवथें.

## नवा सेनापति.

शैलेश्वराच्या मंदिरांतून निघून आपल्या पित्याच्या छावणींत जगत्‌सिंह जाऊन पोहोंचल्यावर महाराज मानसिंह यास पुत्राच्या सांगण्यावरून कळलें कीं, पन्नास हजार पठाणांची फौज धरपुर या गांवाजवळ छावणी करून राहिली आहे, आसपासचीं गांवें लुटीत आहे, ठिकठिकाणीं नवे किल्ले बांधीत आहे, आणि जुने किल्ले ताब्यांत घेऊन बंदोबस्तानें राहिली आहे. ही बातमी ऐकून मानसिंहाला वाटलें कीं, पठाणांच्या या दुर्वर्तनाला आळा घालून लवकरच त्यांचा मोड केला पाहिजे. पण हें काम फार दुष्कर होतें. म्हणून त्यानें पुढील बेत ठरविण्यासाठीं आपल्या बरोबरच्या सर्व सेनापतींना एकत्र बोलावून त्यांना सर्व हकीकत सांगितली, आणि म्हटलें कीं ' दिवसेंदिवस गांवामागून गांव व परगण्यामागून परगणे दिल्लीच्या बादशाहाच्या अमलांतून जात आहेत. आतां पठाणांची गय करून चालावयाचें नाहीं. पण त्यांचें पारिपत्य कसें करतां येईल? ते किल्ल्याच्या आश्रयानें लढतील. युद्धांत त्यांचा पराभव आपण केला, तरी त्यांचा नाश करणें किंवा त्यांना किल्ल्यांतून हुसकावून लावणें आपणास दुष्कर आहे. अर्थातच ते किल्ल्यांत निर्भयपणें राहूं शकतील. सर्व बाजूंनीं पाहिलें म्हणजे असें दिसतें कीं, जर शत्रूंनीं युद्धांत आपला पराजय केला, तर आपण निराश्रित होऊन त्यांच्या हातांत पडूं आणि सर्वस्वीं नाश पावूं. म्हणून असल्या भलत्याच हिंमतीवर विश्वास टाकून बादशहाच्या येवढया सैन्याचा नाश होऊं देणें आणि ओरिसा प्रांत जिंकण्याच्या आशेचा कायमचा नायनाट होऊं देणें अयोग्य होईल असें मला वाटतें. सैय्यदखांची वाट पहाणें योग्य आहे; पण तोंपर्यंत शत्रूंचें पारिपत्य करण्याचा कांहींतरी शीघ्र उपाय योजणें अवश्य आहे. या बाबतींत तुमची सल्ला काय आहे ? '

सर्व वृद्ध सेनापतींनीं एकमत होऊन सांगितलें कीं, सैय्यदखानाची वाट पहाणेंच योग्य. तेव्हां राजा मानसिंह म्हणाला, ' मला वाटतें कीं, सर्व सैन्याचा नाश होऊं न देतां एखाद्या हुशार सेनापतीला शत्रूवर पाठवावें हें बरें.'

तेव्हां एक वृद्ध मोगल सेनापति म्हणाला, 'सगळें सैन्य पाठवून हें कार्य सिद्ध होण्याची जेथें शंका वाटते, तेथें थोडेंसें सैन्य पाठवून काय उपयोग होणार ?'

मानसिंह म्हणाला, 'या थोड्याशा सैन्यानें शत्रूवर चालून जावें, असें माझें म्हणणें नाहीं. त्यानें कुठें तरी दबा धरून राहावें,आणि गांवांची लूट करणाऱ्या पठाण सैन्याच्या लहान लहान तुकड्यांवर दहशत बसवावी. हें त्यांना करितां येईल.'

हें ऐकून तो मोगल म्हणाला, 'महाराज ! जाणूनबुजून काळाच्या जाभाड्यांत उडी घालण्याला कोणता सेनापति तयार होईल ? '

यावर मानसिंह भिवया वर चढवून म्हणाला, 'काय ? इतक्या रजपूतांतून आणि मोगलांतून मृत्यूला न भिणारा एकहि माणूस नाहीं काय ? '

हें ऐकतांच पांचसात मोगल व रजपूत उठून म्हणाले, 'महाराज! हे आम्ही सेवक जाण्यास तयार आहों.' या पांचसात जणांत जगत्सिंहहि होता. तो सर्वांत वयानें लहान होता. तरी तो म्हणाला, 'हुकूम होईल तर मीही कामगिरी करण्यास तयार आहें.'

राजा मानसिंह हंसून म्हणाला, 'तुमच्यासारखे बहादर काय करणार नाहींत ? मोगल व रजपूत हीं नावें अजून बुडालीं नाहींत, हें मला आज कळलें. तुम्ही सगळे ही कठीण कामगिरी करण्यास पुढें झालां आहां, तेव्हां कोणाला पाठवावयाचें आणि कोणाला मागें ठेवावयाचें ?'

यावर एकजण हंसून म्हणाला, 'महाराज ! ही कामगिरी करण्यास अनेक जण तयार झाले आहेत ही चांगली गोष्ट आहे. याच्यायोगानें सेनेचा व्यय कमी करतां येईल. जो सर्वांपेक्षां कमी सैन्य घेऊन या कामगिरीवर जाण्यास सिद्ध होईल त्यालाच हें काम देण्यांत यावें.'

राजा म्हणाला, 'ही सल्ला उत्तम आहे.' नंतर त्यानें पहिल्या नंबरच्या योद्ध्याला विचारलें कीं, 'तुम्हांला किती सैन्य पाहिजे ?' तो म्हणाला, 'पंधरा हजार पायदळ.' यावर राजा म्हणाला, 'या छावणींतून पंधरा हजार माणसें गेल्यावर तळावर फारशीं माणसें शिल्लक राहणार नाहींत. दहा हजार फौज घेऊन जाण्यास कोणी तयार आहे काय ?'

यावर सर्व सेनापति गप्प बसले. अखेर राजाच्या प्रीतींतला यशवंतसिंह नांवाचा एक रजपूत वीर होता, त्यानें उभे राहिलेल्या सेनापतींना राजाची आज्ञा मान्य करण्याविषयीं विनविलें. राजा सर्वांकडे आनंदित चित्तानें पाहूं लागला. कुमार जगत्सिंह हा तर राजाची दृष्टि आपल्याकडे केव्हां वळते त्याची वाट

पहातच उभा होता. ती दृष्टि वळतांच तो नम्रपणानें म्हणाला, 'महाराज! आपली कृपादृष्टि होईल तर हा दास पांचच हजार फौज नेऊन तिच्या साहाय्यानें कतलूखानाला सुवर्णरेखा नदीच्या पार घालवून येईल.'

तें ऐकून राजा मानसिंह आश्चर्यानें अगदीं थक्क झाला. सेनापति एकमेकांच्या कानांत कुजबुजूं लागले. थोड्या वेळानें राजा म्हणाला, 'कुमार! तूं रजपूतकुळाचें भूषण आहेस हें मी जाणतों. पण तुझें आत्तांचें हें धाडस वाजवीपेक्षां जास्त आहे.'

जगत्सिंह हात जोडून म्हणाला, 'जर केलेली प्रतिज्ञा पार न पाडतां बादशहाचें सैन्यबळ कमी करून मी परत आलों तर महाराज करतील ती शिक्षा मी भोगीन.'

यावर थोडा वेळ विचार करून मानसिंह म्हणाला 'रजपुतांच्या कुलधर्माचें आचरण करण्याच्या तुझ्या इच्छेच्या आड मी येणार नाहीं. तूंच या कामगिरीवर जा.'

इतकें बोलून व नेत्रांत अश्रु आणून राजानें कुमाराला दृढालिंगन दिलें, आणि त्याची रवानगी केली. सेनापतिहि आपापल्या तळाला निघून गेले.

---

## प्रकरण पांचवें.

# मांदारणगड.

ज्या मार्गानें विष्णुपुर प्रदेशांतून जहानाबादेकडे जगत्सिंह परत जात होता, त्या मार्गाच्या खाणाखुणा अद्याप आहेत. त्याच्या थोडेसें दक्षिणेला मांदारण नांवाचें गांव आहे. हल्लीं तें गांव अगदीं लहान आहे; पण त्याकाळीं तें एक मोठें शहर होतें. ज्या स्त्रियांशीं जगत्सिंहाची मंदिरांत गांठ पडली होती त्या स्त्रिया मंदिरांतून निघाल्यानंतर याच गांवाकडे जाण्यास निघाल्या होत्या.

या मांदारण गडावर कांहीं जुने किल्ले होते, व त्यावरूनच त्याला तें नांव मिळालें होतें. या नगरांतून आमोदर नांवाची एक नदी वाहत गेली होती. एका ठिकाणीं या नदीनें इतकें वाकण घेतलें होतें कीं त्यामुळें जवळच्या जमिनीच्या एका त्रिकोणाकृति भागाला दोन्ही बाजूंनीं वेष्टिल्यासारखें झालें होतें. तिसऱ्या बाजूला एक मनुष्यनिर्मित खंदक होता. या त्रिकोणाकृति भूमीच्या पुढल्या

बाजूस जेथें नदीच्या वळणाला आरंभ झाला होता, तेथें पाण्याच्यावर एक मोठा गगनचुंबी किल्ला होता. किल्ल्यांतल्या उंच हवेल्या खालपासून वरपर्यंत काळ्या पाषाणानें बांधिलेल्या होत्या. दोन्ही बाजूंनीं नदीचा जोरदार प्रवाह किल्ल्याच्या पायथ्यावर आघात करीत होता. अजून मांदारणगांवांत या किल्ल्याचे अवशेष पाहण्यास सांपडतात. किल्ल्याचा खालचा भाग तेवढा हल्लीं पाहण्यास मिळतो. हवेल्या काळाच्या कठोर हस्तस्पर्शानें धुळीस मिळाल्या आहेत. त्यांच्या-वर चिंच, माधवी, प्रभृति वृक्ष व लता वाढून मोठाले भुजंग, अस्वलें, इत्यादि हिंस्र प्राण्यांचें तें आश्रयस्थान झालें आहे. नदीपलीकडे दुसरेहि कित्येक किल्ले होते.

बंगालच्या पठाण बादशहांच्या पैकीं अग्रगण्य असा जो हुसेनशहा त्याचा विख्यात सेनापति इस्माइल गाजी यानें हा किल्ला बांधला. पण कालक्रमानें जयध-रसिंह नांवाच्या एका हिंदु सरदाराला तो जहागीर म्हणून मिळाला होता. या जयधरसिंहाचा एक वंशज वीरेंद्रसिंह हा या काळीं तेथें राहत होता.

वीरेंद्रसिंहाच्या तारुण्यकाळीं त्याचें व त्याच्या बापाचें नीटसें पटत नव्हतें. वीरेंद्रसिंह स्वभावानें गर्विष्ठ आणि उतावळा होता. तो बापाचें ऐकत नसे. त्यामुळें त्यांच्यांत नेहमीं भांडणें होत. मुलाच्या लग्नासाठीं त्या वृद्ध जमीनदारानें जव-ळच्या आपल्या जातीच्या एका जमीनदाराची कन्या नेमस्त केली होती. त्या मुलीच्या बापाला पुत्र नसल्यामुळें त्याची संपत्ति वीरेंद्राकडेसच येणार होती. मुलगीहि सुस्वरूप असल्यामुळें हा विवाहसंबंध त्या वृद्धाच्या दृष्टीनें फार पसंत होता, आणि तो विवाहाच्या तयारीलाहि लागला होता. पण वीरेंद्राला तो संबंध न आवडून त्यानें त्याच गांवच्या एका निपुत्रिक, दरिद्री विधवा स्त्रीच्या मुलीशीं आपला विवाह अगोदरच उरकून घेतल्यामुळें हा द्वितीय संबंध करण्याचें त्यानें नाकारलें. वृद्धाला हें कळतांच त्यानें संतापून मुलाला घरांतून काढून दिलें. घरांतून बाहेर पडल्यावर लष्करांत नोकरी शोधण्यासाठीं तो दिल्लीला गेला. त्याची पत्नी त्या वेळीं गरोदर असल्यामुळें तिला बरोबर नेतां आलें नाहीं. ती आपल्या आईपाशीं झोपडींतच राहात असे. इकडे पुत्र देशांतराला गेल्यावर त्या वृद्ध जमीनदाराचें अंतःकरण पुत्रविरहामुळें व्याकुळ होऊं लागलें. पश्चात्ताप होऊन तो पुत्राचा शोध करूं लागला. पण त्या प्रयत्नांत त्याला यश आलें नाहीं. पुत्राला परत आणतां आलें नाहीं, तेव्हां त्याच्याबद्दल सुनेला त्यानें

तिच्या दरिद्री आईच्या घरून मोठया आदरानें आपल्या घरीं नेलें. यथाकालीं तिला एक कन्या झाली. त्यानंतर मुलीची आई लवकरच वारली.

वीरेंद्र दिल्लीला पोहोंचल्यावर त्यानें मोगल बादशाहाच्या रजपूत सैन्यांत नोकरी धरली. आणि तेथें आपल्या अंगच्या गुणांच्या जोरावर तो मोठ्या हुद्याला चढला. वीरेंद्रसिंहानें थोड्या वर्षांत उत्तम कीर्ति व पुष्कळ धन संपादन केलें. इतक्यांत पित्याच्या निधनाची वार्ता त्याला कळली, तेव्हां आतां परदेशांत राहण्याचें व दुसऱ्याची ताबेदारी करण्याचें कारण नाहीं, असें पाहून तो आपल्या घरीं परत आला. त्याच्याबरोबर दिल्लीहून पुष्कळ आश्रित माणसें आलीं होतीं. त्यांत एक दासी व एक परमहंस हीं होतीं. या कथानकांत या दोहोंचा संबंध येणार असल्यामुळें त्यांचा परिचय येथें करून देणें अवश्य आहे. दासीचें नांव विमला आणि परमहंसाचें नांव अभिराम स्वामी अशीं होतीं.

विमला घरांतलें काम काज—विशेषतः विरेंद्राच्या कन्येचें लालनपालन व तिचें रक्षण–करीत असे. याशिवाय तिला किल्ल्यांत राहण्याला दुसरें कांहीं कारण दिसत नव्हतें, म्हणूनच तिला आम्ही दासी म्हटलें आहे. वस्तुतः दासीचें कांहीं एक लक्षण तिच्या ठायीं नव्हतें. ती घरांत यजमानिणीप्रमाणें राहात असे, आणि नोकरचाकरहि तिला तसाच मान देऊन तिच्या आज्ञेंत राहत. तिच्या मुद्रेवरून तारुण्यांत ती अतिशय सुंदर असावी असें दिसत होतें. तिच्या सौंदर्याची प्रतिभा तिच्या पोक्तवयांतहि पहांटच्या चंद्राच्या प्रभेसारखी दिसत असे. गजपतीविद्यादिग्गज नांवाचा अभिरामस्वामीचा एक शिष्य होता. त्याची अलंकारशास्त्रांत कितीशी गति होती हा प्रश्न निराळा; पण जेथें तेथें आपली रसिकता प्रकट करण्याची इच्छा मात्र त्याच्या ठायीं प्रबल होती एवढी गोष्ट खरी. तो विमलेला पाहून म्हणे, ‘ भांड्यांत ठेविलेल्या तुपासारखी हिची स्थिति आहे. मदनाग्नि जसजसा थंड होत जातो, तसतसें हिचें शरीर दृढ बनत जातें. ’ येथें हें सांगणें योग्य आहे कीं, ज्या दिवशीं गजपतीनें असें बोलून प्रथमच आपली रसिकता प्रकट केली होती, त्याच दिवशीं विमलेनें त्याचें नांव ‘ रसिकदास स्वामी’ असें ठेविलें होतें.

हावभाव खेरीज करून विमलेची चालचलणूक आणि वाक्चातुर्य इतकें सभ्य होतें कीं तसें एखाद्या दासीच्या ठायीं सांपडणें असंभवनीयच होतें. पुष्कळ लोक तर असें म्हणत कीं, विमलेनें मोगल बादशहाच्या अंतःपुरांत बराच काळ काढला

असला पाहिजे. त्यांत कितपत सत्यांश होता तें एक विमलेलाच ठाऊक ! ती कधीं त्यासंबंधानें तोंडांतून शब्द काढीत नसे.

विमला सवाष्ण होती कीं विधवा होती, कोणास ठाऊक ? ती अंगावर दागिने घालीत असे व एकादशी करीत नसे. तिचें एकंदर आचरण सुवासिनी स्त्रीप्रमाणें होतें.

दुर्गेशनंदिनी-तिलोत्तमा-हिच्यावर तिचें मनापासून भारी प्रेम होतें. याबद्दलचा परिचय मंदिरांतल्या गोष्टीसंबंधानें लिहितांना आम्हीं करून दिलाच आहे. तिलोत्तमाहि विमलेवर तसेंच प्रेम करीत असे. वीरेंद्रसिंहाच्या निकटचें दुसरें माणूस म्हणजे अभिरामस्वामी. तो नेहमीं किल्लयांतच राहत असेअसें नाहीं. मधून मधून देशपर्यटनालाहि जात असे. एक दोन महिने किल्लयांत राहावें, एक दोन महिने देशपर्यटनांत घालावे, असें चाललें असे. नोकरचाकर व इतर लोक यांची अशी समजूत झाली कीं हा स्वामी वीरेंद्राचा दीक्षागुरु असावा. वीरेंद्रसिंहहि त्याचा चांगला मान राखीत असे, यावरून तशी समजूत होणें संभवनीय होतें. इतकेंच नव्हे, तर तो कोणत्याहि प्रापंचिक गोष्टीसुद्धां स्वामीच्या सल्लयावांचून करीत नसे, आणि गुरुजींनीं दिलेली सल्लामसलत सफळहि होत असे. अभिरामस्वामी हा मोठा दूरदर्शी आणि तीक्ष्णबुद्धीचा मनुष्य होता. स्वतःच्या धर्मकर्मांत तत्पर राहून प्रापंचिक गोष्टींत षड्रीपूंचें दमन करण्याचाहि अभ्यास त्यानें केला होता. त्यामुळें प्रसंगविशेषीं रागक्षोभादिकांचें दमन करून शांतचित्तानें एकाद्या गोष्टीचा सर्व बाजूंनीं विचार त्याला करतां येत असे. यामुळें अशा प्रसंगीं मानी व उतावळ्या स्वभावाच्या वीरेंद्रसिंहाच्या मसलतीपेक्षां स्वामीचीच मसलत जास्त फलप्रद व्हावी यांत नवल काय ?

विमला व अभिरामस्वामी यांच्याशिवाय आस्मानी नांवाची एक दासी वीरेंद्राबरोबर आली होती.

---

## प्रकरण सहावें.

# अभिरामस्वामींची सल्ला.



तिलोत्तमा व विमला या दोघीजणी शैलेश्वराच्या मंदिरांतून निघून निर्विघ्नपणें किल्लयांत जाऊन पोंचल्या. त्यानंतर तीन चार दिवसांनीं एकदां वीरेंद्र-

सिंह आपल्या दिवाणखान्यांत गादीवर बसला होता, इतक्यांत अभिरामस्वामी तेथें आले. वीरेंद्रसिंहानें त्यांना उत्थापन देऊन नमस्कार केला. स्वामी वीरेंद्रानें हातानें दाखविलेल्या कुशासनावर बसले. स्वामीच्या आज्ञेनें वीरेंद्रहि आपल्या गादीवर बसला. नंतर स्वामी म्हणाले, 'वीरेंद्रा ! आज तुला कांहीं विशेष सांगावयाचें आहे.'

**वीरेंद्र**—आज्ञा व्हावी, महाराज !

**अभिराम०**—आतांशीं मोंगल व पठाण यांच्यामध्यें तुमुल युद्ध जुंपलें आहे.

**वीरेंद्र**—होय. पण कांहीं विशेष गोष्ट घडून येण्याचा संभव दिसतो कीं काय ?

**अभि०**—तूं काय विचार ठरविला आहेस ?

वीरेंद्रानें गर्वानें उत्तर केलें, 'शत्रू चालून आलाच तर मी या बाहुबळानें त्याला माघारा लावीन.'

यावर परमहंस सौम्यस्वरानें म्हणाले, 'वीरेंद्र ! तुझ्यासारख्या वीराला उचित तेंच तूं उत्तर केलेंस; पण हें पहा, केवळ वीरत्वानेंच जयलाभ नेहमीं घडत नसतो. वेळप्रसंग पाहून तदनुरूप तह किंवा लढाई करण्यावर पुष्कळ वेळां जयप्राप्ति अवलंबून असते. तूं स्वतः वीरांत अग्रगण्य आहेस; पण तुझ्याजवळ एक हजारापेक्षां अधिक फौज नाहीं. एक हजार फौजेनिशीं लढून शतपटीनें अधिक फौज असलेल्या शत्रूला मागें हटविणें कोणत्या वीराला शक्य आहे ? मोगल व पठाण दोघेहि तुझ्यापेक्षां शतपटीनें बलवान् आहेत. तेव्हां कोणत्या-तरी एका पक्षाचें साह्य घेतल्यावांचून दुसऱ्या पक्षापासून स्वतःचा बचाव कर-ण्यास तूं समर्थ होणार नाहींस. माझ्या बोलण्याचा राग मानूं नकोस. शांत मनानें नीट विचार करून बघ. दुसरी गोष्ट अशी कीं दोन्ही पक्षांशीं वैर कर-ण्याचें तुला काय प्रयोजन आहे ? शत्रु म्हटला म्हणजे तो दुष्टच असावयाचा. तेव्हां दोन शत्रू असण्यापेक्षां एकच शत्रु असलेला चांगला कीं नाहीं, तूंच सांग ? म्हणून मी म्हणतों कीं कोणत्या तरी एका पक्षाला मिळावें हें योग्य आहे.'

यावर वीरेंद्र बराच वेळ स्तब्ध राहिला. नंतर तो म्हणाला, 'कोणत्या पक्षाला मिळावें असें आपलें म्हणणें आहे ?'

**अभि०**—'यतो धर्मस्ततो जयः.' ज्या पक्षाला मिळण्यांत कोणताहि अधर्म घडत नसेल त्याला जाऊन मिळावें. राजद्रोह हें पाप आहे. तेव्हां राजपक्षच तूं स्वीकार.

वीरेंद्रानें पुनः क्षणमात्र विचार करून म्हटलें, 'पण राजा तरी कोण म्हणावा ? कारण, मोगल काय कीं पठाण काय, दोघेहि राजत्व मिळविण्यासाठींच लढत आहेत.'

**अभि०**—जो करभार घेतो तो राजा.

**वीरेंद्र०**—म्हणजे कोण ? अकबरशाहा ?

**अभि०**—अर्थातच.

हें ऐकून वीरेंद्रानें अप्रसन्न चर्या केली. हळूहळू त्याचे नेत्र आरक्त दिसूं लागले. त्याचा रागरंग पाहून अभिरामस्वामी म्हणाले, 'वीरेंद्र ! राग आवरून धर, दिल्लीच्या बादशहाला मिळण्याविषयीं मी बोलत आहें, मानसिंहाला मिळण्यास सांगत नाहीं.'

आपला उजवा हात स्वामींच्या पायासमोर ठेऊन व डाव्या हाताची तर्जनी हवेंत मागें पुढें करीत वीरेंद्र म्हणाला, 'आपल्या चरणकमलांच्या आशिर्वादानें हा हात मानसिंहाच्या रक्तांत भिजवीन म्हणतों.'

**अभि०**—शांत हो, असा क्रोधांध होऊन आपलें कार्य बिघडवूं नकोस. मानसिंहानें पूर्वी केलेल्या अपराधाबद्दल त्याला अवश्य शिक्षा कर; पण त्यासाठीं अकबरशहाशीं युद्ध कशाला करायला पाहिजे ?

वीरेंद्र रागानें म्हणूं लागला, 'अकबरशहाचा पक्ष स्वीकारला म्हणजे त्याच्या सेनापतींपैकीं कोणाच्या तरी हाताखालीं राहून लढावें लागेल ना ? कोणा योद्धयाला मदत करायची ? कोणाच्या तंत्रानें चालावयाचें ? मानसिंहाच्या ? गुरुमहाराज ! हा देह आहे तोंपर्यंत हें काम या वीरेंद्राच्या हातून कदापि होणार नाहीं.'

हें ऐकून अभिरामस्वामी अगदीं खिन्न होऊन स्तब्ध बसले. थोड्या वेळानें त्यांनीं म्हटलें, 'तर मग काय पठाणांना मदत केल्यानें तुझें कल्याण होईल ?

**वीरेंद्र०**—असा भेदभाव करण्यांत कांहीं लाभ आहे काय ?

**अभि०**—होय. त्यांतच लाभ आहे.

**वीरेंद्र०**—तर मग पठाणांना मदत करावी हेंच श्रेयस्कर म्हटलें पाहिजे.

अभिरामस्वामी लांब सुसकारा सोडून पुनः स्तब्ध झाले. त्यांच्या डोळयांत अश्रुबिंदु उमे राहिले. तें पाहून वीरेंद्राला अमर्याद विस्मय वाटला. तो म्हणाला, ' गुरुमहाराज ! क्षमा करावी. माझ्या हातून अज्ञानवशात् कांहीं अपराध घडला आहेसें दिसतें. आज्ञा व्हावी. '

अभिरामस्वामी अंगावरील वस्त्रानें डोळे पुशीत पुशीत म्हणाले, ' ऐकतर मग. मी आज कित्येक दिवस ज्योतिःशास्त्राप्रमाणें गणित करून पाहत आहें. तुझ्यापेक्षां तुझी कन्या माझ्या स्नेहाला अधिक पात्र आहे, हें तुला ठाऊकच आहे. तिच्याच संबंधाचें गणित मीं पुष्कळ प्रकारें केलें आहे. '

हें ऐकून वीरेंद्राची चर्या फिक्की पडली. त्यानें आग्रह करून स्वामीला विचारलें, ' गणितावरून आपणाला काय आढळून आलें महाराज ?'

**अभि०**—मोगल सेनापतीच्या हातून तिचें फार अमंगल होणार आहे.

हें ऐकून तर विरेंद्रसिंहाचें तोंड काळें ठिक्कर झालें. अभिरामस्वामी पुढें म्हणाले, ' तूं मोगलांच्या विरुद्ध पक्षाला मिळण्यानेंच त्यांच्या हातून तिचें अमंगल होईल. त्यांच्याच पक्षांत राहिल्यानें तें होण्याचा संभव नाहीं. यासाठींच मोगलांच्या पक्षाला मिळण्याविषयीं मीं येवढा आग्रह केला. या गोष्टी तुला सांगून तुझ्या मनाला व्यर्थ दुःख देण्याची माझी इच्छा नव्हती. मनुष्याचा यत्न विफल आहे. दैवांत लिहिलें असतें तें चुकत नाहीं. तसें नसतें तर तूं तरी येवढा हट्ट धरून कां बसला असतास ?'

वीरेंद्रसिंह मौन धरून बसला होता. अभिरामस्वामी म्हणाले, ' वीरेंद्र ! बाहेर दरवाज्यावर कतलूखानाचा दूत येऊन उभा आहे. त्याला पाहतांच मी तुझ्याकडे आलों. मीं मना केल्यामुळेंच द्वारपाळानें त्याला आंत तुझ्याकडे आणिलें नाहीं. आतां माझें बोलणें संपलें. दूताला आंत बोलावून योग्य तें उत्तर दे. '

वीरेंद्रानें सुसकारा टाकून व वर मान करून म्हटलें, ' गुरुमहाराज ! जोंपर्यंत तिलोत्तमा माझ्या दृष्टीला पडली नव्हती तोंपर्यंत ती माझी कन्या आहे या गोष्टीचें स्मरणसुद्धां मला होत नसे, आणि आतां तिच्याशिवाय या जगांत मला आपलें असें कोणी नाहीं. आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे. आजपासून मी मागचें सगळें विसरून मानसिंहाचा अनुयायी होईन. ' ' चोपदार ! दूताला इकडे घेऊन ये. '

आज्ञेप्रमाणें चोपदारानें दूताला त्याच्याकडे नेलें. दूतानें कतलूखानाचें पत्र वीरेंद्राच्या हातीं दिलें. पत्रांतल्या मजकुराचा सारांश येवढाच होता कीं वीरेंद्रसिंहानें एक हजार घोडेस्वार व पांच हजार मोहोरा पठाणांच्या छावणींत पाठवून द्याव्या. नाहींतर कतलूखानाचें वीस हजार लष्कर मांदारणगडावर चाल करून येईल.

वीरेंद्रानें पत्र वाचून म्हटलें, 'दूता ! तूं आपल्या धन्याला जाऊन सांग कीं फौज पाठवून द्यावी.' यावर दूत मुजरा करून निघून गेला.

विमलेनें ही सारी हकीकत आड्न ऐकली होती.

---

## प्रकरण सातवें.

# बेसावधगिरी.



किल्ल्याच्या ज्या भागाच्या तटाजवळून आमोदर नदी खळखळ आवाज करीत वाहत जात होती, त्याच बाजूच्या एका खिडकींत बसून तिलोत्तमा नदींतल्या भोंवऱ्याकडे टक लावून पाहत होती. संध्याकाळ होत चालली होती. पश्चिमेकडील आकाश भागांत सूर्य अस्ताला जात होता; आणि त्याच्या म्लान किरणामुळें मेघांवर सोन्यासारखी कांति झळकत होती. त्या मेघांसहित एकंदर आकाशाचें प्रतिबिंब खालीं नदीच्या प्रवाहांत पडल्यामुळें तें कंपित झालेलें दिसत होतें. नदी पलीकडच्या उंच हवेल्या व उंच उंच वृक्ष निर्मळ आकाशपटावर काढलेल्या चित्रांसारखे दिसत होते. किल्ल्यांत मोर, सारस इत्यादि पक्षी प्रफुल्लित चित्तानें आवाज करीत होते. कोठें कोठें अंधार पडूं लागल्यामुळें आपापलीं घरटीं शोधण्याच्या कामांत गुंतलेले पक्षी आकाशांत मुकाट्यानें उडत होते. उष्णकाळचा वारा आमोदर नदीच्या पाण्यावरून येतांना शीतल होऊन आम्रवृक्षांना डोलण्यास लावीत होता आणि तोच तिलोत्तमेच्या कुरळ केसांना व खांद्यावरच्या वस्त्राला लीलेनें उडवीत होता.

तिलोत्तमा सुंदर होती. वाचकहो ! तिच्या सुंदर स्वरूपाशीं तुमचा परिचय करून द्यावा अशी माझी इच्छा आहे. पण हें काम कोणत्या प्रकारें करतां येईल ? वाचकहो ! तुम्ही कधीं आपल्या तारुण्याच्या काळांत स्थिर, धीर, कोमल प्रकृति

किशोरीच्या अंगीं नुकतेंच संचरूं लागलेलें लावण्य, प्रेम दृष्टीनें पाहिलें आहे काय ? असें लावण्य एकदां पाहिलें म्हणजे साऱ्या जन्मांत त्याच्या माधुर्याचें विस्मरण कधीं घडत नाहीं. किशोरपणांत, तारुण्यांत, प्रौढावस्थेंत, कामकाज करीत असतांना, विश्रांतीच्या वेळीं, जागृतींत, झोपेंतहि पुनः पुनः त्या मन-मोहिनीची मूर्ति स्मृतिपथावरून ये जा करीत असते; पण तिच्यासंबंधानें केव्हांहि चित्तांत घाणेरडी इच्छा उत्पन्न होत नाहीं. अशी एखादी तरुणी तुमच्या पाहण्यांत आहे काय ? जर असेल तर तिचें स्वरूप मनांत आणिल्यानें तिलोत्त-मेच्या स्वरूपाशीं तुमचा परिचय होईल. जी मूर्ति सौंदर्यप्रभेच्या प्राचुर्यानें मन प्रदीप्त करते, जी मूर्ति लीला लावण्याच्या व्यवस्थितपणानें हृदयांत सर्पानें विषदंत रोविल्याप्रमाणें तीव्र भावना उत्पन्न करते, त्या मूर्तीसारखी तिलोत्तमेची मूर्ति नव्हती. जी मूर्ति कोमलता, माधुर्यादि गुणांनीं चित्तवृत्ति प्रसन्न करते अशी तिची मूर्ति होती. संध्याकाळच्या वायूनें डोलणाऱ्या वसंतलतेप्रमाणें स्मृतीमध्यें डुलत राहणारी अशी तिची मूर्ति होती.

तिलोत्तमा सोळा वर्षांची होती. अर्थातच प्रौढवयाच्या स्त्रीच्या शरीरयष्टी-प्रमाणें तिचें शरीर अद्याप पूर्णपणें विकसित झालेलें नव्हतें. तिचा सुगठित, व सुगोल कपोलप्रांत फार विस्तीर्ण नव्हता, तसा फार आकुंचितहि नव्हता. रात्रीच्या चांदण्यानें उज्ज्वल दिसणाऱ्या नदीप्रमाणें तो तिचा शांत भाव प्रकट करीत होता. त्याच्या मागच्या बाजूस गाढ अंधकाराप्रमाणें कृष्णवर्णाचे व कुरळे केस भिंवयांवर, कपाळावर, गळ्यावर, खांद्यांवर, व उरावर पडलेले दिसत होते. डोक्याच्या मागच्या भागावरचे केस मोत्यांच्या गजऱ्यानें बांधलेले होते. कपा-ळाच्या खालच्या भागांत काळ्याभोर वर्णाच्या व वक्र भिंवया चित्रकारानें चित्रांत काढलेल्या भिंवयांपेक्षांहि बारीक होत्या. त्या आणखी सूतभर जाड असत्या तर अगदीं निर्दोष म्हटल्या गेल्या असत्या. वाचकहो ! चंचल नेत्र तुम्हांला आवडतात काय ? असतील तर तिलोत्तमा तुम्हांला चित्ताकर्षक वाट-णार नाहीं. तिचे नेत्र फार शांत होते. बिजलीच्या चमकेप्रमाणें चकित करून सोडणारे असे तिचे नेत्रकटाक्ष नव्हते. तिचे नेत्र मोठाले व स्थिर असून त्यांत शांतता झळकत होती. उषःकाळीं सूर्योदयाच्या किंचित् अगोदर चंद्राच्या अस्तसमयीं आकाशाचा जसा कोमल नीलवर्ण शोभायमान दिसतो, तसाच तिच्या नेत्रांचा वर्ण होता. अशा प्रशस्त व सुंदर नेत्रांनीं जेव्हां तिलोत्तमा पाही, तेव्हां तिच्या दृष्टींत कुटिलता बिलकुल नसे. तिरप्या किंवा अर्ध दृष्टीनें पाहणें

तिला ठाऊकच नव्हतें. तिच्या दृष्टींत केवळ सरळता व स्पष्टता असे. तिच्या दृष्टींत जशी सरलता होती तशी मनांतहि होती. तिच्याकडे कोणी टक लावून पाहूं लागतांच तिची ती कोमल दृष्टि तत्काळ खालीं पडे. मग खालीं जमिनीशिवाय दुसरीकडे ती पाहत नसे. तिच्या दोन्ही ओठांवर गुलाबी रंग झळकत होता, त्या ओठांवर थोडासा कंप, थोडेंसें फुरफुरणें व थोडेंसें हास्य विलसत होतें. तें स्मित ज्यानें एकदां पाहिलें, मग तो योगी असो, मुनि असो, तरुण असो, वृद्ध असो, कोणीहि असो, पुनः कधीं म्हणून विसरत नसे. आणि त्या मंद हास्यांत सरलता व बालिकाभाव यांशिवाय दुसरें कांहीं नव्हतें.

तिलोत्तमेच्या शरीराचा बांधा चांगला होता, तरी पूर्णता पावलेला नव्हता. ती वयानें लहान होती म्हणून म्हणा किंवा शरिराच्या स्वाभाविक रचनेमुळें म्हणा, पण तिच्या सुंदर शरिरांत क्षीणता होती. स्थूलतेचा गुण नव्हता. तसेंच तिच्या शरिराचा प्रत्येक भाग गोंडस व सुंदर होता. तिच्या गोंडस हातांत रत्नकंकणें होतीं. बाहूच्या ठायीं हिऱ्याचे बाजूबंद होते. हाताच्या करंगळींत अंगठी होती. कमरेच्या जागीं मेखला होती. स्कंधभागीं सुवर्णहार आणि कंठांत रत्नहार होता. सर्वांची घडण सुंदर होती.

तिलोत्तमा खिडकींत एकटी बसून काय बरें करीत आहे? संध्याकाळच्या आकाशाची शोभा पाहात आहे काय? तसें म्हणावें तर तिची दृष्टी खालीं भूतलाकडे कशी? नदीच्या कांठावरील फुलांच्या सुवासानें सुगंधित झालेल्या वायूचें सेवन करीत होती काय? तसें असेल तर तिच्या ललाटभागीं घर्मबिंदु कां दिसावे? तिच्या मुखाच्या एकाच बाजूला वारा लागत नव्हता. गाई चरत होत्या तिकडे तिची दृष्टि होती काय? तसें म्हणावें तर गाई हळू हळू घरीं जाऊं लागल्या होत्या. कोकिलेचा शब्द ऐकत होती काय? तसें म्हणावें तर तिची मुद्रा म्लान कां असावी? खरी गोष्ट ही होती कीं ती कांहींहि पाहात नव्हती किंवा ऐकत नव्हती. ती विचार करीत होती.

दासीनें दिवा लावून आणिला. तिलोत्तमा विचार करण्याचें सोडून हातांत एक पुस्तक घेऊन दिव्यापाशीं जाऊन बसली. तिला वाचतां येत होतें. अभिरामस्वामी जवळ तिनें संस्कृताचें अध्ययन केलें होतें. ती वाचीत होती तें कादंबरीचें पुस्तक होतें. थोडा वेळ वाचल्यावर कंटाळून तिनें तें पुस्तक टाकून दिलें. दुसरें एक पुस्तक घेतलें. हें पुस्तक म्हणजे सुबंधुची वासवदत्ता. ती थोडा

वेळ वाची, थोड वेळ विचार करी, पुनः वाची, पुनः विचार करी. वासवदत्तेच्याहि वाचनांत तिचें मन रमेना. मग तेंहि पुस्तक टाकून तिनें गीतगोविंद काव्य हातीं घेतलें. तें वाचतांना थोडा वेळ तिला बरें वाटलें. थोडेंसें लज्जायुक्त स्मित केलें, आणि तेंहि टाकून दिलें. मग कांहींएक न करतां ती बिछान्यावर स्वस्थ पडून राहिली. जवळ दौत व लेखणी होती. मी काय करीत आहें, याचें भान न राहून पलंगाच्या लाकडावरच ती क स म घर दार झाड मनुष्य, अशीं अक्षरें व शब्द लिहूं लागली. लिहितां लिहितां पलंगाची एक बाजू शाईनें लिहिलेल्या अक्षरांनीं भरून गेली, जेव्हां लिहायला जागा राहिली नाहीं, तेव्हां ती भानावर आली. तिचें तिलाच हसूं आलें. हंसत हंसत ती लिहिलेलें वाचूं लागली. तिनें असें काय लिहिलें होतें ? वासवदत्ता, महाश्वेता, क, इ, ई, प, एक झाड, शेंजुतीचा महादेव, गीत गोविंद, विमला, लता, पानें, गडबडगुंडा, गड, सर्वनाश. आणखी काय लिहिलें होतें ? तर

**'कुमार जगत्सिंह'**

लज्जेनें तिलोत्तमेचें मुख रक्तवर्ण झालें. वेडी कुठली ! घरीं कसली आली आहे लज्जा !

'कुमार जगत्सिंह !' हे शब्द तिनें दोनदां, तीनदां, पुष्कळ वेळां उच्चारले. दाराकडे पाहावें, आणि कोणीं नाहीं असें पाहून उच्चारावें, पुनः दाराकडे पहावें, पुनः उच्चारावें, असें चाललें होतें. जशी काय ती चोरीच करीत होती !

फार वेळ ते शब्द उच्चारण्याचा तिला धीर होईना. न जाणो, कोणीं पाहील अशी भीति तिला वाटली. म्हणून तिनें घाईघाईनें पाणी आणून लिहिलेलें सगळें धुऊन टाकिलें. धुतलें तरी तिच्या मनाची खात्री होईना म्हणून आपल्या वस्त्रानें तिनें तें खूप घासून पुसलें. अजून अक्षरें दिसत आहेत काय म्हणून तिनें पुनः पुनः पाहिलें. आतां मात्र शाईचें चिन्हसुद्धां दिसत नव्हतें. तरी अक्षरें वाचतां येतील कीं काय अशी तिला शंका वाटे. म्हणून पुनः पाणी आणून तिनें लिहिलेलें धुऊन काढलें, आणि वस्त्रानें पुसलें. तरी तिला वाटे कीं अजून

**'कुमार जगत्सिंह'**

हीं अक्षरें तेथें आहेतच.

---

## प्रकरण आठवें.

# विमलेची मसलत.



विमला अभिरामस्वामीच्या मठांत उभी होती. स्वामी जमिनीवर योगासन मांडून बसले होते. तिलोत्तमेची व आपली त्या दिवशीं मंदिरांत जगत्सिंहाशीं कशी गांठ पडली, त्याविषयींची हकीकत ती स्वामीला सांगत होती. ती हकीकत सांगून झाल्यावर विमला म्हणाली, 'आजचा चौदावा दिवस ! उद्यां पंधरवडा पुरा होणार !'

**अभि०**—मग तुम्ही काय ठरविलें आहे ?

**विमला**—त्याविषयीं आपली सल्ला घेण्यासाठींच तर मी आल्यें आहें !

**अभि०**—उत्तम. पण माझी सल्ला अशी आहे कीं त्या गोष्टीचा विचारच मनांत आणूं नये.

हें ऐकून विमला फार खिन्न झाली, आणि स्तब्ध उभी राहिली. स्वामींनीं विचारलें, 'खिन्न होण्याचें काय कारण ?'

**विमला**—तिलोत्तमेसंबंधानें काय उपाय योजावा ?

स्वामींनीं विस्मित होऊन विचारलें, 'म्हणजे ? तिलोत्तमेच्या मनांत प्रेमाचा संचार झाला आहे कीं काय ?

कांहीं वेळ स्तब्ध राहून विमलेनें उत्तर केलें, 'आपणाला किती सांगूं ? मी आज चौदा दिवस अहोरात्र तिच्याकडे बारीक नजरेनें पाहत आहें. मला तर वाटतें कीं तिच्या मनांत अतिशय गाढ प्रेमाचा संचार झाला आहे.'

परमहंसानें किंचित् हंसून म्हटलें, कोठें मनांत प्रेमाचें यत्किंचित् लक्षण दिसतांच 'तुम्हा स्त्रियांना वाटूं लागतें कीं तेथें गाढ प्रेम वसत आहे. विमले, तिलोत्तमेच्या मानसिक सौख्याविषयीं अशी चिंता करूं नकोस. तिचा बालस्वभाव अद्याप कायम आहे. त्यामुळें पहिल्याच नजरभेटीला तिचें मन चंचल झालें आहे. यासंबंधानें कोणीं कांहीं गोष्टच काढली नाहीं म्हणजे आपोआपच तिला जगत्सिंहाचें विस्मरण पडेल.'

**विमला**—छेः छेः ! महाराज ! तसें लक्षण दिसत नाहीं. एका पंधरवड्यांत तिच्या वृत्तींत केवढा विलक्षण फरक पडला आहे ! आतांशा ती माझ्याशीं किंवा

आपल्या मैत्रिणीशीं हंसत नाहीं कीं बोलत नाही. तिनें बहुधा बोलणेंच सोडलें आहे. तिचीं पुस्तकें पलंगाखालीं धूळ खात पडलीं आहेत. तिच्या आवडीचीं फुलझाडें पाण्यावांचून सुकून गेलीं आहेत. तिनें पाळलेल्या पक्ष्यांची विचारपूस सुद्धां ती करीत नाहीं. फार काय, पण तिनें स्वतः खाणेंपिणें सोडलें आहे. रात्रीं तिला धड झोंप देखील येत नाहीं. ती अंगाखांद्यावर दागदागिने घालीत नाहीं. ती कधीं विचारहि करीत नाहीं. अलीकडे तिचें चित्तच ठिकाणावर नाहीं. तिचें तोंड देखील काळवंडलें आहे.

हें ऐकून अभिरामस्वामी स्तब्ध बसले. थोड्या वेळानें म्हणाले, 'मला वाटलें होतें कीं नुसती दृष्टादृष्ट होतांच प्रेम निर्माण होत नसेल. पण स्त्रीचरित्र—विशेषतः बालिकाचरित्र—अगाध आहे. तें एक परमेश्वरच जाणे! पण आतां काय करावयाचें? वीरेंद्र या गोष्टीला कबूल होणार नाहीं.'

**विमला**—मलासुद्धां तीच शंका होती. म्हणून मी आतांपर्यंत ही गोष्ट कोणाजवळहि बोलल्यें नाहीं; पण आतां जर महाराज—

हें बोलतां बोलतां विमलेच्या वृत्तींत एकाएकीं पालट झाला. ती पुनः म्हणाली, 'आतां जर महाराज मानसिंहाशीं सख्य करतील तर जगत्सिंहाला जांवई करून घ्यायला कोणती हरकत आहे?'

**अभि०**—मानसिंह या गोष्टीला कबूल झाला पाहिजे ना?

**विमला**—न झाले तर युवराज स्वतंत्रच आहे!

**अभि०**—पण जगत्सिंह तरी वीरेंद्राच्या कन्येशीं कसा विवाह करील?

**विमला**—कुळशीलाबद्दलचें वैगुण्य दोन्ही पक्षांकडे नाहीं. जयधरसिंहाचे पूर्वजहि यदुवंशांतलेच होते.

**अभि०**—यदुवंशांतल्या कन्येनें मुसलमानाच्या श्यालकाची सून व्हावें काय?

विमला स्वामीकडे निश्चल दृष्टीनें पाहूं लागली. ती म्हणाली, 'कां होऊं नये? यदुवंश हलका का आहे?'

हे शब्द तिच्या तोंडून निघतांच स्वामीच्या नेत्रांतून जणूं काय अग्नीच्या ठिणग्या पडूं लागल्या. ते तिला कठोर स्वरानें म्हणाले, 'अग पापिणी! तूं आपल्या दुर्दैवाला कशी विसरलीस? चालती हो येथून!'

---

## प्रकरण नववें.

# कुलतिलक.

जगत्सिंह पित्याच्या चरणांचें वंदन करून सैन्यासह बाहेर पडल्यानंतर त्यानें जी कामगिरी बजाविली, तिच्यामुळें पठाणसैन्यावर चांगला दरारा बसला. त्यानें प्रतिज्ञा केली होती कीं पांच हजार सैन्यानिशीं निघून कतलुखानाच्या पन्नास हजार फौजेला सुवर्णरेखा नदीच्या पार हांकून लावीन. म्हणून त्यानें अशा युद्धरीतीचें अवलंबन केलें होतें कीं तिच्या योगानें शत्रूला प्रत्यक्ष तोंड न देतां कार्यसिद्धि तर व्हावी. त्यानें आपली छोटी फौज दबा धरून बसवावी. निबिड अरण्यांत किंवा समुद्राच्या लाटांप्रमाणें उंचसखल प्रदेशांत त्यानें अशा आड तळ द्यावा कीं जवळच्या टेकड्या आड येऊन अगदीं जवळच्या सुद्धां शत्रूला त्याची छावणी दिसूं नये. अशा गुप्तपणानें राहून जेव्हां पठाणांच्या लहान लहान टोळ्यांचा सुगावा लागे, तेव्हां त्याची फौज त्या टोळ्यांवर अचानक छापा घालून त्यांचा समूळ नाश करी. त्यानें पुष्कळ हेर ठेविले होते. त्यांनीं कोणी फळें, मुळें, मासे वगैरे विकणारांचे, किंवा भिकारी, बैरागी, ब्राह्मण, वैदू वगैरेंचे वेष घेऊन ठिकठिकाणीं फिरावें आणि पठाणांच्या हालचालींची बातमी मिळवून आणावी. ती मिळाल्याबरोबर जगत्सिंहानें अतिशय सावधगिरीनें व त्वरेनें अशा ठिकाणीं आपली फौज ठेवावी कीं पठाणांच्या फिरत्या टोळ्यांच्या नजरेस न पडतां त्यांच्यावर कुशलतेनें तुटून पडतां यावें. पठाणांची संख्या मोठी असेल तेव्हां जगत्सिंह त्यांच्यावर हल्ला करण्याचा उघड उघड प्रयत्न करीत नसे. कारण, तसें केल्यास एकाच लढाईत आपलें सारें सैन्य फस्त होईल हें तो पूर्णपणें जाणून होता. अशा वेळीं पठाणांच्या फौजेच्या मागें सावधगिरीनें राहून त्यांची रसद, घोडे, तोफा वगैरे तो लुटून आणीत असे. शत्रूची संख्या लहानच असली तर आपण रोंखून ठेविलेल्या स्थळापर्यंत शत्रु येऊन पोहोंचेपर्यंत तो दबा धरून बसे आणि मग योग्य वेळीं एखाद्या भुकेल्या वाघाप्रमाणें गर्जना करीत धावत येऊन तो पठाणांच्या फौजेचा सप्पा उडवीत असे. अशा वेळीं शत्रु आपल्या इतका जवळ आहे हें पठाणांस ठाऊक नसल्यामुळें अर्थात् त्यांची लढण्याची तयारी नसे. त्यामुळें ते शत्रूच्या तावडींत अचानक सांपडून लढाई न होतांच मृत्युमुखीं पडत.

अशा रीतीनें पठाणांचें बरेंचसें सैन्य मारलें गेलें. त्यामुळें ते घाबरून गेले आणि जगत्‌सिंहाच्या सैन्याचा नाश करण्याच्या प्रयत्नाला विशेष जोरानें लागले; पण तें सैन्य कोठें आहे याचा पत्ताच त्यांना लागेना. यमदूतांप्रमाणें पठाण-सैन्याच्या विनाशकाळीं तेवढें त्याचें दर्शन व्हावाचें आणि इतर वेळीं तें अंतर्धान पावावयाचें असें चाललें होतें. जगत्‌सिंह फार चतुर होता. त्यानें आपली पांच हजार फौज कधीं एके जागीं ठेवूं नये. कोठें हजार, कोठें पांचशें, कोठें दोनशें, कोठें दोन हजार अशा रीतीनें लहान लहान तुकड्या करून जशी शत्रूविषयींची बातमी लागेल त्याप्रमाणें तो लहान मोठी तुकडी पाठवीत असे. काम झाल्यावर तो ती तेथें ठेवीत नसे. रजपूत कोठें आहेत व कोठें नाहींत याचा पठाणांना पत्ताच लागेना. आज अमक्या ठिकाणीं आपल्या सैन्याचा नाश झाला, उद्यां तमक्या ठिकाणीं झाला, अशा सैन्याच्या बातम्या कतलूखानाला रोजच्यारोज येऊं लागल्या. सकाळीं, दोन प्रहरीं, संध्याकाळीं, जेव्हां पहावें तेव्हां अशा अमंगल बातम्या येत. शेवटीं कार्यसिद्धि तर बाजूलाच राहिली, पण जीव घेऊन किल्ल्याबाहेर पडूं म्हटलें तर तेंहि पठाणांना दुःसाध्य होऊन बसलें. त्यांचा लूटमार करण्याचा क्रम बंद पडला. फौजेनें किल्ल्याचा आश्रय केला. अन्नसामुग्री बाहेरून आणण्याचें काम मुष्किल झालें. शत्रूंनीं पीडलेला प्रदेश अशा प्रकारें हातांत आल्याची खबर ऐकून महाराज मानसिंह यानें आपल्या मुलास पत्र लिहिलें. तें असें–

'कुलतिलक ! पठाणांच्या हातून राज्याधिकार तूं काढून घेशील अशी आतां खात्री वाटते. म्हणून तुझ्या साह्यार्थ इकडून आणखी दहा हजार फौज पाठविली आहे.'

युवराजानें यावर उत्तर लिहिलें तें असें—

' महाराजांच्या मनोदयाप्रमाणें आणखी दहा हजार फौज आली तर उत्तमच आहे. न आली तरी वडिलांच्या चरणांच्या आशिर्वादानें हा दास पांच हजार फौजेनिशीं क्षत्रियकुलोचित प्रतिज्ञाप्रतिपालनाचें कर्तव्य शेवटास नेल्यावांचून राहणार नाहीं.'

कुमार वीरमदानें उन्मत्त होऊन अबाधितपणानें युद्धांत जय मिळवूं लागला. शैलेश्वरा ! तुझ्या मंदिरांत ज्या सुंदरीच्या सरल दृष्टीपुढें हा योद्धा पराभूत झाला होता, त्या सुंदरीची या लढाईच्या गडबडींत त्याला एकदांसुद्धां आठवण झाली नसेल काय ? जर नसेल तर जगत्‌सिंहहि तुझ्यासारखा पाषाणच म्हटला पाहिजे.

---

प्रकरण दहावें.

## मसलतीनंतर उद्योग.

ज्या दिवशीं अभिरामस्वामींनीं रागावून विमलेला आपल्या मठांतून बाहेर घालवून दिलें, त्याचे दुसरे दिवशीं संध्याकाळीं ती आपल्या खोलींत नीटनेटका पोषाख करीत बसली होती. पसतीस वर्षांच्या स्त्रीला चट्टापट्टा कशाला पाहिजे ? कां बरें ? तिनें तो कां करूं नये ? थोडें वय अधिक झालें म्हणजे काय तारुण्याची हौस जाते ? तारुण्याचा नाश रूपानें किंवा मनानें होत असतो. जिला रूप नाहीं ती विसाव्या वर्षीसुद्धां वृद्धा दिसते. जी सुस्वरूप असते ती पोक्तवयाची झाली तरी तरुणीच राहते. जी हौशी असते ती सर्वकाळ तरुणीच असते. विमलेच्या या वयांतहि तिचे अंगांत रूप उसळत होतें, आणि हौस मनांत मावत नव्हती. वयाच्या प्रौढपणाबरोबर तिची हौस परिपक्क होत गेली होती. ज्या वाचकांचें वय थोडेंसें प्रौढ झालें असेल ते ही गोष्ट खास कबूल करतील.

विमलेचें विडा खाऊन रंगलेलें तोंड पाहून ती तरुणी नाहीं असें कोण म्हणेल ? काजळ घातलेल्या तिच्या नेत्रांतून निघणारे कटाक्ष पाहून तिचें वय चोवीस वर्षांच्या पलीकडे गेलें आहे असें कोण म्हणेल ? काय तिचे ते नेत्र ! केवढे मोठाले, किती चंचल ! किती आवेशयुक्त ! कित्येक प्रगल्भयौवन स्त्रियांच्या डोळ्यांवरूनच त्या मोठ्या मानी व सुखाची लालसा धरणाऱ्या असाव्या असें दिसतें. विमलेचे नेत्र असेच होते. आम्ही वाचकांना खात्रीपूर्वक सांगतों कीं विमला ही तरुणी होती. तिला स्थिरयौवना म्हटलें तरी चाललें असतें. तिच्या चंपकवर्णत्वचेची कोमलता पाहिली म्हणजे ती सोळा वर्षांच्या तरुणीच्या त्वचेहूनहि कोमल आहे, असेंच कोणींहि म्हटलें असतें. तिच्या केसांची एक बट तिच्या कानावरून गालावर तिला नकळत पडली होती. ती पाहून ती तरुणीच्या केसांची बट तिच्या गालावर पडली आहे असें कोण म्हणणार नाहीं ? वाचकहो ! आपले मनश्चक्षु उघडून पहा. ती ज्या ठिकाणीं बसून केस साफसूफ करीत होती तें ठिकाण पहा. आपला विपुल केशगुच्छ डाव्या हातांत धरून व तो आपल्यासमोर आणून ज्या रीतीनें ती तो विंचरीत होती ती रीत पहा. मधून मधून वीणारवालाहि लाजविणाऱ्या मधुर स्वरानें ती गात

होती तें ऐका; आणि इतकें पाहून व ऐकून मग विमलेपेक्षां कोणती तरुणी तुमच्या मनाला अधिक मोहक वाटते तें सांगा.

विमलेनें केस विंचरले, पण वेणी घातली नाहीं. पाठीवर मोकळेच केस सोडले. उत्तम सुगंधित केलेल्या रुमालानें तिनें आपलें तोंड पुसलें. गुलाबी सुपारी व कापूर घातलेला विडा खाऊन तिनें आपले ओठ पुनः रंगविले, अंगांत मोत्यांची चोळी घातली. अंगावर सोन्याचे सगळे दागिने घातले. पुनः तिला काय वाटलें कोण जाणे, तिनें त्यांतले कांहीं काढून ठेविले. उत्तम नक्षीकाम केलेलें वस्त्र परिधान केलें. मोत्यें लाविलेले जोडे पायांत घातले आणि राजपुत्रानें दिलेला बहुमूल्य मुक्ताहार केसांत धारण केला.

याप्रमाणें पोषाख करून विमला तिलोत्तमेच्या महालांत गेली. तिला पाहून तिलोत्तमा चकित झाली आणि हंसून म्हणाली 'हें काय विमले ! आज हा काय थाटमाट केला आहेस ?'

**विमला**—तुला काय करायचें आहे त्याच्याशीं ?

**तिलोत्तमा**—खरें सांग तूं कोठें जायला निघाली आहेस ?

**विमला**—तुला कोणीं सांगितलें मी जायला निघाल्यें आहें म्हणून ?

तिलोत्तमेची बुद्धि कुंठित झाली. तिला लज्जित झालेली पाहून विमलेला तिची दया आली आणि ती थोडेंसें हंसून म्हणाली, 'मी फार दूर जाणार आहें.'

तिलोत्तमेचें मुख प्रफुल्लित कमळाप्रमाणें हर्षविकसित झालें. तिनें हलक्या स्वरानें विचारलें, 'कुठें जातेस ?'

विमला पूर्वीप्रमाणेंच हंसत म्हणाली, 'तुझा अंदाज काय आहे ?'

तिलोत्तमा तिच्या तोंडाकडेच पहात राहिली. तेव्हां विमलेनें तिचा हात धरून म्हटलें, 'ऐक तर मग.' इतकें बोलून विमला तिला खिडकीकडे घेऊन गेली, आणि तेथें तिच्या कानांत म्हणाली, 'मी शैलेश्वराच्या मंदिराला जात आहें. तेथें एका राजपुत्राची व माझी गांठ पडणार आहे.'

हें ऐकून तिलोत्तमेचें शरीर रोमांचित झालें. ती कांहींएक बोलली नाहीं.

विमला सांगूं लागली—'अभिरामस्वामीशीं माझें बोलणें झालें होतें. त्यांचें म्हणणें आहे कीं जगत्‌सिंहाशीं तुझा विवाह होणें शक्य नाहीं. तुझे वडील कांहीं केल्या त्या गोष्टीला रुकार द्यायचे नाहींत. त्यांच्यापाशीं नुसती ही गोष्ट काढणाराला चांगलें बक्षीस मिळालें नाहीं म्हणजे भाग्य समजायचें !'

तिलोत्तमेनें खालीं मान घालून अस्फुट स्वरानें जमिनीकडे दृष्टि लावून म्हटलें, 'मग कसें ?'

**विमला**—कसें म्हणजे ? मी येण्याचें राजपुत्राला वचन देऊन आलें आहें. आज रात्रीं त्याची भेट घेऊन त्याला मी आपली ओळख करून देईन. नुसत्या ओळखीनें काय होणार ? पण तूर्त ओळख तर करून देईन, मग काय करायचें आणि काय नाहीं याचा विचार तो पाहून घेईल. त्याचें तुझ्यावर खरोखरच मन बसलें असलें तर—

तिलोत्तमेनें तिला अधिक कांहीं बोलूं देऊं नये म्हणून तिच्या तोंडाला आपल्या वस्त्राचा पदर लाविला, आणि म्हटलें, ' तुझें हें बोलणें ऐकून मला बाई लाज वाटते. तुला वाटेल तेथें तूं जा; मात्र माझी गोष्ट कोणाला सांगूं नकोस म्हणजे झालें.'

विमला पुनः हंसून म्हणाली, ' असें होतें तर तूं इतक्या लहान वयांत (प्रेम) समुद्रांत उडी कां घातलीस ?'

**तिलो०**—तूं आपली जा कशी ? मी तुझें बोलणें कांहींच ऐकणार नाहीं.

**विमला**—तर मग मी मंदिरांत जाणारच नाहीं मुळीं.

**तिलो०**—मी तुला जाण्याला मनाई का करत्यें आहें ? तुझी इच्छा असेल तेथें खुशाल जा.

विमला हंसूं लागली. ती म्हणाली, ' तर मग मी मुळींच जात नाहीं.'

तिलोत्तमा पुनः खालीं मान घालून म्हणाली, '. जा.' विमला पुनः हंसली आणि थोड्या वेळानें म्हणाली, 'ही चालल्यें. पण मी येईपर्यंत निजूं नकोस हो !'

तिलोत्तमा किंचित् हंसली. झोप कशी येईल हा त्या हंसण्याचा अर्थ होता. विमला तो अर्थ समजली. जातांना तिनें एक हात तिलोत्तमेच्या खांद्यावर ठेवून दुसऱ्या हातानें तिची हनवटी धरली, आणि थोडा वेळपर्यंत तिच्या निष्कपट प्रेमपवित्र मुखाकडे पाहून तिचें प्रेमानें चुंबन घेतलें. विमला जाऊं लागली, तेव्हां तिच्या नेत्रांत अश्रू आलेले तिलोत्तमेला दिसले.

विमला तिलोत्तमेच्या महालांतून बाहेर पडत्ये तोंच तेथें आस्मानीनें येऊन तिला म्हटलें कीं 'धनीसाहेब तुम्हांला बोलावित आहेत.'

तिलोत्तमेनें तें ऐकून विमलेजवळ जाऊन तिच्या कानांत सांगितलें कीं पोशाख बदलून जा.

विमला म्हणाली, 'भिण्याचें कारण नाहीं.'

विमला वीरेंद्रसिंहाच्या शय्यागृहांत गेली. वीरेंद्र तेथें निजला होता. एक दासी त्याचे पाय चेपीत होती. दुसरी पंख्यानें वारा घालीत होती. पलंगाजवळ जाऊन विमलनें विचारलें 'काय आज्ञा आहे ?'

वीरेंद्रानें डोकें वर उचलून पाहिलें तेव्हां त्याला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, 'विमले ! तूं आतां कांहीं कामगिरीवर जात आहेस कीं काय ?'

विमला म्हणाली, 'होय महाराज. आपली काय आज्ञा आहे ?'

**वीरेंद्र**—तिलोत्तमेची प्रकृति आतां कशी आहे ? तिच्या जिवाला बरें नव्हतें. आतां ठीक आहेना ?

**विमला**—आतां बरी आहे.

**वीरेंद्र**—तूंच कांहीं वेळ वारा घाल. आस्मानी तिलोत्तमेला इकडे बोलावून आणील.

पंख्यानें वारा घालणारी दासी पंखा खालीं ठेवून निघून गेली.

विमलेनें आस्मानीला बाहेर उभी राहण्याविषयीं खुणेनें सांगितलें. वीरेंद्र दुसऱ्या दासीला म्हणाला, 'लक्ष्मी ! तूं आमच्यासाठीं विडा लावून आण.' हें ऐकून पाय चेपणारी दासीहि चालती झाली.

**वीरेंद्र**—विमले तूं आज हा थाटमाट कशासाठीं केलास ?

**विमला**—कांहीं कारण आहे.

**वीरेंद्र**—काय कारण आहे, सांगशील ?

**विमला**—ऐकावें महाराज !

वीरेंद्राशीं बोलतां बोलतां विमलेनें आपल्या नेत्रांतून त्याच्यावर मन्मथाचे बाण सोडण्यास सुरुवात केली. ती म्हणाली, 'ऐकावें महाराज ! मी कांहीं संकेतानें जात आहें.'

**वीरेंद्र**—कोणाशीं संकेत ठरला आहे ? यमाशीं ?

**विमला**—यमच कशाला हवा ? मनुष्य काय नाहीं ?

**वीरेंद्र**—असा मनुष्य अजून जन्मास आलेला नाहीं.

**विमला**—नाहीं कां ? एक आहे.

इतकें बोलून विमला त्वरेनें चालती झाली.

---

## प्रकरण अकरावें.

# आस्मानीचा दूतपणा.



इकडे विमलेच्या इशारतीप्रमाणें आस्मानी महालाच्या बाहेर तिची वाट पाहत उभी होती. विमला इतक्यांत तेथें गेली आणि म्हणाली, 'आस्मानी! तुला कांहीं गुप्त गोष्ट सांगावयाची आहे.'

आस्मानी म्हणाली, 'तुमचा हा थाटमाट पाहून आज कांहीं तरी विशेष प्रकार आहे, असा तर्क मीं केलाच होता.,'

**विमला**—मला आज कांहीं कामासाठीं बरेंच दूर जावयाचें आहे. रात्रीचें मला एकटीला जातां येत नाहीं; आणि तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणावर विश्वास ठेवून नेतांहि येत नाहीं. तुलाच माझ्याबरोबर आलें पाहिजे.

**आस्मानी**—पण जायचें आहे कोठें तें तर कळूं द्या!

**विमला**—आस्मानी, तूं पूर्वीं अशी कधीं विचारीत नव्हतीस?

आस्मानी थोडी कुंठित होऊन म्हणाली, 'तर मग जरा थांबा. थोडेंसें काम आहे तेवढें उरकून मी येतें.'

**विमला**—आणखी एक: गोष्ट तुला पुसावयाची आहे. समज, पूर्वींच्या ओळखीचा एखादा मनुष्य तुला आज भेटला, तर तो तुला ओळखूं शकेल काय?

आस्मानीनें आश्चर्यचकित होऊन विचारलें, 'तो कोण?'

**विमला**—समज, कुमार जगत्सिंहाची आणि तुझी गांठ पडली तर?

आस्मानी बराच वेळ स्तब्ध राहून मग सद्गदित कंठानें म्हणाली, 'असा दिवस कुठचा यायला!'

**विमला**—कां नाहीं येणार?

**आस्मानी**—आलाच तर कुमार ओळखील, यांत काय शंका?

**विमला**—तर मग तुला नेतां येणार नाहीं. दुसऱ्या कोणाला तरी नेलें पाहिजे. कारण, मला एकटीला तर जातां येत नाहीं.

**आस्मानी**—कुमाराला पाहण्याची माझी फार इच्छा आहे.

**विमला**—ती मनांतल्या मनांत ठेव. पण मी आतां काय करूं?

विमला विचार करूं लागली. आस्मानी तोंडावर अकस्मात् पदर ओढून घेऊन हंसूं लागली. विमला म्हणाली, 'जळलें मेलें ! आपल्याशींच काय येवढें हंसते आहेस ?'

**आस्मानी**—मी मनांत विचार करीत होत्यें कीं माझ्या सोन्याला—दिग्गजाला—तुमच्याबरोबर पाठविलें तर कसें होईल ?

विमला हंसून आनंदानें म्हणाली, 'हो हो ! ठीक बोललीस. त्या रसिकराजालाच बरोबर न्यावें.'

आस्मानी विस्मित होऊन म्हणाली, 'हें काय ? मी तर सहज विनोदानें म्हटलें.'

**विमला**—थट्टेची गोष्ट नाहीं. माझा त्या वेड्या ब्राम्हणावर अविश्वास नाहीं. आंधळ्याला जसा दिवस आणि रात्र यांच्यांतला भेद कळत नाहीं, तसेंच यालाहि कांहीं तारतम्यज्ञान नाहीं. कळतच नाहीं, तेथें अर्थात् अविश्वासाचीहि गोष्ट बोलायला नको. पण तो ब्राम्हण माझ्याबरोबर येणार नाहीं.

आस्मानी हंसून म्हणाली, 'तें माझ्याकडे लागलें. मी त्याला घेऊन येत्यें. तुम्ही फाटकासमोर थोडावेळ त्याची वाट पहा.'

इतकें बोलून आस्मानी हंसत हंसत किल्ल्यांतल्या एका लहानशा खोपटाकडे गेली.

अभिरामस्वामीचा शिष्य गजपति दिग्गज याचा थोडासा परिचय यापूर्वी वाचकांस करून दिलाच आहे. विमलेनें रसिकराज असें नांव त्याला कां दिलें होतें, तेंहि वाचकांना ठाऊक आहे. तोच महापुरुष या खोपटाचा मालक होता. दिग्गजाची उंची सुमारें साडेपांच हात होती. जाडीहि तशीच अर्धा हात तीन अंगुळें होती. पाय कमरेपासून जमिनीपर्यंत मोजले तर पुरे चार हात भरत. अंगकाठी काठीप्रमाणें सरळ होती, वर्ण दौतींतल्या शाईसारखा होता. एखाद्याला वाटेल कीं लाकूड समजून अग्नीनें त्याचे पायच खाण्यास प्रारंभ केला होता; पण त्यास कांहीं रस मिळाल्यामुळें अर्धवट खऊन तें पुढें खाण्याचें काम तसेंच सोडून दिलें असावें. हा दिग्गज फार उंच असल्यामुळें त्याच्या पाठीला थोडेंसें कुबड आलेलें दिसत होतें. त्याच्या सर्व अवयवांत नाक फार मोठें होतें. बाकीच्या शरीरांतली मांसाची न्यूनता तेथें भरून निघाली होती. डोक्याला टक्कल पडून गुळगुळीत झालें होतें. जे थोडे केस होते, तेहि अगदीं आखुड आणि वरून

हात फिरविला तर हाताला सुयांसारखे बोंचतील असे रांठ होते; आणि शेंडी खूप मोठी होती.

विद्यादिग्गज ही पदवी त्याला अनायासें प्राप्त झाली होती. त्याची बुद्धि फारच तीक्ष्ण होती. लहानपणीं पाठशाळेंत व्याकरणाचें अध्ययन त्यानें सुरू केलें होतें. साडेसात महिन्यांत ' सहर्णेर्धः ' हें सूत्र व्याख्येसह त्याला तोंडपाठ येऊं लागलें होतें. गुरुजींच्या कृपेनें आणि दुसऱ्या दहाजणांच्या गडबडींत पंधरा वर्षें अध्ययन करून त्यानें शब्दकांड पुरें केलें होतें. नंतर दुसऱ्या कांडाला प्रारंभ करण्यापूर्वी गुरुजींनीं विचार केला कीं आतांपर्यंत हा किती शिकला आहे, तें तरी एकदां पाहूं या. म्हणून ते म्हणाले, ' बेटा ! ' राम ' शब्दाला अम् प्रत्यय लाविला तर काय रूप होईल तें सांग पाहूं ? ' शिष्यानें बराच वेळ विचार करून उत्तर दिलें, 'रामकांत. ' गुरुजी म्हणाले, ' बाबा ! पुरे झाली तुझी विद्या ! तूं आतांच्या आतां आपल्या घरीं जा. येथलें तुझें अध्ययन संपलें. तुला शिकविण्यासारखी विद्या आतां माझ्याजवळ उरली नाहीं ! '

त्यावेळीं गजपति मोठ्या ऐटीनें म्हणूं लागला, ' माझी एक विनंति आहे. मला कांहीं पदवी द्यावी !'

तेव्हां गुरुजी म्हणाले, ' बाबारे ! तूं जी विद्या संपादन केली आहे, तिच्यासाठीं नवीनच पदवी निर्माण केली पाहिजे. तूं ' विद्यादिग्गज ' ही पदवी आपल्या नांवाला जोडीत जा. ''

दिग्गज हर्षित चित्तानें गुरूला प्रणाम करून चालता झाला.

घरीं आल्यावर दिग्गज पंडित मनाशीं विचार करूं लागला, ' आपण व्याकरणशास्त्रांत तर पारंगत झालोंच आहों. आतां थोडेंसें स्मृतींचेंहि अध्ययन केलें पाहिजे. अभिरामस्वामी जाडे पंडित आहेत असें ऐकतों. मला शिकवील असा मनुष्य त्यांच्याशिवाय दुसरा कोणी दिसत नाहीं. तेव्हां आतां त्यांच्याचकडे जाऊन स्मृतींचा पाठ घ्यावा. ' असा विचार करून तो या किल्ल्यांत राहण्यास आला होता. अभिरामस्वामी पुष्कळांना पढवीत असत. कोणाचाहि ते कंटाळा करीत नसत. दिग्गज शिको वा न शिको ते आपले त्याला पाठ देत.

गजपति पंडित केवळ व्याकरण व स्मृति यांतच प्रवीण नव्हता. थोडेंसें अलंकारशास्त्राचें व रसांचें ज्ञान त्याला होतें. त्याचें अलंकारशास्त्र म्हणजे शरीराला अलंकारादिकांनीं नटविण्याची विद्या आणि रसज्ञानभांडार म्हणजे तुपांचें भांडें हीं होतीं. त्याच्या या ज्ञानाचें अवडंबर आस्मानीपाशीं विशेष दिसे. त्याचें

एक गुप्त कारणहि होतें. गजपति मनांत म्हणे कीं माझ्या सारख्याचा जन्म या भरतखंडांत केवळ लीला करण्यासाठींच झालेला असतो. हा किल्ला हेंच माझें श्रीवृंदावन आणि आस्मानी हीच राधिका आहे. आस्मानीहि गमतीच होती. असला मदनमोहन मिळाल्यानें माकड पाळण्याची तिची हौस आपोआपच पूर्ण झाली होती. विमलाहि केव्हां केव्हां या माकडाचा नाच करण्यास जात असे.

## प्रकरण बारावें

## आस्मानीचें प्रियकराकडे गमन.



अस्मानीच्या वेणीची शोभा नागफणीसारखी होती. तिच्यापुढें आपणास हार खावी लागली म्हणूनच कीं काय लज्जेनें तोंड लपविण्यासाठीं नाग बिळाचा आश्रय करूं लागला. ब्रह्मदेवालाहि आपल्या हातून प्रमाद घडला, असें वाटूं लागलें. कारण, नाग बिळांत जाऊन राहूं लागल्यावर मनुष्याला कोण दंश करणार ? म्हणून त्यानें शेपूट धरून नागाला बाहेर ओढिलें. नाग बाहेर आल्यावर आपणाला पुनः बाहेर तोंड दाखवावें लागलें या गोष्टीचा राग येऊन तो स्वतःचें डोकें आपटून घेऊं लागला. आपटतां आपटतां तें चपटें झालें, आणि तेव्हांपासून नागाला फणा प्राप्त झाली. आस्मानीचा मुखचंद्र आकशांतल्या चंद्रापेक्षांहि सुंदर होता. अर्थात् चंद्राला बाहेर तोंड काढणें कठीण वाटूं लागलें. तेव्हां त्यानें ब्रह्मदेवाकडे तक्रार नेली. ब्रह्मदेव म्हणाला, 'भिऊं नकोस. तूं उदय पाव. आजपासून स्त्रियांचीं तोंडें झांकलीं जातील.' तेव्हांपासून बुरख्याची चाल आली. तिचे डोळे म्हणजे ताजवा नांवाचे पक्षीच होते. हे पक्षी उडून जातील म्हणून त्यांना ब्रह्मदेवानें पदररूपी पिंजऱ्यांत अडकावून ठेविलें आहे. आस्मानीचें नाक गरुडाच्या नाकाप्रमाणें विशाल होतें. तें पाहून गरुड भीतीनें झाडावर जाऊन बसला, आणि तेव्हांपासून सारे पक्षी झाडांवरच राहूं लागले. अशाच कांहीं कारणांमुळें डाळिंब बंगाल्यांतून निघून पाटण्याकडे पळून गेले, आणि हत्ती आपलें गंडस्थळ घेऊन ब्रह्मदेशाकडे निघून गेले. बाकी उरला धवलगिरी. त्यानें पाहिलें कीं आपलें शिखर फार फार तर अडीच कोस उंच ! आणि आस्मानीची वेणी उंचींत तीन कोसांहून कमी नाहीं. हा विचार मनांत येतांच त्याचें डोकें तापलें. तेव्हां तें थंड करण्यासाठीं तो डोक्यावर बर्फ ठेवूं लागला, आणि तेव्हांपासून तो पर्वत डोक्यावर बर्फ ठेवून बसला आहे.

सटीच्या लेखनदोषामुळें आस्मानीला वैधव्य आलें होतें. तिनें दिग्गजाच्या घरापाशीं येऊन पाहिलें, तों दरवाजा बंद होता. आंत दिवा जळत होता. म्हणून तिनें हांक मारली; पण कोणीं ओ दिली नाहीं. म्हणून ती म्हणाली, 'अरे गोसावब्या'! तरी उत्तर मिळालें नाहीं. तेव्हां तिनें त्या दाराच्या फटींतून पाहिलें तेव्हां दिसलें कीं ब्राह्मण जेवायला बसला आहे आणि म्हणून बोलत नाहीं. बोलल्यावर ब्राह्मणाला पुढें जेवतां येणार नाहीं. तिनें विचार केला कीं, याचा येवढा नेम आहे तर आपणहि पाहावें कीं बोलल्यावर हा पुढें जेवतो कीं काय तें ? म्हणून ती म्हणाली, 'अहो रसिकराज'! तरी उत्तर नाहीं 'अहो रसराज'! उत्तर—'हूं.'

ब्राह्मणानें तोंडांत भाताचा घास धरून दिलेलें उत्तर तें कांहीं खरें बोलणें नव्हें, असें समजून आस्मानी म्हणाली, 'अहो रसिकमणी!' पुनः 'हूं' असेंच उत्तर आलें.

**आस्मानी**—अहो! अगोदर बोला, मग खात बसा.

यावरहि पुनः 'हूं' हेंच उत्तर.

**आस्मानी**—असें कां ? बरें तर. ब्राह्मण जन्माला येऊन असें काम करतोस काय ? थांब, आतां मी जाऊन धनीसाहेबांना कळवित्यें. घरांत रे कोण आहे ?

ब्राह्मणाला शंका येऊन त्यानें घरांत चोहींकडे पाहिलें; पण कोणीं दिसलें नाहीं, तेव्हां तो पुनः खाऊं लागला.

**आस्मानी**—अरे ढोंग्या! तूं ब्राह्मण कसला! चांडाळ आहेस. मी ओळखलें आहे तुला.

दिग्गज रागावून म्हणाला, 'कोण ग चांडाळ ? तूंच चांडाळ !'

**आस्मानी**—पहा, पुनः खातो आहेस. बोलल्यावर पुनः खातोस काय ?

**दिग्गज**—केव्हां ग बोललों ?

आस्मानी खो खो हंसून म्हणाली, 'हा पहा बोललास !'

**दिग्गज**—बरें बरें! आतां पुढें खाणार नाहीं.

**आस्मानी**—तर मग उठून लवकर दार उघड.

आस्मानीनें फटींतून पाहिलें तों ब्राम्हण खरोखरच पानावरून उठत आहे! ती म्हणाली, 'नको नको. सगळा भात खाणें झाल्यावर ऊठ.'

**दिग्गज**—नाहीं. आतां नाहीं मी खाणार. मी बोललोंना ?

**आस्मानी**—हें रे काय ? न खाशील तर तुला माझी शपथ आहे.

**दिग्गज**—गोविंद गोविंद ! काय म्हणत्येस ? जेवतांना बोलल्यावर पुनः भात खायचा ?

**आस्मानी**—तें असो. ही मी चालल्यें. माझ्या मनांतलें हितगुज तुला पुष्कळ सांगायचें होतें; पण आतां नाहीं सांगत. मी जात्यें.

**दिग्गज**—असें काय बरें आस्मानी ? अशी रागावूं नकोस. हा पहा मी खायला बसतों. मग तर झालें ?

ब्राम्हण पुनः खाऊं लागला. दोन तीन घास खाल्ले असतील, इतक्यांत आस्मानी म्हणाली, ' ऊठ, पुरें झालें खाणें. दार उघड. '

**दिग्गज**—आतां थोडाच भात राहिला आहे. तेवढा खाऊन उठतोंच.

**आस्मानी**—अजून तुझें पोट भरलें नाहीं ? तसाच ऊठ, नाहीं तर बघ, तूं जेवतांना बोलल्यावर पुनः भात खाल्ला, असें मी सगळयांना सांगून देईन.

**दिग्गज**—नको नको. हा पहा उठलों.

ब्राह्मण अतिशय खिन्नतेनें पानावर अन्न टाकून तसाच उठला आणि घाई घाईनें चूळ भरून टाकून त्यानें दार उघडलें.

---

## प्रकरण तेरावें.

# आस्मानीचें प्रेम.



दार उघडतांच आस्मानी आंत गेली. तिला पाहून आपलें प्रेमपात्र आलें आहे, तर तिचा चांगला सत्कार करायला पाहिजे असें दिग्गजाला वाटलें, आणि म्हणून तो म्हणाला, ' ॐ आयाहि वरदे देवि.'

आस्मानी म्हणाली 'वाः ! इतकी सरस कविता कोठून आणिलीस ?'

**दि०**—मुद्दाम आज तुझ्याकरितां रचिली.

**आ०**—तुला उगाच 'रसिकराज' नाहीं म्हणत !

**दि०**—सुंदरी ! बैस, मी हात धुऊन येतों.

आस्मानी मनांत म्हणाली, 'अरेच्या ! तूं हात धुणार ? मी तर तुझ्याकडून हा राहिलेला भात खावविणार आहें'. ती मोठ्यानें म्हणाली, 'हें काय ? हात धुतोस ? भात नाहीं का खायचा ?'

**दि०—** हें काय ? मी तर जेवून उठलों देखील. पुनः भात कसा खाऊं ?

**आ०**—काय झालें ? हा भात खायाचा राहिला आहेना अजून ? उपाशीं राहणार कीं काय ?

दिग्गज थोडा खजिल होऊन म्हणाला, ' काय करूं ? तूं तशीच घाई केलीस !' असें म्हणून तो सतृष्ण दृष्टीनें अन्नाकडे पाहूं लागला.

**आ०**—तर मग आतां पुनः खा.

**दि०**—गोविंद गोविंद ! मी चूळ भरली, आंचवलों, आणि पुनः खायला बसायचें ?

**आस्मानी**—हो. खायचें नाहींतर काय ? माझें उष्टें खाल्लें पाहिजे.

इतकें बोलून आस्मानीनें भोजनपात्रांतून एक घास घेऊन स्वतः खाल्ला. ब्राह्मण आश्चर्यानें कुंठितच झाला. आस्मानीनें उष्टें अन्न भोजनपात्रांत ठेवून म्हटलें, 'खा हें.'

ब्राम्हणाच्या तोंडून शब्दसुद्धां निघेना.

**आस्मानी**—खा. माझें ऐक. माझें उष्टें खाल्लेंस म्हणून कोणाजवळ बोलूं नकोस म्हणजे झालें. कोणाला कळलें नाहीं म्हणजे मग दोष कसचा ?

**दिग्गज**—म्हणून काय झालें ?

**आस्मानी**—खा, अथवा खाऊं नको; पण पाटावर तर बसशील ?

**दिग्गज**—त्यानें काय होणार ?

**आस्मानी**—माझी तशी इच्छा आहे. माझी एवढी हौस नाहीं का तूं पुरी करणार ?

दिग्गजानें म्हटलें, 'नुसतें पाटावर बसण्यांत काय दोष आहे ? बरें बुवा ! तुझी हौस पुरती होऊंदे.' असें म्हणून दिग्गजपंडित पाटावर पुनः बसला. पोटांत भूक होती; पण खातां येईना. यामुळें दिग्गजाच्या डोळ्यांना पाणी आलें.

**आस्मानी**—शूद्राचें उष्टें ब्राम्हणानें खाल्लें तर काय होतें ?

**दिग्गज**—स्नान करावें लागतें.

**आस्मानी**—तुझें माझ्यावर कितीसें प्रेम आहे, तें आज मला कळून आलें. मी आतां जात्यें. मीं सांगितलें तर आज रात्रीं तूं आंघोळ करशील ?

दिग्गज आपला बारीक डोळा प्रेमभावानें अर्धा मिटून व आपलें लांब नाक वांकडें करून दीर्घ हास्य करून म्हणाला, 'त्याची काय कथा ? आतां पाहिजे तरी आंघोळ करतों.'

आस्मानी म्हणाली, 'तुझ्या ताटांतला प्रसाद घ्यावा अशी मला आज इच्छा झाली आहे, तूंच आपल्या हातानें थोडासा भात मला कालवून देशील ?'

**दिग्गज**—त्यांत काय मोठेंसें आहे ? स्नान केलें कीं झालें शुद्ध.

असें बोलून उरलेलें सगळें उष्टें अन्न गोळा करून तो तें कालवूं लागला.

**आ०**—मी तुला ऐक गोष्ट सांगत्यें. ती ऐक. माझी गोष्ट सांगणें चाललें असेल तोंपर्यंत तूं भात कालवीत राहिलें पाहिजेस. नाहींतर मी खाणार नाहीं.

**दि०**—ठीक आहे.

आस्मानीनें एक राजा व एक आवडती व एक नावडती अशा त्याच्या दोन राण्या यांची गोष्ट सांगण्यास सुरुवात केली, आणि दिग्गज हुंकार देत व तिच्या तोंडाकडे पाहत ऐकूं लागला. इकडे त्याचें भात कालविण्याचें काम चाललेंच होतें.

ऐकतां ऐकतां दिग्गजाचें मन आस्मानीच्या गोष्टींत गढून गेलें आणि तिचें हंसणें, आणि नटणें मुरडणें यांत तें अडकून राहिलें. भात कालविण्याचें काम अर्थातच बंद पडलें. हात ताटाला नुसता लागलेला राहिला. पोटांत भुकेच्या वेदना होतच होत्या. जेव्हां आस्मानीची गोष्ट ऐनरंगांत आली, आणि ती ऐकण्यांत दिग्गज दंग झाला, तेव्हां त्याच्या हातानें विश्वासघात केला. ताटांतल्या हातानें जवळच्या भाताचा घास उचलून गुपचूप दिग्गजाच्या तोंडांत नेऊन घातला ! तोंडानेंहि मुकाट्यानें त्याचा स्वीकार केला. दांतहि कांहीं भानगड न करतां तो चावूं लागले. जिभेनें तो तसाच घशाखालीं सोडला. गरीब बिचाऱ्या दिग्गजाला हें कांहीं कळलेंसुद्धां नाहीं. हें पाहून आस्मानी फिदी फिदी हंसूं लागली, आणि म्हणाली, ' अरे मूर्खा ! माझें उष्टें खाल्लेंस ना ! '

आतां कोठें दिग्गज शुद्धीवर आला ! घाईघाईनें दुसरा एक घास तोंडांत घालून तो गिळीत गिळीत एका हातानें आस्मानीचे पाय धरूं लागला, आणि एकीकडे घास चावीत चावीत व एकीकडे रडत रडत म्हणाला, ' आस्मानी ! मला वांचीव. ही गोष्ट तूं कुणाजवळ बोलूं नकोस.'

## प्रकरण चौदावें.

# दिग्गज–हरण.

इतक्यांत विमलेनें येऊन बाहेरून दार खडखडविलें. तिनें दारापाशीं लपून उभी राहून आंत घडलेला सारा प्रकार पाहिला होता. दाराचा खडखड आवाज ऐकून दिग्गजाच्या तोंडचें पाणी पळालें. आस्मानी म्हणाली, ' सर्व नाश झाला ! विमला आली वाटतें. आतां लपून तरी बैस. '

दिग्गज पंडित रडत म्हणाला, ' कोठें लपूं ? '

आ०—अंधेरांत. या कोपऱ्यांत एखादें काळें मडकें डोक्यावर घेऊन बैस. अंधेरांत कोणाला दिसणार नाहींस.

दिग्गज त्याप्रमाणें करायला गेला. आस्मानीची तीव्र बुद्धि पाहून तो चकित झाला. दुर्दैवानें घाईघाईंत वरण शिजविण्याचें मडकें त्याच्या हातीं लागलें, तेंच त्यानें डोक्यावर पालथें केलें. तें वरणानें अर्धें भरलेलें होतें. त्यानें तें डोक्यावर पालथें करतांच डोक्यावरून वरणाच्या शेकडों धारा वाहूं लागल्या. त्यांचा प्रवाह शेंडीवरून खालीं उतरला. खांदे, छाती, पाठ व बाहु यांवरून तो प्रवाह, पर्वताच्या कड्यावरून खालीं कोसळणाऱ्या नदीच्या प्रवाहाप्रमाणें, खालीं उडी घेत होता. त्याचें उंच नाक वरणाच्या निर्झरांनीं युक्त अशा गिरिशृंगाप्रमाणें शोभिवंत दिसूं लागलें. याच वेळीं विमला घरांत शिरून दिग्गजाची ती शोभा पाहूं लागली. तिला पाहून तो रडूं लागला. विमलेला त्याची दया आली. ती म्हणाली, ' रडूं नकोस. तूं जर हा राहिलेला भात खाशील तर मी कुणाजवळही बोलणार नाहीं.'

तेव्हां ब्राम्हणाची चर्या प्रफुल्लित झाली. आनंदित होऊन तो पुनः भात खाण्यास बसला. अंगावर सांडलेलें वरण चाटून पुसून खावें असें त्याच्या मनांत फार होतें; पण तसें करण्याचें धैर्य त्याला होईना. आस्मानीसाठीं जो भात त्यानें काढून ठेविला होता, तो त्यानें खाल्ला. वरण फुकट गेल्याबद्दल मात्र त्याच्या मनाला फार वाईट वाटलें. खाणें आटोपल्यावर आस्मानीनें त्याला अंघोळ घातली. मग ब्राम्हणाचें चित्त स्थिर झाल्यावर विमला त्याला म्हणाली, ' अरे रसिकराज ! तुला एक मोठी गोष्ट सांगायची आहे.'

रसिकानें विचारलें, ' कोणती ? '

**वि०**—तुला मी आवडत्यें काय ?

**दि०**—हें काय विचारणें ?

**वि०**—आम्ही दोघीहि तुला आवडतों ?

**दि०**—होय. दोघीहि.

**वि०**—मग मी सांगत्यें तें तूं करशील ?

**दि०**—कां नाहीं करणार ?

**वि०**—आत्तां करशील ?

**दि०**—हो. आत्तां करीन.

**वि०**—या क्षणीं ?

**दि०**—हो. या क्षणीं करीन.

**वि०**—आम्ही दोघीहि येथें कां आलों आहों तें तुला माहित आहे ?

**दि०**—नाहीं.

**आ०**—तुझ्याबरोबर आम्हांला पळून जायचें आहे.

हें ऐकून ब्राह्मण कुंठित झाला. विमलेनें मोठया कष्टानें आलेलें हंसूं दाबून म्हटलें, ‘ आतां कां बोलत नाहींस ? ’

‘ आ—आ–ता–ता–ता–ता– ’ अशा प्रकारच्या अक्षरांशिवाय दिग्गजाच्या तोंडून स्पष्टोद्गार निघाले नाहींत.

आस्मानीनें विचारलें, ‘ मग तुझ्याच्यानें हें होईल कीं नाहीं ?’

**दि०**—आ—आ–ता–ता–ता–गुरुजींना सांगून येतों.

**विमला**—गुरुजींना यांत काय सांगायचें आहे ? येथें काय तुझ्या आईचें श्राद्ध करायचें आहे म्हणून तूं त्याची व्यवस्था त्यांच्याकडे सोंपविणार ?

**दि०**—नाहीं नाहीं. तर मग मी जात नाहीं. बरें, केव्हां निघायचें ?

**वि०**—केव्हां ? आतांच चल. मी दागदागिने घेऊन बाहेर पडल्यें आहें, हें नाहीं का तुला दिसत ?

**दि०**—आतांच ?

**वि०**—हो, आतांच नाहीं तर केव्हां ? तुला यायचें नसलें तर तसें सांग, म्हणजे आम्ही दुसरा मनुष्य पाहूं.

गजपतीच्यानें आतां राहावेना. तो म्हणाला, ‘ चला. मी येतों.’

विमला म्हणाली, ‘ उपरणें बिपरणें घे.’

दिग्गजानें कांठावर देवाचें नांव काढलेलें असें अंगवस्त्र पांघरलें. विमला पुढें आणि ब्राह्मण मागें याप्रमाणें तीं निघालीं. तो म्हणाला, 'बाई!'

**वि०**—काय ?

**दि०**—आपण परत केव्हां येऊं ?

**वि०**—आतां कसली येण्याची गोष्ट बोलतोस ? आतां कायमचेच जात आहों.

हंसतां हंसतां दिग्गजाची चर्या हर्षभरित झाली. तो म्हणाला, 'भांडींकुंडीं घ्यायचीं राहिलींना ?'

**विमला**—तीं सगळीं तुला विकत घेऊन देईन.

हें ऐकून ब्राम्हण जरा खिन्न झाला. आतां काय करायचें ? आपल्यावर याचें प्रेम नाहीं असें कदाचित् या दोघी समजतील, म्हणून आपलें तिकडे लक्ष नाहीं असें दाखवून तो म्हणाला, 'माझ्या पोथ्यांचें दप्तर ?'

**वि०**—लवकर घेऊन ये, जा.

विद्यादिग्गजाच्या दोनच पोथ्या होत्या. एक व्याकरणाची आणि दुसरी स्मृतींची. पैकीं व्याकरणाची पोथी हातांत घेऊन तो म्हणाला, 'आतां या पोथीचें काय काम आहे ? मला तर व्याकरण तोंडपाठ येत आहे.' असें म्हणून त्यानें फक्त स्मृतीची पोथी घेतली, आणि तोंडानें देवाचें नामस्मरण करीत तो विमला व आस्मानी यांच्याबरोबर निघाला.

**आस्मानी**—तूं पुढें हो मी मागून येत्यें.

इतकें बोलून आस्मानी घरांत गेली. विमला व गजपति बरोबर चालूं लागलीं. अंधारांतून दोघेंहि कोणाच्या नजरेस न पडतां किल्ल्याच्या बाहेर पडलीं. थोडें दूर गेल्यावर दिग्गज म्हणाला, 'अद्याप आस्मानी कशी आली नाहीं ?'

**विमला**—तिला येतां आलें नसेल असें दिसतें. तिच्याशीं आपल्याला काय करावयाचें आहे ?

हें ऐकून रसिकराज गप्प बसले. थोड्या वेळानें दिग्गज उसासा टाकून म्हणाला, 'आतां कसलीं आलीं आहेत भांडींकुंडीं !'

---

## प्रकरण पंधरावें.

# दिग्गजाचें साहस.

विमलेनें त्वरेनें पावलें उचलीत उचलीत मांदारण गांव मागें टाकिलें. रात्र अतिशय काळोखाची होती, म्हणून ताऱ्यांच्या प्रकाशांत ती फार जपून जात होती. जंगलाची वाट लागली, तेव्हां विमलेला थोडीशी भीति वाटली. तिचा सोबती मुकाट्यानें मागोमाग येत होता. कोणीहि तोंडांतून शब्द काढला नव्हता. अशा वेळीं माणसाचा स्वर कानीं आला तर थोडी हिंमत येते आणि तो ऐकण्याची त्याला इच्छाहि होत असते. म्हणून विमलेनें गजपतीला विचारिलें, ' रसिकराज ! कसला विचार चालला आहे ?'

**रसिक०**—दुसरा कसला ? भांड्याकुंड्यांचा.

विमला कांहीं न बोलतां तोंडांत पदर धरून हंसूं लागली.

पुनः थोड्या वेळानें तिनें विचारलें, ' दिग्गज ! तुला भुतांचें भय वाटतें का !'

' तोंडानें राम राम राम राम म्हणा ' असें बोलून तो विमलेच्या मागें दोन हातांवर येऊन पोंचला.

देवापाशीं मागितला एक डोळा आणि देवानें दिले दोन ! विमला म्हणाली, ' ही वाट म्हणजे भुतांचें केवळ आगर आहे ! ' हें ऐकतांच दिग्गजानें विमलेचा पदर धरला. ती म्हणाली, 'मी त्या दिवशीं शैलेश्वराची पूजा करून परत येत होत्यें: तेव्हां वाटेंत वडाच्या झाडाखालीं एक अक्राळविक्राळ मूर्ति दिसली !'

पदराच्या थरथर कांपण्यावरून विमला समजली कीं ब्राम्हण भेदरून गेला आहे. आतां आपण अधिक भीति घातली तर हा अगदीं बेशुद्ध होऊन पडावयाचा ! म्हणून तसें न करतां ती म्हणाली, ' रसिकराज ! तुला गातां येतें काय ? '

'रसिकाला गातां येत नाहीं, असें कधीं झालें आहे ?' दिग्गज म्हणाला, 'येतें तर ?'

**वि०**—तर मग एक गाणें म्हण पाहूं ?

दिग्गजानें लागलीच सुरवात केली—आ–आ–हम्–'देखिली ग श्याममूर्ति कदंबशाखेवरी'—

वाटेंत एक गाय रवंथ करीत बसली होती. तिनें तो अलौकिक शब्द ऐकतांच वेगानें पलायनच केलें. त्यानें तें गाणें थोडा वेळ म्हटलें; पण इतक्यांत एकाएकीं तें बंद पडलें. त्याचें श्रवणेंद्रिय मुग्ध झालें. अप्सरेच्या हातांतल्या वीणेच्या नादासारखा अमृतमय व मनाला उन्माद आणणारा मधुर संगीतध्वनि त्याच्या कानीं पडला. विमलेनें खुल्या आवाजानें गाणें म्हणण्यास सुरुवात केली होती.

निःशब्द अरण्यांत रात्रीचे वेळीं तिच्या कंठांतून निघणाऱ्या सप्तसुरांनीं सगळें आकाश व्यापून टाकिलें आणि त्या सुरांचा प्रतिध्वनि उठूं लागला. थंड वाऱ्याबरोबर तिचा सूर चांगलाच चढला.

दिग्गजहि श्वास न सोडतां गाणें ऐकत होता. विमलेचें गाणें संपलें, तेव्हां तो म्हणाला, 'आणखी.'

**वि०**—आणखी काय ?

**दि०**—आणखी एक गाणें.

**वि०**—कोणतें गाणें म्हणूं ?

**दि०**—एक बंगाली गाणें म्हणा.

**वि०**—बरें म्हणत्यें.

विमलेनें पुनः गाणें म्हणण्यास सुरवात केली. गातां गातां आपल्या पदराला ओढ लागली आहे, हें तिच्या ध्यानांत आलें; म्हणून तिनें मागें वळून पाहिलें. तेव्हां गजपति एकदम तिच्या पायापाशीं पडला आहे आणि त्यानें पदर अगदीं घट्ट धरला आहे असें तिला आढळलें. विमलेनें चकित होऊन विचारलें, 'अरे, झालें काय ? भूतबीत आलें कीं काय ?'

ब्राह्मणाच्या तोंडून एक शब्दमुद्धां निघेना. त्यानें नुसत्या बोटानें दाखवून म्हटलें, 'तें.'

विमला स्तब्ध होऊन तिकडे पाहूं लागली. तों कोणीतरी धापा टाकीत येत आहे, असा शब्द तिच्या कानीं पडला, आणि कांहींसें त्या बाजूला दिसलें.

हिंम्या करून विमला जवळ जाऊन पाहूं लागली, तेव्हां एक चांगल्या बांध्याचा व शृंगारलेला घोडा मरणाच्या यातना भोगीत पडलेला तिला आढळला.

विमला तशीच पुढें जाऊं लागली. वाटेंत उत्तम शृंगारलेला लष्करी घोडा मृत्युपंथाला लागलेला पाहून ती चिंताग्रस्त झाली. बराच वेळ ती कांहीं बोलली

नाहीं. चांगलें अर्धाकोस अंतर चालून गेल्यावर गजपति पुनः तिचा पदर ओढूं लागला. विमला म्हणाली, ' काय रे ? '

गजपतीनें एक वस्तु उचलून घेऊन तिला दाखविली. ती पाहून विमला म्हणाली, ' हें तर शिपायाचें पागोटें आहे ! ' विमला पुनः चिंतामग्न झाली. मग ती आपल्या मनाशीं म्हणाली, ' ज्याचा घोडा त्याचेंच तर हें पागोटें नसेल ? का हें पायदळांतल्या एखाद्या शिपायाचें पागोटें आहे ? '

थोड्या वेळानें चंद्रोदय झाला. विमलेचें चित्त अधिकच चिंतातुर झालें. बऱ्याच वेळानें गजपतीनें हिंय्या करून विचारलें, ' बाई ! आतां तुम्ही कांहींच बोलत नाहीं, हें कसें ? '

वि०—या वाटेवर कोणाचीं पावलें उमटलेलीं तुला दिसतात काय ?

गजपति ज्यास्त लक्षपूर्वक पाहूं लागला. बारकाईनें पाहिल्यावर तो म्हणाला, ' होय. पुष्कळ घोड्यांच्या टापांचीं चिन्हें उमटलेलीं दिसत आहेत. '

वि०—अहो शहाणे ! यावर तुमचा काय तर्क चालतो ?

दि०—कांहीं नाहीं बुवा !

वि०—पलीकडे मरत असलेला घोडा, तेथें शिपायाचें पागोटें, आणि येथें घोड्यांच्या टापांचीं उमटलेलीं चिन्हें, यांवरून तुला कांहींच तर्क करतां येत नाहीं ? मी सांगूं ?

दि०—काय सांगणार ?

वि०—या रस्त्यानें बरीच फौज गेली असावी.

गजपति भयभीत होऊन म्हणाला, ' तर मग हळू हळू चला. त्या फौजेला पुष्कळ पुढें जाऊं द्या. '

विमला हंसून म्हणाली, ' अरे मूर्खा ! ती फौज कशी रे पुढें जाणार ? टापांचीं तोंडें कोणत्या दिशेला आहेत तें नाहीं का दिसत ? ही फौज मांदारण-गडाला गेली आहे. ' इतकें बोलून ती खिन्न झाली.

लवकरच शैलेश्वराच्या देवालयाची शुभ्र शोभा दिसूं लागली. विमलेनें विचार केला कीं राजपुत्राची या ब्राह्मणाशीं गांठ पडून कांहीं उपयोग नाहीं. त्यापासून उलट कांहीं अनिष्ट घडावयाचें. म्हणून त्याला आतां कशी रजा द्यावी या विचा-रांत ती पडली. पण गजपतीनें स्वतःच त्याबद्दलची युक्ति सुचविली. ब्राह्मणानें पुनः तिच्या पाठीपाशीं येऊन तिचा पदर ओढला. विमलेनें विचारलें, 'आणखी काय ?

ब्राह्मणानें विचारलें, 'तें किती दूर आहे?'

**वि०**—तें म्हणजे रे काय?

**दि०**—वडाचें झाड.

**वि०**—कोणतें वडाचें झाड?

**दि०**—जेथें त्या दिवशीं तें तुम्हांस दिसलें तें.

**वि०**—काय दिसलें?

**दि०**—ज्याचें नांव रात्रीं घेऊं नये तें.

विमला मनांत समजली आणि ही संधी बरी आहे असें पाहून गंभीर स्वरानें म्हणाली, 'तें पहा.'

ब्राह्मण अधिकच भयभीत होऊन म्हणाला, 'तें काय?'

विमलेनें शैलेश्वराजवळचें वडाचें झाड बोटानें दाखवून हळूच म्हटलें, 'तें वडाचें झाड.'

दिग्गज जागचा हलेना. त्याच्या पायांची शक्तीच गेली! तो पिंपळाच्या पानांप्रमाणें कांपूं लागला.

**विमला**—अरे! लवकर लवकर पाऊल उचल?

ब्राह्मणानें कांपत कांपत उत्तर केलें, 'माझ्याच्यानें नाहीं बुवा आतां येववत.'

**विमला**—मलाहि बाई भय वाटतें.

ब्राह्मण हें ऐकून व भयभीत होऊन पळण्याच्या उद्योगाला लागला.

विमला झाडाकडे दृष्टि लावून पाहूं लागली, तेव्हां त्या झाडाखालीं कांहीं पांढरें पांढरें पडलेलें तिला दिसलें. तिला ठाऊक होतें कीं शैलेश्वराचा सांड तेथें पडलेला असतो; पण ती गजपतीला म्हणाली, 'गजपति! इष्ट देवतेच्या नांवाचा जप कर. त्या झाडाखालीं तुला कांहीं दिसतें आहे काय?'

'अरे बाप रे!' इतकें बोलून ब्राम्हणानें एकदम धूम ठोकली, आणि लांब लांब फलांगा टाकून तो हां हां म्हणतां अर्धा कोस निघून गेला.

विमलेला त्याचा स्वभाव ठाऊक होता. म्हणून तो आतां थेट किल्ल्याच्या दरवाजापाशीं जाऊन उभा राहील अशी तिची खात्री होती. ती आपली निश्चित मनानें मंदिराकडे जाऊं लागली.

सर्व बाजूंनीं विचार करूनच विमला आलेली होती. एकच गोष्ट तिच्या विचारांतून सुटली होती. राजपुत्र मंदिरांत आला असेल कीं नाहीं? ही शंका आतां तिला आली, आणि तिच्या मनाला फार क्लेश होऊं लागले. ती विचार

करूं लागली, तेव्हां तिच्या ध्यानांत आलें कीं मी येईनच असें निश्चित वचन राजपुत्रानें दिलें नव्हतें. या ठिकाणीं आपली पुनः गांठ पडेल, आणि न पडली तर मात्र पुनः गांठ पडणार नाहीं, इतकेंच तो म्हणाला होता. यावरून तो न येण्याचा संभव तिला दिसला. तो जर न आला, तर केलेले श्रम व्यर्थ होणार ! असें मनांत येऊन ती खिन्न झाली, आणि मनांत म्हणूं लागली, ' ही गोष्ट अगोदर कशी मला सुचली नाहीं ? ब्राम्हणाला व्यर्थ घालवून दिलें म्हणावयाचें ! आतां मी एकटी येथें रात्रींची कुठें भटकूं ? शैलेश्वरा ! तुझी इच्छा असेल ती खरी !'

वडाच्या झाडाखालून मंदिराकडे जाण्याची वाट होती. ती त्या झाडाखालून जात असतांना तिला आढळून आलें कीं त्या जागीं सांड नाहीं. झाडाखालीं जें पांढरें पांढरें दिसलें तेंहि आतां तेथें नाहीं. तेव्हां विमला विस्मित झाली. सांड तेथून उठून गेला असता तर दिसला असता.

विमला झाडाखालीं बारोक नजरेनें पाहूं लागली. तेव्हां झाडाच्या मागच्या बाजूला माणसाच्या पांढऱ्या पोषाखाचा कांहीं भाग तिला दिसला. तेव्हां ती अधिकच भ्याली, आणि झपाझप पावलें उचलीत मंदिराकडे जाऊं लागली. तिनें मंदिराच्या दारावर जोरानें थाप मारली. दार बंद होतें. आंतून कोणीसें गंभीर स्वरानें विचारलें, ' कोण आहे ?' त्या शून्य मंदिरांतून ' कोण आहे ? ' असा गभीर प्रतिध्वनि आला.

विमलेनें होतें नव्हतें तेवढें धैर्य एकवटून उत्तर केलें, ' मी एक थकलेली वाटसरू स्त्री आहें.'

दार उघडलें. विमलेनें पाहिलें, तेव्हां मंदिरांत दिवा जळत होता, आणि समोर हातांत ढाल तलवार घेतलेला एक धिप्पाड शरीराचा मनुष्य उभा होता. विमलेनें त्याला ओळखून विचारलें, ' कोण ? जगत्सिंह ! '

---

## प्रकरण सोळावें.

# शैलेश्वरासमक्ष.



विमलेनें मंदिरांत शिरल्यावर अगोदर बसून थोडीशी विश्रांति घेतली. नंतर नम्र भावानें देवाला नमस्कार केल्यावर युवराजालाहि तिनें मुजरा केला. थोडा

वेळ दोघेंहि स्तब्ध उभीं राहिलीं. आपल्या मनांतला भाव कोणी कशाप्रकारें व्यक्त करून दाखवावयाचा अशी दोघांनाहि पंचाईत पडली. कोणीं बोलण्याला सुरुवात करावयाची असें दोघांनाहि संकट येऊन पडलें.

असल्या प्रसंगीं समयसूचकता ठेवून वागण्यांत विमला पटाईत होती. किंचित् हास्य करून तिनें म्हटलें, 'युवराज ! आज शैलेश्वराच्या कृपेनें आपलें दर्शन मला घडलें. रात्रींची अरण्यांतून एकटी येत असतांना मला भीति वाटली होती; पण आतां या मंदिरांत आपलें दर्शन घडल्यानें मला धीर आला आहे.'

युवराजानें विचारलें, 'आपली सगळी मंडळी खुशाल आहे ना ?'

युवराजाचें तिलोत्तमेवर प्रेम आहे कीं नाहीं तें अगोदर पहावें आणि मग दुसऱ्या गोष्टी बोलाव्या असा विमलेचा विचार होता. त्याप्रमाणें ती म्हणाली, 'देवानें मंगळ घडवून आणावें म्हणून तर शैलेश्वराच्या पूजेसाठीं येथें आल्यें आहें. आतां मला कळून चुकलें आहे कीं आपल्या पूजेनेंच शैलेश्वर तृप्त झाला आहे. माझी पूजा तो ग्रहण करणार नाहीं. तेव्हां आपली परवानगी घेऊन मी परत जाईन म्हणत्यें.'

**युव०**—जावें. पण तुम्हीं एकटें जाणें योग्य नाहीं. मी तुम्हांला पोंचविण्याला येतों.

विमलेला दिसून आलें कीं, राजपुत्रानें सारा जन्म नुसती अस्त्रविद्याच शिकण्यांत घालविला नाहीं. तिनें विचारलें, 'एकटें जाण्यास कोणती हरकत आहे ?'

**युव०**—वाटेंत फार भीति आहे म्हणून.

**वि०**—तर मग मी महाराज मानसिंह यांच्याकडे जाईन.

**युव०**—कां ?

**वि०**—कां ? मला त्यांच्याकडे फिर्याद करायची आहे. त्यांनीं जो सेनापति नेमिला आहे, त्याच्या हातून आमच्या वाटेंतलें भय दूर केलें जात नाहीं. शत्रूचा नाश करण्यास तो असमर्थ आहे, अशी मला फिर्याद करायची आहे.

राजपुत्रानें हंसून उत्तर केलें, 'सेनापति म्हणेल कीं शत्रूला मारणें जेथें देवांनासुद्धां असाध्य आहे, तेथें मनुष्याचा काय पाड ! महादेवानें तपोवनांत मदनरूपी शत्रूला जाळून भस्म करून टाकिलें होतें; पण आजच पंधरा दिवस झाले, त्याच मदनानें त्याच शिवाच्या मंदिरांत पहा कसा उच्छाद मांडला !'

विमला किंचित् हंसून म्हणाली, 'कोणाशीं त्यानें असें दुष्टपणाचें वर्तन केलें ?'

**युव०**—त्या सेनापतीशींच.

**वि०**—अशा असंभवनीय गोष्टीवर महाराज कसा विश्वास ठेवतील?

**युव०**—माझ्याजवळ त्या गोष्टीला साक्षीदार आहे.

**वि०**—महाराज! कोण तो असा साक्षीदार?

**युव०**—सदाचरण—

पण राजपुत्राच्या तोंडून वाक्य पुरतें निघण्याच्या पूर्वीच विमला म्हणाली, 'ही दासी सदाचरणी नाहीं, अतिशय दुराचारी आहे. मला 'विमला' याच नांवानें हाक मारावी.'

**राज०**—तर मग विमला हीच साक्षीदार.

**वि०**—विमला अशी साक्ष देणार नाहीं.

**युव०**—असा संभव आहे खरा. जें मनुष्य आपण दिलेलें वचन पंधरा दिवसांतच विसरून जातें, तें काय खरी साक्ष देणार आहे?

**वि०**—महाराज! कोणतें वचन दिलें होतें तें सांगावें.

**युव०**—तुमच्या सखीचा परिचय करून देण्याचें.

विमलेनें तत्काळ विनोदप्रियता टाकून दिली, आणि गंभीर भावानें म्हटलें, 'महाराज! परिचय करून देण्याला संकोच वाटतो. कारण त्यामुळें आपल्या मनाला वाईट वाटेल एखादें.'

राजपुत्र किंचित् काळपर्यंत विचारांत पडला. त्यानेंहि आपला थट्टेखोरपणा टाकला, आणि विचार करून म्हटलें, 'विमले! खरी ओळख झाल्यानें माझ्या मनाला दुःख होण्याचें कारण काय?'

**वि०**—कारण आहे.

राजपुत्र पुनः विचारांत पडला. क्षणभरानें तो म्हणाला, 'कांहींहि होवो. तुम्ही माझी इच्छा पूर्ण करा. मला सध्यां जी असह्य उत्कंठा लागली आहे तिच्यापेक्षां पुढें होणारें दुःख कांहीं मोठें नसेल. तुम्हांला जी शंका वाटत आहे ती खरी असली तरी सध्यांच्या माझ्या मानसिक यातनांपेक्षां तिचें दुःख बरें. अंतःकरणाला त्यापासून कांहीं चेतना तरी मिळेल. विमले! मी केवळ गमतीखातर तुमच्या भेटीसाठीं येथें आलों नाहीं. गेल्या पंधरवड्यांत घोड्याच्या पाठीशिवाय अन्य शय्या किंवा विश्रांतिस्थान मला ठाऊक नाहीं. माझें मन अत्यंत व्याकुळ झालें आहे म्हणूनच मी आलों आहें.'

हे शब्द ऐकण्यासाठींच विमलेनें येवढा खटाटोप केला होता. त्याच्या तोंडून आणखी कांहीं ऐकण्यास मिळावें म्हणून ती म्हणाली, ' युवराज ! आपण राजनीतींत निपुण आहां. आपण विचार करून पहा कीं अशा युद्धकाळीं आपणास दुर्लभ अशा रमणीवर मन ठेवणें उचित आहे काय ? आपणा उभयतांच्या सुखासाठीं म्हणून सांगत्यें कीं माझ्या सखीला विसरून जाण्याचा यत्न करा, म्हणजे युद्धाचे कामीं आपणास उत्साह वाटून आपण खात्रीनें कृतकार्य व्हाल. '

युवराजाच्या ओंठावर हास्य दिसलें, पण तें त्याच्या मनाला वाटत असलेल्या खेदाचें निदर्शक होतें. तो म्हणाला, ' कोणाचें विस्मरण होईल ? तुमच्या सखीचें रूप माझ्या अंतःकरणावर जें खोल उमटलें आहे ' तें माझें अंतःकरण दग्ध झाल्यशिवाय कधीं नाहींसें होणारें नाहीं. लोक मला पाषाणहृदयी म्हणतील. पण पाषाणावर जी मूर्ति एकदां खोदली जाते ती त्या पाषाणाचा नाश झाल्याशिवाय नाहींशी होत नाहीं. लढाईची गोष्ट कशाला बोलतां ? विमले ! मी तुमच्या सखीला पाहिल्यावेळेपासून लढाईंतच गुंतलेला आहें. रणभूमीवर काय किंवा छावणींत काय, त्या मुखाचें विस्मरण मला कधींच घडलें नाहीं. माझें शिर तोडण्यासाठीं पठाणानें तलवार उगारली होती, त्यावेळीं सुद्धां, तें मुख मला एकदांच पाहण्यास मिळालें, पुनः पाहण्यास मिळणार नाहीं, हाच विचार सर्वांच्या अगोदर माझ्या मनांत आला होता. विमले ! कोठें गेल्यानें तुमच्या सखीचें दर्शन मला घडेल ? '

आणखी जास्त ऐकून विमलेला काय करावयाचें होतें ? ती म्हणाली, ' मांदारणगडावर गेल्यानें माझ्या सखीचें दर्शन तुम्हांला घडेल. तिलोत्तमा ही वीरेंद्रसिंहाची कन्या आहे. '

जगत्सिंहाला वाटलें कीं जणूं काय आपणास काळसर्पाचाच दंश झाला आहे ! तो तरवारीवर भार देऊन खालीं मान घालून उभा राहिला. बऱ्याच वेळानें लांब उसासा टाकून तो म्हणाला, ' तुमचेंच म्हणणें खरें होईल. तिलोत्तमा माझी होणार नाहीं. मी आतां युद्धाला जात आहें. भावी सुखाविषयींच्या माझ्या सगळ्या आकांक्षा मी आतां शत्रूच्या रक्तांत बुडवून टाकीन. '

राजपुत्राची अशी खिन्नता पाहून विमला म्हणाली, ' युवराज ! प्रेमाला जर कांहीं बक्षीस असेल, तर तिलोत्तमेची प्राप्ति होण्याला आपण योग्य आहां. पण असे अगदीं निराश कां होतां ? आज प्राक्तन प्रतिकूळ असेल; पण तेंच उद्यां अनुकूळहि होईल कदाचित् ! '

आशा ही मोठी गोडबोली आहे. विपत्तीच्या काळीं ती माणसाच्या कानांत हळूच सांगते कीं ' आलेले ढग चिरकाळ टिकून राहतील असें नाहीं. मग दुःख कां करतोस ? माझी गोष्ट ऐक. ' विमलेच्या तोंडानें आशा म्हणाली, ' असे कष्टी कां होतां ? मी सांगत्यें तें ऐका.'

जगत्सिंहानें ते आशेचे बोल ऐकले. ईश्वराची इच्छा कोणाला सांगतां येईल ? विधात्यानें दैवीं काय लिहिलें आहे तें कोणाला अगोदर वाचून सांगतां येतें ? या जगांत असंभवनीय असें काय आहे ? आणि आजवर अघटित घटना घडल्या नाहींत काय ?

आशा उत्पन्न करणारें विमलेचें भाषण ऐकून राजपुत्रानें म्हटलें, ' तें कांहींहि असो; पण आज माझें मन फारच अस्थिर झालें आहे. कर्तव्याकर्तव्य मला कांहींच कळत नाहीं. जें अदृष्टांत लिहिलें असेल तें घडेलच. कपाळीं लिहिलेलें कोणाला पुसतां येणार आहे ? आतांच्या वेळीं माझ्या मनांत जें आहे तें मला व्यक्त करून सांगतां येतें. या शैलेश्वराला साक्ष ठेवून मी सांगतों कीं तिलोत्तमे-शिवाय दुसऱ्या कोणावरहि माझें मन जडलेलें नाहीं. तुमच्याजवळ माझें येव-ढेंच मागणें आहे कीं तुम्ही माझी ही सगळी गोष्ट तुमच्या सखीला कळवा आणि तिला सांगा कीं मी फक्त एकवार तुझ्या दर्शनाची इच्छा करीत आहें. पुनः म्हणून मी अशी याचना करणार नाहीं असें वचन देतों.'

हें ऐकून विमलेची मुद्रा हर्षानें प्रफुल्लित झाली. ती म्हणाली, ' माझ्या सखीचें उत्तर महाराजांस कसें मिळेल ? '

युवराज म्हणाला, ' तुम्हांला माझ्यानें वारंवार त्रास देववत नाहीं; पण तुम्ही जर पुनः या मंदिरांत येऊन मला भेटाल तर तुमचे माझ्यावर फार फार उपकार होतील. जगत्सिंह त्या उपकाराची फेड कोणत्याना कोणत्या प्रकारें करील.'

विमला म्हणाली, ' युवराज ! मी आपली हुकुमाची ताबेदार आहें. पण रात्रीं या मार्गानें एकटें येण्याचें फार भय वाटतें. कबूल केल्याप्रमाणें यायलाच पाहिजे होतें म्हणून मी आज आल्यें. आजकाल या प्रदेशांत शत्रूनें मोठा दरारा बसविला आहे. त्यामुळें-पुनः येण्यास फार भय वाटतें.'

राजपुत्र क्षणभर विचारांत पडला. नंतर तो म्हणाला, ' जर कांहीं हरकत नसली तर मी तुमच्याबरोबर मांदारण गडापर्यंत येतों. मी तेथें एखाद्या सोइ-स्कर ठिकाणीं तुमची वाट पाहत बसेन. तुम्ही येऊन मला निरोप सांगा म्हणजे झालें.'

विमला हर्षित होऊन म्हणाली ‘ बरें तर चलावें.’

दोघेंहि मंदिरांतून बाहेर पडून चालू लागलीं. इतक्यांत मंदिराच्या बाहेर कोणी हळू हळू सावधगिरीनें चालल्याचा शब्द कानीं आला. राजपुत्रानें किंचित् विस्मित होऊन विचारलें, ‘ तुमच्याबरोबर कोणी आलें आहे काय ?’

तिनें उत्तर केलें, ‘ नाहीं.’

‘ तर मग हा पावलांचा आवाज कोणाचा ? मला शंका येते. कोणीं तरी आडून आपलें बोलणें ऐकलें असावें.’

इतकें बोलून राजपुत्रानें मंदिराला चारी बाजूंनीं प्रदक्षिणा घालून पाहिलें; पण कोणीहि त्याला दिसलें नाहीं.

---

## प्रकरण सतरावें.

# वीर पंचमी.

दोघेंहि शैलेश्वराला वंदन करून साशंक चित्तानें मांदारणगडाकडे जाण्यास निघालीं. थोडा वेळ तीं कांहीं बोललीं नाहींत. नंतर राजपुत्रानें बोलण्यास प्रथम सुरुवात केली. तो म्हणाला, ‘ विमले ! मला एक गोष्ट विचारावीशीं वाटते. ती ऐकून तुम्ही काय म्हणाल तें सांगतां येत नाहीं. ’

विमलेनें विचारलें—‘ ती कोणती गोष्ट ? ’

**जगत्०**—माझ्या मनाची खात्री होऊन चुकली आहे कीं, तुम्ही दासी नाहीं.

विमलेनें किंचित् हंसून उत्तर केलें, ‘ ही शंका आपल्या मनांत कशी आली ?’

**जगत्०**—वीरेंद्रसिंहाची मुलगी अंबरपतीची सून होऊं शकत नाहीं, याला कांहीं विशेष कारण आहे. ती हकीकत फार गुप्त आहे. तुम्ही दासी असून ती हकीकत तुम्हांला कशी कळली ?

विमलेनें लांब उसासा टाकिला आणि थोड्या दुःखित स्वरानें म्हटलें, ‘ आपला तर्क खरा आहे. मी दासी नाहीं. प्रारब्धदोषामुळें दासीसारखी रहात आहें. प्रारब्धाकडे तरी काय दोष आहे ? माझें प्रारब्ध कांहीं वाईट नाहीं !’

राजकुमार समजला कीं आपल्या प्रश्नामुळें विमलेच्या मनाला दुःख झालें आहे, तेव्हां आतां आपण अधिक कांहीं बोलूं नये हें बरें.

विमला आपण होऊनच म्हणाली, ' युवराज ! मी माझी हकीकत आपणांस सांगेन; पण आतांच नाहीं. हा कसला शब्द ऐकूं येत आहे ? मागून कोणी येत तर नाहीं ? '

याच वेळीं मागून कोणी मनुष्य येत असल्याचा शब्द स्पष्टपणें ऐकूं येऊं लागला. कोणी दोन माणसें एकमेकांच्या कानांत कुजबुजत आहेत असें वाटलें. यावेळीं मंदिरापासून सुमारें अर्धाकोस अंतर तीं चालून आलीं होतीं. राजपुत्र म्हणाला, ' मला भारी शंका येते. मी पाहून येतों. '

इतकें बोलून राजपुत्र थोडासा परत गेला आणि कोणी मनुष्य आहे कीं काय याचा शोध करण्यासाठीं रस्त्याच्या बाजूला पाहूं लागला; पण कोणी मनुष्य दिसलें नाहीं. तेव्हां परत येऊन तो विमलेला म्हणाला, ' आपल्या मागें कोणी लागलें आहे अशी मला शंका येते. सावधगिरीनें बोलावें हें चांगलें.'

तेव्हां दोघेंहि अगदीं हलक्या स्वरानें बोलत चालूं लागलीं. जातां जातां मांदारण गांवांत त्यांनीं प्रवेश केला, आणि किल्ल्यासमोर येऊन तीं उभीं राहिलीं. राजपुत्रानें विचारलें, ' आतां तुम्ही किल्ल्यांत कशा जाणार ? एवढ्या रात्रीं किल्ल्याचा दरवाजा तर बंद झालाच असेल ? '

**वि०**—आपण त्याची काळजी करूं नका. मीं त्याची व्यवस्था किल्ल्यांतून निघण्यापूर्वीच करून ठेविली आहे.

राजपुत्र हंसून म्हणाला, ' एखादी चोरवाट आहे कीं काय ? '

विमला हंसून म्हणाली, ' जेथें चोर आहे, तेथें वाटहि असलीच पाहिजे. '

क्षणभरानें राजपुत्र पुनः म्हणाला, ' विमले ! आतां मला पुढें येण्याचें कांहीं कारण नाहीं. मी किल्ल्याजवळच्या या आंबराईत तुमची वाट पाहत बसतों. तुम्ही माझ्या वतीनें आपल्या सखीला विनंति करून सांगा कीं, पंधरा दिवसांनीं म्हणा, महिनाभरानें म्हणा, पण पुनः एकदां त्यांच्या दर्शनानें नेत्रांची तृप्ति करून घ्यावी अशी माझी फार इच्छा आहे. '

**विमला**—ही आंबराई म्हणजे कांहीं निर्जन स्थान नाहीं. आपण माझ्या-बरोबर यावें.

**जगत्०**—कोठपर्यंत ?

**विमला**—किल्ल्यांत यावें.

राजपुत्रानें थोडासा विचार करून म्हटलें, ' विमले ! हें बरोबर नाहीं. किल्ल्याच्या मालकाच्या परवानगीवांचून मला येतां येत नाहीं. '

**विमला**—काय हरकत आहे ?

राजपुत्रानें अभिमानपूर्ण स्वरानें म्हटलें, ' राजपुत्रांना कोठेंहि जाण्याची भीति वाटत नसते; पण तुम्हीच विचार करून पहा कीं, किल्ल्याच्या मालकाला न कळूं देतां चोरासारखें गुपचिप किल्ल्यांत शिरणें हें अंबरपतीच्या पुत्राला शोभतें कीं काय तें ? '

**विमला**—पण मी आपणाला बोलावून नेत आहें ना ?

राजकुमार म्हणाला, ' तुम्हांला दासी समजून मी तुमची अवज्ञा करीत आहें असें समजूं नका; पण मला बोलावून किल्ल्यांत नेण्याला तुम्हांला काय अधिकार आहे सांगा बरें ? '

थोडा वेळ विचार करून विमला म्हणाली, ' मला काय अधिकार आहे, तें कळल्यावांचून आपण आंत येणार नाहीं काय ? '

**राज०**—नाहीं. कधीं येणार नाहीं.

तेव्हां विमलेनें राजपुत्राच्या कानाला लागून कांहींसें सांगितलें. तेव्हां राजपुत्र म्हणाला, ' आतां चला. '

**विमला**—युवराज ! मी दासी. दासीला ' तुम्ही चला ' असे शब्द कशाला म्हणायला हवेत ? ' चल ' म्हणावें.

**युव०**—बरें, तसें कां होईना.

ज्या वाटेनें विमला राजपुत्राला घेऊन चालली होती; ती वाट किल्ल्याच्या दरवाज्याकडे जात होती. किल्ल्याच्या बाजूला आंबराई होती. किल्ल्याच्या मुख्य दरवाज्यांतून ती दिसत नव्हती. याच वाटेनें जिकडे आमोदर नदी अंतःपुराच्या मागून वाहत जात होती, तिकडे जावयाचें झालें, तर या आंबराईतून जावें लागे. विमला यावेळीं राजमार्ग सोडून राजपुत्राबरोबर याच आंबराईत शिरली.

आंबराईत शिरतांच वाळलेल्या पानांवर मनुष्याचा पाय पडल्यानें जसा शब्द होतो, तसा शब्द त्या दोघांनीं ऐकला. विमला म्हणाली, 'पुनः शब्द !'

**राज०**—तूं पुनः क्षणभर उभी रहा. मी पाहून येतों.

राजपुत्र म्यानांतून उपसलेली तलवार हातीं घेऊन जिकडून शब्द आला होता त्या दिशेकडे गेला; पण त्याला कांहीं दिसलें नाहीं. आंबराईच्या तळाशीं नानाप्रकारच्या वेली वगैरेंचें इतकें जंगल माजलें होतें, व वृक्षांच्या गाढ छायेमुळें इतका अंधार पडला होता कीं राजपुत्र जिकडे जाई तिकडे त्याच्यापासून फारसें दूरचें कांहीं त्याला दिसेना. तेव्हां राजपुत्राला वाटलें कीं वाळलेल्या पानांवरून

चाललेल्या एखाद्या पशूच्या पावलाचा शब्द आपण ऐकला असेल. कांहींहि असो. शंका आलीच आहे तर ती फेडून घ्यावी हें योग्य आहे, असा विचार करून तो हातांतल्या तलवारीसह आंब्याच्या झाडावर चढला. झाडाच्या शेंड्यावर चढून बराच वेळ चोहींकडे बारकाईनें पाहिल्यावर त्याला असें आढळून आलें कीं एका मोठ्या आम्रवृक्षाच्या अंधकारमय फांद्यांच्या गर्दींत दोन माणसें बसलीं आहेत. त्यांच्या पटक्यांवर चंद्राचे किरण पडले आहेत व त्यामुळें ते पटकेच तेवढे दिसत आहेत, माणसांचे अवयव छायेमुळें झांकले गेले आहेत. ते माणसांच्या डोक्यांवरचे पटके आहेत याविषयीं राजपुत्रानें पुरी खात्री करून घेतली, व तें झाड आपणास पुनः सांपडेल, चूक होणार नाहीं, अशा रीतीनें पक्कें ध्यानांत धरलें. नंतर हळू हळू झाडावरून खालीं उतरून शब्द न करतां तो विमलेकडे परत गेला. त्यानें जें पाहिलें तें सर्व त्यानें वर्णन करून विमलेला सांगितलें. तो म्हणाला, 'या वेळीं दोन भाले पाहिजे होते !'

**विमला**—भाले घेऊन काय करणार होतां ?

**जगत्०**—ते असते म्हणजे हीं माणसें कोण आहेत तें कळलें असतें. हें लक्षण बरें दिसत नाहीं. पटक्यांवरून असें वाटतें कीं दुष्ट हेतु मनांत धरून ते माझा पाठलाग करीत असावेत.

लागलींच तिला रस्त्याच्या बाजूला आढळलेला मृत अश्व, पागोटें व घोड्यांच्या टापांचीं जमिनीवर उमटलेलीं चिन्हें यांचें स्मरण झालें. ती म्हणाली, 'आपण येथें थांबावें, मी आत्तां किल्ल्यांतून भाले घेऊन येत्यें.'

इतकें बोलून विमला त्वरेनें किल्ल्याच्या पायथ्यापाशीं गेली. ज्या महालांत बसून तिनें आदले दिवशीं संध्याकाळीं पोषाख केला होता, त्याच्या खालच्या बाजूच्या खोलीची एक खिडकी आंबराईच्या बाजूला होती. विमलेनें पदरांतून एक किल्ली बाहेर काढली आणि कळ फिरविली. नंतर खिडकीच्या गजांना धरून तिनें तिच्या दाराला धक्का दिला. त्याबरोबर शिल्पकौशल्यामुळें खिडकीची चौकट गज, फळ्या, सर्व कांहीं भिंतीच्या पोकळींत प्रविष्ट झालीं, आणि तिचा खोलींत जाण्याचा मार्ग मोकळा झाला. विमलेनें खोलींत शिरून भिंतींत गेलेली चौकट धरून ओढली. तेव्हां खिडकी बाहेर येऊन पुनः पूर्वीच्या सारखी नीट बसली. दाराच्या आंतून बाहेरच्या प्रमाणें अंगची कळ होती. विमलेनें किल्लीनें ती कळ नीट दाबल्याबरोबर बाहेरून कोणाला उघडतां येणार नाहीं, अशा रीतीनें ती खिडकी पक्की लागली.

विमला अतिशय चपळतेनें शिलेखान्यांत गेली, आणि तेथल्या पाहारेवाल्याला म्हणाली, 'मी तुझ्यापाशीं जें मागेन तें कोणाला सांगूं नकोस. मला दोन भाले दे, मी ते परत आणून देईन.'

पाहारेवाला दचकला. त्यानें विचारलें, 'भाले नेऊन तुम्ही काय करणार ?'

विमलेच्या अंगीं समयसूचकता बरीच होती. तिनें चटकन् म्हटलें, 'आज मला वीरपंचमीचें व्रत आहे. हें व्रत केलें म्हणजे पोटीं वीरपुत्र जन्मास येतो. या व्रतांत रात्रीच्या वेळीं अस्त्रपूजा करायची असते. मला पुत्रप्राप्तीची इच्छा आहे, ही गोष्ट कोणापाशीं बोलूं नकोस हो !'

तिनें शिपायाला सांगितलें तें त्यालाहि खरें वाटलें. किल्ल्यांतले सगळे नोकर-चाकर विमलेच्या हुकुमांत असत. अर्थात् दुसरें तिसरें कांहीं न बोलतां त्यानें तिला दोन तीक्ष्ण भाले दिले.

विमला ते भाले घेऊन पूर्वीसारखी त्वरेनें खिडकीपाशीं गेली आणि युक्तीनें खिडकी उघडून, बाहेर पडून, जगत्सिंहापाशीं जाऊन पोंचली.

घाईत असल्यामुळें म्हणा किंवा आपण जवळच आहों, लागलीच परत येऊं अशा खात्रीमुळें मन निश्चिंत होतें म्हणून म्हणा, विमलेनें बाहेर जातांना खिडकी पूर्वीसारखी बंद करायची ती न करतांच ती निघून गेली. पण या तिच्या चुकीमुळें एक मोठा घोटाळा झाला. खिडकीच्या अगदीं जवळ आंब्याचें एक झाड होतें. त्याच्या आड एक हत्यारबंद पुरुष उभा होता. त्यानें विमलेनें केलेली चूक पाहिली होती. विमला दृष्टिआड होईपर्यंत तो तसाच लपून उभा राहिला. ती दिसेनाशी होतांच त्यानें झाडाच्या तळाशीं करकर आवाज करणारे आपले जोडे टाकून देऊन हळूहळू पावलें टाकीत टाकीत खिडकीचें दार गांठलें. प्रथम त्यानें खिडकीच्या उघड्या दारांतून खोलीच्या आंत नजर फेकली, आणि आंत कोणी नाहीं असें पाहून गुपचुप आंत प्रवेश केला. मग खिडकीचें दार बंद करून तो अंतःपुरांत शिरला.

इकडे राजपुत्र विमलेच्या हातून भाले घेऊन पूर्वीप्रमाणें झाडावर चढला, व अगोदर पाहून ठेवलेल्या झाडाकडे पाहूं लागला. तेव्हां त्याला तेथें एकच पटका दिसला, दुसरा मनुष्य कोठें दिसेना. राजपुत्रानें एक भाला डाव्या हातांत घेतला, आणि दुसरा उजव्या हातांत घेऊन व वृक्षावरच्या पटक्यावर नेम धरून आपल्या विशाल बाहुबलानें तो फेकला. त्याबरोबर प्रथम त्या झाडाच्या पानांचा 'मर्मर' असा मोठा शब्द झाला आणि नंतर लागलीच कांहीं जड पदार्थ खालीं

पडल्याचा आवाज ऐकूं आला. आतां पटका झाडावर दिसला नाहीं. त्यावरून राजपुत्र समजला कीं आपला बिनचूक नेम बरोबर लागून पटका बांधलेला माणूस झाडावरून खालीं पडला असावा.

आतां जगत्‌सिंह वेगानें झाडावरून खालीं उतरला आणि झाडावरून पडलेल्या माणसाच्या जवळ गेला. पाहतो तों शिपायाचा लष्करी पोषाख घातलेला एक हत्यारबंद मुसलमान अगदीं मेल्यासारखा पडला आहे, व त्याच्या डोळयांत भाल्याचें टोंक शिरलें आहे.

त्या मरणोन्मुख माणसाच्या शरीराकडे बारकाईनें पाहिल्यावर त्याला दिसलें कीं त्याचा प्राणसुद्धां निघून गेला होता. भाला त्याच्या डोळयांतून मेंदू भेदून गेला होता. मेलेल्या माणसाच्या खिशांत एक पत्र होतें. त्याचें डोकें बाहेर दिसत होतें. जगत्‌सिंहानें तें पत्र काढून घेऊन वाचलें. त्यांत पुढील मजकूर होता—

" कतलूखानाच्या सेवकांनीं ही चिठ्ठी पाहतांच ती आणणाराच्या हुकुमाप्रमाणें करावें. कतलूखाँ. "

विमलेनें फक्त झालेला आवाज ऐकला होता; पण तो कशाचा काय तें तिला मुळींच कळलें नव्हतें. राजकुमारानें तिच्या जवळ जाऊन तिला सगळा वृत्तांत सांगितला. तो ऐकून विमला म्हणाली, ' युवराज ! असें होणार हें मला अगोदर कळतें तर मीं कधींहि आपणाला भाले आणून दिले नसते. मी महापातकी आहें, आज जें कर्म घडलें आहे त्याची निष्कृति पुष्कळ दिवस प्रायश्चित्त भोगल्यानेंहि होणारी नाहीं. '

**युवराज**—शत्रूच्या वधाबद्दल इतका क्षोभ कशाला करायला हवा ? शत्रुवध हा तर आपला धर्मच आहे !

**विमला**—असा विचार करणें आपल्या सारख्या वीराला उचितच आहे. पण मी पडल्यें स्त्री !

क्षणभरानें विमला पुनः म्हणाली ' राजकुमार ! आतां उशीर करणें ठीक नाहीं. किल्ल्यांत चलावें. मी दार उघडें ठेवून आल्यें आहें. '

दोघेंहि त्वरेनें किल्ल्यापाशीं गेलीं. प्रथम विमलेनें आणि मागून राजपुत्रानें आंत प्रवेश केला. आंत शिरतांना राजपुत्राचें हृदय व पाय हीं कंप पावूं लागलीं. एक लाख शत्रूंपुढें ज्याच्या डोक्याचा एक केस सुद्धां हलत नसे, त्याचें काळीज या सुखालयांत प्रवेश करतांना असें कां बरें धडधडावें ?

विमलेनें पूर्वीप्रमाणें खिडकीचें दार बंद करून घेतलें. नंतर ती राजपुत्राला घेऊन शय्यागृहांत गेली. ती राजपुत्राला म्हणाली, ' मी आतां येत्यें. आपण तोंपर्यंत या पलंगावर बसावें. दुसरा कांहीं विचार मनांत न आणतां आपण येवढें समजावें कीं भगवंताला देखील आसनाबद्दल वटपत्र घ्यावें लागलें होतें.'

विमलेनें तेथून निघून गेल्यावर थोड्या वेळानें शेजारच्या खोलीचें दार उघडून म्हटलें, ' युवराज ! इकडे येऊन माझी थोडी विनंति ऐकावी. ' हें ऐकून राजपुत्राचें हृदय पुनः धडधडूं लागलें. तो पलंगावरून उठून खोलींत विमलेच्याकडे गेला.

विमला तत्क्षणीं विजेप्रमाणेंच तेथून निघून गेली. राजपुत्रानें पाहिलें तर त्या खोलींत सर्वत्र सुवास सुटला होता. चांदीचे दिवे जळत होते, व कोपऱ्यांत बुरखा घेतलेली एक स्त्री उभी होती. तीच तिलोत्तमा !

---

## प्रकरण अठरावें.

# शेराला सव्वाशेर !



विमला आपल्या खोलींत येऊन पलंगावर बसली. तिची मुद्रा हर्षानें प्रफुल्लित झाली होती. तिनें मोठ्या कौशल्यानें आपला मनोरथ सिद्धीला नेला होता. खोलींत दिवा जळत होता. समोर एक आरसा होता. तिनें संध्याकाळीं जो पोषाख केला होता तोच अद्याप होता. विमलेनें क्षणभर आरशांत आपलें रूप पाहिलें. संध्याकाळीं तिनें जशी वेणी घातली होती तशीच अजून कायम होती. डोळ्यांतलें काजळहि जशाचें तसें होतें. विड्यानें रंगलेले तिचे ओठ तसेच रंगलेले होते. तिच्या कानांतले डूल तिच्या मांसल खांद्यावर तसेच लोंबत होते. विमला तक्याला टेकून अर्धवट निजलेली व अर्धवट बसलेली होती. ती आपलें रूप आरशांत पाहून हंसली, दिग्गजपंडित घर सोडून उगाच नाहीं आपल्याबरोबर यायला तयार झाला ! असा विचार मनांत येऊनच ती हंसली.

विमला जगत्सिंहाच्या परत येण्याची वाट पाहत होती. इतक्यांत आंबराईत कोणी रणवाद्य वाजविल्याचा आवाज ऐकूं आला. त्याबरोबर ती दचकून उठली, व घाबरली. किल्ल्याच्या मुख्य दरवाज्याशिवाय आंबराईसारख्या इतर ठिकाणीं

रणवाद्य वाजविण्यांत येत नसे. तशांतून रात्रींची वेळ. या वेळीं रणशिंग कां वाजलें ? विशेषतः त्याच रात्रीं मंदिरांत जाते वेळीं व तेथून येते वेळीं तिनें जो प्रकार पाहिला होता, त्याचें आतां तिला स्मरण झालें. तिच्या लक्षांत तत्काळ येऊन चुकलें कीं भावी संकटाचें हें पूर्व चिन्ह आहे. म्हणून शंका येऊन तिनें खिडकीपाशीं जाऊन आंबराईकडे पाहिलें. पण तेथें तिला विशेष कांहीं दिसलें नाहीं. तेव्हां घाबरून ती खोलींतून बाहेर पडली. ज्या रांगेंत तिची खोली होती तिच्या पलीकडे एक चौक होता व पलीकडे पुनः खोल्यांची रांग होती, व त्या रांगेंत वर गच्चीकडे जाण्यासाठीं जिना होता. विमला खोलींतून बाहेर पडली ती हा जिना चढून गच्चीवर गेली. तिनें चोहींकडे पाहिलें, पण जंगलाच्या घनदाट छायेमुळें तिला कांहीं दिसलें नाहीं. तेव्हां तिचें मन दुप्पट उद्विग्न झालें. ती गच्चीच्या वरवंडीपाशीं गेली, आणि वरवंडीवर छाती टेकून व खालीं तोंड वाकवून किल्ल्याच्या पायथ्यापर्यंत तिनें नजर टाकिली; पण कांहींहि तिला दिसलें नाहीं. झाडांच्या श्यामवर्ण पानांवर चंद्राचे स्निग्ध किरण पडून तीं उज्ज्वल दिसत होतीं. केव्हां केव्हां वाऱ्यानें तीं हलत, तेव्हां त्यांचा पिंगल वर्ण दृष्टीस पडे. अरण्याच्या तळाशीं जेथें कोठें वृक्षांच्या शाखा व पल्लव तोडले होते, तेथें चंद्राचे किरण खालीं जमिनीवर पडले होते. आमोदर नदीच्या स्थिर जलप्रवाहांत आकाश, तारा व चंद्रमा यांचें प्रतिबिंब पडलेलें होतें. नदीपलीकडच्या दूरच्या कांहीं गगनचुंबी हवेल्या व कांहीं वाड्यांच्या बुरुजावरल्या पाहरेकऱ्यांच्या मूर्ति दिसत होत्या. यांच्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें. विमला खिन्न मनानें परत येण्याच्या बेतांत होती. इतक्यांत तिच्या पाठीला मागून कोणीं बोटानें स्पर्श केल्याचा तिला भास झाला. म्हणून ती दचकून मागें वळून पाहूं लागली तों एक अनोळखी हत्यारबंद पुरुष उभा असलेला दिसला. त्याला पाहून चित्रांतल्या पुतळीप्रमाणें ती निश्चल उभी राहिली.

तो हत्यारबंद पुरुष म्हणाला, 'ओरडूं नकोस. स्त्री जातीला ओरडणें शोभत नाहीं.'

ज्या पुरुषानें अशा रीतीनें विमलेला एकाएकीं घाबरवून सोडलें होतें, त्याचा पोषाख पठाण शिपायासारखा होता. पोषाखाचा नीटनेटकेपणा व उंचीपणा यांवरून तो उच्च पदस्थ पुरुष असावा हें सहज कळण्यासारखें होतें. त्याचें वय तीस वर्षांपेक्षां जास्त नव्हतें. त्याचें शरीर कांतियुक्त होतें. त्याच्या विशाल भालप्रांतीं बांधलेल्या पटक्यावर हिऱ्याचा शिरपेच झळकत होता. विमलेचें मन

यावेळीं जर स्थिर असतें तर हा पुरुष जगत्सिंहाहून थोरपणांत कमी नाहीं. हें तिला कळलें असतें. तो जगत्सिंहासारखा भव्य शरीराचा नव्हता. त्याची छातीहि विशाल नव्हती; पण जगत्सिंहाप्रमाणें त्याच्या सुंदर कांतींत वीरत्वाचें चिन्ह दिसत होतें. त्याच्यापेक्षां याचें शरीर अधिक सुकुमार होतें त्याच्या बहुमोल कमरेला प्रवालखचित म्यानांत दमास्कस येथें बनविलेली कट्यार असून हातांत नंगी तलवार होती. दुसरें हत्यार मात्र कांहीं नव्हतें.

तो शिपाई गडी म्हणाला, ‘ ओरडूं नकोस. ओरडलीस तर संकटांत पडशील.’

विमलेच्या अंगीं समयसूचकता आणि तीक्ष्ण बुद्धिमत्ता बरीच होती, तरी ती क्षणमात्र घाबरली. त्या पुरुषानें दोनदां जें तिला बजाविलें, त्यावरून त्याचा अभिप्राय ती समजली. विमलेच्या मागें गच्चीचा शेषभाग होता आणि समोर हा सशस्त्र योद्धा उभा होता. तिला गच्चीवरून खालीं फेकून देणें कठीण नव्हतें. हें सगळें लक्षांत घेऊन ती बुद्धिमान् विमला म्हणाली, ‘तुम्ही कोण ?’

**शिपाई**—तें कळून तुला काय उपयोग होणार ?

**वि०**—तुम्ही कशासाठीं या किल्ल्यांत आलां ? चोराला सुळावर चढवितात हें तुम्हीं कधीं ऐकिलें नाहीं काय ?

**शिपाई**—पण सुंदरी ! मी चोर नाहीं.

**वि०**—तुम्ही या किल्ल्यांत कसे आलां ?

**शिपाई**—तुझ्याच कृपेनें. तूं खिडकी उघडी ठेविलीस तिनें मीं आंत प्रवेश केला, आणि तुझ्याच मागोमाग गच्चीवर आलों.

विमलेनें कपाळावर हात मारला. तिनें पुनः विचारलें, ‘ तुम्ही कोण ? ’

**शिपाई**—आतां मी कोण तें तुला सांगितल्यानें माझें काय वाकडें व्हायचें आहे ? मी पठाण आहें.

**वि०**—येवढयानें काम भागत नाहीं. तुम्ही पठाण हें कळलें; पण तुमचें नांव गांव काय ?

**शिपाई**—ईश्वरेच्छेनें या दीनाला उस्मानखाँ म्हणतात.

**वि०**—उस्मानखाँ कोण तें मला ठाऊक नाहीं.

**शिपाई**—कतलूखानाचा सेनापति.

हें ऐकतांच विमलेल्या अंगाला कंप सुटला. कांहीं तरी उपायानें सुटका करून घेऊन वीरेंद्रसिंहाला हें वर्तमान कळवावें, अशी तिची इच्छा होती; पण तिला कांहीं उपाय दिसेना. समोर तो सेनापति तिचा रस्ता अडवून उभा

होता. तेव्हां अनन्यगतिक होऊन तिनें विचार केला कीं याला असाच जितका वेळ बोलण्यांत गुंतवीन तितकें कालहरण होईल. तेवढयांत किल्लयांतला एखादा पाहारेकरी तिकडे कदाचित येईल. म्हणून ती पुनः त्याच्याशीं बोलूं लागली. ती म्हणाली ' तुम्हीं या किल्लयांत काय म्हणून आलां ? '

उस्मानखाँनें उत्तर केलें, 'आम्ही वीरेंद्राकडे नम्रतापूर्वक एक दूत पाठविला होता. त्याच्या हातीं त्यानें उत्तर पाठविलें कीं तुमची ताकद असेल तर सैन्य घेऊन किल्लयांत या'.

**वि०**—समजल्यें. दुर्गाधिपति तुमच्याशीं मैत्री न करतां मोगलांच्या पक्षाला मिळाला आहे म्हणून तुम्ही हा किल्ला घेण्यासाठीं आलां आहां एकूण ! पण तुम्ही एकटे कसे ?

**उस्मान०**—यावेळीं मी एकटाच आहें.

**वि०**—म्हणून मला वाटतें कीं भिऊन तुम्ही मला जाऊं देत नाहीं ?

भीतीचा आरोप केल्यानें सेनापतीला वाईट वाटेल आणि आपल्या अंगचें धैर्य प्रगट करण्यासाठीं तरी तो आपला मार्ग खुला करून देईल अशी दुराशा मनीं धरून विमला असें म्हणाली होती.

उस्मान थोडेंसें हंसून म्हणाला 'सुंदरी ! तुझ्यापुढें असतांना मला तुझ्या केवळ नेत्रकटाक्षाची भीति वाटते. तीहि भीति फारशी नाहीं. पण तुझ्याजवळ मला एक मागणें मागावयाचें आहे.'

हा काय मागतो तें कळण्याच्या बुद्धीनें उस्मानच्या तोंडाकडे विमला टक लावून पाहूं लागली. उस्मान म्हणाला, 'तुझ्या वस्त्राच्या पदरांत जी किल्ली आहे, ती मला देशील तर माझ्यावर उपकार होतील. तुझ्या अंगाला स्पर्श करून तुझा अपमान करण्यास मला संकोच वाटतो'.

सेनापतीचा उद्दिष्ट हेतु सिद्धीस जाण्यास किल्लीची अत्यंत अवश्यकता आहे, ही गोष्ट विमलेसारख्या चाणाक्ष स्त्रीच्या लक्षांत येण्यास फारसा काळ लागला नाहीं. ती गोष्ट लक्षांत येतांच तिनें विचार केला कीं आतां काय उपाय आहे ? जी वस्तु हा बळजबरीनें घेऊं शकतो तिची याचना करणें ही केवळ थट्टा आहे. आपण किल्ली दिली नाहीं, तर हा जबरदस्ती करून ती घेईल. दुसरी कोणी असती, तर तिनें खास ती तत्काळ फेकून दिली असती; पण विमला चतुर होती. ती म्हणाली, 'महाराज ! मी खुषीनें किल्ली न दिली तर तुम्ही ती कशी घ्याल ?'

हें बोलत असतांना विमलेनें आपल्या अंगावरचें वस्त्र काढून हातांत घेतलें. उस्मानाची नजर त्या वस्त्राकडे होतीच. त्यानें उत्तर केलें, ' राजीखुषीनें तूं न दिलीस तर तुझ्या अंगस्पर्शसुखाचा लाभ मी करून घेईन. '

' घ्या तर ' असें बोलून तिनें हातांतलें वस्त्र खालीं आंबराईंत फेकलें. उस्मानाचें लक्ष त्या वस्त्राकडे होतें. त्यानें लागलीच हात लांब करून तें फेकलेलें वस्त्र धरलें.

उस्मानखाँनें तें वस्त्र हस्तगत करून एका हातानें विमलेचा हात आपल्या वज्रप्राय दृढ अशा मुठींत धरला आणि दांतांत तें वस्त्र धरून दुसऱ्या हातानें गांठ सोडून किल्ली काढल्यावर ती आपल्या कमरेच्या पट्टयांत ठेवून दिली. पुढें तो जें कांहीं करूं लागला त्यानें विमलेचें तोंड सुकून गेलें. उस्माननें विमलेला शेकडों सलाम करून हात जोडून म्हटलें, ' माफ करा. ' इतकें बोलून त्यानें तिचे दोन्ही हात त्या वस्त्रानें कठड्याला घट्ट बांधले. विमलेनें विचारलें, " हें काय ? '

उस्मान म्हणाला, ' हा प्रेमाचा फांस. '

**वि०**—या दुष्कर्माचें फळ तुम्हांला लवकरच मिळेल.

उस्मान विमलेला तशीच सोडून चालता झाला. ती आरडाओरड करूं लागली; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. तिचें ओरडणें कोणाला ऐकूंच गेलें नाहीं.

उस्मान पूर्वीच्या जिन्यानें उतरून विमलेच्या खोलीच्या खालच्या खोलींत गेला, आणि विमलेनें केलें होतें त्याप्रमाणें किल्लीनें कळ फिरवून त्यानें खिडकी भिंतीच्या पोकळींत ढकलली. खिडकीचें द्वार मोकळें झाल्यावर त्यानें शिटी वाजविली. ती ऐकतांच झाडाच्या आडून एकजण अनवाणी खिडकीच्या द्वारानें आंत शिरला. त्याच्या मागून दुसरा शिरला. याप्रमाणें क्रमाक्रमानें पुष्कळ पठाण शिपाई मुकाट्यानें किल्ल्यांत शिरले. अखेर जो शिपाई खिडकीपाशीं आला, त्याला उस्मान म्हणाला, ' आतां पुरे. तुम्ही बाहेरच राहा, आणि माझ्याकडून इषारा मिळतांच बाहेरून किल्ल्यावर हल्ला करा. ही गोष्ट ताजखानाला जाऊन सांग.'

तो मनुष्य परत गेला. किल्ल्यांत प्रवेश केलेल्या शिपायांना घेऊन उस्मान पुनः मुकाट्यानें गच्चीवर गेला. जेथें विमलेला बांधून ठेविलें होतें तेथून जातांना तो एका शिपायाला म्हणाला, ' ही बाई बुद्धिमान् आहे. हिचा कांहीं भरंवसा देतां येत नाहीं. रहिमशेख ! तूं हिच्याजवळ पाहरा करीत राहा. हिनें जर पळून

जाण्याचा किंवा दुसऱ्या कोणाशीं बोलण्याचा यत्न केला, तर स्त्रीवध करण्याला मागें पुढें पाहूं नकोस.'

'जो हुकुम' असें म्हणून रहीम तेथें पाहारा करूं लागला.

पठाण शिपाई एका गच्चीवरून दुसऱ्या गच्चीवर याप्रमाणें किल्ल्याच्या दुसऱ्या भागांत गेले.

---

## प्रकरण एकोणिसावें.

# आशक माशुक.



चतुर उस्मान दुसरीकडे गेला आहे असें विमलेनें पाहिलें, तेव्हां आतां आपणांस युक्तीनें आपली सुटका करून घेतां येईल असा भरंवसा तिला वाटूं लागला. म्हणून ती जलदीनें उपाय शोधूं लागली.

पाहारेवाला शिपाई येऊन थोडा वेळ उभा राहिल्यावर ती त्याच्याशीं गोष्टी बोलूं लागली. पाहरेकरी असो किंवा यमदूत असो, सुंदर स्त्रीशीं बोलण्याची इच्छा कोण करीत नाहीं ? विमलेनें प्रथम इकडच्या तिकडच्या सामान्य गोष्टी काढल्या. हळू हळू पाहारेवाल्याचें नांवगांव, कामकाज, व सुखदुःखाच्या गोष्टी वगैरे तिनें विचारून घेतल्या. ती आपल्यासंबंधानें इतक्या आस्थेनें विचारीत आहे, हें पाहून पाहरेवाला फार खुष झाला. विमलाहि हळू हळू आपल्या भात्यांतून एकेक बाण बाहेर काढूं लागली. प्रथम अमृतासारखें गोड भाषण व नंतर त्या भाषणाबरोबरच त्या विशाल नेत्रांच्या कटाक्षांचें बिनचूक संधान, अशा दुहेरी माऱ्यापुढें त्या शिपायाची गाळणच उडाली. त्याच्या चर्येवरून जेव्हां विमलेला असें दिसून आले कीं त्याच्या अधःपाताचा काळ समीप येऊन ठेपला आहे, तेव्हां तिनें हलक्या स्वरानें म्हटलें, 'शेखजी! असे कां भितां ? जवळ येऊन कां नाहीं बसत ?'

पाहारेकऱ्याला कृतार्थ झालों असें वाटून तो विमलेच्या जवळ जाऊन बसला. थोडा वेळ दुसऱ्या कांहीं गोष्टीसंबंधानें बोलणें झाल्यावर विमलेनें पाहिलें कीं मात्रा लागू पडली आहे, आणि शिपाई आपल्या जवळ बसल्यापासून आपल्याकडे त्यानें सारखी टक लाविली आहे. तेव्हां ती म्हणाली, 'शेखजी!

तुम्ही घामाघूम झाले आहां. माझे हात मोकळे कराल तर मी तुम्हांला वारा घालीन म्हणत्यें. मग पुनः तुम्ही माझे हात बांधा.'

शेखजीच्या कपाळावर घामाचा एकसुद्धां बिंदु नव्हता. पण घाम आला नसता तर विमल असें कशाला म्हणती ? शिवाय असल्या हाताचा वारा मिळणें तरी कोणाच्या नशीबीं आहे ? असा विचार करून त्यानें विमलेचे हात बांधले होते ते सोडले.

विमलेनें थोडा वेळ आपल्या वस्त्रानें शिपायाला वारा घातल्यावर मग तिनें तें वस्त्र आपल्या अंगावर घेतलें. तिचे हात पुनः बांधून ठेवण्याची गोष्टच शिपायाच्या तोंडून निघाली नाहीं. त्याला एक विशेष कारणहि होतें. शेल्यानें दोरीचें काम करण्याचें सोडून देऊन जेव्हां विमलेच्या अंगावर तो विराजमान झाला, तेव्हां तिचें लावण्य अधिकच खुलून दिसलें. जें लावण्य आरशांत पाहून विमला मनांतल्या मनांत हंसली होती, तेंच लावण्य पाहून शिपाई कुंठित होऊन गेला होता.

**वि०**—शेखजी ! तुमची स्त्री तुम्हांला आवडत नाहीं काय ?

**शि०**—( विस्मयानें )—कां बरें ?

**वि०**—आवडत असती तर अशा वसंत ऋतूंत ( या वेळीं ऐन ग्रीष्मकाळ संपत येऊन वर्षाऋतु लागावयाचा होता ) तुमच्यासारख्या पतीला सोडून तिच्याच्यानें राहवलें तरी कसें असतें ?

हें ऐकून शेखजीनें एक लांब उसासा सोडला.

विमलेच्या भात्यांतून आतां बाणावर बाण सुटूं लागले. ती म्हणाली, 'शेखजी ! मला बाई बोलायला लाज वाटते. पण तुम्ही जर माझे पति असतां तर मीं कधीं तुम्हांला लढाईवर जाऊं दिलें नसतें.'

शिपायानें पुनः उसासा टाकला. विमला म्हणाली, 'आहा ! तुम्ही जर माझे पति असतां तर काय बहार झाली असती !'

विमलेनेंहि इतकें बोलून एक लहानसा उसासा सोडला आणि त्याच्याबरोबरच तीव्र कटाक्ष टाकण्यास सुरवात केली. त्यामुळें शिपायाचें डोकें फिरून गेलें. तो हळूहळू सरकत सरकत आणखी तिच्याजवळ गेला. विमलाहि त्याच्याजवळ सरकून बसली.

विमलेनें आपला कोमल करपल्लव त्या शिपायाच्या हातावर ठेविला. तेव्हां तर शिपाई अगदीं वेडाच झाला.

विमला म्हणूं लागली, 'मला विचारायला लाज वाटते. पण तुम्ही जेव्हां लढाईवर जाल, तेव्हां माझें स्मरण तुम्हांला राहील काय ?'

शि०—तुमची आठवण राहणार नाहीं असें कसें होईल ?

वि०—माझ्या मनांतली गोष्ट तुम्हांला सांगूं ?

शि०—सांगा, सांगाच.

वि०—नको, पण. तुम्ही काय म्हणाल ?

शि०—नाहीं, नाहीं, सांगाच. मी तुमचा दास आहें, असें समजा.

वि०—माझ्या मनांत फार आहे कीं या माझ्या पापी पतीच्या तोंडाला काळोखी लावून तुमच्याबरोबर यावें.

पुनः तिनें एक नेत्रकटाक्ष टाकिला. त्याबरोबर तो शिपाई आनंदानें नाचूं लागला.

शि०—यायचें आहे ?

दिग्गजासारखे पंडित पुष्कळ असतात !

वि०—घेऊन जाल तर येईन म्हणत्यें.

शि०—तुम्हांला नाहीं घेऊन जाणार ? तुमचा दास होऊन राहीन.

वि०—तुमच्या या प्रेमाचा मोबदला मी काय देऊं ? हें येवढें घ्या.

असें म्हणून विमलेनें आपल्या गळ्यांतला स्वर्णहार त्याच्या गळ्यांत घातला. तेव्हां तर आपण सदेह स्वर्गाला गेलों असें त्या शिपायाला वाटलें. विमला म्हणाली, ' आमच्या शास्त्रांत सांगितलें आहे कीं एकानें आपल्या गळ्यांतली माळ दुसऱ्याच्या गळ्यांत घातली म्हणजे त्यांचा विवाह झाला असें समजावें.'

हंसता हंसतां शिपायाच्या काळ्या दाढींतून त्या अंधेरांत त्याचे दांत बाहेर दिसले. तो म्हणाला, ' तर मग तुमच्याबरोबर माझी शादी झाली म्हणायची ?'

' आतां काय बाकी आहे !' असें बोलून विमला क्षणभर चिंतामग्न होऊन बसली. शिपायानें विचारलें, ' कसला विचार चालला आहे ?'

वि०—विचार करत्यें आहें कीं माझ्या दैवांत सुख लिहिलेलें नाहीं. तेव्हां तुम्हांला आज या किल्ल्यांत जय मिळणार नाहीं.

शिपाई हें ऐकून अभिमानानें म्हणाला, ' त्याबद्दल अगदीं शंका नाहीं. आतां जय होतो पहा.'

वि०—ऊंहूं ! त्यांत एक गुपित आहे.

शि०—तें काय ?

वि०—मी तें तुम्हांला सांगून ठेवत्यें. म्हणजे तुम्हांला मिळेल.

पहारेकरी ' हूं ' म्हणून ऐकूं लागला. विमला सांगतां सांगतां संकोच करूं लागली. तेव्हां शिपायानें त्रासून म्हटलें, ' असें कां करतां ? काय प्रकार आहे ?'

वि०—तुम्हांला ठाऊक नाहीं. या किल्ल्यापाशीं जगत्‌सिंह दहा हजार फौज घेऊन दबा धरून बसला आहे. तुम्ही आज येणार आहां हें कळल्यावरून तो आगाऊ येऊन बसला आहे. तो आतां कांहीं करणार नाहीं. तुम्ही किल्ला मिळाला म्हणून निश्चित होऊन बसाल, तेव्हां तो येऊन तुम्हांला वेढा घालील.

पाहारेवाला क्षणभर चकित होऊन स्तब्ध बसला.

वि०—ही गोष्ट किल्ल्यांत सर्वांना ठाऊक आहे. आम्हींहि ऐकली आहे.

शिपायाचें मन आनंदानें भरून गेलें. तो म्हणाला, ' प्राणप्रिये ! तूं आज मला मोठ्या पदावर चढविलेंस. मी आतांच जाऊन आमच्या सेनापतीला ही गोष्ट कळवून येतों. असली महत्वाची बातमी दिल्यास शिरपेंच इनाम मिळेल. तूं येथेंच बैस. मी आतां जाऊन येतों. '

शिपायाच्या मनांत विमलेविषयीं यत्किंचित् सुद्धां शंका आली नाहीं.

वि०—तुम्ही परत याल ना पण ?

शि०—येईन तर ? आत्तां आलोंच.

वि०—मला विसरूं नका हो.

शि०—छेः ! छेः ! असें कसें होईल ?

वि०—पहा बरें ? माझी शपथ आहे तुम्हांला.

' अशी चिंता कां करत्येस ? ' असें बोलून शिपाई बेदम पळत गेला.

शिपाई दिसेनासा झाला असें पाहून विमलाहि उठून पळून गेली. ' "विमलेच्या कटाक्षाची मोठी भीति वाटते ' हे उस्मानाचे शब्द खरे झाले.

---

## प्रकरण विसावें.

# खोलींतून खोलींत.

—••✿••—

सुटका झाल्याबरोबर विमलेचें पहिलें काम वीरेंद्रसिंहाला खबर देण्याचें होतें. त्यासाठीं ती धूम ठोकोत त्याच्या शय्यागृहाकडे गेली. अर्धी वाट चालून ती गेली असेल नसेल तोंच ' अल्ला-अल्ला-हो' असा पठाण शिपायांचा रणध्वनि

तिच्या कानीं आला. ' हा काय पठाण सेनेचा जयध्वनि ? ' असें म्हणून ती अतिशय व्याकुळ झाली. हळूहळू मोठाच कोलाहल ऐकूं येऊं लागला. तेव्हां किल्ल्यांतलीं माणसें जागीं झालीं असें ती समजली.

घाबरून ती वीरेंद्राच्या शय्यागृहाकडे जाऊन पाहत्ये तों तेथें अतिशयच गडबड तिला दिसली. पठाण लोक त्या गृहाचीं दारें मोडून तोडून आंत शिरले होते. विमलेनें डोकावून पाहिलें तों वीरेंद्राचे हात घट्ट बांधलेले, त्याच्या हातांत नंगी तलवार, अंगांतून रक्ताच्या धारा वाहताहेत, आणि तो वेड्यासारखा तलवार फिरवीत आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें. पण त्याचा तो लढण्याचा उद्योग निष्फळ होता. एका मोठ्या बलवान् पठाणाच्या लांब तलवारीच्या आघातानें वीरेंद्राच्या हातांतील तलवार गळून पडली आणि वीरेंद्र शत्रूंचा बंदिवान झाला.

विमला तो प्रकार पाहून हताश झाली आणि तेथून चालती झाली. अजून तिलोत्तमेचें रक्षण करण्यास वेळ आहे असें पाहून ती तिच्याकडे धावत गेली. पण वाटेंत तिला दिसून आलें कीं तिलोत्तमेच्या महालांत जाणें मुष्किलीचें होऊन बसलें होतें. कारण सगळी जागा पठाणांनीं व्यापून टाकिली होती. पठाणांनीं किल्ला सर केला यांत आतां बिलकुल शंका राहिली नव्हती.

तिलोत्तमेच्या महालांत गेलों तर पठाणांच्या हातांत सापडूं असें विमलेनें पाहिलें तेव्हां ती परत फिरली, आणि घाबरून जाऊन अशा काळजींत पडली कीं अशा संकट प्रसंगीं जगत्सिंह आणि तिलोत्तमा यांना ही खबर कशी कळवितां येईल ? विमला एकटी एका खोलींत उभी राहून विचार करीत होती. इतक्यांत कांहीं शिपाई दुसरी एक खोली लुटून आपल्या खोलीकडे येत आहेत असें तिच्या नजरेस पडलें. तेव्हां ती अतिशय घाबरली आणि खोलींतल्या एका पेटी आड लपून बसली. शिपाई त्या खोलींत येऊन लूट करूं लागले. तेव्हां विमलेला वाटलें कीं आतां या प्रसंगांतून निभावणें अशक्य आहे. हे लुटारू पेटी उघडण्यास येतील तेव्हां आपणाला खास पकडतील. तरी धीर धरून तशीच येणाऱ्या प्रसंगाची वाट पाहात आणि शिपाई काय काय करीत आहेत तें पेटीच्या आडून हळूच पाहात ती बसली. ती विलक्षण हिंमतवान् होती. विपत्काळीं तिचें धैर्य वाढलें. शिपाई लूट करण्याच्या कामांत दंग आहेत, असें जेव्हां तिनें पाहिलें, तेव्हां ती बिलकुल चाहूल न लागूं देतां पेटीच्या मागून हळुच बाहेर

पळून पळून गेली. परंतु इतक्यांत लूट करण्यांत दंग असलेल्या एका शिपायानें येऊन तिचा हात धरला.

विमलेनें मागें वळून पाहिलें तों हात धरणारा शेख रहीम! तो म्हणाला, 'पळून जात होतीस, नाहीं का? आतां कोठें पळशील?'

आपण दुसऱ्यांदां रहीमच्या हातांत सांपडलों, हें पाहून विमलेचा चेहरा खरकन् उतरला; पण किती? तर क्षणमात्र! तिची बुद्धि प्रखर असल्यामुळें त्या बुद्धीच्या प्रभावानें तिचें मुख पुनः हर्षानें प्रफुल्लित झालें. ती आपल्या मनाशीं म्हणाली, 'आपली सुटका व्हावयाची असली तर ती याच्याच हातून होईल.' म्हणून त्याला तिनें उत्तर केलें, 'गप बसा, आणि हळूहळू बाहेर चला.'

असें बोलून विमलेनें त्याचा हात धरला, आणि खेचून नेलें. तोहि इच्छापूर्वक बाहेर आला. त्याला एकीकडे नेऊन ती म्हणाली, 'छिः छिः! तुमचें असलें हें कृत्य! मला एकटीला सोडून तुम्ही कोणीकडे गेलां होतां? तुमच्यासाठीं त्रिखंड शोधलें!'

विमलेनें पुनः एक नेत्रकटाक्ष त्याच्यावर टाकिला.

शेखजीचा राग दूर झाला. तो म्हणाला, ' मी जगत्सिंहाची बातमी सेनापतीला देण्यासाठीं त्यांना शोधीत पुष्कळ भटकलों; पण कोठेंहि त्यांची गांठ पडली नाहीं. तेव्हां तुझ्याकडे परत गेलों; पण तूंहि गच्चीवर दिसली नाहींस. म्हणून तुला शोधण्यासाठीं जागोजाग हिंडत आहें.'

**वि०**—तुम्हांला येण्याला उशीर लागला, तेव्हां मला वाटलें कीं तुम्हांला माझा विसर पडला असावा. म्हणून तुमच्या शोधासाठीं मी निघाल्यें. आतां उशीर कशाचा? किल्ला तुमच्या हातीं लागलाच आहे. अशा वेळीं आपण पळून जाण्याची खटपट करणें चांगलें; नाहीं काय?

**रहीम**—आज नाहीं. उद्यां सकाळीं पाहूं. मीं नाहीं म्हटल्यावर तूं कशी जाणार? उद्यां सकाळीं सेनापतीकडून रजा मागून घेऊन आपण जाऊं.

**वि०**—चला तर मग. माझे जे चार दागिने आहेत ते आत्तांच तुम्ही आपल्या ताब्यांत घ्या. नाहींतर कोणी शिपाई येऊन लुटून नेतील.

रहीम म्हणाला, ' चल.' रहीमला बरोबर घेण्यांत विमलेचा उद्देश येवढाच होता कीं तसें केल्यानें इतर शिपायांच्या पासून आपलें रक्षण व्हावें. तिच्या या दूर दृष्टीचा अनुभव तिला लवकरच आला. ती थोडी दूर जाते न जाते तोंच लुटण्यासाठीं हपापलेल्या शिपायांची एक टोळी तिच्या समोर उभी राहिली.

विमलेला पाहतांच ते शिपाई ओरडून म्हणाले, ‘ वाः ! छानदार शिकार सांपडली !’

**रहीम**—भाई हो ! तुम्ही आपापलें काम करा. इकडे पाहूं नका.

शिपाई या बोलण्याचा अर्थ समजून गप बसले. एकजण म्हणाला, ‘ रहीम ! तूं भाग्यवान् खरा ! पण नबाबसाहेब तुझ्या तोंडचा हा घास काढून न घेवोत म्हणजे झालें.’

रहीम व विमला हीं दोघें चालतीं झालीं. विमला रहीमला आपल्या खोलीच्या खालच्या खोलींत घेऊन जाऊन म्हणाली, ‘ ही माझी खोली. येथलें जें जें कांहीं घ्यावेंसें वाटेल तें तें गोळा करून घ्या. माझी निजण्याची खोली वर आहे. मी तेथून आपले दागदागिने घेऊन आत्तां येत्यें. असें म्हणून तिनें किल्ल्यांचा एक झुबका त्याच्यापुढें टाकिला.

त्या खोलींत रगड द्रव्यसामुग्री असलेली पाहून रहीम हर्षित झाला आणि पेट्या उघडून पाहाण्यांत गुंतला. विमलेविषयीं आतां त्याच्या मनांत तिळमात्र शंका राहिली नाहीं. विमलेनें खोलींतून बाहेर पडतांच त्या खोलीचें दार बंद करून त्याला बाहेरून कुलूप ठोकिलें. रहीम अर्थातच आंत अडकलेला राहिला.

विमला मग धापा टाकीत माडीवरच्या खोलींत गेली. विमला आणि तिलोत्तमा यांच्या खोल्या किल्ल्याच्या एका भागांत होत्या. आतांपर्यंत त्या ठिकाणीं ते अत्याचारी शिपाई जाऊन पोंचले नव्हते. तिलोत्तमा व जगत्‌सिंह यांना चाललेली गडबड ऐकूं तरी गेली होती कीं नाहीं याची सुद्धां शंका वाटते. विमलेनें एकदम तिलोत्तमेच्या महालांत प्रवेश न करतां तिलोत्तमा व राजकुमार काय करीत आहेत तें जाणण्याचा कुतूहलानें बाहेरून दाराच्या फटींतून पाहिलें. ‘स्वभावो दुरतिक्रमः’ म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. या वेळींसुद्धां विमलेच्या मनांत कुतूहल उत्पन्न झालें ! तिला जें कांहीं दिसलें त्यानें तिला विस्मय वाटला.

तिलोत्तमा पलंगावर बसली होती. जगत्‌सिंह जवळ उभा राहून मुकाट्यानें तिच्या मुद्रेकडे पाहत होता. तिलोत्तमा रडत होती व राजपुत्र तिचे डोळे पुशीत होता.

हें निरोप घेण्याच्या वेळचें रडणें आहे, असें विमलेला वाटलें व ती दार उघडून आंत गेली.

---

## प्रकरण एकतिसावें.

# तलवारीशीं तलवार !



विमलेला पाहून जगत्‌सिंहानें विचारलें, 'काय गडबड आहे ?'

**वि०**—हा पठाणांचा जयध्वनी आहे. आतां जलदीनें आत्मरक्षणाचा कांहीं उपाय शोधून काढा. शत्रु क्षणभरांत या महालांत येऊन उभे राहतील.

राजपुत्र किंचित्काळपर्यंत विचार करून म्हणाला, 'वीरेंद्रसिंह काय करीत आहेत ?'

**वि०**—ते तर शत्रूच्या हातीं लागून कैद झाले आहेत.

तें ऐकतांच तिलोत्तमेच्या कंठांतून अस्फुट चीत्कार शब्द निघाला, आणि मूर्च्छित होऊन ती पलंगावर पडली.

जगत्‌सिंहाचें तोंड एकदम उतरलें आणि तो विमलेला म्हणाला, 'पहा पहा ! तिलोत्तमेकडे पहा !'

विमलेनें गुलाबदाणींतलें गुलाबपाणी तिलोत्तमेच्या तोंडावर, मानेवर, व गालांवर शिंपडलें आणि घाबऱ्या घाबऱ्या ती वारा घालूं लागली. शत्रूंची गडबड अधिकाधिक जवळ ऐकूं येऊं लागली. तेव्हां रडक्या स्वरानें ती म्हणाली, 'ते आले वाटतें. राजपुत्र ! आतां कसें होईल ?'

राजपुत्राच्या नेत्रांतून आगीच्या ठिणग्या निघूं लागल्या. तो म्हणाला, 'मी एकटा काय करणार ? तरी पण येवढें सांगतों कीं तुमच्या या सखीच्या रक्षणार्थ मी आपले प्राण द्यावे लागले तरी देईन.'

शत्रूंची भयंकर गडबड आणखी जवळून ऐकूं येऊं लागली. त्यांच्या शस्त्रांचा खणखणाटहि ऐकूं येत होता. विमला मोठ्यानें ओरडून म्हणाली, 'तिलोत्तमे ! अशा वेळीं तूं कशीग बेशुद्ध पडलीस ! आतां तुझें रक्षण कसें करावें ?'

तिलोत्तमेनें डोळे उघडले. विमला म्हणाली, 'तिलोत्तमा शुद्धीवर आली आहे. राजकुमार ! आतां हिचा जीव वांचवा हो !'

राजकुमार म्हणाला, 'या महालांत राहून रक्षण करण्याचें काम कोणाच्यानें करवणार आहे ? आतां आपल्याला महालाबाहेर पडतां आलें असतें तर मी तुम्हांला किल्ल्याच्या बाहेर घेऊन गेलों असतों. पण तिलोत्तमेला तर चालण्याची

मुळींच शक्ति नाहीं. विमले ! ते पठाण पहा जिना चढूं लागले. मी तर सर्वांच्या अगोदर प्राण देईनच; पण वाईट वाटतें तें येवढेंच कीं प्राण देऊनसुद्धां तुमचा जीव मला वांचवितां येणार नाहीं.'

विमलेनें क्षणांत तिलोत्तमेला कडेवर उचलून घेतलें आणि म्हटलें, 'चला तर. मी तिलोत्तमेला घेऊन येत्यें.'

विमला आणि जगत्सिंह हीं लांब फलांगा टाकून दारापाशीं येऊन पोंचलीं याच वेळीं चार पठाण शिपाईहि त्याच दारापाशीं आले. जगत्सिंह म्हणाला, 'विमले ! आतां पुढें जाण्यांत अर्थ नाहीं. माझ्या मागें उभी राहा.'

शिकार समोर आलेली पाहून पठाण 'अल्ला हो' असें ओरडून भुतांसारखे नाचूं लागले व कमरेच्या शस्त्रांचा खणखणाट करूं लागले. तें ओरडणें संपतें न संपतें तोंच जगत्सिंहाची तलवार एका पठाणाच्या छातींत मुठीपर्यंत घुसली, व भयंकर किंकाळी फोडीत त्या पठाणानें प्राण सोडला. त्याच्या छातींतून ती तलवार काढून घेण्याच्या पूर्वीच जगत्सिंहाच्या मानेवर दुसऱ्या एका पठाणाच्या बर्चीचा आघात येऊन पडला. तो पडतो न पडतो तोंच राजपुत्रानें विद्युद्वेगानें हातचलाखी करून बर्ची डाव्या हातानें धरली आणि तिच्या तडाक्यानें त्या पठाणाला खालीं जमिनीवर लोळविलें. दुसरे दोन पठाण होते त्यांनीं एका क्षणांत राजपुत्राच्या शिरावर नेम धरून त्यावर तलवारीचा प्रहार केला. जगत्सिंहानें त्यांना क्षणाचाहि अवसर न देतां आपल्या उजव्या हातांतल्या तलवारीच्या एका तडाख्यानें एका पठाणाचा हात तलवारीसह तोडला. पण दुसऱ्या पठाणाच्या आघाताचें निवारण त्याच्यानें करवलें नाहीं. त्याच्या तलवारीचा प्रहार राजपुत्राच्या मस्तकावर झाला नाहीं; खांद्यावर तो येऊन पडला. पण पारध्याचा बाण अंगाला लागतांच वाघ जसा चवताळतो तशी राजपुत्राची आतां स्थिति झाली. पठाण तलवार उगारून दुसरा आघात करणार, इतक्यांत राजपुत्रानें दोन्ही हातांनीं तलवार घट्ट धरून उडीसरसा त्या पठाणाच्या मस्तकावर जोराचा वार केला. त्यामुळें त्या पठाणाच्या डोक्याची त्याच्या पगडीसह दोन शकलें झालीं. पण याच वेळीं ज्या पठाणाचा हात राजपुत्रानें तोडिला होता त्यानें कमरेची तीक्ष्ण कट्यार डाव्या हातानें काढून घेऊन ती राजपुत्राच्या अंगावर नेम धरून फेकली आणि राजपुत्राची उडी खालीं जमिनीवर पडतांच ती कट्यार त्याच्या विशाल बाहूंत खोल घुसली. राजपुत्रानें तो आघात सुई टोंचल्याप्रमाणें क्षुद्र मानून तिकडे लक्ष न देतां त्या पठाणाच्या कमरेंत अशी जोरानें लाथ

मारली कीं तिच्याबरोबर तो कोलमडून दूर जाऊन पडला. राजपुत्र धावत जाऊन त्याचें शिर कापणार होता, पण इतक्यांत 'अल्ला-अल्ला-हो' असा भयंकर घोष करीत पठाणांचें अगणित सैन्य महालाकडे धावलें. तेव्हां राजपुत्राला वाटलें कीं आतां यांच्याशीं लढणें आपल्याच मृत्यूला कारण होणार आहे.

राजपुत्राचें अंग रक्तानें भरलें होतें, व अंगांतून रक्त गेल्यानें क्षीणताहि आली होती. तिलोत्तमा अद्याप बेशुद्धावस्थेंत विमलेच्या मांडीवर पडली होती. तिला मांडीवर घेऊन विमला रडत बसली होती. राजपुत्राच्या अंगांतून उडालेल्या रक्ताच्या चिळकांडीनें तिचें वस्त्र रक्तानें भिजलें होतें.

ती खोली पठाण सैनिकांनीं भरून गेली. राजपुत्रानें तलवारीवर भार देऊन एक उसासा टाकिला. तेव्हां एक पठाण म्हणाला, 'ए लौंडे! हत्यार खालीं ठेव, मी तुझा जीव घेत नाहीं.' विझत आलेल्या अग्नीवर ज्याप्रमाणें एखाद्यानें तुपाची आहूती द्यावी, त्याप्रमाणें हे शब्द ऐकतांच राजपुत्राचा क्रोधाग्नि पेटून त्यानें एका उडीसरशी हातांतल्या तलवारीनें त्या उन्मत्त पठाणाचें शिर तोडून आपल्यापायांपाशीं पाडलें, आणि हातांतली तलवार परजून म्हटलें, 'अरे यवना! रजपूत कसे प्राणत्याग करतात तें पहा.'

यानंतर राजपुत्राची तलवार विद्युल्लतेप्रमाणें चमकूं लागली. आपल्या एकट्याच्यानें येवढ्या प्रचंड सेनेशीं लढणें होणार नाहीं हें राजपुत्र जाणून होता. तरी मारवतील तितक्या शत्रूंना मारून मग प्राणत्याग करावयाचा असा त्याचा उद्देश होता. याच उद्देशानें दोन्ही हातांच्या वज्रप्राय दृढ मुठींत तलवार धरून ती फिरवीत फिरवीत तो शत्रूंच्या भर गर्दींत घुसला. स्वसंरक्षणाचा विचारसुद्धां आतां त्याच्या डोक्याला शिवला नव्हता. तलवारीचा प्रहार करावयाचा येवढें त्याला ठाऊक होतें. एक-दोन-तीन असे एकामागून एक तीन वार त्यानें केले. त्यांनीं कोणी मरून जमिनीवर पडले, कोणाचे हात पाय तोडले गेले, आणि राजपुत्राच्या अंगावर चोहींकडून पावसाच्या धारांप्रमाणें शस्त्रप्रहरांची वृष्टि होऊं लागली. पुढें त्याचा हात चालेना. त्या हातांतून रक्तस्राव जोरानें होऊन क्षीणता आली, डोकें फिरूं लागलें, डोळ्यांपुढें अंधेरी आली. चाललेली गडबड कानांनीं अधिकाधिक अस्पष्ट ऐकूं येऊं लागली.

'राजपुत्राला कोणी मारूं नका. वाघाला जिवंतच धरून पिंजऱ्यांत घातलें पाहिजे' येवढे उस्मानखानाचे शब्द मात्र त्यानें ऐकले. दुसरें कांहीं त्याला ऐकूं गेलें नाहीं.

राजपुत्राचे हात ढिले होऊन लांब पसरले होते. निःशक्त झालेल्या त्याच्या मुठींतून गळून जमिनीवर पडलेल्या तलवारीचा खणखण नाद झाला. राजपुत्र स्वतः मूर्च्छित होऊन एका पठाणाच्या मृत देहावर पडला. तेव्हां कांहीं पठाण राजपुत्राच्या पागोट्यावरलीं रत्नें लुटण्याकरितां एकदम धावले. हें पाहून उस्मान वज्रासारख्या गंभीर स्वरानें म्हणाला, ' खबरदार ! कोणी राजपुत्राच्या अंगाला स्पर्श केला तर खबरदार ! '

तेव्हां सगळे मागें फिरले. उस्मान व दुसरा एक पठाण शिपाई यांनीं राज-पुत्राला उचलून पलंगावर निजविलें. तिलोत्तमेशीं आपला विवाह होऊन आपण तिच्यासह या पलंगावर बसूं अशी चार घटकांपूर्वीं राजपुत्राला आशा वाटत होती; पण आतां तोच पलंग त्याची मृत्युशय्या झाला !

जगत्सिंहाला निजविल्यावर उस्मानखानानें शिपायांना विचारलें, ' त्या स्त्रिया कोठें आहेत ? '

विमला व तिलोत्तमा त्याला दिसल्या नाहींत. जेव्हां दुसऱ्यांदां शिपाई महा-लांत शिरले. तेव्हां पुढें काय होणार तें विमलेला कळून चुकलें होतें. दुसरा कांहीं उपाय दिसेना म्हणून तिलोत्तमेला घेऊन ती पलंगाखालीं लपून बसली होती. तिला कोणीं पाहिलें नव्हतें. त्या दिसत नाहींत, असें पाहून उस्मान म्हणाला, ' त्या स्त्रिया कोठें आहेत ? किल्ल्यांत सगळीकडे त्यांचा शोध करा. ती दासी फार हुशार आहे. ती जर पळून गेली असली तर माझें मन अस्वस्थ राहील. पण वीरेंद्राच्या मुलीवर बिलकुल जुलूम होणार नाहीं, याबद्दल खबर-दारी घ्या .'

शिपाई किल्ल्याच्या निरनिराळ्या भागांतून त्यांच्या शोधाला गेले. एक दोघे त्याच महालांत शोध करूं लागले. एकजण दिवा घेऊन पलंगाखालीं पाहूं लागला, आणि तेथें त्या आढळतांच म्हणाला, ' या पाहा ! येथेंच आहेत.'

उस्मानाची चर्या आनंदानें प्रफुल्लित झाली. तो त्या दोघींना म्हणाला, 'चला, बाहेर या. फिकीर करूं नका.'

विमला अगोदर बाहेर आली, आणि मागून तिनें तिलोत्तमेला बाहेर आणून बसविलें. तिलोत्तमा आतां शुद्धीवर येत होती. तिला आतां बसतां आलें. हळूहळू तिनें विमलेला विचारलें, ' कोठें ग आपण आहों ?'

विमलेनें तिच्या कानांत सांगितलें, 'काळजी करूं नकोस. तोंडावरून बुरखा घेऊन बैस.'

ज्या शिपायानें त्यांना शोधून काढलें होतें तो उस्मानाला म्हणाला, 'जनाब, या बंद्यानें शोधून काढलें आहे.'

**उस्मान**—मग काय तुला इनाम पाहिजे ? तुझें नांव काय ?

**शिपाई**—या गुलामाचें नांव करीमबक्ष आहे. पण ह्या नांवानें मला लोक ओळखत नाहींत. मी पूर्वी मोगलसैन्यांत होतों म्हणून लोक मला थट्टेनें 'मोगल-सेनापति' म्हणतात.

हें ऐकून विमलेच्या अंगावर कांटा उभा राहिला. अभिरामस्वामींनीं ज्योतिर्गणित करून सांगितलेल्या गोष्टीचें तिला स्मरण झालें.

उस्मान म्हणाला, ' अच्छा ! माझ्या ध्यानांत आहे.'



*

*

# दुर्गेशनंदिनी.

## खंड दुसरा.

—•• ••—

### प्रकरण पहिलें.

## आयेषा.



जगत्सिंहानें जेव्हां डोळे उघडले तेव्हां आपण एका मोठ्या रमणीय वाड्यांत पलंगावर निजलों आहों असें त्याला आढळून आलें. ज्या खोलींत तो निजला होता त्या खोलींत पूर्वी कधीं आल्याचें त्यास स्मरेना. ती खोली अतिशय विस्तृत व सुशोभित होती. जमीन फरसबंदी केलेली असून तिच्यावर मऊ गालिचा अंथरलेला होता व त्या गालिच्यावर गुलाबदाणी वगैरे मूल्यवान् सोन्या रुप्यांचीं भांडीं आणि हस्तिदंती वस्तू मांडून ठेविलेल्या होत्या. दारांना व खिडक्यांना निळ्या रंगाचे पडदे लाविलेले होते. त्यामुळें सूर्यप्रकाश सौम्य होऊन आंत प्रवेश करीत होता. त्या खोलींत ठेविलेल्या नानाविध सुगंधी द्रव्यांचा सुगंध तेथें दरवळत होता.

त्या जागीं इतकी शांतता होती कीं जणूं काय तेथें अगदीं शुक्र होतें.

एक दासी सुवासिक पाणी शिंपडलेल्या पंख्यानें मुकाट्यानें वारा घालीत बसली होती, आणि दुसरी एक दासी चित्रांतल्या निर्जीव पुतळीप्रमाणें अगदीं स्तब्ध उभी होती. ज्या हस्तिदंती पलंगावर राजपुत्र निजला होता, त्यावर राजपुत्राच्या जवळच एक स्त्री बसली होती आणि ती त्याच्या अंगावरच्या जखमांना मोठ्या काळजीपूर्वक मलम लावीत होती. खालीं गालिच्यावर चांगला पोशाख केलेला एक पठाण विडा खात आणि हातांतल्या एका फारशी पुस्तकाकडे पाहत बसला होता. कोणी बोलत नव्हतें किंवा यत्किंचित्‌हि गडबड करीत नव्हतें.

राजपुत्रानें डोळे उघडून खोलींत चोहींकडे पाहिलें. त्यानें कुशीवर वळण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्यानें तिळमात्र हालचाल करवेना. त्याच्या सर्वांगांत भयंकर वेदना होत होत्या.

पलंगावर बसलेली स्त्री राजपुत्राची ती चळवळ पाहून वीणारवासारख्या मधुर स्वरानें म्हणाली, ' स्वस्थ पडून राहा. हलूं नका.'

राजपुत्र क्षीण स्वरानें म्हणाला, ' मी कोठें आहें ?'

पूर्वीच्याच स्त्रीनें मधुर स्वरानें उत्तर केलें, ' अगदीं बोलूं नका, आपण उत्तम जागीं आहां. कांहीं काळजी करूं नका, आणि बोलूं नका.'

राजपुत्रानें पुनः क्षीण स्वरानें विचारलें, ' किती वाजले ?'

मधुर वाणीनें पुनः क्षीण हलक्या स्वरानें तिनें म्हटलें, ' दुपारची वेळ आहे. आपण अगदीं शांत रहा. आपण बोललांत तर बरें होणें जड जाईल, आपण जर स्वस्थ राहणार नाहीं तर मी उठून जाईन.'

राजपुत्र मोठ्या कष्टानें म्हणाला, 'मी आणखी एक गोष्ट विचारतों. तुम्ही कोण आहां ?'

**स्त्री**—आयेषा.

राजपुत्र मुकाट्यानें आयेषाच्या तोंडाकडे पाहूं लागला. आपण हिला पूर्वी कोठें पाहिलें आहे काय ? असा मनाशीं विचार करतां करतां पूर्वी कधीं पाहिलेलें नाहीं अशी त्याच्या मनाची खात्री झाली.

आयेषेचें वय या वेळीं सुमारें बावीस वर्षांचें असेल. ती दिसण्यांत अतिशय सुंदर होती. पण तें सौंदर्य असें होतें कीं दोनचार शब्दांनीं त्याचें वर्णन करून सांगणें दुष्कर होतें. तिलोत्तमाहि लावण्यवती होती, पण आयेषेचें लावण्य कांहीं और होतें. स्थिरयौवन विमला हिच्या सौंदर्याचीहि छटा अद्याप पाहाणाराचें मन मोहून टाकीत असे; पण आयेषेचें रूप तसेंहि नव्हतें. कांहीं कांहीं तरुणींचें सौंदर्य वसंतऋतूंतल्या मल्लीका पुष्पाप्रमाणें नुकतें उमललेलें, लज्जेनें संकोचयुक्त, कोमल, निर्मल व परिमलमय असतें. तिलोत्तमेचें रूप याप्रकारचें होतें. कांहीं तरुणींचें रूप अपराण्हकालच्या भुईकमळासारखें म्हणजे निर्गंध, मुदितोकुल, शुष्कपल्लव पण सुशोभित, जितकें अधिक विकसित तितकें अधिक कांतिन्मूख व मधुपूर्ण अशा पुष्पाप्रमाणें असतें. विमलेचें रूप याप्रकारचें होतें. आयेषेचें रूप नुकत्याच उमललेल्या सूर्याच्या किरणांनीं प्रफुल्लित झालेल्या पाण्यांतील कमलाच्या सारखें होतें. सुविकसित, सुवासित, रसानें परिपूर्ण, सूर्यप्रकाशानें प्रदीप्त,

संकुचित नव्हे आणि शुष्कहि नव्हे असें, कोमल, आणि प्रोज्ज्वल असें होतें. कमळाच्या पाकळ्यांवरून सूर्याचे किरण जसे परावर्तित होतात, तसें तिचें हास्य तिच्या मुखावर न पावल्यामुळें परावर्तित होऊन चोहींकडे फाकलेलें होतें. वाचक हो ! सौंदर्याचा प्रकाश तुम्हीं कधीं पाहिला आहे काय ! तो कधीं पाहिला नसेल, नुसता ऐकला सुद्धां नसेल. पुष्कळ सुंदर स्त्रिया आपल्या सौंदर्यानें दशदिशा प्रकाशित करतात. पुष्कळ लोकांच्या सुना सौंदर्यानें गृहें प्रकाशित करतात, असें आपण ऐकतों. गोकुळांत आणि निशुंभाशीं झालेल्या युद्धप्रसंगीं काळाच्या रूपानेंहि पुष्कळ प्रकाश पडला होता. यावरून सौंदर्याचा प्रकाश कसा असतो तें वाचकांना कळून चुकलें असेल. विमलेच्या रूपाचा प्रकाश पडत असे; पण तो दीपप्रकाशाप्रमाणें होता. म्हणजे थोडा थोडा लुकलुकणारा, तेल घातलें तरच दिव्याचा प्रकाश पडावयाचा, नाहीं तर नाहीं. त्याच्या साहाय्यानें घरांतलीं कामें करतां यावयाचीं, पण हात लागला कीं तो भाजल्याशिवाय राहावयाचा नाहीं. तिलोत्तमेच्या रूपाचा प्रकाश बालेंदूच्या चांदण्यासारखा होता. म्हणजे स्वच्छ, मधुर, शीतल, पण त्याच्या साह्यानें घरांतलीं कामें करतां यावयाचीं नाहींत. तो प्रखर नसायचा, आणि दुरून यावयाचा. आयेषाच्या रूपाचाहि प्रकाश पडे, पण तो सकाळच्या उन्हाप्रमाणें होता. म्हणजे तो प्रदीप्त व प्रभामय असून तो जिच्यावर पडेल त्या वस्तूला हंसायला लावायचा !

ज्याप्रमाणें उद्यानांत कमळ, त्याप्रमाणें या आमच्या कादंबरींत आयेषा ही आहे. म्हणून तिच्या शरीरावयवाचें वर्णन द्यावेंसें वाटतें. मी जर चित्रकार असतों आणि हातांतल्या कुंचलीनें तिचा वर्ण बरोबर काढून दाखवेतां आला असता, तर धड चांफ्यांच्या फुलासारखा नाहीं, धड रक्तवर्ण नाहीं, किंवा श्वेतकमळाच्या कळीप्रमाणें धड पांढराहि नाहीं, पण तिघांचेंहि मिश्रण आहे, असा वर्ण मीं काढला असता. तिचें कपाळ उत्तम गोलाकार, मला काढतां आलें असतें, तर मदनाच्या रंगभूमीप्रमाणें मी तें सुगोल आति विस्तीर्ण असें काढलें असतें, आणि त्यावर तिच्या केसांची सीमा दाखविणारी छानदार वक्ररेषा मीं दाखविली असती आणि ती रेषा तिच्या कपाळाच्या गोल वळणाच्या बरोबर नेत नेत कानापर्यंत नेऊन सोडली असती, आणि कपाळापासून त्या केसांच्या मधून नीटनेटका आणि सूक्ष्म भांग काढलेला दाखविला असता. जर तिच्या केसांचा हुबेहुब रंग मला दाखवितां आला असता, तिची खालीं लोंबणारी वेणी, परस्परांना भेटण्याच्या उद्देशानें जवळ जवळ आलेल्या पण न मिळतां कमानदार होऊन कमा-

नीचा मध्यभाग येतो न येतो तोंच स्थूल रेषा धारण करणाऱ्या आणि केशरेषेजवळ क्रमाक्रमानें सूक्ष्म होत होत टोकांशीं सुईच्या अग्राप्रमाणें अत्यंत सूक्ष्म झालेल्या अशा तिच्या भिंवया मला काढतां आल्या असत्या; जर विद्युत्तेजानें युक्त आणि मेघांप्रमाणें चंचळ व कोमल असे तिचे नेत्रपल्लव मला काढतां आले असते; जर मला तिच्या नेत्रांचा विस्तार योग्य प्रकारें दाखवितां आला असता; त्यांच्या वरच्या व खालच्या पापण्यांची सुंदर धनुष्याकृति, त्या डोळ्यांची नीलालक्तकप्रभा, व भ्रमराप्रमाणें कृष्णवर्ण व स्थूल अशा तिच्या नेत्रांतल्या बाहुल्या मला काढतां आल्या असत्या; मानीपणामुळें विस्फारलेल्या नाकपुड्या असलेलें तें नाक, तो रसमय ओष्ठाधर, वेणीनें स्पर्श केलेली संगमरवरी पाषाणाप्रमाणें पांढरी शुभ्र अशी मान, कर्णभूषणांनीं स्पर्श करावा म्हणून उत्कंठित झालेले ते गोंडस खांदे, स्थूल कोमल आणि रत्नाभरणभूषित असे सुगोल बाहु; बोटाच्या तेजापुढें त्यांतल्या हिऱ्याच्या अंगठ्यांचेंहि तेज फिकें पडलें आहे अशीं बोटें; रक्तकमलाप्रमाणें लाल असे ते कोमल करपल्लव; मोत्यांच्या हाराच्या तेजालाहि लाजविणारा असा पुष्ट व उन्नत उरोभाग; किंचित् उंच अशा तिच्या शरीराची मनाला मोहित करणारी ठेवण—या सगळ्यांचें यथातथ्य चित्र काढण्याचें सामर्थ्य माझ्या ठायीं असतें तरी, तें काढण्यासाठीं मी हातांत कुंचली घेण्याचें धाडस केलें नसतें. आयेषाच्या सौंदर्याचें सार—समुद्रांतलें कौस्तुभ रत्न—म्हणजे तिचे धीर नेत्र कटाक्ष होते. संध्याकाळच्या वाऱ्यानें कंप पावणाऱ्या नीलकमलाची बरोबरी करणारे ते तिचे धीर मधुर कटाक्ष मला चित्रांत कसे दाखवितां येतील ?

राजपुत्र आयेषकडे बराच वेळ पाहत राहिला. त्याला तिलोत्तमेचें स्मरण झालें, तें होतांच त्याचें हृदय विदीर्ण झालें. त्याच्या शिरांमधून रक्ताचा प्रवाह जोरानें वाहूं लागला. त्याच्या खोल जखमांतून पुनः रक्त येऊं लागलें. राजपुत्र पुनः बेशुद्ध होऊन डोळे मिटून पडला.

पलंगावर बसलेली स्त्री तत्क्षणीं घाबरून उठली. जो मनुष्य गालिच्यावर बसून पुस्तक वाचीत होता, तो मधून मधून सप्रेम दृष्टीनें आयेषेकडे पाहत होता. इतकेंच नाहीं, तर ती स्त्री जेव्हां पलंगावरून उठली, तेव्हां तिच्या कानांतल्या हलणाऱ्या कर्णभूषणाकडेच तो पठाण अतृप्त नेत्रांनीं बराच वेळ पाहत राहिला. आयेषेनें उठून व हळूहळू त्या पठाणापाशीं जाऊन त्याच्या कानांत सांगितलें कीं ‘ उस्मान ! हकीमाला लवकर बोलावणें पाठवा !’

किल्ला सर करणारा उस्मानच गालिच्यावर बसला होता. आयेषेनें सांगतांच तो उठून चालता झाला.

चांदीच्या घडवंचीवर ठेविलेल्या भांड्यांतून आयेषेनें थोडें पाणी घेऊन तें मूर्च्छित झालेल्या राजपुत्राच्या डोळ्यांना लावून थोडेंसें त्याच्या तोंडावरहि शिंपडलें.

उस्मानखां लवकरच हकीमाला घेऊन आला. हकीमानें अनेक उपाय करून रक्तस्राव बंद केला, आणि नाना प्रकारचीं औषधें आयेषेजवळ देऊन तीं कशीं द्यावयाचीं तें हलक्या स्वरानें तिला सांगितलें.

आयेषेनें त्याला कानांत विचारलें, ' आतां कशी काय प्रकृति आहे ?'

हकीम०—ताप फार भयंकर आहे.

हकीम निरोप घेऊन जात असतां उस्मान त्याच्या मागोमाग गेला, आणि दारांत गेल्यावर त्याला हळूच म्हणाला, ' वांचेल ना ?'

---

## प्रकरण दुसरें.

## पुष्पांत पाषाण !

त्या दिवशीं बऱ्याच रात्रीपर्यंत आयेषा व उस्मान हीं जगत्सिंहाच्या जवळ बसून राहिलीं होतीं. जगत्सिंह केव्हां केव्हां शुद्धीवर येई, केव्हां केव्हां मूर्च्छित होऊन पडे. हकीमजी वरचेवर येऊन पाहून जात असत. आयेषा त्याची शुश्रूषा अविश्रांत करीत होती. दोन प्रहर रात्र झाली, तेव्हां एका दासीनें येऊन तिला सांगितलें कीं बेगमसाहेब बोलावीत आहेत.

' आल्येंच ' असें म्हणून आयेषा उठली. उस्मानहि उठला. तेव्हां ' तुम्हीहि उठलांत ? ' असें आयेषेनें विचारलें.

**उस्मान**—रात्रीची वेळ आहे. चला, मी तुम्हांला पोंचविण्यास येतों.

तेथील दासदासींना सावध राहण्यास सांगून आयेषा आपल्या आईच्या महालाकडे जाण्याला निघाली. वाटेंत उस्मान म्हणाला, ' तुम्ही काय आज बेगमसाहेबापाशींच राहणार ? '

**आ०**—नाहीं. मी राजपुत्राकडे परत येणार आहें.

उ०—आयेषे ! तुमच्या गुणांना सीमा नाहीं. तुम्ही या प्रत्यक्ष वैऱ्याची अशी काळजीपूर्वक शुश्रूषा करीत आहां कीं तशी प्रत्यक्ष बहीण आपल्या भावाचीसुद्धां करणार नाहीं. तुम्ही त्याला प्राणदान देत आहां.

साऱ्या जगाला मोहून टाकणाऱ्या अशा तिच्या मुखावर या वेळीं थोडेंसें स्मित दिसूं लागलें. ती म्हणाली, ' उस्मान, मी तर काय बायकोच्याच जन्माला आलेली आहें. दुःखितांची सेवा करणें हा तर माझा धर्मच आहे. त्याप्रमाणें आचरण केलें तर त्यांत प्रशंसा नाहीं, न केलें तर मात्र दोष घडणार. पण तुम्ही कां बरें तसेंच करतां ? जो तुमचा कट्टा दुष्मन, रणभूमीवर तुमचा रेच उतरणारा शत्रु–ज्याची तुम्हीं आपल्या हातानें अशी दशा केली, त्याची तुम्ही रात्रंदिवस इतकी मनःपूर्वक शुश्रूषा करीत आहां, आणि त्याच्या आरोग्यलाभासाठीं झटत आहां, तेव्हां त्याबद्दल तुम्ही खरोखर प्रशंसेला पात्र आहां. '

यावर किंचित् गोंधळल्यासारखा होऊन उस्मान म्हणाला, ' आयेषे ! तुमच्या सुंदर स्वभावाला अनुरूप असें सगळें कांहीं तुम्हांला सुंदर दिसतें. पण माझा उद्देश तसा चांगला नाहीं. जगत्सिंह जगला तर आमचा केवढा फायदा होईल हें तुम्हांला ठाऊक नाहीं. त्याला आतां मृत्यु आला, तर आमचें कसें होईल ? रणभूमीवर मानसिंह जगत्सिंहापेक्षां कमी नाहीं. एका योद्धयाचे जागीं दुसरा उभा राहील; पण जर जगत्सिंह जगला आणि आमच्या हातांत बंदिवान होऊन राहिला, तर मानसिंह हातीं लागलाच म्हणून समजा. आपल्या प्रिय पुत्राच्या मुक्ततेसाठीं तो आम्हांला अनुकूल असा तह करील. अकबर बादशहाहि असला कुशल सेनापति पुनः प्राप्त व्हावा म्हणून तह करण्यास कबूल होईल. आणखी, जर चांगल्या वागवणुकीनें आम्हीं जगत्सिंहाला वश करून घेतलें, तर तोहि आम्हांला फायदेशीर असा तह घडवून आणण्याचे कामीं आग्रह धरील, निदान यत्न तरी करील. त्याचा यत्न अगदींच निष्फळ होणार नाहीं. अगदींच कांहीं फलप्राप्ति झाली नाहीं, तरी जगत्सिंहाच्या स्वातंत्र्याची किंमत म्हणून मानसिंहाकडून बरीचशी द्रव्यप्राप्ति तरी आम्हांला खास होईल. समोरासमोर उभे राहून लढाई करून जय मिळविण्यापेक्षांहि जगत्सिंहाच्या जगण्यापासून आमचा अधिक फायदा आहे.'

असा सगळा विचार मनांत आणून उस्मान राजपुत्राचे प्राण वांचविण्याची खटपट करीत होता यांत शंका नाहीं. पण त्यांत आणखीहि एक हेतु होता. कांहीं लोक असे असतात कीं लोक आपणाला दयाळु म्हणतील या लज्जेच्या

भीतीनें ते वर्तनांत मुद्दाम कडकपणा दाखवितात, आणि दयाशीलता हा बायकी गुण आहे असा उपहास करीत करीत ते परोपकार करतात. कोणीं विचारलें तर ते सांगतात कीं तसें करणें आम्हांला जरूरच आहे. उस्मान अशा माणसांपैकीं एकजण आहे, हें आयेषा पक्कें जाणून होती. ती हंसत हंसत म्हणाली, 'उस्मान ! सर्वच जण तुमच्या सारखे स्वार्थबुद्धीमुळें दूरदृष्टि ठेवून वागतील, तर मग धर्माचें कारणच उरणार नाहीं.'

उस्मान थोडा वेळ इकडे तिकडे पाहून मृदु स्वरानें म्हणाला, 'मी अत्यंत मतलबी आहें याला आणखी एक पुरावा देतों.'

हें ऐकतांच पोटांत विद्युत्तेज असलेल्या मेघाप्रमाणें असणारे आपले नेत्र आयेषेनें उस्मानाच्या चर्येकडे लाविले. तेव्हां उस्मान म्हणाला, 'मी एका आशालतेला धरून बसलों आहें. आणखी किती दिवस तिच्या तळाशीं जलसिंचन करीत बसूं ? '

हें ऐकतांच आयेषेची चर्या गंभीर दिसूं लागली. उस्मानला तिच्या चर्येंत पडलेल्या या फरकांत नवीन सौंदर्य दिसूं लागलें. आयेषा म्हणाली, 'उस्मान ! मी तुम्हांला भाऊ समजून तुमच्यांत बसत्यें उठत्यें. पण तुम्ही असा अधिकपणा कराल तर मी तुमच्या दृष्टीस सुद्धां पडायची नाहीं.'

उस्मानाचें हर्षोत्फुल्ल मुख एकदम म्लान झालें. तो म्हणाला, 'ही तर नेहमींचीच गोष्ट आहे. सृष्टिकर्त्या ! फुलासारख्या या नाजूक शरीरांत असें पाषाणासारखें कठोर हृदय तूं कसें ठेवलेंस ? '

उस्मान आयेषेला तिच्या आईच्या महालापर्यंत पोंचवून खिन्न चित्तानें आपल्या निवासस्थानीं परत आला.

आणि जगत्सिंह ? तो तर भयंकर ज्वरानें बेशुद्ध होऊन बिछान्याला खिळून पडलेला होता.

---

## प्रकरण तिसरें.

## 'तुम्ही कीं तिलोत्तमा ? '



दुसरे दिवशीं संध्याकाळीं जगत्सिंह होता त्या खोलींत आयेषा, उस्मान आणि हकीम असे तिघेजण पूर्ववत् निःशब्द बसले होते. आयेषा पलंगावर

बसून हातांतल्या पंख्यानें वारा घालीत होती. हकीम वारंवार नाडी पाहत होते. जगत्सिंह निचेष्ट पडला होता. हकीमजी म्हणाले कीं 'आज ज्वर निघण्याचे वेळीं जगत्सिंहाच्या जिवाला धोका होण्याची भीति आहे. पण ती वेळ निभावली म्हणजे मग चिंता करण्याचें कारण नाहीं. मग हा खास जगला समजावें.' ताप निघण्याची वेळ येऊन पोंचली होती, म्हणून सगळेजण विशेष चिंतातुर झाले होते. हकीम वरचेवर नाडी पाहत होता. 'आतां नाडी क्षीण आहे' 'आतां आणखी मंद झाली आहे,' 'आतां थोडीशी जोरानें वाहूं लागली आहे' असें अस्फुट शब्दांनीं तो मधून मधून सांगत होता. इतक्यांत एकाएकीं त्याची चर्या काळवंडली. तो म्हणाला, 'वेळ येऊन पोंचली.'

आयेषा व उस्मान मुकाट्यानें सारें ऐकत होतीं. हकीमजी नाडीवर हात धरून बसले होते.

थोड्या वेळानें हकीम म्हणाला, 'गति मंद झाली.' हें ऐकून आयेषेची चर्या म्लान झाली. एकाएकीं जगत्सिंहाच्या चर्येवर भयाची छाया दिसूं लागली, त्याचें मुख फिकट दिसूं लागलें. हाताच्या मुठी घट्ट वळल्या. डोळे चमत्कारिक रीतीनें फिरूं लागले. तें पाहून आयेषा समजली कीं आतां काळाच्या मुखांत ग्रास पडण्यास फारसा अवकाश राहिला नाहीं. हकीमजी हातांत औषधाची वाटी घेऊन बसले होते. त्यांनीं तीं लक्षणें पहातांच बोटानें रोग्याची दांतखीळ उघडून औषध तोंडांत घातलें; पण तें पोटांत न जातां बाहेरच्या बाहेर निघून पडलें. कांहीं थोडासा अंश मात्र पोटांत गेला होता; पण तो जातांच रोग्याची अवस्था पालटूं लागली. हळू हळू प्रेतकळा दूर होऊन पूर्वीची कांति येऊं लागली. तोंडावरचा फिकटपणा जाऊन रक्तसंचार होऊं लागला. हाताच्या मुठी वळलेल्या ढिल्या पडल्या. डोळ्यांतल्या बुबुळांची चंचलता जाऊन दृष्टि स्थिर झाली, आणि ते मिटूं लागले. हकीमजी लक्ष्यपूर्वक नाडी पाहूं लागले. बऱ्याच वेळानें ते हर्षित होऊन म्हणाले, 'आतां फिकीर नाहीं. वेळ निभावली.'

उस्माननें विचारलें, 'ताप निघाला काय?'

**हकीम**—होय.

हें ऐकून आयेषा व उस्मान या दोघांचीं मुखें प्रफुल्लित झालीं. हकीम म्हणाला, 'आतां कांहीं चिंता नाहीं. आतां मला बसण्याचें कारण नाहीं. हें औषध दोन प्रहर रात्रीपर्यंत घटके घटकेनें द्या म्हणजे झालें.' इतकें बोलून हकीम निघून

गेला. उस्मान आणखी चार घटका बसून आपल्या महालाला गेला. आयेषा मात्र पलंगावर बसून घटके घटकेनें औषध देत राहिली.

दोन प्रहररात्रीच्या किंचित् अगोदर राजकुमारानें डोळे उघडले. त्याबरोबर आयेषेची आनंदानें प्रफुल्लित झालेली मुद्रा त्याच्या दृष्टीस पडली. त्याच्या दृष्टीच्या चमत्कारिक तऱ्हेवरून तिला वाटलें कीं त्याला भ्रम झाला आहे. अथवा तो कशाचें तरी स्मरण करूं पाहत आहे, पण त्याचा तो यत्न निष्फळ होत आहे. बऱ्याच वेळानें तो आयेषेला म्हणाला, 'मी कोठें आहें ? ' आज दोन दिवसांनंतर हे उद्गार प्रथमच त्याच्या तोंडून निघाले होते.

आयेषा म्हणाली, 'कतलूखानाच्या किल्ल्यांत.'

राजपुत्र पुनः मागच्या सारखा आठवण करूं लागला. बऱ्याच वेळानें तो म्हणाला, 'मी येथें कसा आलों ?'

आयेषा अगोदर चूप बसली होती; पण मागून तिनें उत्तर केलें, 'आपण आजारी आहां म्हणून.'

राजपुत्र विचार करीत करीत मान हलवून म्हणाला, 'नाहीं, नाहीं. मी कैद झालों आहें.'

हें बोलतां बोलतां राजपुत्राची चर्या पालटली.

आयेषेनें कांहीं उत्तर केलें नाहीं. राजपुत्राची स्मरणशक्ति पुनः जागृत होत आहे, असें तिला दिसून आलें.

क्षणभरानें राजपुत्रानें पुनः विचारलें, 'तुम्ही कोण ?'

'मी आयेषा.'

'आयेषा कोण ?'

'कतलूखानाची कन्या.'

राजपुत्र पुनः क्षणभर स्तब्ध राहिला. एकदम पुष्कळ बोलण्याइतकी शक्ति अजून त्याला नव्हती. थोडा वेळ विश्रांति घेतल्यावर तो म्हणाला, 'मी किती दिवस येथें आहें ? '

'चार दिवस.'

'मांदारणगड अजून तुमच्याच ताब्यांत आहे काय ? '

'होय, आहे.'

पुनः कांहीं वेळ विश्रांति घेऊन राजपुत्रानें विचारलें, 'वीरेंद्रसिंहाची काय स्थिति आहे ?'

'ते कैदेंत पडले आहेत. आज त्यांची चौकशी व्हावयाची आहे.'

जगत्‌सिंहाचें म्लान मुख अधिकच म्लान झालें. त्यानें विचारलें, 'इतर माणसांची काय खबर आहे?'

आयेषेचें मन उद्विग्न झालें. ती म्हणाली, 'मला सगळी माहिती नाहीं.'

जगत्‌सिंह आपल्याच मनाशीं कांहीं पुटपुटला. त्याच्या तोंडावाटे एक नांव निघालें व आयेषेनें तें ऐकलें. तिलोत्तमा हें तें नांव होतें.

आयेषा हळूच उठून हकीमानें दिलेलें गोड औषध आणण्यास गेली. राजपुत्र तिच्या कर्णभूषणांच्या हलण्यानें तिच्या शरीरसौंदर्याला जी अपूर्व शोभा आली होती ती पाहूं लागला. आयेषेनें औषध आणिलें, तें पिऊन राजपुत्र म्हणाला, 'मी शरीरव्यथेनें बेशुद्ध पडलों असतां एक स्वप्न पाहिलें होतें. त्यांत एक स्वर्गीय देवकन्या माझ्या उशाशीं बसून शुश्रूषा करीत असलेली दिसली. ती तुम्ही कीं तिलोत्तमा?'

आयेषा म्हणाली, 'आपण तिलोत्तमेला स्वप्नांत पाहिलें असावें'.

---

## प्रकरण चौथें.

# बुरखा घेतलेली स्त्री.

किल्ला सर करून घेतल्यानंतर दोन दिवसांनीं सुमारें एक प्रहर दिवस आल्यावर कतलूखान आपल्या किल्ल्यांतील दरबारांत बसला होता. दरबारी लोक आपापल्या दर्जाप्रमाणें दोन्ही बाजूंस रांगेनें उभे होते. समोरच्या पटांगणांत हजारों लोक मुकाट्यानें उभे होते. त्या दिवशीं वीरेंद्राची चौकशी व्हावयाची होती. हत्यारबंद शिपाई वीरेंद्राला शृंखलाबद्ध करून दरबारांत घेऊन आले. वीरेंद्राची मूर्ति लालभडक दिसत होती; पण त्याच्या चर्येवर भीतीचें चिन्ह मुळींच नव्हतें. त्याच्या डोळ्यांतून जणूं काय विस्तवाच्या ठिणग्या पडत होत्या. नाकपुड्या फुगून कांपत होत्या, आणि दांत खालचा ओठ चावीत होते. त्याला कतलूखानाच्या समोर आणिल्यावर खानानें विचारलें, 'वीरेंद्रसिंह! तुझ्या अपराधाची आतां चौकशी व्हावयाची आहे. तूं काय म्हणून आमच्या विरुद्ध वागलास तें सांग पाहूं?'

वीरेंद्र रागानें लाल झाला होता. तथापि आपला क्रोध आवरून तो म्हणाला, 'मी तुमच्या विरुद्ध कसा वागलों तें तुम्हीच मला अगोदर दाखवा.'

एक दरबारी त्याला म्हणाला, 'जरा नम्रतेनें बोल.'

**कतलू०**—माझ्या हुकुमाप्रमाणें द्रव्य व सैन्य पाठविण्याचें तूं कां नाकारलेंस ?

वीरेंद्रानें न कचरतां उत्तर केलें, 'तूं राजद्रोही लुटारू आहेस. तुला कशाबद्दल द्रव्य द्यायचें ? आणि कशासाठीं सैन्य द्यायचें ?'

प्रेक्षकांना वाटलें कीं वीरेंद्र नाहक आपल्या हातानें आपला शिरच्छेद करून घेण्यास तयार होत आहे.

कतलूखान रागानें थरथर कांपूं लागला. तथापि एकदम क्रोध आवरून धरण्याची शक्ति अभ्यासानें त्याच्या ठायीं असल्यामुळें त्यानें थोडीशी शांतता धारण करून म्हटलें, 'तूं आमच्या अमला खालीं राहत असून मोगलांना जाऊन मिळालास, तो कां ?'

वीरेंद्रानें विचारलें, 'तुझा अमल कोठला ?'

या उत्तरानें कतलूखानाचा क्रोध अधिकच भडकला. तो म्हणाला, 'दुरात्म्या ! ऐक. तुझ्या कर्माचें उचित फळ तुला भोगलेंच पाहिजे. इतका वेळ तुझ्या जगण्याची कांहीं आशा वाटत होती, पण तूं मूर्ख आहेस. तूं केवळ अभिमानाच्या पायीं आपलें मरण ओढून घेत आहेस.'

वीरेंद्र अभिमानपूर्वक हंसूं लागला, तो म्हणाला, 'कतलूखाँ ! मी तुझ्याकडे असा कैद होऊन आलों, तेव्हां तुझ्या दयेची आशा धरून मुळींच आलों नाहीं. तुझ्यासारख्या शत्रूच्या दयेवर अवलंबून जे आपले प्राण रक्षण करूं पाहतात त्यांनीं जिवंत राहावेंच कशाला ? मला मारून टाकण्यानेंच तूं समाधान मानून घेतास तर मीं तुला आशीर्वाद देत देत मरण पत्करलें असतें. पण तूं माझ्या पवित्र कुलाला कलंक लाविला आहेस. मला प्राणाहूनहि प्रिय अशा धनाचा'—

वीरेंद्राच्यानें पुढें बोलवेना. त्याचा कंठ दाटून आला. डोळे अश्रूंनीं भरून आले, आणि निर्भीड व स्वाभिमानी असा वीरेंद्र खालीं मान घालून रडूं लागला.

कतलूखान स्वभावतः निष्ठुर होता. इतका निष्ठुर कीं दुसऱ्याच्या दुःखानें त्याला आनंदाच्या उकळ्या फुटत. आपल्या मोठ्या मानी स्वभावाच्या शत्रूची अशी अवस्था झालेली पाहून त्याचें मन हर्षोत्फुल्ल झालें. तो म्हणाला, 'वीरेंद्रसिंह ! तूं माझ्यापासून कांहीं मागून घेत नाहींस काय ? विचार कर. तुझा अंतकाळ जवळ आला आहे.'

ज्या दुःसह संतापाग्नीनें वीरेंद्राचें हृदय दग्ध झालें होतें तो संताप त्याच्या रडण्यानें थोडासा शांत झाला होता. पूर्वीपेक्षां अधिक शांतपणानें त्यानें उत्तर केलें, 'दुसरें कांहीं मागायचें नाहीं. येवढेंच मागणें मागतों कीं माझा वध लौकर करून टाक.'

**कत०**—तें तर होईलच. पण आणखी कांहीं ?

**वीरें०**—या जन्मीं दुसरें कांहीं नको.

**कत०**—मरणाचे वेळीं तूं आपल्या कन्येला भेटूं इच्छित नाहींस काय ?

हा प्रश्न ऐकून प्रेक्षकवर्ग दुःखानें स्तब्ध होऊन राहिला. वीरेंद्राच्या नेत्रांतून पुनः पूर्वीच्या सारख्या अग्नीच्या ठिणग्या दिसूं लागल्या. तो म्हणाला, 'जर माझी मुलगी तुझ्या घरांत जिवंत असेल तर मला तिची भेट नको. जर ती मेली असेल तर तिला आण म्हणजे तिला पोटाशीं धरून मी प्राण सोडीन.'

प्रेक्षकवर्ग हे शब्द ऐकून चकित झाला. अगणित माणसें तेथें जमा झालीं असून इतकी स्तब्धता झाली कीं सुई खालीं जमिनीवर पडली असती तर तिचा सुद्धां शब्द ऐकूं आला असता. नबाबाकडून इशारत मिळतांच शिपायांनीं वीरेंद्राला वधस्थानाकडे नेलें. तेथें जाऊन पोंचण्याच्या थोडा वेळ अगोदर एक मुसलमान वीरेंद्राच्या कानांत कांहीं पुटपुटला. वीरेंद्राला त्याचा अर्थ कांहीं कळला नाहीं. तेव्हां त्या मुसलमानानें वीरेंद्राच्या हातांत एक पत्र दिलें. वीरेंद्राचें मन दुसऱ्याच कांहीं विचारांत होतें. त्यानें तें पत्र घेऊन उघडून पाहिलें तर विमलेचें हस्ताक्षर ! वीरेंद्रानें रागारागानें चोळामोळा करून तें दूर फेकून दिलें. तें आणणारानें उचलून घेऊन तो चालता झाला. जवळच्या माणसापैकीं एकानें हा प्रकार पाहून दुसऱ्याला म्हटलें, 'मुलीचें पत्र असावें.'

ते शब्द वीरेंद्राच्या कानीं पडले. तेव्हां तो त्या दिशेकडे वळून म्हणाला, 'माझी मुलगी म्हणून कोणीं म्हटलें ? मला मुलगीच नाहीं.'

कागद आणणारा मनुष्य तो घेऊन गेला. जातां जातां त्यानें शिपायांना फर्माविलें कीं 'मी परत येईपर्यंत अंमळ थांबा.'

शिपाई म्हणाले, 'जी हुकूम.'

कागद आणणारा स्वतः उस्मान हाच होता. म्हणूनच शिपायांच्या तोंडून अदबीचे शब्द निघाले होते.

उस्मान तो कागद घेऊन अंतःपुराच्या तटापाशीं गेला. तेथें बकुल वृक्षाच्या आड बुरखा घेतलेली एक स्त्री उभी होती. उस्माननें तिच्या जवळ जाऊन व

चोहींकडे अगोदर पाहून मग घडलेला सर्व वृत्तांत तिला सांगितला, तेव्हां ती स्त्री म्हणाली, 'मी आपणाला फार तसदी देत आहें. पण आपल्यामुळेंच आमची अशी दशा झाली आहे. म्हणून माझें येवढें काम आपण केलें पाहिजे.'

उस्मान स्तब्ध उभा राहिला.

बुरखा घेतलेली स्त्री दुःखामुळें कांपऱ्या आवाजानें म्हणाली, 'करायचें नसलें तर नका करूं. मी सांप्रत अनाथ झाल्यें आहें; पण परमेश्वर माझा वाली आहे!'

उस्मान म्हणाला, 'मासाहेब ! तुम्ही मला किती कठीण काम सांगत आहां याची तुम्हांला कल्पना नाहीं. कतलूखानाला हें कळलें, तर तो माझें डोकेंच मारील.'

स्त्री म्हणाली, 'कतलूखान ? मला कां असें ठकवूं पाहतां ? कतलूखानाची काय बिशाद आहे कीं तो तुमच्या केसाला धक्का लावील ?'

**उस्मान०**—कतलूखानाला तुम्ही ओळखीत नाहीं. बरें चला, मी तुम्हांला वधस्थानीं घेऊन जातों.

उस्मानाच्या मागून मागून ती स्त्री वधस्थानीं गेली आणि मुकाट्यानें उभी राहिली. वीरेंद्रसिंह तिच्याकडे न पाहतां दरिद्री माणसाचा वेष घेतलेल्या एका ब्राम्हणाशीं गोष्टी बोलत होता. त्या स्त्रीनें बुरख्यांतून पाहिलें तों तो ब्राम्हण म्हणजे स्वामी अभिराम होता असें तिला दिसून आलें.

वीरेंद्र अभिराम स्वामीला म्हणाला, 'गुरुजी ! मी आतां आपला निरोप घेतों. आपणास आतां मी काय सांगायचें आहे ? या लोकीं आतां मला कांहीं मागावयाचें नाहीं. कोणासाठीं मी मागायचें ?'

अभिरामस्वामीनें मागें उभी असलेल्या बुरखा घेतलेल्या स्त्रीकडे बोट केलें. वीरेंद्रानें तिच्याकडे तोंड वळविलें. त्याबरोबर त्या स्त्रीनें बुरखा काढून फेकून दिला, आणि शृंखलाबद्ध वीरेंद्राच्या पायांवर लोटांगण घातलें. वीरेंद्रानें गद्गद स्वरानें म्हटलें, 'कोण ? विमला ?'

'स्वामी ! प्रभो ! प्राणेश्वरा ! ' अशा शब्दांनीं संबोधतां संबोधतां विमला वेड लागलेल्या स्त्रीप्रमाणें मोठ्यानें म्हणूं लागली, 'मी आज साऱ्या दुनियेसमक्ष बोलणार आहें. मला कोण मना करतें तें पाहत्यें. धनीसाहेब ! अहो कंठमणि ! कोठें चाललां ? आम्हांला आतां कोठें ठेवणार ?'

हे शब्द ऐकून वीरेंद्राच्या नेत्रांतून घळघळ अश्रुधारा वाहूं लागल्या. विमलेचा हात धरून तो म्हणाला, 'विमले ! प्रियतमे ! यावेळीं मला कां रडायला लावित्येस ? शत्रूंनीं हें पाहिलें तर ते म्हणतील कीं मी मरणाला भीत आहें.'

विमला स्तब्ध राहिली. वीरेंद्र पुनः म्हणाला; 'विमले ! मी जातों. तूं मागून ये.'

विमला म्हणाली, 'येईन बरें ! '

नंतर कोणालाहि ऐकूं जाणार नाहीं अशा स्वरानें ती म्हणूं लागली, 'मी येईन; पण अगोदर या दुःखाबद्दल सूड घेईन तेव्हां येईन.'

मालवण्याच्या बेतांत असलेल्या दीपाप्रमाणें वीरेंद्राचें मुख प्रफुल्लित झालें. तो म्हणाला, 'तुला हें करतां येईल ?'

विमला आपल्या उजव्या हाताकडे बोट दाखवून म्हणाली, 'या हातानें करून दाखवीन. हीं पहा या हातांतलीं कांकणें काढून टाकिलीं. आतां यांचें काय काम आहे ? ' असें बोलून तिनें हातांतलीं कांकणें काढून फेकून दिलीं आणि म्हटलें, 'आतां तीक्ष्ण धारेच्या शस्त्राशिवाय या हातांत दुसरा अलंकार धारण करणार नाहीं.'

वीरेंद्र हर्षित होऊन म्हणाला, 'तूं करशील. परमेश्वर तुझी मनकामना पूर्ण करो.'

चांडाळ ओरडून म्हणाला, 'आतां उशीर करूं नका, आटपा.'

वीरेंद्र विमलेला म्हणाला, 'आणखी कांहीं बोलण्याचें आहे काय ? नसेल तर जा आतां.'

विमला म्हणाली, 'नाहीं. माझ्या देखतच मला वैधव्य येऊं द्या. म्हणजे तुमच्या रक्तानें माझ्या मनांतला सगळा संकोच धुऊन निघेल.' या वेळच्या विमलेच्या स्वरांत भयंकर दृढता भरलेली दिसत होती.

'बरें तसें कां होईना !' असें बोलून वीरेंद्रानें चांडाळाला इशारा केला. विमलेनें पाहिलें तों मारण्यासाठीं वर उचललेलें शस्त्र सूर्यप्रकाशानें चकाकत होतें. त्यामुळें तिचे नेत्र क्षणमात्र मिटले. तिनें पुनः डोळे उघडले, 'तेव्हां तिला आढळून आलें कीं वीरेंद्रसिंहाचें तोडलेलें मस्तक रक्तानें भिजलेल्या धुळींत पडलें आहे.

एखाद्या पाषाणाच्या पुतळीप्रमाणें विमला स्थिर उभी होती. तिच्या डोक्या-वरचा एकहि केस वाऱ्यानें हलत नव्हता कीं डोळ्याच्या पापण्या मिटत नव्हत्या. तिची दृष्टि एकसारखी तुटून पडलेल्या मस्तकाकडे लागून राहिली होती.

---

## प्रकरण पांचवें.

## विधवा.



तिलोत्तमा कोठें आहे ? ती पितृहीन अनाथ बालिका कोठें आहे ? विमला तरी कोठें आहे ? आपल्या स्वामीच्या वधाचे वेळीं ती कोठून येऊन आपल्या दृष्टीस पडली ? आणि त्या नंतर ती कोठें गेली ?

वीरेंद्रसिंहानें आपल्या मृत्युसमयींहि कन्येची भेट कां म्हणून घेतली नाहीं ? तिचें नांव काढतांच भडकलेल्या अग्नीप्रमाणें त्याच्या अंगाचा संताप होत असे, तो काय म्हणून ? 'मला मुलगीच नाहीं' असें तो म्हणाला होता तें कां ? आणि विमलेचें पत्र न वाचतांच त्यानें चोळामोळा करून फेकून दिलें होतें तें कां ?

कां ? कतलूखानाविषयीं वीरेंद्राला जो इतका तिरस्कार वाटत असे त्याचें स्मरण करा म्हणजे काय काय भयंकर प्रकार घडले होते तें कळेल.

'माझ्या पवित्र कुळाला डाग लागला आहे' असें बोलून त्या शृंखलाबद्ध व्याघ्रानें भयंकर गर्जना केली होती, हें ध्यानांत आहेना ?

तिलोत्तमा व विमला या कोठें आहेत, तें जाणण्याची तुमची इच्छा आहे काय ? कतलूखानाच्या वेश्यांच्या मंदिरांत शोध करून पहा, म्हणजे त्या तेथें तुम्हांला आढळतील.

जगाची अशीच रीत आहे. भाग्यचक्राचे फेरे असेच भयंकर आहेत. रूप, यौवन, सरळ स्वभाव, निर्मलता हीं सगळीं त्याच चक्राच्या धावेखालीं चिरडलीं जात आहेत.

कतलूखानाचा असा नियम होता कीं, कोणताहि किल्ला किंवा गांव सर केला म्हणजे तेथें ज्या सुंदर स्त्रिया हातीं लागतील, त्यांना पकडून तो आपल्या सेवे-साठीं ठेवून घेई. मांदारणगड काबीज केल्यावर दुसरे दिवशीं कतलूखानानें तेथें जाऊन कैद केलेल्या लोकांची व्यवस्था लावण्याचें व किल्ल्याच्या रक्षणार्थ लोक

नेमण्याचें काम स्वतः केलें. पकडलेल्या लोकांत तिलोत्तमेला व विमलेला पाहतांच आपलें विलासमंदिर सुशोभित करण्यासाठीं त्यानें त्या दोघींना तिकडे पाठवून दिलें आणि नंतर तो दुसऱ्या उद्योगांना लागला. लोकांत बोलवा होती कीं जगत्सिंह बंदिवान झाल्याचें ऐकून रजपूत सैन्य जवळच कोठें चालून जाण्याच्या उद्योगांत होतें. म्हणून त्या सैन्याला मागें पिटाळून लावण्यासाठीं योग्य ती तजवीज करण्यांत कतलूखान गुंतला होता व त्यामुळें या नूतन दासींच्याकडे लक्ष देण्यास त्याला फुरसत मिळाली नव्हती.

विमला आणि तिलोत्तमा यांना निरनिराळ्या खोल्यांतून ठेवण्यांत आलें होतें. त्या पितृहीन तरुणीची देहयष्टी जमिनीवर धुळींत पडली होती. वाचकहो ! अशा स्थितींत तिच्याकडे पाहण्याचें आपणाला काय कारण आहे ? वसंत ऋतूच्या आगमनसमयीं वृक्षांची नवी पालवी ज्याप्रमाणें वाऱ्यानें हलत असते, तेव्हां तिच्या छायेखालीं घटकाभर बसावें असें कोणाला वाटत नाहीं ? पण जेव्हां ग्रीष्म ऋतूंतल्या वावटळीनें झाडांचीं पानें गळून पडतात, तेव्हां मुळांसकट उलथून पडलेल्या मोठमोठाल्या वृक्षांना सोडून गरीब बिचाऱ्या वेलीकडे कोणाचें तरी लक्ष जातें का ? लाकूडतोड्ये मोठमोठाले वृक्ष तोडून नेत असतात पण ते गरीब बिचाऱ्या वेलींना नुसतें पायांखालीं तुडवितात.

तिलोत्तमेला सोडून आपण दुसरीकडे जाऊं या. पूर्वीच्या चंचल, चतुर, रसप्रिय, रसिक अशा विमलेच्या बदलीं आतां ती गंभीर, पश्चात्ताप करीत दुःखानें मलिन झालेल्या डोळ्यांना पदर लावून बसलेली एक विधवा आहे. तिच्याकडे आपण जाऊं.

ही विमलाच काय ? आतां पूर्वीसारखी तिनें वेणीफणी केलेली नाहीं, डोक्यांत खंडीभर मळ सांचला आहे. तिच्या अंगावर पूर्वीसारखें सुंदर कलाकुसरीचें काम केलेलें वस्त्र नाहीं. अंगांत रत्नखचित चोळी नाहीं. तिचें वस्त्र जीर्ण झालेलें, अपुरें व मळकट आहे. तिच्या अंगावरचे डागिने कोठें आहेत ? खांद्याला स्पर्श करणारी तिचीं कर्णभूषणें कोठें आहेत ? तिचे डोळे कां बरें सुजले आहेत ? तिचे ते नेत्रकटाक्ष कोठें गेले ? कपाळावर जखम कसली दिसत आहे ? तिच्यांतून रक्त बाहेर आलें आहे !

विमला उस्मानाच्या येण्याची वाट पाहत बसली आहे.

उस्मान हा पठाण कुलाचा तिलकासारखा होता. युद्ध हेंच त्याचें स्वार्थसाधन, तोच त्याचा व्यवसाय, आणि तोच त्याचा धर्म होता. अर्थात्च युद्धांत जय मिळावा

म्हणून तो कोणत्याहि कामांत मागें पुढें पाहणारा नव्हता; पण युद्धांत जय प्राप्त झाल्यावर पराजितांवर यत्किंचित्हि अत्याचार तो घडूं देत नसे. जर कतलूखान स्वतः विमला व तिलोत्तमा यांच्या दुर्दैवानें वर सांगितल्याप्रमाणें भयंकर व्यवस्था न करता, तर उस्मानाच्या कृपेनें बंदिवान होण्याचा त्यांच्यावर प्रसंग आला नसता. त्याच्याच कृपेमुळें विमलेला आपल्या स्वामीच्या मृत्युप्रसंगीं त्याची भेट घेतां आली होती. जेव्हां उस्मानाला कळलें कीं ती वीरेंद्राची स्त्री आहे, तेव्हां त्याच्या दयार्द्र चित्ताला तिची अधिकच दया आली. उस्मान हा कतलूखानाचा पुतण्या असल्यामुळें जनानखान्यांत जाण्या येण्याला त्याला मनाई नसे. ज्या क्रीडागृहांत कतलूखानाच्या वेश्या असत, तेथें कतलूखानाच्या मुलांनासुद्धां जाण्याची बंदी असे. उस्मानखानालाहि जातां येत नसे. पण उस्मान हा कतलूखानाचा उजवा हात होता. त्याच्याच बाहुबळावर आमोदर नदीच्या तीरापर्यंत उत्कल प्रांत कतलूखानानें काबीज केला होता. अर्थात् सगळे लोक जसे कतलूखानाच्या तसेच उस्मानाच्याहि आज्ञेंत होते. यामुळेंच आज सकाळीं विमलेच्या विनंतीवरून विमलेला तिच्या पतीचें दर्शन घडलें होतें.

विमलेला वैधव्य प्राप्त झाल्यानंतर दोन दिवसांनीं तिचे जे कांहीं थोडे दागदागिने राहिले होते ते तिनें, कतलूखानानें तिच्या दिमतीस दिलेल्या दासीला, देऊन टाकिले. ती दासी म्हणाली, 'काय आज्ञा आहे ?'

विमला म्हणाली, 'तूं काल जशी उस्मानाकडे गेलीस तशी आज एकवार जा, आणि त्यांना सांग कीं त्यांची पुनः एकदां भेट घेण्याची माझी इच्छा आहे. त्यांना म्हणावें कीं ही माझी शेवटचीच प्रार्थना आहे. पुनः म्हणून मी आपलेजवळ कांहीं मागणार नाहीं.'

दासीनें त्याप्रमाणें जाऊन उस्मानाला सांगितलें. त्यानें उलट निरोप पाठविला कीं, 'तुमच्या महालामध्यें माझ्या जाण्यायेण्यानें आपल्या दोघांवरहि संकट येण्याचा संभव आहे. तेव्हां तुम्हीच माझ्या घरीं या.'

विमलेनें विचारलें, 'पण मी कशी येऊं ?' दासीनें उत्तर केलें, 'ते म्हणाले कीं त्याची तजवीज मी करतों.'

संध्याकाळ झाल्यावर आयेषेची एक दासी येऊन तिनें पाहाऱ्यावरच्या खोजाला कांहीं सांगून विमलेला आपल्याबरोबर उस्मानाकडे नेलें.

उस्मान म्हणाला, 'आणखी माझ्याकडून तुमचें कोणतें काम होण्यासारखें आहे ? सांगा.'

विमला म्हणाली, ' एक अगदीं सामान्य काम आहे. राजपुत्र कुमार जगत्सिंह जिवंत आहे काय ?'

**उस्मान**—होय.

**विमला**—तो मोकळा आहे कीं कैदेंत ?

**उस्मान**—बंदिवान तर खराच; पण कैदेंत नाहीं. त्याला जखमा झाल्या असल्यामुळें तो अंथरुणाला खिळला आहे. कतलखानाला न कळूं देतां त्याला जनानखान्यांत ठेवण्यांत आलें आहे. त्या ठिकाणीं त्याची नीट बरदास्त राहील म्हणून त्याला तेथें ठेविलें आहे.

हें ऐकून विमलेनें म्हटलें, ' या दुर्दैवी स्त्रीच्या संपर्कामुळें त्याच्या वर हा अमंगल प्रसंग आला. यांत कांहींतरी ईश्वरी संकेत असला पाहिजे. आतां राजपुत्र दुखण्यांतून जर जगला तर तो पुरा बरा झाल्यावर हें पत्र त्याला द्यावें. तोंपर्यंत हें आपल्यापाशींच राहूं द्यावें. येवढेंच माझें मागणें आहे.'

उस्मान तें पत्र परत देऊन म्हणाला, ' हें कार्य करणें मला अनुचित आहे. राजपुत्र आतां कोणत्याहि स्थितींत असला, तरी बंदिवानांतच त्याची गणना केली पाहिजे; आणि बंदिवानाला पाठविण्यांत येणारें कोणतेंहि पत्र स्वतः वाचल्याशिवाय तसेंच जाऊं देतां येत नाहीं. तसें करणें आमच्या सरकारच्या हुकुमाविरुद्ध होईल.'

विमला म्हणाली, ' आपणाला अनिष्टकारक असें कांहींच या पत्रांत नाहीं. आणखी कोणत्या सरकारच्या हुकुमाविरुद्ध काम करावयाचें आहे ? आपणच स्वतः सरकार आहां.'

उस्मानानें उत्तर केलें, ' इतर गोष्टींत एखादे वेळेस काकासाहेबांच्या हुकुमाविरुद्ध मला वागतां येईल; पण या कामांत नाहीं. तुम्ही म्हणतां कीं, या पत्रांत आमच्याविरुद्ध असें कांहीं नाहीं, आणि मलाहि तशी खात्री वाटते; पण या बाबतींत मला नियम मोडतां येत नाहीं. माझ्या हातून हें काम होणार नाहीं.'

विमला कुंठित झाली. ती म्हणाली, ' तर मग आपण अगोदर हें पत्र वाचून मग पाठवा.'

उस्मान तें पत्र हातीं घेऊन वाचूं लागला.

---

## प्रकरण सहावें.

# विमलेचें पत्र.



" युवराज ! मी स्वतःचा परिचय करून देण्याचें वचन आपणांस दिलें होतें. तसें करण्याचा प्रसंग आतां प्राप्त झाला आहे.

मला भरंवसा वाटत होता कीं आमची तिलोत्तमा अंबरच्या सिंहासनावर आरूढ होऊन माझा परिचय करून देईल. आतां ती आशा निर्मूळ झाली आहे. थोड्याच दिवसांत या पृथ्वीवर तिलोत्तमा नाहीं आणि विमलाहि नाहीं, अशी खबर आपल्या कानीं येईल असें मला वाटत आहे. आमची आयुष्यमर्यादा संपली आहे, म्हणूनच आपणांस हें पत्र लिहीत आहें.

मी महान् पापी आहें. अनेक अनुचित कर्में माझ्या हातून घडलीं आहेत. मी मेल्यावर लोक माझी निंदा करतील व नाहीं नाहीं तें माझ्याविषयीं बोलतील, त्या वेळीं माझ्या नांवावरचा कलंक दूर करील असा कोण आहे ? असा कोणता मित्र आहे ?

असा एक मित्र आहे; पण तोहि लवकरच माणसांची वस्ती सोडून तपश्चर्येसाठीं निघून जाणार आहे; तेव्हां अभिरामस्वामीच्या हातून या दासीचें कार्य होण्यासारखें नाहीं. कुमार ! मला खात्री वाटत होती कीं, एक दिवसाकरितां तरी मी तुमच्या नातलगवर्गांत गणिली जाईन. ही गोष्ट मी कोणापाशीं बोलूं ? या अभागिनीचें दुर्दैव अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें आहे. जे कोणी जवळ होते, त्यांना त्याची आंच लागली. तें कांहींहि असो, दासीच्या ह्या प्रार्थनेचें स्मरण ठेवा. जेव्हां कोणी म्हणतील कीं विमला कुलटा होती, दासीचा नुसता वेष होता; पण खरोखर वेश्या होती, तेव्हां त्यांना सांगा कीं विमला हलक्या जातींत जन्मलेली, दुर्दैवी, शत अपराध केलेली होती; पण वेश्या नव्हती. ज्यांनीं नुकतेंच स्वर्गाला प्रयाण केलें, त्यांनीं विमलेच्या अदृष्टाच्या प्रसादानें तिचें यथाशास्त्र पाणिग्रहण केलें होतें. विमलेनें एक दिवससुद्धां आपल्या स्वामीशीं विश्वासघाताचें वर्तन केलें नाहीं.

इतके दिवस ही गोष्ट बाहेर लोकांना कळली नव्हती. आतां तिच्यावर कोण विश्वास ठेवणार ? मी धर्मपत्नी असून दासीप्रमाणें कां राहिल्यें तें आतां ऐका.

मांदारणगडाच्या जवळ एका गांवीं शशिशेखरभट्टाचार्य हे राहात होते. शशिशेखर हा एका श्रीमंत ब्राम्हणाचा मुलगा होता. तरुणपणीं त्यानें रीतीप्रमाणें विद्याध्ययन केलें होतें. पण अध्ययनानें स्वभावदोष दूर होत नसतो. परमेश्वरानें शशिशेखराच्या अंगीं सर्व प्रकारचे गुण ठेविले होते; पण त्याबरोबर एक मोठा प्रबळ दोषहि ठेवला होता. तो दोष म्हणजे तारुण्यांतला दोष.

मांदारणगडावर जयधरसिंह याच्या एका सेवकाच्या वंशांत एक पतिविरहिणी स्त्री होती. तिचें सौंदर्य अलौकिक होतें. तिचा पति राजाच्या सैन्यांत शिपाई असल्यामुळें तो पुष्कळ दिवस देशांतराला गेला होता. मध्यंतरीं ती शशिशेखराच्या दृष्टिपथांत आली, आणि थोड्याच काळांत तिच्या उदरांत गर्भसंचार झाला.

अग्नि आणि पाप हीं फार दिवस गुप्त राहात नसतात. शशिशेखराचें पापकृत्य त्याच्या बापाच्या कानीं गेलें. दुसऱ्याच्या कुलाला आपल्या पुत्रानें लाविलेला कलंक दूर करण्यासाठीं शशिशेखराच्या पित्यानें सगळी हकीगत कळवून त्या स्त्रीच्या नवऱ्याला सत्वर घरीं परत आणविलें. अपराधी पुत्राची त्यानें नानाप्रकारें निर्भर्त्सना केली, तेव्हां कलंक लागलेलें तोंड घेऊन शशिशेखरानें देशत्याग केला.

बापाचें घर सोडून निघाल्यावर शशिशेखर काशीला गेला. तेथें एका मोठ्या विद्वान् संन्याशाची ख्याती ऐकून त्यानें त्या संन्याशाजवळ अध्ययनाला आरंभ केला. त्याची बुद्धि अतिशय तीव्र होती. दर्शनशास्त्रांत तो लवकरच निष्णात झाला. ज्योतिषशास्त्रांत तो अद्वितीय होता. त्यानें महामहोपाध्याय ही पदवी मिळविली. त्याचे गुरु त्याच्यावर अतिशय प्रसन्न असत.

शशिशेखराच्या घराजवळच एका शूद्र स्त्रीचें घर होतें. तिला एक तरुण कन्या होती. ब्राह्मणाविषयीं तिची अत्यंत भक्ति असल्यामुळें ती शशिशेखरच्या घरांतलीं सगळीं कामें करीत असे. मातापित्यांच्या दुष्कृत्यांवर झांकण घालणें हें माणसाचें कर्तव्यच आहे. फार काय सांगूं ? शूद्र कन्येच्या पोटीं शशिशेखरापासून या हतभागिनीचा जन्म झाला.

पुढें हें गुरूला समजल्यावर ते शिष्याला म्हणाले, 'असल्या दुराचारी विद्यार्थ्याला मी शिकविणार नाहीं. तूं आतां या काशीक्षेत्रांतून आपलें तोंड काळें कर.' त्याप्रमाणें शशिशेखरानें लज्जेनें काशीहून प्रयाण केलें. इकडे माझ्या आईलाहि दुराचारी म्हणून आजोबानें घरांतून काढून दिलें. तेव्हां माझी दुःखी माता मला घेऊन एका झोपडींत राहूं लागली. शारीरिक कष्ट करून ती कसातरी निर्वाह

करूं लागली. कोणीहि त्या दुःखी स्त्रीला परत घरांत घेईना. माझा पिता कोठें गेला त्याचा पत्ता नव्हता. कित्येक वर्षांनंतर हिंवाळ्यांत एक बडा पठाण बंगाल्यांतून दिल्लीला जात असतां वाटेंत काशी येथें त्याचा मुक्काम पडला होता. काशीला येण्यास फार रात्र झाल्यामुळें त्याला उतरण्याला कोठें जागा मिळेना. त्याची बिबी आणि एक तान्हा मुलगा होता. तो माझ्या आईच्या झोपडीपाशीं आला, आणि आजची रात्र मला या झोपडींत काढूं द्या अशी विनंति करूं लागला. तो म्हणाला, 'अशा रात्रीं हिंदूंच्या वस्तींत आम्हांला कोणी उतरूं देत नाहींत. आतां रात्रीं या लहान मुलाला घेऊन आम्हीं कोठें जावें? या लहान अर्भकाला येथली थंडी सोसणार नाहीं. आमच्याबरोबर माणसें वगैरेंचा परिवार नाहीं. या झोपडींत आजची रात्र सहज काढतां येईल. मी तुम्हांला चांगलें बक्षीस देईन.' खरी गोष्ट अशी आहे कीं तो पठाण कांहीं विशेष निकटीच्या कामासाठीं त्वरेनें दिल्लीला जात होता. त्याच्याबरोबर एकच नोकर होता. माझी आई दरिद्री होती, म्हणून म्हणा, तिचें अंतःकरण दयाळू होतें म्हणून म्हणा, किंवा धन-लोभानें त्या अर्भकाची तिला दया आली म्हणून म्हणा, तिनें त्या पठाणाला आपल्या झोपडींत जागा दिली. तो पठाण झोपडीच्या एका भागांत उशाशीं दिवा जळत ठेवून स्त्रीपुत्रांसह निजला होता, आणि दुसऱ्या भागांत आम्ही निजलों होतों. या वेळीं काशी क्षेत्रांत मुलें चोरून नेण्याचें भय फार मोठें होतें. मी त्या वेळीं सहा वर्षांची होत्यें. मला त्या वेळची चांगलीशी आठवण नाहीं. आईच्या तोंडून जें मीं ऐकलें तेंच मी सांगत आहें.

रात्रीं दिवा जळत होता. अशा वेळीं झोंपडीच्या भिंतींत एक भोंक पाडून एक चोर आंत आला, आणि पठाणाच्या त्या मुलाला घेऊन तो जाऊं लागला. इतक्यांत मीं जागी झाल्यें. मला तो सगळा प्रकार दिसला. तो पाहून मी ओरडल्यें. माझ्या ओरडण्यानें सगळी मंडळी जागी झाली. पठाणाच्या स्त्रीनें पाहिलें तों मुलगा जागेवर नाहीं! म्हणून ती मोठ्यानें ओरडली. तो चोर तेव्हां त्या मुलाला घेऊन खाटेच्या खालीं लपून बसला होता. पठाणानें त्या चोराची शेंडी जोरानें ओढून धरून त्याच्यापासून मुलाला काढून घेतलें. तो चोर फारच काककूत करूं लागला, तेव्हां पठाणानें तलवारीनें त्याचे कान कापून त्याला बाहेर घालवून दिलें.'

येथपर्यंत पत्र वाचून झाल्यावर उस्मान दुसऱ्या कांहीं गोष्टींचा विचार करीत करीत म्हणाला, "तुला त्या वेळीं दुसरें कांहीं नांव नव्हतें काय?"

विमला म्हणाली, ' होतें; पण तें मुसलमानी नांव असल्यामुळें माझ्या बापानें तें नांव बदललें.'

' कोणतें तें नांव? माहरू?'

विमला विस्मित होऊन म्हणाली, ' तुम्हांला हें कसें कळलें?'

उस्मान म्हणाला, 'तो चोरीस गेलेला मुलगा मीच.'

तें ऐकून विमला चकित झाली. उस्मान पुन्हां पत्र वाचूं लागला.

' दुसरे दिवशीं सकाळीं पठाण निरोप घेऊं लागला, तेव्हां तो माझ्या आईला म्हणाला, 'तुमच्या या मुलीनें आमच्यावर मोठे उपकार केले आहेत, त्यांची फेड आतांच करतां यावयाची नाहीं. पण तुमची जी काय इच्छा असेल ती सांगा. मी दिल्लीला गेल्यावर तेथून तुम्हांस जें पाहिजे असेल तें पाठवीन. द्रव्य पाहिजे असेल तर तें पाठवीन.'

आई म्हणाली ' द्रव्याची जरूर नाहीं. मजूरी करून मला निर्वाह करतां येतो. पण बादशहापाशीं आपलें कांहीं वजन असेल—'

तिचें वाक्य पुरें होतें न होतें तोंच पठाण म्हणाला, 'पुष्कळ आहे. बादशाच्या दरबारांत कांहीं काम असलें तर तें मी करूं शकेन.' यावर आई म्हणाली, 'तर मग या मुलीच्या बापाचा शोध करून मला कळवावें.'

पठाणानें तें कबूल केलें. आईच्या हातांत त्यानें एक मोहोर टाकली; पण आईनें ती घेतली नाहीं. पठाणानें दिल्लीस गेल्यावर आपल्या वचनाप्रमाणें माझ्या पित्याच्या शोधार्थ माणसें पाठविलीं; पण शोध लागला नाहीं.

यानंतर १४ वर्षांनीं सरकारी अधिकाऱ्यांना माझ्या बापाचा पत्ता लागला आणि त्यांनीं माझ्या आईला पत्र पाठवून त्याची खबर दिली. माझा पिता दिल्लींतच होता. शशिशेखर हें नांव टाकून अभिरामस्वामी हें नांव त्यांनीं धारण केलें होतें.

ही खबर येऊन पोहोंचली, तेव्हां माझी आई स्वर्गवासी झाली होती. यथाशास्त्रविधीवांचून पाणिग्रहण झालेल्या स्त्रीला स्वर्गप्राप्ति होणें शक्य असेल, तर ती माझ्या आईला झाली असेल यांत शंका नाहीं.

बापाचा पत्ता लागल्यावर मग काशीक्षेत्रांत माझें मन रमेना. या जगांत माझें असें म्हणण्याला माझा पिता हाच एकटा होता. तो दिल्लीस असल्यावर मीं काशींत कोणासाठीं रहावयाचें? असा विचार करून मी एकटी बापाच्या भेटीसाठीं निघाल्यें. मला पाहून माझ्या बाबांला प्रथम मोठा राग आला. पण मी पुष्कळ

रडल्यें पाया पडल्यें तेव्हां त्यांच्याजवळ राहून त्यांची सेवा करण्यास त्यांनीं सम्मति दिली आणि माझें माहरू हें नांव बदलून विमला हें नांव ठेवलें. मी बापाच्या घरीं राहून त्यांची मनापासून सेवा करूं लागल्यें. त्यांना संतोष होईल तें मी करीत असें. त्यांत माझा कांहीं स्वार्थ होता किंवा पित्याचें प्रेम ओढून घेण्याची माझी इच्छा होती, असा प्रकार मुळींच नव्हता. पितृसेवेंत मला खरोखरच मनापासून आनंद वाटे. पित्यावांचून मला दुसरें कोणीं नव्हतें, तेव्हां मीं मनांत म्हटलें, आपणाला या संसारांत पितृसेवेपेक्षां दुसरें कोणतें सुख आहे ? माझी पितृभक्ति पाहून म्हणा, किंवा मनुष्य स्वभावतःच गुणाला वश होतो म्हणून म्हणा, पण माझा पिता माझ्यावर प्रेम करूं लागला. प्रेम हें समुद्राला मिळणाऱ्या प्रवाहासारखें उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जातें. जेव्हां माझ्या सुखाच्या दिवसाची प्रभात झाली, तेव्हां माझ्या पित्याचें माझ्यावर किती प्रेम आहे तें मला कळून आलें."

---

## प्रकरण सातवें.

# विमलेचें पत्र समाप्त.

"मीं पूर्वींच सांगितलें आहे कीं मांदारणगडावरील एका गरीब स्त्रीच्या पोटीं माझ्या पित्यापासून गर्भ राहिला होता. माझ्या आईची दुर्दैवानें जशी स्थिति झाली होती, तशीच तिचीहि झाली होती. तिच्याहि पोटीं एक कन्या आली आणि त्या कन्येच्या आईला लवकरच वैधव्य आल्यावर तीहि माझ्या आईप्रमाणें मोलमजुरी करून आपला व आपल्या मुलीचा निर्वाह करूं लागली. जशी खाण तशी माती असा कांहीं ब्रह्मदेवाच्या घरचा नियम नाहीं. पर्वतावरील खडकांवर सुद्धां कोमल लता पुष्पें उत्पन्न होतात, आणि अंधकारमय खाणींत उज्ज्वल रत्नें पैदा होतात. गरीबाच्याहि घरांत सुंदर कन्या जन्मास येतात. मांदारणगड गांवांत त्या गरीब विधवेच्या कन्येची गणना सुप्रसिद्ध सुंदर स्त्रियांत होऊं लागली. सर्व गोष्टींना केव्हांना केव्हां तरी अंत हा आहेच. या न्यायानें त्या विधवेवरचा कलंकहि लयास गेला. विधवेची ती सुंदर कन्या जारोत्पन्न आहे ही गोष्ट लोक विसरले. पुष्कळांना तर ती गोष्ट ठाऊकहि नव्हती. किल्ल्यांत

तर ही गोष्ट कोणालाच ठाऊक नव्हती. जास्त काय सांगूं ? त्याच सुंदरीच्या पोटीं तिलोत्तमेचा जन्म झाला.

तिलोत्तमा जेव्हां तिच्या मातेच्या उदरांत होती, तेव्हां या विवाहामुळेंच माझ्या जीवनांतली एक अतिशय महत्त्वाची गोष्ट घडून आली. त्याच वेळीं एके दिवशीं बाबांनीं आपल्याबरोबर आपल्या जांवयाला घरीं आणिलें. बाबांनीं मला सांगितलें कीं तो आपला एक शिष्य आहे. पण ते खरोखर कोण होते, तें मला स्वर्गवासी झालेल्या त्या माझ्या स्वामीकडूनच पुढें कळलें.

मीं ज्या वेळीं त्यांना पाहिलें तेव्हांपासूनच माझें चित्त परवश झालें. पण त्या सगळ्या गोष्टी मी आपणास कशा सांगूं ? विवाह केल्यावांचून मी प्राप्त होणार नाहीं हें वीरेंद्राला कळून चुकलें. आमच्या सगळ्या प्रणयविषयक गोष्टी बाबांनाहि कळून आल्या. तेव्हां एके दिवशीं त्या दोघांत थोडेंसें संभाषण झालें. तें मीं आडून ऐकलें.

बाबा म्हणाले, ' विमलेला सोडून मला दुसरीकडे कोठें राहतां येत नाहीं. पण ती जर तुमची धर्मपत्नी झाली, तर मी तुमच्यापाशीं राहीन. तुमचा तसा विचार नसेल तर—'

बाबांचें वाक्य संपतें न संपतें तोंच माझे स्वर्गवासी स्वामी थोडेंसें रागावून म्हणाले, ' महाराज ! शूद्रकन्येशीं कसा विवाह करावा ?'

बाबांनीं विचारलें, ' जारज कन्येबरोबर कसा विवाह केला ?'

प्राणेश्वरांनीं थोडें खिन्न होऊन उत्तर केलें, ' विवाह झाला, त्या वेळीं ती जारजा आहे हें मला ठाऊक नव्हतें. जाणूनबुजून शूद्रकन्येबरोबर विवाह कसा करायचा ? शिवाय, तुमची वडील मुलगी जारजा असली तरी शूद्र नाहीं.'

बाबा म्हणाले, ' तुम्ही हिच्याशीं विवाह करण्यास कबूल नाहीं. ठीक आहे. आतां तुमच्या येण्याजाण्यापासून विमलेचें नुकसान होण्याचा संभव आहे. तेव्हां इतःपर तुम्ही या आश्रमांत येण्याचें कारण नाहीं. तुमच्याच घरीं येऊन मी भेटत जाईन.'

त्या दिवसांपासून कांहीं काळपर्यंत त्यांचें आमच्या घरीं येणेंजाणें बंद झालें. मी रोज चातकीप्रमाणें त्यांच्या येण्याची वाट पाहत असें; पण कित्येक दिवसपर्यंत माझी आशा निष्फळ होत केली. मला वाटतें त्यांच्यानेंहि राहवलें नाहीं. त्यांचें पुनः पूर्ववत् येणंजाणें सुरू झालें. यामुळें त्यांचें दर्शन होतांच मला पूर्वीप्रमाणें माझा लाजाळूपणा राहिला नाहीं. बाबांच्या लक्षांत ही गोष्ट आली,

तेव्हां एके दिवशीं त्यांनीं मला बोलावून म्हटलें, ‘ मीं आश्रमव्रतधर्म स्वीकारला आहे. म्हणून तुझा सहवास मला फार दिवस घडणार नाहीं. मी ठिकठिकाणीं फिरण्यास जाणार आहें, तेव्हां तूं कोठें राहशील ? ’

बाबांचा वियोग होणार या भीतीनें मी फार व्याकूळ होऊन रडूं लागलें. मीं म्हटलें, ‘ मी तुमच्याबरोबर फिरेन. नाहींतर जशी काशीला मी एकटी राहत होत्यें तशी येथें राहीन. ’

बाबा म्हणाले, ‘नाहीं. विमले ! यापेक्षां एक चांगला विचार मीं केला आहे. मी जेव्हां येथें नसेन तेव्हां तुला एखाद्या चांगल्या रक्षकाच्या हवालीं करीत जाईन. तूं महाराज मानसिंहाच्या नूतन राणीच्या संगतींत राहावें अशी मी तजवीज करतों.’

मीं रडत रडत म्हटलें, ‘ तुम्ही मला सोडून जाऊं नका.’ बाबा म्हणाले, ‘ नाहीं. मी इतक्यांतच कोठें जात नाहीं. तूं आतां राजा मानसिंहाच्या येथें जा. मी येथेंच राहतों. रोज मी तुला भेटत जाईन. तूं तेथें कशी काय राहतेस तें पाहून जें काय करावयाचें तें करीन.’

युवराज ! मी आपल्या घरीं दासी होऊन राहिल्यें. माझ्या बाबांनीं अशा मोठ्या युक्तीनें मला आपल्या जांवयाच्या दृष्टीआड केलें.

युवराज ! मीं आपल्या वडिलांच्या येथें पुष्कळ दिवस दासी होऊन राहिल्यें. पण आपली व माझी ओळख नव्हती. त्यावेळीं आपण केवळ दहा वर्षांचे कुमार होतां आणि अंबर येथील राजवाड्यांत आपल्या आईजवळ राहत होतां. मी आपल्या नूतन सावत्र आईजवळ दिल्ली येथें राहत होत्यें. गळ्यांतल्या पुष्पहारांत गुंफिलेल्या असंख्य पुष्पांप्रमाणें राजा मानसिंहाच्या गळ्यांतल्या स्त्रीरत्नहारांत अनेक रमणी होत्या. आपल्या सगळ्या सावत्र आयांना आपण ओळखतां काय ? जोधपूरच्या उर्मिळादेवीचें आपणास स्मरण आहे काय ? काय त्या देवीचे गुण वर्णावे ! मला त्या आपल्या प्राणाहून प्रिय अशा सख्या बहिणीप्रमाणें मानीत. त्यांनीं मला मोठ्या प्रयत्नानें नानाविध विद्या शिकवून योग्यतेला चढविलें. त्यांच्याच कृपेनें मी शिल्पादि विद्या शिकल्यें. त्यांच्याच करमणुकीसाठीं मी नृत्यगीत शिकल्यें. त्यांनीं स्वतः मला लिहायला वाचायला शिकविलें. मी जें हें वेडेंवांकडें लिहिलेलें पत्र आपणास पाठविण्यास समर्थ झाल्यें आहे, तें सगळें आपल्या सापत्न मातेच्या—उर्मिळादेवीच्या—कृपेचें फळ आहे.

उर्मिळादेवीच्या कृपेनें मला आणखी एक मोठा लाभ झाला. त्यांची माझ्यावर कृपादृष्टि होतीच, आणखी महाराजापाशींहि माझ्याविषयींच्या

गोष्टी त्या बोलल्या होत्या. संगीतादि कलांत मी थोडीशी प्रवीण झाल्यें होत्यें हें ऐकून व पाहून महाराजांचाहि माझ्यावर लोभ जडला होता. त्यामुळेंच कीं काय, पण महाराज आपल्या कुटुंबांतल्या माणसाप्रमाणें मला समजत होते. त्यांची माझ्या बाबांच्या ठायीं भक्ति होती. माझे बाबा नेहमीं माझ्या भेटीला येत असत.

उर्मिळादेवीच्या सहवासांत असतांना मी सर्व प्रकारें सुखी होत्यें. एकच दुःख होतें आणि तें हें कीं ज्यांच्यासाठीं एका धर्माव्यतिरिक्त दुसऱ्या हव्या त्या गोष्टीचा त्याग करण्यास मी तयार होत्यें त्यांचें दर्शन मला घडत नसे. तेहि मला विसरले होते काय? नाहीं. युवराज! आस्मानी नांवाच्या दासीचें आपणांस स्मरण आहे काय? असेलच. तिचें माझें चांगलें सख्य होतें. तिला मी स्वामीची खबर आणण्यास पाठवीत असें. तीहि त्यांचा शोध लावून माझे निरोप पोंचवीत असे. त्यांच्याकडचे निरोपहि ती मला सांगत असे. ते काय सांगूं? मी आस्मानीच्या हातीं एक पत्र पाठविलें, त्यांनींहि त्याचें उत्तर लिहून पाठविलें, असें चाललें होतें. अशा रीतीनें प्रत्यक्ष भेट न होतां आम्ही परस्परांना मनोगत कळवीत होतों.

अशा रीतीनें तीन वर्षें गेलीं. तीन वर्षांतहि कोणाचा कोणाला विसर पडला नाहीं. तेव्हां आम्ही समजलों कीं आमचा प्रणय हा शैवालपुष्पाप्रमाणें केवळ वरवर भासमान होणारा नसून कमलाप्रमाणें त्याचीं मुळें खोल गेलीं आहेत. काय कारण असेल तें मला सांगतां येत नाहीं; पण आतां त्यांचा धीर सुटला. एके दिवशीं त्यांनीं विपरीत आचरण केलें. रात्रीं मी आपल्या खोलींत एकटीच निजलें होत्यें. एकाएकीं माझी झोंप उघडली. मिणमिण जळणाऱ्या दिव्याच्या प्रकाशांत पाहात्यें तों माझ्या उशागतीं एक मनुष्य उभा!

'प्राणेश्वरी! भिऊं नकोस. हा मी तुझा दास आहें.' असें मधुर वाक्य माझ्या कानीं पडलें.

मी काय उत्तर देणार? तीन वर्षांनीं भेट झालेली! मी सगळ्या गोष्टी विसरून गेल्यें, आणि त्यांच्या गळ्याला मिठी मारून रडूं लागल्यें. मी आतां लवकरच मरणार, तरी अशा गोष्टी सांगण्यास मला लज्जा वाटत नाहीं—सगळ्या गोष्टी लिहीत आहें.

जेव्हां मला बोलण्याची स्फूर्ति झाली, तेव्हां 'आपण येथें अंतःपुरांत कसे आलां?' म्हणून मीं त्यांना विचारलें.

ते म्हणाले, 'आस्मानीला विचार. शागीर्दांचा वेष घेऊन तिच्याबरोबर आंत आलों, आणि इतका वेळ लपून बसलों होतों.'

मीं विचारलें 'आतां पुढें ?'

ते म्हणाले, 'आतां काय ? तूं करशील तें.'

मी विचारांत पडल्यें. काय करावें ? यांना कोठें लपवावें ? चित्त जिकडे नेतें तिकडे माणसाची बुद्धि जाते. अशी मी विचार करीत बसल्यें असतां एकाएकीं माझ्या खोलीचें दार उघडलें. पाहल्यें तों महाराज मानसिंह !

विस्तारानें सांगण्याची काय अवश्यकता आहे ? वीरेंद्रसिंह कारागृहांत अडकून पडले. महाराज म्हणाले कीं, 'याला बादशाहाकडून शिक्षा करवीन.' त्या वेळीं माझ्या अंतःकरणाची काय स्थिति झाली असेल त्याची कल्पना कोणालाहि करतां येईल. मी रडत रडत उर्मिळादेवीच्या चरणांवर लोळण घेतली. स्वतःचा अपराध कबूल केला. सगळ्या दोषाची जबाबदारी स्वतःवर घेतली. बाबांची गांठ पडली तेव्हां त्यांच्याहि चरणीं लोटांगण घातलें. महाराजांची त्यांच्या ठायीं भक्ति असे. ते त्यांना गुरूप्रमाणें मान देत. त्यांच्या शब्दाला महाराज खास मान देतील असें समजून मीं म्हटलें, 'आपल्या थोरल्या कन्येचें स्मरण करा.' मला वाटतें बाबांचें व महाराजांचें बोलणें होऊन कांहीं विचार ठरला असावा. बावांनीं माझ्या रडण्याकडे लक्षच दिलें नाहीं. ते रागावून म्हणाले, 'पापो' चांडाळणी ! तूं अगदींच लज्जा सोडलीस.'

ऊर्मिळादेवीनें माझ्या स्वामीच्या प्राणरक्षणार्थ महाराजापाशीं पुष्कळ रदबदली केली. महाराज म्हणाले, 'तो विमलेशीं लग्न करील तर त्या चोराला मी सोडतों.'

मी महाराजांचा मतलब ओळखून गप्प राहिल्यें. प्राणेश्वर महाराजांच्या बोलण्यानें रागावून म्हणाले, 'मला यावज्जन्म कैदेंत राहावें लागलें तरी हरकत नाहीं; देहांत शिक्षाहि भोगीन; पण शूद्र कन्येशीं विवाह कदापि करणार नाहीं. आपण हिंदु असून अशा भलत्याच गोष्टीविषयींचा आग्रह कसा करतां ?'

महाराज म्हणाले, 'मीं आपल्या बहिणीचा शहाजादा सेलीमशीं विवाह करून दिला आहे, तर तुला शूद्रकन्येशीं विवाह करण्याविषयीं मीं आग्रह केला, यांत काय विचित्र घडलें ?'

तरी पण ते कबूल झाले नाहींत. उलट म्हणाले, 'महाराज ! जें व्हायचें तें होऊन चुकलें. आतां मला सोडा; मी विमलेचें नांव पुनः कधीं घेणार नाहीं.'

महाराज म्हणाले, 'तसें केलें तर तुझ्या अपराधाबद्दल तुला प्रायश्चित्त कसें मिळेल ? तूं विमलेचा त्याग करशील; पण मग दुसरे लोक तिला कलंकित झालेली समजून तिचा विटाळ मानतील व तिरस्कार करतील त्याची काय वाट ?'

इतकें झालें तरी विवाह करण्याकडे त्यांची बुद्धि वळेना. अखेर बंदिवासांतलें दुःख असह्य होऊं लागलें, तेव्हां त्यांनीं अर्धवट संमति देऊन म्हटलें, 'विमला जर माझ्या घरांत दासीसारखी राहून माझ्या हयातींत विवाहाची गोष्ट काढणार नाहीं आणि माझी धर्मपत्नी आहे, असें कोणाला सांगणार नाहीं, तर मी शूद्र-कन्येशीं विवाह करीन; नाहीं तर नाहीं.'

तेंसुद्धां मीं मोठ्या आनंदानें कबूल केलें. मी पैसा, मानपान, ऐश्वर्य किंवा नोकरचाकर यांच्यासाठीं हपापलेली नव्हतें. बाप आणि महाराज या दोघांचीहि त्या गोष्टीला संमति मिळाली. मी दासीवेषानें राजवाड्यांतून आपल्या स्वामीच्या घरीं आल्यें.

स्वतःची इच्छा नसतां दुसऱ्याच्या जुलमामुळें त्यांनीं माझ्याशीं विवाह केला होता. अशा स्थितींत लग्न केलेल्या स्त्रीचा आदर कोण करील ? विवाह झाल्या-वर ते मला विषवत् समजूं लागले. पूर्वींचा तो प्रणय एकदम पार नाहींसा झाला. महाराज मानसिंहाकडून झालेल्या अपमानाचें स्मरण होऊन ते माझा तिरस्कार करीत. तो तिरस्कारच मला आदरासारखा वाटूं लागला. अशा रीतीनें कांहीं काळ गेला. पण ती सगळी हकीकत उगाच कशाला सांगत बसूं ? कालां-तरानें मला स्वामीच्या प्रेमाचा पुनः लाभ घडला; पण अंबराधिपतीवरची त्यांची विषारी दृष्टि तशीच राहिली. माझ्या नशिबींच तसें लिहिलें होतें, नाहीं तर हा सगळा प्रकार कशाला घडता !

माझी कथा संपली. स्वतःची हकिकत सांगण्याचें वचन देऊन मी चुकलें होत्यें म्हणून मीं हें पत्र लिहिलें आहे, असें नाहीं. पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं मी कुलधर्माचा त्याग करून मांदारणगडच्या अधिपतीचीं दासी होऊन राहिल्यें होत्यें. मी परलोकीं गेल्यावर तरी आपण माझ्या नांवावरचा कलंक पुसून टाकाल, असा भरंवसा धरून मीं हें पत्र लिहिलें आहे.

या पत्रांत मीं केवळ स्वतःचाच वृत्तांत लिहिला आहे. जिची खबर कळावी म्हणून आपलें चित्त चंचल होत असेल, तिच्या नांवाचा उल्लेखसुद्धां मीं यांत केला नाहीं. तें नांव या पृथ्वीतलावरून नाहींसें झालें आहे, असें समजा. तिलोत्तमा नांवाची जी कोणी होती, तिला विसरून जा !"

उस्मानानें तें पत्र अखेरपर्यंत वाचून म्हटलें, ‘मातुःश्री ! तुम्हीं माझे प्राण वांचविले आहेत. या तुमच्या उपकाराची फेड मी करीन.’

विमला लांब उसासा टाकून म्हणाली; ‘आतां या जगांत माझ्यावर उपकार करण्यासारखें काय राहिलें आहे ? तुम्ही माझ्यावर काय उपकार करणार ? तरी पण एक उपकार करतां येईल.’

उस्मानानें म्हटलें, ‘तोच मी करीन.’

विमलेचे नेत्र उज्ज्वल झालें. ती म्हणाली; ‘उस्मान ! काय म्हणतां ? या दग्ध अंतःकरणाची कां उगाच प्रतारणा करतां ?’

उस्मानानें हातांतून एक अंगठी काढून म्हटलें, ‘ ही अंगठी घ्या. एकदोन दिवसांत कांहीं करतां येणार नाहीं. कतलूखानाचा वाढदिवस आल्यासारखाच आहे. त्या दिवशीं मोठा उत्सव होत असतो. पाहारेकरी आनंदांत दंग असतात. त्याच दिवशीं मी तुमची सुटका करीन. त्या दिवशीं रात्रीं तुम्ही अंतःपुराच्या दारापाशीं या. तेथें जो कोणी तुम्हांला अशीच दुसरी एक अंगठी दाखवील त्याच्याबरोबर तुम्ही बाहेर पडा. खात्री ठेवा कीं निर्विघ्नपणें तुम्ही बाहेर याल. इतक्या उपर परमेश्वराची मर्जी ! ’

विमला म्हणाली, ‘ परमेश्वर तुम्हांला दीर्घायुष्य देवो. अधिक काय बोलूं ?’

विमलेचा कंठ दाटून आला. तिच्यानें अधिक कांहीं बोलवेना. ती उस्मानाला आशीर्वाद देऊन जाऊं लागली. तेव्हां उस्मान म्हणाला, ‘ एक गोष्ट बजावून ठेवतों. एकट्याच या. तुमच्याबरोबर दुसरें कोणी आल्यास कार्यभाग साधणार नाहीं. उलट भलतेंच कांहीं होईल.’

तिलोत्तमेला बरोबर आणूं नका हा उस्मानाच्या म्हणण्याचा आशय विमलेनें ओळखला. ती मनांत म्हणाली, ‘ बरें आहे. दोघींना नाहीं जातां आलें तर नाहीं, तिलोत्तमा एकटीच राहील.’ विमलेनें त्याचा निरोप घेतला.

---

## प्रकरण आठवें.

# आरोग्य.



दिवस हा चाललाच आहे. तुम्ही वाटेल तें करा. दिवस हा जाणारच. तो कधीं थांबायचा नाहीं. पांथस्था ! तूं भयंकर वृष्टींत सांपडला आहेस काय ?

तुझ्या डोक्यावर मेघांचा गडगडाट चालला आहे काय ? तूं पावसांत भिजला आहेस काय ? तुझ्या उघड्या शरीरावर गारांचे तडाखे बसत आहेत काय ? तुला कोठें आश्रयस्थान सांपडत नाहीं ना ? क्षणभर धीर धर. हाहि दिवस निघून जाईल, राहणार नाहीं. क्षणभर थांब. दुर्दिन संपून सुदिन उगवेल. भानु उदय पावेल. उद्यांपर्यंत दम धर. कोणाचा दिवस राहिला आहे तर तुझाच राहील ? कोणाचें दुःख टिकून राहावें म्हणून दिवस थांबला आहे ? कां उगाच रडतोस ?

कोणाचा दिवस गेला नाहीं ? तिलोत्तमा धुळींत पडली आहे, तरी पण दिवस चाललाच आहे ना ?

विमलेच्या अंतःकरणरूपी कमलांत सूडरूपी कालसर्पानें वस्ती करून तिचें सगळें शरीर विषानें जर्जर करून सोडलें आहे. त्याचा दंश क्षणभरसुद्धां तिच्यानें सहन करवत नाहीं. एका दिवसांत किती तरी क्षण असतात ! तथापि दिवस गेलाच कीं नाहीं ?

कतलूखान विजयी होऊन गादीवर सुखानें लोळत राहिला. दिवस चालले आहेत. ते कांहीं राहत नाहींत.

जगत्सिंह आजारी आहे. आजारी माणसाला दिवस किती तरी मोठा वाटतो, हें कोणाला ठाऊक नाहीं ? तरी पण त्याचाहि दिवस चाललाच आहे. दिवसामागून दिवस चालले. दिवसेंदिवस जगत्सिंह अधिक बरा होत चालला. काळाच्या तोंडांतून एकदां सुटका झाल्यावर राजपुत्रावरचीं संकटें क्रमाक्रमानें दूर होऊं लागलीं. अगोदर शरीराची ग्लानि दूर झाली, मग थोडें फार जेवण जाऊं लागलें, हळूहळू शक्ति येत गेली, शेवटीं चिंता प्राप्त झाली.

पहिली चिंता ही कीं तिलोत्तमा कोठें असेल ? राजपुत्र जसजसा बरा होत चालला, तसतसा अधिकाधिक व्याकुळतेनें तो प्रत्येकाजवळ तिची विचारपूस करूं लागला होता. पण त्याला समाधानकारक उत्तर कोणी देईना. आयेषेला ठाऊक नव्हतें, उस्मान बोलेना, नोकराचाकरांना कोणाला माहित नव्हतें म्हणा किंवा कांहीं उद्देशानें म्हणा ते सांगेनात, तेव्हां कांटे पसरलेल्या अंथरुणावर निजल्याप्रमाणें राजपुत्र अतिशय अस्वस्थचित्त झाला होता.

दुसरी चिंता—आपलें पुढें काय होणार ही. ' काय होणार ? ' या प्रश्नाचें उत्तर चटकन् एखाद्याला कसें देतां येईल ? राजपुत्रानें पाहिलें कीं आपण पडलों बंदिवान. दयाळु उस्मान व आयेषा यांना आपली दया आल्यामुळें

तुरुंगवासाच्या ऐवजीं या उत्तम रीतीनें शृंगारलेल्या व सुगंधमय महालांत राहण्यास आपणास मिळालें आहे. दासदासी आपल्या सेवेला हजर आहेत. जें पाहिजे तें इच्छा व्यक्त करण्यापूर्वींच आपणास प्राप्त होत आहे. कोणी बहीण वडील भावाची व्यवस्था ठेवणार नाहीं इतकी आयेषा आपली उत्तम व्यवस्था ठेवीत आहे. तरी पण दाराशीं पाहारा आहे. सोन्याच्या पिंजऱ्यांत अडकलेल्या आणि सुरस खाद्य पेयें प्राप्त होत असलेल्या पक्ष्याप्रमाणें आपली स्थिति आहे. आपली येथून सुटका केव्हां होणार ? सुटण्याचा कांहीं संभव तरी आहे काय ? आपलें सैन्य कोठें आहे ! सेनापतीच्या अभावीं त्यांची काय दशा झाली आहे कोणास ठाऊक ?

तिसरा विचार आयेषेबद्दलचा. ती चमत्कार करून दाखविणारी, परोपकाराची मूर्ति या जड पृथ्वीतलावर कशाकरितां अवतरली असेल ?

जगत्सिंहानें पाहिलें कीं तिला विश्रांति अशी नाहींच. तिला शीण किंवा अनादर हीं ठाऊक नाहींत, ती रात्रदिवस अजारी माणसाची शुश्रूषा करीत आहे. राजपुत्राला आरोग्य प्राप्त होईपर्यंत ती रोज पाहाटेस प्रभातकाळच्या सूर्याप्रमाणें हातांत पुष्पहार घेऊन लावण्यमय पावलें टाकीत टाकीत बिलकुल आवाज न करतां येत असे. रोज पहावें तर ती आपली स्नानाची वेळ अगदीं येऊन पोंचेपर्यंत त्या महालाच्या बाहेर कधीं पाऊल टाकीत नसे. रोज पहावें तर ती क्षणांत परत येऊन अगदीं जरूरीच्या कारणाशिवाय जागची उठतसुद्धां नसे, आणि तिची आई जी बेगम तिच्याकडून दासीच्या हातीं बोलावणें येईपर्यंत सेवेंत अंतर पडूं देत नसे.

कधीं आजारी पडला नाहीं असा कोण आहे ? आजारी पडला असतांना आपल्या उशाशीं बसून एखादी मनोमोहिनी स्त्री पंख्यानें वारा घालीत आहे, असा अनुभव ज्याला भाग्यानें प्राप्त झाला असेल त्यालाच त्याचें सुख कळलें असेल.

वाचक हो ! जगत्सिंहाची स्थिति प्रत्यक्ष पाहण्याची तुमची इच्छा आहे काय ? असेल तर कल्पनेनें तरी तुम्ही त्याच्या शय्येवर निजून पहा, आणि त्याच्या शारीरिक व्यथेचा अनुभव घ्या. शत्रूच्या हातांत तुम्ही बंदिवान होऊन पडले आहां या गोष्टीचें मात्र स्मरण ठेवा. नंतर उत्तम प्रकारें शृंगारलेल्या, सुवासिक, आणि सुस्निग्ध असा महाल लक्षांत घ्या. बिछान्यावर निजल्या निजल्या तुम्हीं दाराकडे पाहिलें; एकाएकीं तुमची चर्या प्रफुल्लित झाली; शत्रूच्या नगरींत सख्ख्या भावा-

प्रमाणें तुमच्यावर प्रेम करणारें माणूस आलें आहे, आणि तें माणूस म्हणजे मनाला आनंद देणारी एक स्त्री—एक पूर्णविकसित कमळ. निजल्या निजल्या तिच्याकडे दृष्टि एकाग्र करून पहा कशी ती मूर्ति आहे! किंचित् उंच बांधा, शरीराची सुंदर ठेवण, आणि देवीप्रमाणें तेजस्विता! निसर्गानेंच राणी बनविलेली! तिच्या पावलें टाकण्याच्या तऱ्हेंत तरी किती लालित्य भरलेलें! गजेंद्राची गति कधीं ऐकिली आहे काय? ती कशी असते? हंसीची गति कशी असते? सांगा पाहूं? ही पहा अशी. सुरांचा लय पद्यांत होत असतो; पण हिच्या पदविक्षेपाचा लय तुमच्या अंतःकरणांत होत आहे. हातांतला हा पुष्पहार पहा. हाताच्या प्रभेनें पुष्पाला मलिनता आली आहे, पाहिलीत? कंठाच्या प्रभेनें गळ्यांतला रत्नहार दैदिप्यमान झाला आहे. पाहिला? तुमच्या डोळ्याच्या पापण्या कां मिटत नाहींत? तिच्या मानेची वक्रता पाहिलीत? संगमरवरासारख्या शुभ्र मानेवर तिचा घनदाट केशगुच्छ पडला आहे, तो पाहिलात? त्या केशगुच्छाच्या दोन्ही बाजूंला तिचीं कर्णभूषणें लोंबत आहेत, तीं पाहिलींत? मस्तक किंचित्—किंचिन्मात्र—वक्र केलें आहे, तें पाहिलेंत? ही वक्रता केवळ मानेच्या दीर्घत्वामुळें आलेली आहे. असे सारखी टक लावून काय पाहत राहिले आहां? आयेषा काय म्हणेल?

जितके दिवस अशा रीतीनें जगत्सिंहाच्या दुखण्यांत त्याची शुश्रूषा करणें अवश्य होतें, तितके दिवस आयेषा ती करण्यांत रोज अखंड गुंतलेली असे. हळूहळू राजपुत्र जसा बरा होत गेला, तसतसें आयेषेचें जाणें येणें कमी होऊं लागलें. राजपुत्र साफ बरा झाला, तेव्हां तिचें त्याच्याकडे जाणें अजिबात बंद झालें. गेलीच असली तर एक दोन वेळांच गेली असेल. थंडीनें काकडलेला मनुष्य बराच वेळ उन्हांत बसल्यानंतर त्याच्या अंगांतली हुडहुडी जशी हळूहळू त्याच्या अंगांतून निघून जाते, त्याप्रमाणें जगत्सिंहाला आरोग्य प्राप्त होऊं लागण्याबरोबर आयेषा त्याच्यापासून दूर होऊं लागली.

एके दिवशीं दुपारीं जगत्सिंह घराच्या खिडकीपाशीं उभा राहून किल्ल्याच्याबाहेर पाहत होता. पुष्कळ लोक आपापल्या इच्छेप्रमाणें किंवा कामानिमित्तानें बिनहरकत जात येत होते. राजपुत्र दुःखित होऊन त्यांच्या स्थितीशीं आपल्या स्थितीची तुलना करीत होता. एके ठिकाणीं कांहीं लोक एका माणसाच्या भोंवतीं घेरा घालून उभे होते. राजपुत्राची दृष्टि तिकडे गेली. ते लोक आनंद करीत आहेत हें त्याच्या लक्षांत आलें. ते लोक कान देऊन कांहीं ऐकत

होते. मध्यभागीं कोणता मनुष्य किंवा वस्तु आहे तें त्याला दिसेना. पण त्याला जिज्ञासा उत्पन्न झाली. थोड्या वेळानें ऐकणारांपैकीं कित्येकजण निघून गेले, आणि कुमाराची जिज्ञासा पूर्ण झाली. त्याला दिसून आलें कीं त्या मंडळींच्या मध्यभागीं एक मनुष्य हातांतल्या पोथीप्रमाणें सुट्या असलेल्या कागदाच्या कांहीं तुकड्यांवरून कांहीं वाचून दाखवीत होता. त्या वाचणाराची आकृति पाहून राजपुत्राला थोडेंसें आश्चर्य वाटलें. त्याला मनुष्यहि म्हणतां आलें असतें किंवा वीज पडून पानें गळून गेलेला मध्यम आकाराचा तालवृक्ष म्हटलें असतें तरी चाललें असतें. त्याची उंचीहि तितकीच होती आणि जाडीहि तशीच होती. पण ताडाच्या वृक्षाला त्याच्यासारखें मोठें नाक नसतें. आकार व हालचाल हीं दोघांचीं सारखींच होतीं. पोथी वाचतांना तो जे हातवारे करी व मान हलवी तिकडे राजपुत्र मुकाट्यानें पाहत होता. इतक्यांत उस्मान त्या खोलींत आला.

परस्परांचा सलाम वगैरे उपचार झाल्यावर उस्माननें विचारलें, 'तुम्ही खिडकींतून इतके एकाग्र चित्तानें काय पाहत होतां ?'

जगत्सिंह म्हणाला , 'एक सरळ लाकूड ! तें पहा.'

तें पाहून उस्मान म्हणाला, 'तुम्हीं पूर्वीं कधीं याला पाहिलें नव्हतें ?'

राजपुत्र म्हणाला, 'नाहीं.'

उस्मान म्हणाला, 'हा आपला ब्राह्मण आहे. गप्पा गोष्टी सांगण्यांत मोठा पटाईत ! मीं याला मांदारणगड येथें पाहिलें होतें.'

राजकुमार अंतःकरणांत चिंताग्रस्त झाला. हा मांदारणगड येथें होता काय ? तर मग तिलोत्तमेविषयींची कांहीं खबर याला सांगतां येणार नाहीं काय ? या चिंतेनें व्याकुळ होऊन राजपुत्रानें विचारलें, 'याचें नांव काय ?'

उस्मान विचार करून म्हणाला, 'याचें नांव जरासें बिकट आहे. चट्कन् आठवत नाहीं. गणपत ? छे ! गणपत गणपत ? नाहीं. गणपत काय ?'

'गणपत ? हें या देशचें नांव नाहीं. हा पहावा तर बंगाली दिसतो.'

'बंगाली दिसतो खरा. याला भट्टाचार्य म्हणतात. याला एक पदवी आहे. एलम-एलम असेंच कांहीं आहे.'

'बंगाल्याच्या पदव्यांत एलम अशी कांहीं पदवी दिसत नाहीं. इलमला बंगालींत विद्या म्हणतात. विद्याभूषण किंवा विद्यावागीश असेल.'

'हां हां ! विद्या हा एक शब्द त्यांत आहे.—तें असो. बंगालींत हत्तीला काय म्हणतात ?'

हस्ती.

'आणखी कांहीं ?'

'करी, दंती, वारण, नाग, गज—'

'हां हां. आतां आठवलें. याचें नांव गजपति विद्यादिग्गज आहे.'

'विद्यादिग्गज. चमत्कारिक पदवी म्हणायची ! जसें नांव तशी पदवी. याच्याशीं बोलण्यांत मोठी मौज वाटत असली पाहिजे ?'

उस्माननें गजपतीचें बोलणें थोडेंसें ऐकलें होतें. त्यानें विचार केला कीं त्याच्याशीं राजपुत्र बोलला तर कांहीं मोठेंसें नुकसान होणार नाहीं. म्हणून तो म्हणाला, 'मी त्याला बोलावतों.'

दोघेहि जवळच्या बाहेरील खोलींत गेले आणि उस्मानानें एका चाकराकडून गजपतींना बोलावून आणिलें.

---

## प्रकरण नववें.

# दिग्गजाशीं भाषण.



गजपति विद्यादिग्गज चाकराबरोबर खोलींत येतांच राजकुमारानें विचारलें, 'तुम्ही ब्राह्मण काय ?'

दिग्गजानें हातवारे करून उत्तर केलें, 'यावत् मेरौ स्थिता देवा यावद्गंगा महीतले । असारे खलु संसारे सारं श्वशुरमंदिरम् ।'

जगत्सिंहानें आलेंलें हंसू आवरून त्याला नमस्कार केला. गजपति आशीर्वाद देत म्हणाला, 'खुदाखान आपणास सुखी राखो.' राजपुत्र म्हणाला, 'महाराज ! मी मुसलमान नाहीं, हिंदू आहें.'

दिग्गजाला वाटलें कीं हा बेटा यवन असून आपणाला फसवीत आहे. याला कांहीं तरी मतलब साधावयाचा आहे. नाहीं तर यानें आपणाला कशाला बोलाविलें असतें ? तो भयानें घाबरी मुद्रा करून म्हणाला, 'खानसाहेब ! मी आपणाला ओळखतों. मी आपलेंच अन्न खात आलों आहें. आपण मला कांहीं सांगू नका. मी आपल्या चरणांचा दास आहें.'

जगत्सिंहानें पाहिलें कीं हें एक लचांडच झालें. तो म्हणाला, 'महाराज ! तुम्ही ब्राह्मण, मी रजपूत. तुम्हीं असें बोलूं नये. तुमचें नांव गजपति विद्या-दिग्गज आहे ना ? '

दिग्गज मनाशीं म्हणाला, 'अरेच्या ! याला माझें नांवसुद्धां ठाऊक आहे ! आतां हा आपल्यावर कोणती घोरपड आणील कोणास ठाऊक ? म्हणून तो हात जोडून म्हणाला, 'शेखजी ! माफ करा, मी गरीब माणूस आहें. तुमच्या पायां पडतों. '

जगत्सिंहानें पाहिलें कीं जेव्हां हा ब्राह्मण इतका भिऊन गेला आहे, तेव्हां याच्या हातून कांहीं कार्यसिद्धि व्हावयाची नाहीं. म्हणून दुसरीच गोष्ट काढण्यासाठीं तो म्हणाला, 'तुमच्या हातांत ही कसली पोथी आहे ? '

'ही माणिकपीराची पोथी आहे. '

"ब्राह्मणाच्या हातांत आणि माणिकपीराची पोथी ?'

दिग्गज म्हणाला, 'मी मूळचा ब्राह्मण होतों, पण आतां नाहीं.'

हें ऐकून राजपुत्राला विस्मय वाटला, आणि रागहि आला. तो म्हणाला, ' तें कसें ? तुम्ही मांदारणगडला राहत होतां ना ? '

दिग्गजाला वाटलें आतां आपला पुरा नाश झाला ! मी वीरेंद्रसिंहाच्या किल्ल्यांत राहत होतों याची सुद्धां बित्तंबातमी याला आहे. आतां वीरेंद्राची जी गत झाली, तीच आपलीहि होणार. ब्राह्मण भीतीनें रडूं लागला. राजपुत्रानें विचारलें, ' हें हो काय ? '

दिग्गज हात चोळीत चोळीत म्हणाला, ' खानबाबा ! हात जोडतों. मला–मला मारूं नका. मी आपला गुलाम आहें बाबा !'

' तुम्हांला वेडबीड तर नाहीं लागलें ?'

' नाहीं बाबा ! मी आपला दास आहें बाबा ! मी तुमचा आहें बाबा !'

त्या ब्राह्मणाला धीर देण्यासाठीं राजपुत्र म्हणाला, ' तुम्ही कांहीं काळजी करूं नका. ती माणिकपीराची पोथी थोडीशी वाचा पाहूं. मी ऐकतों. '

ब्राह्मण पोथी उघडून हेल काढून वाचूं लागला. नाटकांतलीं पोरें जशीं त्यांच्या वस्तादानें कान पिळल्यावर संगीत पद म्हणतात, तशी दिग्गजाची अवस्था झाली.

थोड्या वेळानें राजपुत्रानें पुनः विचारलें, ' तुम्ही ब्राह्मण असून माणिकपीराची पोथी वाचतां हें कसें ?'

ब्राह्मणानें सूर थांबवून उत्तर केलें, ' मी मुसलमान झालों आहें. '

राजपुत्रानें विचारलें, ' तें कां ? '

गजपति म्हणाला, " मुसलमान गडावर आले तेव्हां ते मला म्हणाले, ' ए ब्राह्मणा ! तुझी जात बुडवूं ? ' असें बोलून त्यांनीं मला धरलें आणि मुरगीचा पुलाव मला खाऊं घातला. "

' पुलाव म्हणजे काय ? '

गजपति म्हणाला, ' उन्हांत वाळविलेले व तुपांत शिजविलेले तांदूळ. '

तो पदार्थ काय असावा तें राजपुत्र समजला, आणि म्हणाला, ' बरें, पुढें ? '

दिग्गज म्हणाला, ' त्यानंतर मला कल्मी शिकविली. '

**राज०**—कल्मा शिकविला !

**दिग्गज**—मग ते म्हणाले, ' तूं मुसलमान झालास. ' तेव्हांपासून मी मुसलमान झालों.

तेव्हां राजपुत्रानें विचारलें, ' बाकीच्या लोकांचें काय झालें ? '

दिग्गजानें उत्तर केलें, ' दुसरेहि पुष्कळ ब्राह्मण असेच मुसलमान झाले. '

राजपुत्रानें उस्मानाच्या चर्येकडे पाहिलें. उस्मान राजपुत्राचा तो मुग्ध तिरस्कार पाहून म्हणाला, ' राजपुत्र ! यांत कसला दोष आहे ? मुसलमानांच्या दृष्टीनें महंमदी धर्म हाच सत्य धर्म आहे. म्हणून बलात्कारानें म्हणा कीं कपटानें म्हणा, सत्यधर्माचा प्रसार करणें हा आमच्या मतें अधर्म नाहीं; उलट धर्मच आहे. '

राजपुत्र यावर उत्तर न करतां दिग्गजाला प्रश्न करूं लागला. तो म्हणाला, ' विद्यादिग्गज पंडित ? '

' जी महाराज ! आतां शेखदिग्गज म्हणावें. '

' बरें तर, तसेंच का होईना. शेखजी ! गडावरील दुसरी कांहीं खबर तुम्हांला माहीत नाहीं काय ? '

उस्मान राजपुत्राचा उद्देश ओळखून उद्विग्न झाला. दिग्गज म्हणाला, ' आणखी अभिरामस्वामी पळून गेले. '

राजपुत्र समजला कीं या मूर्खाला अगदीं स्पष्ट विचारल्याशिवाय कांहीं कळायचें नाहीं. म्हणून त्यानें विचारलें, 'वीरेंद्रसिंहाची काय खबर आहे?'

ब्राम्हण म्हणाला, ' नबाब कतलूखान यानें त्यांना मारून टाकिलें. '

राजपुत्राची मुद्रा लाल झाली. त्यानें उस्मानला विचारलें, ' हा काय प्रकार आहे ? हा ब्राम्हण खोटें सांगतो काय ? '

उस्मान गंभीरपणानें म्हणाला, ' नबाबानें चौकशी करून व राजद्रोही ठरवून त्याला देहांत शिक्षा केली. '

राजपुत्राच्या नेत्रांत आतां अग्नि प्रज्वलित झालेला दिसूं लागला. त्यानें उस्मानला विचारलें, ' मी आणखी एक विनंति करूं काय ? ही गोष्ट आपल्या संमतीनें झाली काय ? '

उस्मान म्हणाला, ' माझ्या सल्ल्याविरुद्ध. '

यावर राजकुमार बराच वेळ स्तब्ध बसला. उस्मान, योग्य संधी पाहून दिग्गजाला म्हणाला, ' तुम्हांला आतां रजा आहे जा. '

दिग्गज उठून चालूं लागणार, इतक्यांत कुमारानें त्याचा हात धरून त्याला अडविलें आणि म्हटलें, ' आणखी एक गोष्ट विचारायची आहे. विमला कोठें आहे ?'

ब्राम्हण उसासा टाकून रडूं लागला. तो म्हणाला, ' ती आतां नबाबाची राख होऊन राहिली आहे.'

राजपुत्र विद्युत् दृष्टीनें उस्मानाकडे पाहून म्हणाला. 'हेंहि खरें काय ?' उस्मानानें कांहीं उत्तर न देतां ब्राह्मणाला म्हटलें, 'तुम्ही हें काय बरळतां ? चालते व्हा.'

राजपुत्रानें ब्राह्मणाचा हात अधिक घट्ट धरून ठेविला. त्याला जाण्याची शक्तिच राहिली नाहीं. राजपुत्र त्याला म्हणाला, 'आणखी एक क्षणभर थांबा. आणखी एकच गोष्ट विचारावयाची आहे.' त्याच्या लाल झालेल्या डोळ्यांत दुप्पट अग्नीनें विस्फुरण होऊं लागलें. तो म्हणाला, 'आतां एकच गोष्ट विचारतों. तिलोत्तमा कोठें आहे' ?

ब्राह्मणानें उत्तर केलें, 'तिलोत्तमा नबाबाची राख झाली आहे. दासदासी घेऊन ती मौजेनें राहत आहे.'

राजकुमारानें वेगानें ब्राह्मणाच्या हाताला हिसडा दिला. इतका कीं ब्राह्मण कोलमंडत मुष्किलीनें सावरला. कुमार उस्मानला म्हणाला, 'हें खरें काय ? '

उस्मान लज्जित होऊन मृदु स्वरानें म्हणाला, 'मी काय नुसता सेनापति आहें !'

राजपुत्रानें उत्तर केलें, 'तुम्ही पिशाचाचे सेनापति आहां.'

---

## प्रकरण दहावें.

# प्रतिमाविसर्जन.



त्या रात्रीं जगत्सिंहाचा डोळ्याशीं डोळा लागला नाहीं, हें सांगायला नकोच. बिछान्यावर निखारे पसरले आहेत आणि हृदयांत अग्नि पेटला आहे, असें त्याला वाटलें. जी तिलोत्तमा मेली असती तर जग त्याला शून्यवत् वाटलें असतें, त्या तिलोत्तमेनें प्राणत्याग केला नाहीं, या गोष्टीविषयीं त्याला अतिशय दुःख वाटत होतें.

हें काय ? तिलोत्तमा मेली कशी नाहीं ? पुष्पाप्रमाणें सुकुमार तो देह–माधुर्य-युक्त कोमल तेजानें वेष्टित असा तो देह—जिकडे जिकडे जगत्सिंहाची दृष्टि जाई तिकडे तिकडे त्याच्या मनश्चक्षूला दिसत होता. त्या देहाची स्मशानमृत्तिका होईल काय ? या पृथ्वींत–या अमर्याद पृथ्वींत–कोठेंच त्या देहाचें चिन्ह देखील राहणार नाहीं असें कसें होईल ? अशा प्रकारें जेव्हां तो विचार करूं लागला, तेव्हां त्याच्या नेत्रांतून घळ घळ अश्रुधारा वाहूं लागल्या. इतक्यांत आणखी त्या दुष्ट कतलूखानाच्या विलासमंदिराचें स्मरण त्याच्या अंतःकरणांत विद्युल्लतेप्रमाणें एकदम चमकून उठलें. तो कुसुम सुकुमार देह त्या पापी पठाणाच्या मांडीवर पडलेला आहे, असें जेव्हां त्याला दिसलें तेव्हां तर त्या दारुण अग्नीनें त्याचें हृदय पुनः भडकूं लागलें.

तिलोत्तमा म्हणजे त्याची हृदयमंदिरांतली अधिष्ठात्री देवी ! आणि ती त्या पठाणाच्या मंदिरांत ! तो कतलूखानाची राख ! आतां रजपुतानें त्या मूर्तिची आराधना करायची ? ती प्रतिमा आपल्या हातानें स्थानभ्रष्ट करण्याविषयीं संकोच करणें हें काय रजपूतकुलाला उचित होतें ?

ती प्रतिमा जगत्सिंहाच्या हृदयांत अतिशय खोल जाऊन बसली होती. तिचें उच्चाटन करायचें म्हणजे ती काढतांना तिला आधारभूत असलेलें हृदयच विदीर्ण व्हावयाचें ! त्या मोहिनीच्या मूर्तीचें चिरकाल विस्मरण कोणत्या प्रकारें होईल ? जोंपर्यंत बुद्धि कायम आहे, जोंपर्यंत अस्थि–मज्जा–रक्त यांनीं निर्मित असा हा देह कायम आहे, तोंपर्यंत ती हृदयेश्वरी हृदयांत विराजमान होऊन राहणारच.

या सगळ्या उत्कट विचारांनीं राजपुत्राच्या मनाची स्थिरता कायम राहणें तर दूरच; पण बुद्धीलाहि भ्रंश होऊं लागला आणि स्मृतीहि विशृंखल होऊं लागली.

रात्र संपत आली तरी राजपुत्र दोन्ही हातांनीं डोकें धरून बसला होता. डोकें भ्रमण करीत होतें. विचार करण्याची शक्ति तर मुळींच राहिली नव्हती.

एकाच अंगावर पुष्कळ वेळ बसून राहिल्यामुळें त्याचें अंग दुखूं लागलें. मानसिक यातनांच्या गाढतेमुळें त्याचा संताप ज्वराच्या रूपानें प्रकट झाला, तेव्हां राजपुत्र खिडकीजवळ जाऊन उभा राहिला.

उष्णकाळांतल्या रात्रीच्या शीतल वायूच्या स्पर्शानें जगत्सिंहाच्या अंगाचा संताप कांहींसा दूर झाला. तो खिडकीच्या कठड्यावर हात ठेवून व त्या हातांवर डोकें टेंकून उभा होता. झोंप न येतां पुष्कळ वेळपर्यंत मानसिक यातनांनीं पीडित झाल्यामुळें त्याला शीण आला होता. आतां स्निग्ध वायूच्या स्पर्शानें त्याला अंमळ बरें वाटलें आणि त्याचें मन दुसऱ्या कांहीं गोष्टीकडे लागलें. एवढा वेळ ज्या विचाररूपी सुरीच्या संचालनानें त्याचें हृदय विद्ध झालें होतें, ती आतां दूर होतांच अपेक्षातीत व तीक्ष्णताशून्य असें नैराश्य त्याच्या मनांत प्रविष्ट होऊं लागलें. आशेचा त्याग करणेंच अधिक क्लेशदायक असतें. एक वेळ मनांत नैराश्य स्थिर झालें म्हणजे पुढें तें इतकें क्लेशदायक होत नाहीं. अस्त्राघातच अधिक क्लेशकर असतो. त्याच्यापासून होणाऱ्या जखमेच्या यातना अधिक वेळ टिकणाऱ्या असतात खऱ्या; पण तितक्या तीव्र नसतात. जगत्सिंह निराशेच्या कमी क्लेशकर वेदना भोगूं लागला. अंधकारमय व तारकाशून्य आकाशाकडे पाहतां पाहतां आपलें हृदयाकाशहि तसेंच अंधकारयुक्त झालें आहे, असा विचार त्याच्या मनांत येऊं लागला. पूर्वीच्या सगळ्या गोष्टी आतां त्याला थोडथोड्या व कमी तीव्रतेनें स्मरूं लागल्या. बालपण व किशोरावस्थेंतला आनंद, या सगळ्यांची त्याला आठवण झाली आणि जगत्सिंहाचें मन त्याच आनंदांत रममाण झालें. क्रमाक्रमानें त्याचें चित्त अवांतर गोष्टींकडे अधिकाधिक लागत गेलें. त्याचें शरीरहि अधिक शीतल होत गेलें. थकवा येऊन त्याची चेतनाहि लोप पावूं लागली. खिडकीला टेकून उभा असतांच त्याची तंद्रा लागली. त्या निद्रावस्थेंत त्याला एक स्वप्न दिसलें. त्याच्या चर्येवर रागाचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्याला यातना होत आहेत असेंहि त्याबरोबर त्याच्या चर्येवरून दिसूं लागलें. त्याचा अधरोष्ठ कांपूं लागला. कपाळाला घाम सुटला आणि हाताच्या मुठी वळल्या.

एकदम चमकल्यासारखें होऊन त्याची झोंप उघडली. घाबरा होऊन तो खोलींत इकडून तिकडे फेऱ्या घालूं लागला. किती वेळ तो अशा रीतीनें

यातना भोगीत होता, तें निश्चितपणें सांगणें कठीण आहे. पण सकाळीं जेव्हां सूर्याचे किरण वाड्याच्या तटावर पडलेले दिसले, तेव्हां जगत्सिंह खालीं भुईवर अंथरुणापांघरुणाशिवाय पाय लांब पसरून निजलेला होता.

उस्माननें येऊन त्याला उठविलें. राजपुत्र जागा झाल्यावर उस्माननें सलाम करून एक पत्र त्याच्या हातीं दिलें. राजपुत्र तें पत्र हातांत घेऊन मुकाट्यानें उस्मानच्या तोंडाकडे पाहूं लागला. उस्मान समजला कीं राजपुत्राचा आत्मा विव्हळ झाला आहे. अर्थात् दुसऱ्या गोष्टी बोलण्याची ही वेळ नव्हे. म्हणून तो म्हणाला, 'राजकुमार ! आपण जमिनीवर कां निजलां होतां, तें विचारण्याची माझी इच्छा नाहीं. हें पत्र जिनें पाठविलें, तिच्यापाशीं मीं कबूल केलें होतें कीं हें पत्र मी आपणास देईन. ज्या कारणामुळें इतके दिवस हें पत्र मीं आपणास दिलें नाहीं, तें कारण आतां दूर झालें आहे. आपणास तें ठाऊक झालेंच आहे. म्हणून मी हें पत्र येथें ठेवून जातों. फुरसतीच्या वेळीं आपण तें वाचा. तिसऱ्या प्रहरीं मी पुनः येईन. उत्तर देण्याची आपली इच्छा असली, तर तेंहि पत्र लिहिणारणीकडे पोंचविण्याची तजवीज करतां येईल.' इतकें बोलून राजपुत्रापाशीं पत्र ठेवून उस्मान चालता झाला.

राजपुत्र एकटा बसून चांगला सावध झाल्यावर विमलेचें पत्र वाचूं लागला. तें संपूर्ण वाचल्यानंतर त्यानें तें जाळून टाकिलें. तें पुरें जळेपर्यंत त्याची दृष्टि त्या पत्राकडे होती. तें पुरतें जळल्यावर तो स्वतःशीं म्हणाला, 'हें स्मृतिचिन्ह अग्नींत टाकून मला नाहींसें करतां आलें; पण माझी स्मृति-जी संतापानें मला जाळीत आहे-ती कशी नाहींशी करणार ?'

राजपुत्रानें रीतीप्रमाणें प्रातःकृत्यें उरकलीं. पूजादिक आन्हिक कृत्यें आटोपल्यावर भक्तिभावानें इष्ट देवतेला वंदन केलें आणि नंतर हात जोडून व वर दृष्टि लावून म्हटलें, 'प्रभो ! या दासाचा त्याग करूं नका. मी राजधर्म पाळीन; क्षत्रकुलोचित कर्म करीन; या आपल्या चरणकमलांच्या प्रसादाची याचना करीत आहें. विधर्मी माणसाच्या राखेला मी मनांतून काढून टाकीन. तसें करतांना मरण आलें तर अंतकाळीं तुमची प्राप्ति मला होईल. मनुष्याला जें साध्य तें मी करीतच आहें. मनुष्यानें जें करायला पाहिजे, तें मी करीन. पहा, प्रभो ! आपण अंतर्याम जाणणारे आहां, माझ्या अंतःकरणाच्या तळापर्यंत दृष्टि पोंचवून पाहा. इतःपर तिलोत्तमेच्या प्रेमाचा अभिलाष करणारा मी नाहीं. तिच्या दर्शनाचीसुद्धां मला आतां इच्छा नाहीं. केवळ पूर्वकाळची स्मृति प्रतिक्षणीं माझें हृदय जाळीत

आहे. पुढच्या आशेवर तर मीं पाणी सोडिलें आहे. झाल्या गोष्टींचा विसर पडणार नाहीं काय ? प्रभो ! आपल्या चरणांजवळ एवढा प्रसाद मागतों. मागच्या गोष्टी आठवल्यानें होणाऱ्या या यातना माझ्यानें आतां सहन करवत नाहींत.'

प्रतिमेचें विसर्जन झालें.

तिलोत्तमा त्या वेळीं धुळींत पडून राहून कोणतें स्वप्न पाहत होती ? या घोर अंधकारांत जें एक नक्षत्र ती पाहत होती तेंहि इतःपर तिच्या हातास येणार नव्हतें. या घोर तुफानाच्या वेळीं तिनें ज्या लतेच्या ठायीं प्राण बद्ध करून ठेविले होते तीहि तुटून पडली. आणि ज्या भोपळयावर छातीचा भार देऊन ती समुद्राच्या पार पोहून जात होती, तोहि आतां फुटला.

---

## प्रकरण अकरावें.

# गृहांतर.



अगोदर सांगून ठेविल्याप्रमाणें उस्मान तिसऱ्या प्रहरीं राजपुत्राच्या समोर जाऊन उभा राहिला. तो म्हणाला, "युवराज ! आपली उत्तर पाठविण्याची इच्छा आहे काय ?"

राजपुत्रानें उत्तर लिहून ठेविलें होतें. तें त्यानें उस्मानाच्या हातीं दिलें. उस्मान तें पत्र हातांत घेऊन म्हणाला, "आपण मला दोष देऊं नये. आमची पद्धति अशी आहे कीं किल्ल्यांत राहणाऱ्यापैकीं कोणीहि बाहेर एखाद्याला पत्र पाठवावयाचें झालें, तर किल्ल्यावरील अधिकाऱ्यांनीं तें वाचून पाहिल्याशिवाय जाऊं देऊं नये."

युवराज थोडा खिन्न होऊन म्हणाला, "हें सांगावयाला नको. आपण खुशाल पत्र उघडून वाचा; आणि वाटलें तर पुढें पाठवा."

उस्माननें पत्र उघडून वाचलें. त्यांत येवढाच मजकूर होता—

"मंदभागिनि ! मी तुझी विनंति विसरणार नाहीं; पण जर तूं पतिव्रता असशील, तर पतीच्या मार्गानें जाऊन आपल्यावरील कलंक लवकर धुऊन टाक."

**जगत्सिंह.**

उस्माननें पत्र वाचून म्हटलें, "राजपुत्र ! आपलें हृदय फार कठोर आहे."

राजपुत्रानें कठोरतेनें उत्तर दिलें, "पठाणापेक्षां कांहीं जास्त नाहीं."

हें ऐकून उस्मानाची चर्या लाल झाली. थोड्याशा कर्कश स्वरानें तो म्हणाला, " मला वाटतें पठाणानें आपणाशीं असभ्यपणाचें वर्तन बिलकुल केलें नाहीं."

हें ऐकून राजपुत्र रागावला आणि लज्जितहि झाला. तो म्हणाला,

" नाहीं. खानसाहेब ! मी स्वतःची गोष्ट सांगत नाहीं. आपण माझ्याशीं सर्व प्रकारें दयेचें वर्तन केलें आहे, आणि मी बंदिवान असूनहि मला प्राणदान दिलें आहे. जशा आपल्या सैन्यांतल्या लोकांच्या त्याचप्रमाणें शत्रूच्याहि आपण जखमा बऱ्या केल्या आहेत. जो मनुष्य कारागृहांत शृंखलाबद्ध रहावयाचा, त्याला आपण विलासमंदिरांत सुखांत ठेविलें आहे. आणखी चांगलें तें काय करावयाचें ? पण मी सांगूं का ?—आपल्या सौजन्याच्या जाळ्यांत मी अडकलों आहें. या सुखाचा परिणाम काय होईल तें कळत नाहीं. मीं बंदिवान असलों तर मला तुरुंगांत ठेवा. या दयेच्या शृंखलेंतून माझी सुटका करा, आणि मी बंदिवान नसलों, तर या सोन्याच्या पिंजऱ्यांत मला अडकवून ठेवण्याचें प्रयोजन तरी काय आहे ? "

उस्माननें शांत चित्तानें उत्तर केलें, " राजपुत्र ! अशुभासाठीं इतके आतुर कां होतां ? अमंगलाला बोलावून आणावें लागत नाहीं. तें आपलें आपण येतें."

राजपुत्र गर्वाच्या तोऱ्यानें म्हणाला, " आपली ही पुष्पशय्या सोडून तुरुंगांतल्या शिलाशय्येवर निजणें रजपुतांना अमंगल वाटणार नाहीं. "

उस्मान म्हणाला, " शिलाशय्या ही अमंगलाची अंतिम पायरी असेल, तर मग काय हरकत आहे ? "

राजपुत्रानें उस्मानाकडे तीव्र दृष्टीनें पाहून म्हटलें, "जर कतलूखानाला योग्य असें शासन मला देतां आलें नाहीं, तर मला मरण आलें तरी काय हरकत आहे ?"

उस्मान म्हणाला, "युवराज ! खबरदार रहा. पठाण बोलल्याप्रमाणें करतील."

राजपुत्रानें हंसून उत्तर केलें, "सेनापतिसाहेब ! आपण जर मला भीति दाखविण्याकरितां आलां असाल, तर आपला यत्न निष्फळ होईल हें समजून रहा."

उस्मान म्हणाला, " राजपुत्र ! निकट सहवासामुळें आपण परस्परांना इतकें चांगलें ओळखतों कीं उगाच शब्दावडंबर करून कोणाचाहि उद्देश सिद्धीला जाणार नाहीं. मी आपणाकडे कांहीं विशेष कामासाठीं आलों आहें."

जगतसिंहाला थोडा विस्मय वाटला. तो म्हणाला, "ठीक आहे. बोला."

उस्मान म्हणाला, 'मी आतां जें कांहीं सांगणार आहें, तें कतलुखानाच्या हुकमावरूनच सांगणार आहें असें समजा.'

**जगत्०**—उत्तम.

**उस्मान०**—ऐका तर. रजपूत व पठाण यांच्या युद्धांत दोन्ही पक्षांचा नाश होत आहे.

**जगत्०**—पठाणांचा नाश करावा हा तर या युद्धाचा उद्देशच आहे.

**उस्मान०**—तें खरें; पण दोन्ही पक्षांचा थोडा फार नाश झाल्यावांचून एकाच पक्षाचा नाश होणें किती असंभवनीय आहे, हें आपण पाहिलेंच आहे. तसेंच मांदारणगड जिंकणारे लोक अगदींच कांहीं दुर्बल नाहींत, हेंहि तुम्हाला दिसून आलेंच आहे.

**जगत्०**—( किंचित् हंसून ) तें युक्तिबाज आहेत खरे.

**उस्मान०**—तें कांहींहि असो. स्वतःची प्रौढी मारण्याचा माझा उद्देश नाहीं. मोगल बादशाहाशीं रात्रंदिवस झगडत राहून पठाणांना ओरिसा प्रांतांत राहणें सुखाचें होणार नाहीं. पण मोगल बादशहांनाहि पठाणांना आपल्या मुठींत आणतां येणार नाहीं. ही आत्मश्लाघा समजूं नका. आपण राजनीति जाणतां. दिल्लीपासून ओरिसा किती दूर आहे, विचार करून पाहा ! दिल्लीच्या बादशाहानें मानसिंहाच्या बाहुबळावर एकदां पठाणांवर जय मिळविला; पण त्याची जय-पताका या देशांत किती दिवस फडकत राहील ? महाराज मानसिंह सैन्यासह दिल्लीकडे परतले कीं या देशांतला बादशाहाचा अंमल लोप पावेल. यापूर्वींहि एकदां अकबर बादशाहानें हा देश जिंकून घेतला होता. पण तो किती दिवस तसा त्याच्या अधीन राहिला ? या वेळीं तो मिळविला तसा जाईल. तो पुन्हा सैन्य पाठवील, पुन्हा प्रांत जिंकील, आणि पुन्हा पठाण स्वतंत्र होऊन बसतील. पठाण म्हणजे कांहीं बंगाली नव्हेत. तें कधींहि पारतंत्र्यांत राहाणार नाहींत. आमच्यांतला एक मनुष्य जरी जिवंत राहिला, तरी तो पारतंत्र्य स्वीकारणार नाहीं, हें मी खात्रीनें सांगतों. तेव्हां रजपूत आणि पठाण यांच्या रक्तानें या पृथ्वीला न्हाऊं घालण्यापासून कोणता लाभ होणार ?

जगत्सिंह म्हणाला, 'मग काय करावें असें आपण म्हणतां ?'

**उस्मान०**—मी कांहींच म्हणत नाहीं. आमच्या सरकारशीं तह व्हावा अशी इच्छा आहे.

**जगत्०**—कशा प्रकारचा तह ?

**उस्मान०**—दोन्ही पक्षांनीं थोडें पडतें घेतलें पाहिजे. नबाब कतलूखानानें आपल्या बाहुबळानें वंग देशाचा जो भाग जिंकून घेतला आहे, तो सोडून देण्यास ते तयार आहेत. अकबर बादशाहानेंहि ओरिसावरचें आपलें स्वमित्व सोडून सैन्यासह निघून जावें, आणि पुनः तो प्रांत जिंकून घेण्याचा नाद सोडावा. त्यापासून बादशाहाचें मुळींच नुकसान नाहीं. असेल तर पठाणांचें आहे. जें आम्हीं मोठ्या कष्टानें मिळविलें आहे, तें आम्ही सोडून देत आहों. बादशाहाला जें हस्तगत करून घेतां आलें नाहीं, तें त्याला सोडावयाचें आहे.

राजपुत्रानें तें सगळें भाषण ऐकून म्हटलें, 'फार चांगली गोष्ट. पण ती माझ्याजवळ काढून काय उपयोग? लढाई किंवा तह करणें हा सगळा अधिकार महाराज मानसिंह यांजकडे आहे. त्यांच्याकडे दूत पाठवा.'

**उस्मान०**—त्यांच्याकडे दूत पाठविला होता; पण दुर्दैवानें कोणीं त्यांना सांगितलें कीं आम्ही पठाणांनीं आपणास जिवें मारलें. त्यामुळें संतापाच्या व शोकाच्या भरांत तहाची गोष्टसुद्धां त्यांनीं ऐकून घेतली नाहीं. दूताच्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसेना. यासाठीं आपणच स्वतः तहाचें बोलणें करण्यास जाल तर ते त्या गोष्टीला कबूल होतील.

राजपुत्रानें उस्मानाकडे पुनः स्थिर दृष्टीनें पाहून म्हटलें, 'सगळें नीट स्पष्टपणें सांगा. माझ्या हातचें अक्षर पाठविलें तरी महाराजांची खात्री पटण्याचा संभव आहे. मग मला स्वतःला जाण्याला कां सांगतां?'

**उस्मान०**—त्याचें कारण हेंच कीं महाराज मानसिंहाला आमची स्थिति पूर्णपणें माहित नाहीं. आमचें बळ किती आहे, तें आपल्याकडून त्यांना नीट कळेल. आपल्या सांगण्यानें कार्यसिद्धि होण्याचा विशेष संभव आहे. पत्रद्वारें तसें होणार नाहीं. तहाचा एक तात्कालिक परिणाम असा होईल कीं आपली सुटका होईल. आपण हें तह घडवून आणण्याचें काम पत्कराल अशी कतलूखानाची पूर्ण खात्री आहे.

**जगत्०**—वडिलांकडे जाण्यास माझ्याकडून ना नाहीं.

**उस्मान०**—हें ऐकून मला फार बरें वाटतें. पण आणखीहि एक गोष्ट सांगावयाची आहे. जर अशा रीतीनें तह घडवून आणण्यांत आपणास यश न आलें, तर पुन्हां या किल्ल्यांत परत येण्याचें आपण कबूल केलें पाहिजे.

**जगत्०**—मी कबूल केल्यावरहि परत येईनच अशी काय खात्री आहे?.

**उस्मान०**—( हंसून ) ती आमची खात्री आहे. रजपूत वचनाचा भंग करीत नसतात हें सर्वांना ठाऊक आहे.

राजपुत्र संतुष्ट होऊन म्हणाला, 'मी कबूल करितों कीं वडिलांची भेट घेतल्यानंतर लागलीच मी एकटा या किल्ल्यांत परत येईन.'

**उस्मान०**—आणखी एक गोष्ट आपण कबूल कराल तर आमच्यावर विशेष उपकार होतील. आपण महाराजांना भेटल्यावर आमच्या इच्छेप्रमाणें तह घडवून आणण्याचा यत्न कराल असें वचन द्या.

**राजपुत्र**—सेनापतिसाहेब ! असें वचन मला देतां येत नाहीं. दिल्लीच्या बादशाहानें पठाणांना जिंकण्याच्या कामावर आमची योजना केली आहे. आम्ही पठाणांना जिंकूं; अथवा मरून जाऊं; पण तह करण्यासाठीं आम्हांला नेमिलें नाहीं. तेव्हां आम्ही तह करणार नाहीं किंवा तो करण्याविषयीं आग्रहहि करणार नाहीं.

हें ऐकून उस्मानाच्या चर्येवर संतोष व क्षोभ या दोन्हीचीं चिन्हें दिसूं लागलीं. तो म्हणाला, 'युवराज ! आपण रजपुताप्रमाणें हें उत्तर दिलें; पण नीट विचार करून पहा. आपल्या सुटकेला याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.'

**जगत्०**—माझ्या सुटकेशीं दिल्लीच्या बादशहाला काय करावयाचें आहे ? रजपूत कुळांत दुसरे पुष्कळ राजपुत्र आहेत.

उस्मान व्याकुळ होऊन म्हणाला, 'युवराज ! माझें ऐकून घ्या आणि हा विचार सोडा.'

**जगत्०**—कां बरें ?

**उस्मान०**—राजपुत्र ! मी स्पष्टच सांगतों. आपल्या द्वारें कार्यसिद्धि होईल असें समजूनच नबाबसाहेबांनीं आपणाला आतांपर्यंत मानापानानें ठेविलें. आतां आपण जर त्यांच्याविरुद्ध गेलांत तर आपणास फार जड जाईल.

**जगत्०**—पुन्हां धमकी दाखवितां काय ? आतांच बंदिवासांत राहण्याविषयींची माझी इच्छा मीं आपणास कळविली आहे.

**उस्मान०**—युवराज ! केवळ कैदखान्यांत घालूनच नबाबसाहेबांची तृप्ति झाली तर भाग्य समजा !

युवराजानें भिवया वर चढवून म्हटलें, 'नाहींतर वीरेंद्रसिंहाच्या रक्ताचा प्रवाह आणखी पुढें वाढविण्यांत येईल; इतकेंच ना ?' हें बोलतांना राजपुत्राच्या डोळ्यांतून अग्नीच्या ठिणग्या बाहेर पडत होत्या.

उस्मान म्हणाला, 'मी आपली रजा घेतों. मीं आपलें काम केलें. कतलखानाचा हुकूम आपण दुसऱ्या दूताच्या तोंडून ऐकाल.'

थोड्या वेळानें दुसरा एक दूत आला. तो लष्करी पोषाख केलेल्या सामान्य शिपायापेक्षां वरच्या पायरीचा दिसत होता. त्याच्याबरोबर आणखी चौघे हत्यारबंद पायदळ शिपाई होते. राजपुत्रानें त्यांना विचारलें, 'तुमचें काय काम आहे?' शिपाई म्हणाला, 'आपली राहण्याची जागा बदलावयाची आहे.'

'मी तयार आहें, चला.' इतकें बोलून राजपुत्र दूताच्या मागोमाग गेला.

---

## प्रकरण बारावें.

# अलौकिक अलंकार.



उत्सवाचा दिवस प्राप्त झाला. आज कतलखानाचा वाढदिवस. दिवसा रंग, नाच, दान, खान, पान इत्यादि गोष्टींत सर्वजण दंग झाले आहेत. रात्रीं तर अधिकच मौज व्हावयाची आहे. नुकतीच संध्याकाळ होऊन गेली आहे. किल्ल्यांत सर्वत्र लखलखाट झाला आहे. सैनिक, शिपाई, उमराव, नोकर चाकर, नागरिक, भिकारी टाकारी, मद्यपी, नट, नर्तकी, गवई, गाणारणी, बजवय्ये, जादुगार, माळी, तांबोळी, सुगंधी, वाणी, कारागीर जिकडे तिकडे दिसत आहेत. जिकडे जावें तिकडे दिवेच दिवे, गाणें बजावणें, गुलाबपाणी, फुलें, आतषबाजी व वेश्या हीं दिसत आहेत. अंतःपुरांतमुद्धां कोठें कोठें हाच थाट आहे. नबाबाच्या विलासमंदिरांत थोडीशी शांतता आहे; तरी पण नेहमींपेक्षां तेथें आज आनंदाची मात्रा विशेषच आहे. दालनादालनांतून चांदीच्या समया, स्फटिकांचे दीप व अत्तराचे दिवे सुगंधयुक्त प्रकाश पसरीत आहेत. सुवासिक पुष्पांच्या माळा पडद्यांतून, खांबावर, बिछान्यावर, बैठकीवर आणि अंतःपुरांतल्या स्त्रियांच्या अंगावर विराजत आहेत. गुलाबाच्या वासाचा भार वातावरणांत मावत नाहीं; अगणित दासी, कोणी भरजरीची, कोणी आपल्या इच्छेप्रमाणें निळ्या, हिरव्या, तांबड्या, काळ्या, जांभळ्या इत्यादि रंगांची, रेशमी वस्त्रें परिधान

करून आणि सोन्याचे अलंकार घालून दिव्याच्या प्रकाशानें झळकत फिरत आहेत. त्या ज्यांच्या दासी आहेत त्या सुंदर मालकिणी महालांमहालांतून मोठ्या परिश्रमानें वेणीफणी व चट्टीपट्टी करीत आहेत. आज नबाबसाहेब प्रमोदमंदिरांत येऊन सर्वांसह ख्यालीखुशाली करणार आहेत. नाचगाणें होईलच. ज्याची जी इच्छा असेल, तें त्याला आज प्राप्त करून घेतां येईल. कोणी आपल्या भावाला चाकरी मिळवून देण्यासाठीं मोठ्या आस्थेनें केस विंचरीत आहेत; कोणी आपणाला जास्त नोकर चाकर मिळावे म्हणून केसांच्या जटा हस्तिदंती फणीनें वक्षस्थळांपर्यंत नेऊन सोडीत आहेत; कोणी नुकत्या झालेल्या तान्हुल्याला कांहीं संपत्ति मिळवून देण्याच्या इच्छेनें, त्याचे गाल लाल दिसावे म्हणून घासून घासून ते रक्त येईपर्यंत लाल करीत आहेत; कोणी नबाबाच्या एखाद्या लाडक्या स्त्रीला नुकत्याच मिळालेल्या रत्नालंकाराप्रमाणें एखादा अलंकार आपणाला मिळावा म्हणून डोळ्याच्या खालच्या भागांत सुरम्याचा पट्टा कानापर्यंत ओढीत आहेत; कोणी त्राटिका, दासीनें पायजमा चढवितांना त्यावर पाय दिला म्हणून तिच्या गालावर चापटी मारीत आहे; कोणी पोक्त स्त्री दासी केस विंचरूं लागली तेव्हां वयोमानाप्रमाणें अगोदरच कमी होत चाललेले केस दासीच्या हातांतल्या फणीनें विंचरतांना उपटले गेल्यामुळें निर्भयपणानें मोठा गळा काढून रडत बसली आहे; अशा वेळीं पुष्पोद्यानांतल्या भुईकमळाप्रमाणें अथवा पक्षिगणांतल्या मयूरीप्रमाणें एक सुंदरी वेणी फणी उरकून ऐटीनें प्रत्येक महालांतून फिरत होती. आज कोणाला कोठेंहि जाण्याला मनाई नव्हती. ज्या अवयवाचें जसें सौंदर्य असावें, तसें ब्रह्मदेवानें त्या त्या स्त्रीला दिलें होतें. ज्या स्थानीं जो अलंकार पाहिजे, तो तिला कतलूखानानें दिला होता. तथापि त्या स्त्रीच्या मुखावर सौंदर्याच्या किंवा अलंकाराच्या गर्वाचें चिन्ह तिळमात्र दिसत नव्हतें. ख्यालीखुशाली, हंसणें बागडणें कांहीं नव्हतें. तिच्या मुखाची कांति गंभीर व स्थिर होती. डोळ्यांत मात्र भयंकर ज्वाला दिसत होती.

विमला अशा रीतीनें ठिकठिकाणीं फिरत असतां एका चांगल्या रीतीनें शृंगारलेल्या घरांत गेली आणि आंत गेल्यावर तिनें दाराला आंतून अडसर घातला. या उत्सवाच्या दिवशीं देखील त्या घरांत एकच मंदसा दिवा जळत होता. घरांत एका बाजूला एक पलंग होता. त्या पलंगावर पायापासून डोक्यापर्यंत पांघरूण घेऊन कोणी निजलें होतें. विमला पलंगापाशीं उभी राहून मृदु स्वरानें म्हणाली, ' मी आल्यें आहें.'

निजलेल्या व्यक्तीनें दचकल्याप्रमाणें चटकन तोंडावरलें पांघरूण काढलें. विमलेला ओळखून तिनें अंगावरचें पांघरूण काढलें. ती उठून बसली; पण कांहीं बोलली नाहीं.

विमला पुन्हां म्हणाली, ' तिलोत्तमे ! मी आल्यें आहें. ' तरी तिलोत्तमा कांहीं उत्तर करीना. ती स्थिर दृष्टीनें विमलेच्या तोंडाकडे पहात राहिली.

तिलोत्तमा आतां लाजणारी मुलगी नव्हती. या वेळीं तिच्याकडे त्या मंद प्रकाशांत पाहून एखाद्याला वाटलें असतें कीं ती तिच्या खऱ्या वयापेक्षां दहा वर्षांनीं मोठी असेल. ती अत्यंत कृश झाली होती. तिचा चेहरा मलिन दिसत होता. अंगावर एक लहानसें वस्त्र होतें. वेणीचे केंस विस्कटून त्यांत धूळ साचली होती. अंगावर अलंकाराचें नांव नव्हतें. पूर्वी ती जे अलंकार घालीत असे त्यांच्या खुणा मात्र अंगावर राहिल्या होत्या.

विमला पुनः म्हणाली, 'मी येईन म्हणून म्हटलें होतें त्याप्रमाणें आल्यें आहें. तूं बोलत कां नाहींस ?'

तिलोत्तमा म्हणाली, 'जें कांहीं मांगावयाचें होतें, तें सांगितलेंच आहे. आणखी काय सांगणार !'

तिलोत्तमेच्या स्वरावरून ती रडत होती असें विमलेनें ताडलें. डोक्यावर हात ठेवून आणि तोंड वर करून विमलेनें पाहिलें तों डोळ्यांतल्या अश्रूंनीं तिचें तोंड भिजलेलें दिसलें. तिच्या लुगड्याचा पदर हात लावून पाहिला तों तो भिजून चिंब झाला होता. ज्या उशीवर डोकें टेकून तिलोत्तमा निजली होती, तिला हात लावून पाहिलें तों तीहि भिजलेली दिसली. विमला म्हणाली, 'अशी रात्रंदिवस रडत राहिलीस तर हें शरीर किती दिवस चालणार ?'

तिलोत्तमा दृढतेनें म्हणाली, 'आतां हें शरीर राहून तरी काय करावयाचें आहे ? इतके दिवस तरी तें कसें राहिलें याचेंच मला वाईट वाटत आहे !'

यावर विमला कांहीं बोलली नाहीं. तीहि रडूं लागली. कांहीं वेळानें मोठा उसासा टाकून विमला म्हणाली, 'आतां काय उपाय करावयाचा ?' तिलोत्तमा असंतोषपूर्वक विमलेच्या अलंकाराकडे पुन्हां पाहून म्हणाली, 'उपाय कशाला करायचा ?'

विमला म्हणाली, 'बेटा ! आशा सोडूं नकोस.' तिलोत्तमा म्हणाली, 'अजून तूं कतलुखानाला चांगलें ओळखलें नाहींस का ? आतांपर्यंत त्याला फावलें नाहीं

म्हणून म्हण किंवा आपणाला शोक निवारण्यासाठीं अवकाश देण्याच्या इछेनें म्हण, पण त्या दुरात्म्यानें आपली गय केली आहे. आपली मुदत कोठपर्यंत आहे तें पूर्वीच सांगण्यांत आलें आहे. आज जर का आपण नृत्यशाळेंत आलेल्या त्याला न दिसलों, तर तो काय करील आणि काय नाहीं तें सांगतां येत नाहीं.'

विमला किंचित् स्थिर होऊन म्हणाली, 'तिलोत्तमे! अशी अगदीं निराश कां होतेस? अजून आपले प्राण आहेत. आणि आपण धर्महि राखला आहे. आपल्या जिवांत जीव आहे, तोंपर्यंत आपण धर्म पाळूं.'

तेव्हां तिलोत्तमा म्हणाली, 'तर मग आई! हे सगळे अलंकार काढून फेकून दे. तूं हे घातलेले डागिने माझ्या डोळ्यांत सलत आहेत.'

विमलेनें किंचित् हंसून म्हटलें, 'बेटा, माझे सर्व डागिने पाहिल्याशिवाय तूं माझा असा धिःक्कार करूं नकोस.'

असें बोलून विमलेनें आपल्या लुगड्यांत लपवून आणलेली तीक्ष्ण धारेची एक कट्यार बाहेर काढली. दिव्याच्या उजेडांत तिची तीक्ष्ण पात विजेप्रमाणें चमकली. ती पाहून तिलोत्तमा विस्मित झाली. तिच्या तोंडाला कोरड पडली. तिनें विचारलें, 'ही तुला कोठें मिळाली?'

विमला म्हणाली, 'कालपासून अंतःपुरांत एक नवी दासी आली आहे. ती तूं पाहिलीस काय?'

**तिलोत्तमा**—हो. पाहिली आहे. आस्मानीच ना?

**विमला**—आस्मानीच्या मार्फत अभिरामस्वामीकडून ही आणली आहे.

तिलोत्तमा चकित होऊन स्तब्ध बसली. तिचें हृदय कांपूं लागलें. क्षणभरानें विमलेनें विचारलें, 'तूं हा पोषाख आज टाकून देणार नाहींस काय?'

**तिलोत्तमा**—नाहीं.

**विमला**—नृत्य गीताला जावयाचें नाहीं काय?

**तिलोत्तमा**—नाहीं.

**विमला**—गेल्यावांचून सुटका नाहीं.

तिलोत्तमा रडूं लागली. तेव्हां विमला म्हणाली, 'स्थिर होऊन ऐक. मीं तुझ्या सुटकेचा एक उपाय योजिला आहे.'

तिलोत्तमा विमलेच्या तोंडाकडे लक्षपूर्वक पाहूं लागली. विमलेनें, उस्माननें दिलेली आंगठी तिलोत्तमेच्या हातांत देऊन म्हटलें, 'ही आंगठी संभाळ. नृत्यगृहांत जाऊं नकोस. मध्यरात्रीच्या अगोदर ही उत्सवाची धामधूम संपायची

नाहीं. तोंपर्यंत मी पठाणाला थांबवून धरूं शकेन. मी तुझी सावत्र आई आहें हें त्याला कळलें आहे. तूं माझ्या देखत येऊं शकत नाहींस, अशी सबब सांगून नृत्यगीत संपेतोंपर्यंत तुझ्या भेटीची त्याची इच्छा मी थोपवून धरीन. मध्यरात्र झाली कीं तूं ही आंगठी घेऊन अंतःपुराच्या दरवाजापाशीं जा. तेथें दुसरा एक मनुष्य तुला अशीच एक दुसरी आंगठी दाखवील. त्याच्याबरोबर निर्भय चित्तानें खुशाल जा. ज्या ठिकाणीं घेऊन जाण्यास तूं त्याला सांगशील त्या ठिकाणीं तो तुला घेऊन जाईल. अभिरामस्वामीच्या आश्रमांत घेऊन जाण्याविषयीं तूं त्याला सांग.'

हें ऐकून तिलोत्तमेला फार आश्चर्य वाटलें. विस्मयानें म्हणा, किंवा आनंदानें म्हणा, कांहीं काळपर्यंत तिच्या तोंडांतून शब्द फुटेना. नंतर ती म्हणाली, 'हा काय प्रकार आहे ? ही आंगठी तुला कोणीं दिली ?'

विमला म्हणाली, 'तें एक भारूडच आहे. दुसऱ्या एखाद्या वेळीं फुरसतीप्रमाणें सांगेन. आतां मनांत अगदीं संकोच न ठेवतां मीं सांगितल्याप्रमाणें कर.'

तिलोत्तमा म्हणाली, 'तुझें आतां कसें होईल ? तूं कशी बाहेर येशील ?'

विमला म्हणाली, 'माझी काळजी करूं नकोस. मी दुसरी कांहीं युक्ति करून उद्यां सकाळीं तुला भेटेन.'

असें बोलून विमलेनें तिलोत्तमेची समजूत घातली; पण तिनें तिलोत्तमेसाठीं आपला स्वतःचा सुटण्याचा मार्ग बंद करून ठेवला आहे, हें तिलोत्तमेला कळलें नाहीं.

आज बरेच दिवसांत तिलोत्तमेच्या चर्येवर हर्षाचा विकास दिसत नव्हता. विमलेचें भाषण ऐकून आज तिलोत्तमेची मुद्रा आनंदानें प्रफुल्लित झालेली दिसली.

हें पाहून विमलेच्या मनांत आनंदाच्या उकळ्या फुटल्या. कंठ सद्गदित होऊन ती म्हणाली, 'मी आतां जात्यें !'

तिलोत्तमा मनांत संकोच धरून म्हणाली, 'मला वाटतें तुला किल्ल्यांतल्या सगळ्या लोकांची खबर कळली आहे. आपली मंडळी कोठें आहे ? व कशा प्रकारें आहे ? तेवढें सांगून जा.'

विमलेनें पाहिलें कीं अशा विपत्सागरांत पडली असतांहि तिलोत्तमेच्या मनांत जगत्‌सिंहाची स्मृति जागृत आहे. विमलेला राजपुत्राचें निष्ठुरतेचें पत्र आलें

होतें. त्यांत तिलोत्तमेचा नामनिर्देशहि नव्हता. ही गोष्ट तिलोत्तमेला जर कळली, तर अगोदरच दग्ध झालेलें तिचें अंतःकरण अधिकच दग्ध केल्यासारखें होईल, म्हणून त्याविषयीं कांहीं एक न सांगतां विमलेनें उत्तर केलें, 'जगत्सिंह या किल्ल्यांतच आहे आणि तो शरिरानें कुशल आहे.'

यावर तिलोत्तमा कांहीं बोलली नाहीं. विमला डोळे पुशीत पुशीत तेथून चालती झाली.

---

## प्रकरण तेरावें.

# अंगठीचें प्रदर्शन.

विमला निघून गेल्यावर खोलींत एकटी बसून तिलोतमा जे विचार करीत होती त्यांना सुख व दुःख हीं दोन्ही कारणें होतीं. त्या पापात्म्याच्या कैदेंतून लौकर सुटका होण्याचा आतां संभव आहे, ही गोष्ट तिच्या मनांत पुनः पुनः येऊं लागली. येवढीच केवळ गोष्ट नाहीं, तर विमला आपल्यावर प्राणाधिक प्रेम करत्ये, आणि तिच्यामुळेंच आपल्या सुटकेचा उपाय सांपडला ही गोष्ट वारंवार मनांत घोळत राहून तिला दुप्पट सुख होऊं लागलें. ती आणखी मनांत म्हणूं लागली कीं 'सुटका झाल्यावर तरी कोठें जाणार ? आतां आपल्याला बापाचें घर तरी कोठें आहे ?' हा विचार मनांत येऊन ती रडूं लागली. सगळे विचार शांत झाल्यावर दुसरा एक विचार तिच्या मनांत जागृत झाला. 'राजकुमार खुशाल आहे काय ? तो कोठें आहे ? त्याची काय अवस्था आहे ? तोहि बंदींतच आहे काय ?' असे विचार करतां करतां तिलोत्तमेचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. 'हाय अदृष्टा ! राजपुत्र माझ्याचसाठीं बंदिवान झाले. त्यांच्या चरणीं मीं आपले प्राण अर्पण केले, तरी त्यांचे उपकार फिटतील काय ? मीं त्यांच्यासाठीं काय करावें ?' पुनः ती विचार करूं लागली आणि म्हणूं लागली कीं 'ते कारागृहांत असतील काय ? तें कारागृह कसें असेल ? त्या ठिकाणीं कोणाला जातां येईल काय ? कारागृहांत बसून ते कशाचा विचार करीत असतील ? तिलोत्तमेविषयींचा विचार त्यांच्या मनांत कधीं येत असेल काय ? येत असेल यांत काय नवल आहे ? मीच त्यांच्या दुःखाला कारण झाल्यें आहें. ते मनांतल्या मनांत मला काय म्हणत असतील कोण जाणे !'

पुनः ती म्हणाली, 'हें काय? असा विचार माझ्या मनांत कां बरें यावा? ते कधीं तरी कोणाला वाईट म्हणतील काय? तसें नसेल तर दुसरी एक शंका येते. ते मला विसरले तर नसतील? मी मुसलमानांच्या घरांत राहायला गेल्यें म्हणून तिरस्कारानें त्यांनीं मला आपल्या मनांतून दूर तर केलें नसेल?' पुनःतिला वाटे, 'छेः छे! ते असें कसें करतील? ते जसे किल्ल्यांत बंदिवान होऊन पडले तशी मीहि अडकल्यें आहें, मग ते माझा धिक्कार काय म्हणून करतील? जरी केला तरी मी त्यांचे पाय धरून त्यांची समजूत घालीन. नाहीं का त्यांची समजूत पडणार? पडेल. यांत काय शंका आहे? न पडली तर मी त्यांच्या समक्ष प्राणत्याग करीन. पूर्वीच्या काळीं अग्नीचें दिव्य करीत असत. कलियुगांत तें बंद आहे. तें होवो वा न होवो, मी त्यांच्यासमोर अग्नींत उडी टाकून प्राणत्याग करीन.' पुनः तिला वाटे, 'केव्हां त्यांची भेट होईल? त्यांची सुटका कोणत्या उपायानें होईल? माझी सुटका झाली तर कार्यसिद्धि होईल काय? ही अंगठी आईला कोठून मिळाली असेल बरें? त्यांच्या सुटकेसाठीं तर ही युक्ति नसेलना? ही अंगठी त्यांच्याकडे पाठविली तर नाहीं का चालणार? मला न्यायला कोण येईल? त्याच्याद्वारें कांहीं उपाय करतां येणार नाहीं काय? ठीक आहे. मी त्याला विचारीन. पाहीन तो काय म्हणतो तें. एक वेळ त्यांची भेट नाहीं का व्हावयाची?' पुनः तिला वाटे, 'पण काय म्हणून मी त्यांच्या भेटीची इच्छा करीत आहें? भेट झाली तर मी त्यांच्याशीं काय बोलूं? काय सांगून त्यांचा मनस्ताप शमवूं?'

याप्रमाणें तिलोत्तमा एकसारखी विचार करूं लागली. इतक्यांत एक दासी त्या खोलींत आली. तिलोत्तमेनें तिला विचारलें, 'किती ग रात्र झाली?'

दासी म्हणाली, 'दोन प्रहर उलटून गेले. दासी बाहेर जाण्याची वाट तिलोत्तमा पाहूं लागली. दासी काम होतांच चालती झाली. तिलोत्तमा विमलेनें दिलेली अंगठी घेऊन खोलींतून बाहेर पडली. आतां तिच्या मनाला भीति वाटूं लागली; पाय लटपटूं लागले; हृदयांत कंप भरला; तोंडाला कोरड पडली; एक पाऊल पुढें टाकावें, तर दुसरें मागें घ्यावें, असें ती करूं लागली. मोठें साहस करून ती एकदांची अंतःपुराच्या दरवाज्यापर्यंत आली. अंतःपुरांतले नोकर चाकर, खोजे, हबशी वगैरे सगळे मौजा मारण्यांत दंग झालेले होते. कोणींहि तिच्याकडे पाहिलें नाहीं. पाहिलें असलें तरी तिच्याकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. तिलोत्तमेला बरीक वाटलें कीं सर्वांचें लक्ष आपल्याकडेसच आहे.

ती कशीबशी अंतःपुराच्या द्वारापर्यंत आली. तेथचे पाहारेवाले आनंदानें उन्मत्त झालेले होते. कोणी निजले होते, कोणी अर्धवट शुद्धींत होते; कोणी अगदीं बेशुद्ध होऊन पडले होते, तिच्याकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें. एक मनुष्य मात्र दाराशीं होता. त्यानेंहि पाहारेवाल्याचा पोषाख केलेला होता. त्यानें तिलोत्तमेला विचारलें, 'तुमच्या हातांत अंगठी आहे काय?'

तिलोत्तमेनें भीतभीतच विमलेनें दिलेली अंगठी दाखविली. पाहारेवाल्याचा वेष धारण केलेल्या माणसानें त्या अंगठीकडे निरखून पाहिलें आणि आपल्या हातांतली अंगठी तिलोत्तमेला दाखविली. मग तो म्हणाला, 'माझ्याबरोबर चला. कांहीं शंका मनांत आणूं नका.'

तिलोत्तमा चंचळ चित्तानें त्याच्याबरोबर गेली. अंतःपुराच्या दरवाज्यावरील पाहारेवाल्याप्रमाणेंच वाड्यांतले सगळे पाहारेकरी गुंगून पडले होते. विशेष गोष्ट ही कीं आज रात्रीं सगळे दरवाजे खुले होते. कोणी कोणाला विचारीत नव्हतें. तो मनुष्य तिलोत्तमेला बरोबर घेऊन अनेक दरवाजे, दालनें आणि चौक यांतून चालला होता. अखेर किल्ल्याच्या शेवटाच्या फाटकापर्यंत आल्यावर तो म्हणाला, 'आतां कोठें जावयाचें तें सांगा म्हणजे घेऊन जातों.'

विमलेनें जें कांहीं सांगून ठेविलें होतें त्याची तिलोत्तमेला आठवण राहिली नव्हती. प्रथम तिला जगत्सिंहाची आठवण झाली आणि इच्छा झाली कीं, 'जेथें राजपुत्र आहे तेथें घेऊन चल.' असें म्हणावें; पण पूर्वीची वैरीण जी लज्जा तिनें येऊन वैर साधलें. ते शब्द तिच्या तोंडांत घुटमळूं लागले. 'कोठें जावयाचें'? असें त्या माणसानें पुनः विचारलें.

तिलोत्तमेच्यानें कांहींच बोलवेना. जणूं काय ती अगदीं ज्ञानशून्य झाली होती. आपोआप तिचें काळीज कांपूं लागलें. डोळ्यांनीं पाही पण दिसेना, कानांनीं ऐकूं येईना, तोंडांतून शब्दोच्चार निघाला तरी तो तिला कळेना. अशा स्थितींत त्या माणसाच्या कानीं 'जगत्सिंह' असा अस्फुट शब्द पडला.

तो म्हणाला, 'जगत्सिंह यावेळीं कारागृहांत पडला आहे. तेथें दुसऱ्या कोणाला जातां येत नाहीं; पण मला असा हुकूम आहे कीं आपणाला जेथें जाण्याची इच्छा असेल, तेथें आपणास घेऊन जावें. चला तर.'

तो मनुष्य परत किल्ल्यांत शिरला. आपण काय करीत आहों व कोठें जात आहों, हें कांहींच न कळून तिलोत्तमा एखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें त्याच्याबरोबर चालली होती. तो मनुष्य कारागृहाच्या दरवाज्यापाशीं जाऊन पाहूं

लागला, तों इतर पाहारेवाल्यांप्रमाणें येथचे पाहारेवाले त्या दिवशींच्या आनंदानें बेहोष झालेले व आपल्या कामांत ढिलाई करणारे नव्हते. सगळे आपापल्या जागीं सावध होते असें त्याला आढळून आलें. त्यानें राजपुत्र कोठें आहे; असें त्यांतल्या एकाला विचारलें, तेव्हां त्यानें त्याला बोटानें एक जागा दाखविली. अंगठी घेऊन येणाऱ्या त्या माणसानें तुरुंगावरच्या रक्षकाला विचारलें, ' बंदिवान यावेळीं निजला आहे कीं जागा आहे ? ' तेव्हां त्या रक्षकानें कोठडीच्या दारापर्यंत जाऊन परत येऊन सांगितलें कीं बंदिवान जागा आहे, अशी वर्दी मिळाली आहे.'

तिलोत्तमेच्या मार्गदर्शकानें रक्षकाला म्हटलें कीं, 'आमच्यासाठीं या कोठडीचें दार उघडा. या बाई त्यास भेटण्यासाठीं आंत जातील. '

तो रक्षक चकित होऊन म्हणाला, ' हें कसें होईल ? आम्हांला तसा हुकूम नाहीं, हें तुम्हांला ठाऊक नाहीं काय ? '

तेव्हां त्या मार्गदर्शकानें उस्मानची खुणेची आंगठी त्या रक्षकाला दाखविली. तेव्हां ताबडतोब शिर लववून त्यानें कोठडीचें दार उघडून दिलें.

राजकुमार त्या कोठडींत एका सामान्य खाटेवर निजला होता. दार उघडल्याचा शब्द ऐकून त्यानें आश्चर्यानें तिकडे पाहिलें. तिलोत्तमा बाहेरच्या दारापर्यंत आली. पुढें तिच्यानें येववलें नाहीं. तिचें पाऊलच उचलेना. ती दारापाशीं फळीला धरून उभी राहिली.

आंत प्रवेश करण्याची तिलोत्तमेची इच्छा नाहीं, असें पाहून रक्षक म्हणाला, ' हें काय ? तुम्ही येथेंच का वेळ घालविणार ? ' इतकें त्यानें म्हटलें तरी तिचें पाऊल उचलेना.

रक्षकानें पुनः म्हटलें, ' जायचें नसलें तर परत चला. असें उभें राहण्याची ही जागा नव्हे. '

तिलोत्तमा परत जाण्यास तयार झाली. पण तिकडेहि जाण्याला तिचें पाऊल उचलेना. आतां काय करणार ? रक्षकाला मोठी पंचाईत पडली. विचार करतां करतां तिलोत्तमेचें पाऊल तिला न कळत पुढें पडलें. एकदांचा तिनें कोठडींत प्रवेश केला.

कोठडींत गेल्यावर राजपुत्राला पाहतांच पुनः तिची गति खुंटली. तिचे पायच गळाले. ती दाराजवळच भिंतीचा आधार घेऊन मान खालीं घालून उभी राहिली.

राजपुत्रानें प्रथम तिलोत्तमेला ओळखलें नाहीं. स्त्री आणि येथें कशी आली, याचेंच त्याला आश्चर्य वाटलें. कोणी स्त्री भिंतीच्या आधारानें उभी आहे आणि जवळ येत नाहीं, याचा त्याला विस्मय वाटला. तो बिछान्यावरून उठून दारापाशीं गेला. स्त्रीकडे निरखून पाहिल्यावर त्यानें तिला ओळखलें.

क्षणमात्र उभयतांची दृष्टादृष्ट झाली. लागलीच तिलोत्तमेनें आपली दृष्टी खालीं जमिनीकडे वळविली; पण तिचें शरीर मात्र किंचित् पुढें झुकलें. राजपुत्राच्या चरणापाशीं तें पडतेंसें दिसलें.

राजपुत्र अंमळ मागें उभा राहिला. त्याच क्षणीं तिलोत्तमेचा देह मंत्रमुग्ध सर्पाप्रमाणें स्तंभित होऊन स्थिर राहिला. क्षणापूर्वीं उमललेलें तिचें हृत्कमल लागलीच कोमेजून गेलें. राजपुत्रानें विचारलें, 'वीरेंद्रसिंहाची कन्या काय?'

हे शब्द तिलोत्तमेच्या हृदयाला शल्यासारखे लागले. 'वीरेंद्रसिंहाची कन्या!' अशा वेळीं तिला असें म्हणावयाचें? जगतसिंह काय तिलोत्तमेचें नांवसुद्धां विसरून गेला होता? दोघेंहि कांहीं वेळ स्तब्ध राहिलीं. राजपुत्रानें पुनः विचारलें, 'येथें कां आलां?'

'येथें कां आलां?' काय हा प्रश्न? तिलोत्तमेचें डोकें फिरूं लागलें. चारी बाजूंनीं कोठडी, दिवा, भिंत सगळींच जणूं काय फिरत आहेत असें तिला वाटलें म्हणून आधरासाठीं भिंतीला डोकें टेंकून उभी राहिली.

तिच्याकडून कांहीं उत्तर मिळेल अशा आशेनें राजपुत्र कांहीं वेळ उभा राहिला होता. पण कोण उत्तर देणार? उत्तर देण्याचा संभव नाहीं, असें पाहून राजपुत्र म्हणाला, 'तुम्हांला दुःख होत आहे. परत जा, आणि मागचें सारें विसरा.'

तिलोत्तमेची भ्रांति फिटली. वृक्षावरून जशी एकाएकीं वेल तुटून पडावी, तशी ती धाडकन् जमिनीवर पडली.

---

## प्रकरण चौदावें.

# मोह.

—०—

जगतसिंहानें खालीं वांकून पाहिलें तों तिलोत्तमा बेशुद्ध होऊन पडलेली त्यास दिसली. तो आपल्या वस्त्रानें तिला वारा घालीत होता, तरी ती शुद्धीवर येण्याचें कांहीं चिन्ह दिसेना. तेव्हां त्यानें तिच्या बरोबरच्या रक्षकाला बोलाविलें.

तो रक्षक आला. जगत्सिंह त्याला म्हणाला, 'हिला एकाएकीं मूर्च्छा आली आहे. हिच्याबरोबर कोणी माणूस आलें असेल त्याला बोलावा, आणि हिची शुश्रूषा करण्यास सांगा.'

रक्षक म्हणाला, 'मीच यांच्या बरोबर आलों आहें.'

राजपुत्रानें आश्चर्यचकित होऊन विचारलें, 'तुम्हीच एकटे ?'

रक्षक म्हणाला, 'होय. माझ्याशिवाय दुसरें कोणी आलें नाहीं.'

राजपुत्र म्हणाला, 'मग आतां काय इलाज करणार ! कोणा दासीला तरी बातमी कळवा.

रक्षक जाऊं लागला. तेव्हां राजपुत्रानें त्याला हाक मारून म्हटलें, 'हें पहा. दुसऱ्या कोणाला सांगितलें तर गडबड होईल. आणखी आजच्या सारखी रात्रीची मौज सोडून हिच्या साह्याला कोण यायला बसलें आहे ? '

रक्षक म्हणाला, 'असें तर खरेंच. आणखी पाहरेकरी तरी दुसऱ्या कोणाला कसे आंत येऊं देतील ? परक्या माणसाला या कैदखान्यांत आणण्याला मला धीर होत नाहीं.'

**राज०**—मग काय करणार ? आतां एक उपाय आहे. तुम्ही झटपट जाऊन नबाबसाहेबांच्या मुलीला खबर कळवा.'

रक्षक त्वरेनें तसें करण्यास निघाला. राजपुत्र शक्य तेवढी तिलोतमेची शुश्रूषा करूं लागला. तेव्हां राजपुत्राच्या मनांत काय काय विचार आले, ते कोणाला सांगतां येणार आहेत ? त्याच्या डोळ्यांत अश्रू आले होते कीं नाहींत तें कोणीं सांगावें ?

राजपुत्र तिलोत्तमेसह त्या कोठडींत एकटा असल्यामुळें घाबरून गेला होता. आयेषेपर्यंत निरोप जाऊन पोंचला नाहीं, किंवा तिला कांहीं उपाय करतां आला नाहीं, तर कसें होईल ?

हळू हळू तिलोत्तमा शुद्धीवर येऊं लागली. त्याच क्षणीं जगत्सिंहानें त्या उघड्या दरवाजांतून पाहिलें. तेव्हां रक्षकाबरोबर दोन स्त्रिया येत आहेत असें त्याला दिसलें. त्या दोघींपैकीं एकीनें तोंडावरून बुरखा घेतलेला होता. बुरखा घेतलेल्या त्या स्त्रीचा उंच शरीरबांधा, संगीताप्रमाणें मधुर अशी तिची चालण्याची ढब, आणि मानेची सुंदर ठेवण हीं दुरून पाहून राजपुत्रानें ताडलें कीं आयेषा स्वतःच दासीला बरोबर घेऊन आली आहे. या गोष्टीमुळें त्याच्या मनाला धीरहि आला.

आयेषा व तिची दासी या दोघीजणी तुरुंगांतल्या त्या कोठडीच्या दारापाशीं आल्या, तेव्हां पहारेकऱ्यानें त्यांच्या बरोबरच्या रक्षकाला विचारलें कीं यांनाहि आंत सोडावयाचें कीं काय ?

रक्षक म्हणाला, 'तो विचार तुमचा तुम्ही पहा मला ठाऊक नाहीं.' पाहारेकरी म्हणाला, 'ठीक आहे.' त्यानें त्या स्त्रियांना आंत जाण्याची मनाई केली. तेव्हां आयेषानें तोंडावरचा बुरखा काढून म्हटलें, 'शिपाई ! आम्हांला जाऊं दे आंत. त्याबद्दल तुझें कांहीं बरें वाईट झालें तर आमच्याकडे लागलें.'

पाहारेकरी आयेषेला ओळखीत नव्हता. पण दासीनें ती कोण आहे, तें त्याला हळूच सांगितलें. तेव्हां पाहारेवाल्यानें आश्चर्यचकित होऊन लवून अदबीनें मुजरा केला, आणि हात जोडून म्हटलें, 'गरिबाच्या चुकीची माफी असावी. आपणास कोठेंहि जाण्यास मनाई नाहीं.'

आयेषा कोठडींत शिरली. त्या वेळीं ती हंसत नव्हती. तरी ती स्वभावतःच हंसतमुख असल्यामुळें ती हंसतच आहे असें वाटे. तुरुंगांतल्या कोठडीचा नूर एकदम पालटला. हा म्हणजे तुरुंग आहे असें कोणालाहि वाटलें नाहीं. आयेषा राजपुत्राला अभिवादन करून म्हणाली, 'राजपुत्र, काय प्रकार आहे ?'

राजपुत्र काय उत्तर देणार ? तोंडानें कांहींच न बोलतां त्यानें जमिनीवर पडलेल्या तिलोत्तमेकडे फक्त बोट केलें.

आयेषेनें तिलोत्तमेकडे बारीक दृष्टीनें पाहून विचारलें, 'ही कोण ?'

राजपुत्र संकोचानें म्हणाला, 'वीरेंद्रसिंहाची कन्या.'

आयेषा तिला मांडीवर घेऊन बसली. दुसरें कोणी असतें तर त्याला तसें करण्यास संकोच वाटला असता; करूं कीं नको करूं असा त्याला विचार पडला असता. आयेषेनें तसें कांहीं न करतां तिलोत्तमेला एकदम मांडीवर घेतलें.

आयेषा जें कांहीं करी तें सुंदरच दिसे. प्रत्येक कामाला ती सुंदर करून सोडी. आयेषा तिलोत्तमेला मांडीवर घेऊन बसली, तेव्हां जगत्सिंह व ती दासी या दोघांना मनांत वाटलें कीं, 'अहाहा ! किती सुंदर !'

आयेषेनें येतांना दासीच्या हातीं गुलाबपाणी, सरबत, इ. वस्तु आणिल्या होत्या. तिनें त्यांचें सेवन तिलोत्तमेकडून करविलें, आणि तोंडावर गुलाबपाणी शिंपडलें. दासी वारा घालूं लागली. तिलोत्तमेला आधींच थोडी बहुत शुद्धि येऊं लागली होती. आतां आयेषेच्या उपचारांनीं ती चांगली शुद्धीवर आली.

चोहींकडे पाहतांच तिला मागच्या गोष्टी आठवल्या. तत्क्षणीं ती कोठडींतून बाहेर जाऊं लागली; पण त्या रात्रींच्या शारीरिक व मानसिक श्रमामुळें तिची क्षीण काया थकून गेली असल्यामुळें तिच्यानें जाववेना. पूर्वींच्या गोष्टींचें स्मरण होतांच तिचें डोकें फिरूं लागून ती पुनः खालीं बसली. आयेषा तिचा हात धरून म्हणाली, ' ताई ! असा जिवाला त्रास कां करून घेतां ? तुम्ही अतिशय अशक्त झाल्या आहां. आमच्या घरीं चला, थोडा वेळ विश्रांति घ्या, आणि मग तुमची इच्छा असेल त्या ठिकाणीं तुम्हांला पोंचविण्याची व्यवस्था करतां येईल.'

यावर तिलोत्तमेनें कांहींच उत्तर केलें नाहीं.

आयेषेनें त्या रक्षकाकडून त्याला माहीत होती तेवढी तिलोत्तमेची हकीकत विचारून घेतली होती. त्यावरून आपल्याबरोबर येण्याला तिलोत्तमेला शंका वाटत आहे हें ओळखून ती म्हणाली, ' माझ्याविषयीं असा अविश्वास तुम्ही कां धरतां ? मी तुमच्या शत्रूची कन्या खरी, पण त्यावरून मी विश्वासास पात्र नाहीं, असें समजूं नका. माझ्याकडून कोणतीहि गोष्ट बाहेर फुटावयाची नाहीं. रात्र संपते न संपते तोंच तुम्हांला जावयाचें असेल तेथें दासीबरोबर तुमची रवानगी करून देईन. कोणी केव्हांहि तुमची गोष्ट बाहेर फोडणार नाहीं. '

हें सगळें आयेषा इतक्या गोड शब्दांनीं बोलली कीं तिलोत्तमेला तिच्याविषयीं तिळमात्र अविश्वास वाटला नाहीं. आतां चालण्याची शक्ति तिच्या ठायीं नव्हती; आणि जगत्सिंहाच्या जवळहि तिला बसतां येईना. म्हणून आयेषेच्या म्हणण्याला ती कबूल झाली. आयेषा म्हणाली, ' तुम्हांला चालतां येत नाहीं, तर दासीच्या अंगावर भार टाकून चला.'

तिलोत्तमा दासीच्या खांद्यावर हात ठेवून तिच्या आधारानें हळूहळू चालूं लागली. आयेषेनेंहि राजपुत्राचा निरोप घेतला. तेव्हां राजपुत्र तिच्या तोंडाकडे अशा रीतीनें पाहत राहिला कीं, त्यावरून ती समजली कीं याच्या मनांतून आपल्याशीं बोलावयाचें आहे. आयेषा त्याच्या मनांतला भाव समजली आणि दासीला म्हणाली, ' तूं या बाईला माझ्या शय्यागृहांत पोंचवून मला न्यायला परत ये. ' त्याप्रमाणें ती दासी तिलोत्तमेला घेऊन गेली.

जगत्सिंह मनांत म्हणाला, 'तुमची व आमची हीच शेवटची भेट !' नंतर गंभीरपणें उसासा टाकून तो स्तब्ध राहिला. दारांतून जोंपर्यंत तिलोत्तमा दिसत होती, तोंपर्यंत तो तिच्याकडे सारखा पाहत होता.

इकडे तिलोत्तमेलाहि वाटलें कीं 'यांची व माझी ही शेवटचीच भेट.' जोंपर्यंत तो दृष्टिपथांत होता तोंपर्यंत तिनें मागें वळून पाहिलें नाहीं, आणि जेव्हां पाहिलें तेव्हां जगत्सिंह तिला दिसला नाहीं.

रक्षक तिलोत्तमेच्या जवळ जाऊन म्हणाला, 'मी आतां रजा घेऊं' ?

तिलोत्तमेनें उत्तर केलें नाहीं. तेव्हां दासी म्हणाली, 'होय.' रक्षक म्हणाला, 'तर मग आपल्याजवळची खुणेची अंगठी मला परत द्यावी.'

तिलोत्तमेनें ती अंगठी दिली आणि रक्षक चालता झाला.

---

प्रकरण पंधरावें

## उघड उघड.

——:o:——

तिलोत्तमा आणि दासी कोठडींतून निघून गेल्यावर आयेषा बिछान्यावर बसली. कारण, तेथें बसण्यास दुसरें कांहीं नव्हतें. जगत्सिंह जवळच उभा राहिला.

आयेषेनें आपल्या वेणींतलें गुलाबाचें एक फूल काढून हातांत घेतलें आणि त्याची एकेक पाकळी नखांनीं तोडीत म्हटलें, 'राजकुमार ! आपल्या मनांत माझ्याशीं कांहीं बोलावयाचें आहे असें दिसतें. माझ्या हातून आपलें कांहीं काम होण्यासारखें असलें तर सांगा; अगदीं संकोच धरूं नका. आपलें काम केल्यानें माझ्या मनाला संतोष वाटेल.'

राजपुत्र म्हणाला, 'नबावकन्ये ! या वेळीं माझें कांहीं विशेष काम नाहीं. त्या-साठीं मीं आपल्या भेटीची इच्छाहि केली नव्हती. माझें इतकेंच म्हणणें आहे कीं सांप्रत मला प्राप्त झालेल्या स्थितीवरून मला आपलें दर्शन पुनः घडेल असा भरंवसा वाटत नाहीं. हीच आपली शेवटची भेट असें मी समजतों. आपलें मजवर जें उपकाराचें ऋण झालें आहे त्याची फेड माझ्या हातून कशी होणार ? ती गोष्ट माझ्या नशीबीं दिसत नाहीं. म्हणून मी आपणाजवळ येवढेंच मागणें मागतों कीं माझ्या हातून कांहीं कार्य होण्यासारखें असेल, जर चांगले दिवस मला यावयाचे असतील, तर केव्हांहि व कोणतेंहि काम माझ्या हातून घेण्यास आपण अगदीं संकोच करूं नये.'

हें बोलत असतांना जगत्सिंहाचा स्वर इतका व्याकुळ आणि निराशाव्यंजक झाला होता कीं तो ऐकून आयेषेलाहि दुःख झालें. ती म्हणाली, 'आपण इतके निराश कां होतां ? हे दिवस असेच का सदोदित राहणार आहेत ?'

जगत्सिंह म्हणाला, 'मी निराश झालों नाहीं. पण इतःपर कशाचीच आशा करावीसें मला वाटत नाहीं. या जीवनाचा त्याग करण्याशिवाय दुसरी कसलीहि इच्छा मला होत नाहीं. फार काय, पण ह्या तुरुंगाचाहि त्याग करावेंसें वाटत नाहीं. माझ्या मनांतलें सारें दुःख आपणास ठाउक नाहीं. आणि तें आपणास सांगण्यासहि मी असमर्थ आहें.'

राजपुत्र हे शब्द इतक्या करुणस्वरानें बोलला कीं, ते ऐकून आयेषेला आश्चर्यापेक्षां दुःखच अधिक झालें. आपण नबाबाची कन्या आहों हा तिच्या मनांतला भावच नाहींसा झाला. दूरपणा राहिला नाहीं. त्या प्रेममूर्ति स्त्रीनें स्त्रीस्वभावाला अनुसरून मोठ्या कष्टानें आपल्या कोमल करपल्लवांत राजपुत्राचा हात धरला; पुनः लागलीच तो सोडलाहि; आणि राजपुत्राच्या मुखाकडे वर दृष्टि लावून ती म्हणाली, 'कुमार, कशाचें इतकें दारुण दुःख आपण हृदयांत वागवीत आहां ? मला आपण परकी समजूं नका. आपण रागवणार नाहीं तर मी विचारत्यें कीं ही वीरेंद्रसिंहाची कन्या कोण—? '

आयेषेचा प्रश्न संपण्यापूर्वींच राजकुमार म्हणाला, 'त्या गोष्टीशीं आतां काय करायचें आहे ? तें स्वप्न भंग पावलें आहे.'

आयेषा स्तब्ध राहिली. जगत्सिंहहि स्तब्ध राहिला. दोघांतून कोणीहि बोलेना. आयेषेनें वर केलेली मान खालीं घातली.

राजपुत्र एकदम दचकला. त्याच्या हातावर उष्ण जलबिंदु पडले. राजपुत्रानें खालीं वाकून आयेषेच्या तोंडाकडे पाहिलें तों ती रडत आहे आणि तिच्या गौरवर्ण गालांवरून अश्रुधारा वाहत आहेत असें त्याला दिसलें.

राजपुत्र विस्मित होऊन म्हणाला, 'हें काय ? तुम्हीहि रडतां ?'

आयेषेनें कांहीं उत्तर न करतां हळूहळू हातांतलें गुलाबाचें फूल छिन्नभिन्न करून टाकिलें. फुलांचे शेकडों तुकडे झाल्यावर ती म्हणाली, 'युवराज, आज आपल्यापासून अशा रीतीनें निरोप घेण्याचा प्रसंग येईल असें माझ्या ध्यानींमनींहि नव्हतें. मी दुसरीं हवीं तीं दुःखें सहन करूं शकेन पण आपणाला या कारागृहांत एकट्याला या मानसिक यातना सोशीत टाकून जाणें माझ्याच्यानें होणार नाहीं.

जगतसिंह ! तुम्ही माझ्याबरोबर बाहेर या. मी आपणास तबेल्यांतून घोडा आणून देववित्यें. त्यावर स्वार होऊन आपण आज रात्रीच्या रात्रीं आपल्या छावणींत जा.'

त्या वेळीं जगतसिंहाची कुलदेवता भवानी, मूर्तिमंत त्याच्यापुढें येऊन उभी राहती, आणि वर माग म्हणती, तरी त्या गोष्टीचें त्याला इतकें आश्चर्य वाटलें नसतें. राजपुत्राला प्रथम यावर कांहीं उत्तर सुचेना. आयेषेनें पुनः म्हटलें, 'जगतसिंह ! राजकुमार ! चला.'

बराच वेळ गेल्यानंतर जगतसिंह म्हणाला, 'आयेषा ! तुम्ही मला कारागृहांतून मुक्त करणार आहां काय ? '

**आयेषा**—होय. याच क्षणीं करणार आहें.

**राज०**—आपल्या वडिलांच्या हुकुमावरून काय ?

**आयेषा**—त्याची अगदीं फिकीर करूं नका. तुम्ही छावणींत जाऊन पोंहचल्यावर मग मी त्यांना सर्व कांहीं सांगेन.

**राज०**—पाहरेकरी कसे सोडतील ?

आयेषेनें आपल्या गळ्यांतला रत्नहार काढून तो दाखवून म्हटलें, 'या बक्षिसाच्या लालचीनें ते सोडतील.'

राजपुत्रानें पुनः म्हटलें, 'ही गोष्ट आपल्या वडिलांना कळल्यावर ते आपले हालहाल करतील ?'

**आयेषा**—त्याची कुणाला येवढी पर्वा आहे !

**राज०**—आयेषा ! मी नाहीं जात.

हें ऐकून आयेषेची चर्या म्लान झाली. ती खिन्न होऊन म्हणाली, 'कां बरें ?'

**राज०**—तुम्ही माझे प्राणसुद्धां वांचविले. तेव्हां जिच्यापासून तुमच्या जिवाला त्रास होईल अशी गोष्ट माझ्या हातून कदापि घडणार नाहीं.

आयेषेचा कंठ दाटून आला. ती म्हणाली, 'नाहीं जायचें असाच का तुमचा अखेर निश्चय ठरला आहे ?'

**राज०**—आपण एकट्याच जा.

आयेषा पुनः स्तब्ध राहिली. पुनः अश्रुधारा वाहूं लागल्या. त्या ती मोठ्या कष्टानें आवरून धरूं लागली.

आयेषेला अशी मुकाट्यानें रडतांना पाहून राजपुत्राला चमत्कार वाटला. तो म्हणाला, 'आयेषा ? आपण कां रडतां ?'

आयेषा कांहीं बोलली नाहीं. राजपुत्र पुनः म्हणाला, 'आयेषा ! माझें म्हणणें ऐका. रडण्याचें कारण मला सांगण्यासारखें असेल तर सांगा. तुमच्या या निःशब्द रडण्याचें कारण दूर करण्यासाठीं मला आपले प्राण वेंचावे लागले तरी वेंचण्यास मी तयार आहें. मी बंदिवान् होऊन पडलों आहें, येवढयाच कारणासाठीं आयेषेच्या नेत्रांतून अश्रु पडत नाहींत. आपल्या वडिलांच्या कारागृहांत माझ्यासारखे अनेक बंदिवान कष्ट भोगीत आहेत.'

आयेषेनें राजपुत्राच्या प्रश्नाचें उत्तर न देतां पदरानें आपले डोळे पुसले, आणि क्षणभर कांहीं न बोलतां चित्त शांत झाल्यावर म्हटलें, 'राजपुत्र ! आतां मी रडणार नाहीं.'

आपण विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर मिळालें नाहीं, असें पाहून राजपुत्राला किंचित् वाईट वाटलें, व दोघेंहि पुनः कांहीं वेळ खालीं माना घालून उभीं राहिलीं.

इतक्यांत कोठडीच्या भिंतीवर एक व्यक्तीची सावली पडली; पण ती कोणींहि पाहिली नाहीं. हें तिसरें माणूस त्यांच्याजवळ येऊन उभें राहिलें, तरी त्याच्याकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं. क्षणभर खांबाप्रमाणें निश्चळ उभे राहून नंतर क्रोधावेशानें कंपित झालेल्या आवाजानें हें तिसरें मनुष्य म्हणालें, 'नबाबकन्ये ! वाः ! फार उत्तम !'

हे शब्द ऐकतांच दोघांनीं वर पाहिलें तों पुढें उस्मान् उभा !

अंगठी घेऊन गेलेल्या रक्षकाकडून सगळी हकीकत कळल्यावरून उस्मान आयेषेच्या शोधार्थ आला होता. उस्मानाला तेथें आलेला पाहून राजपुत्राला आयेषेविषयींची काळजी वाटूं लागली होती. आपल्यामुळें उस्मान व कतलूखान यांच्याकडून आयेषाचा तिरस्कार किंवा अपमान होतो कीं काय असें त्याला वाटूं लागलें. उस्मानानें जे रागानें व्यंगोक्तीचे शब्द उच्चारले, त्यांवरून त्याची शंका त्याला संभवनीय वाटूं लागली. ते व्यंगोक्तीचे शब्द ऐकतांच आयेषेला त्या शब्दांतला अभिप्राय पूर्णपणें कळून चुकला होता. क्षणमात्र तिचें तोंड लाल झालें.

तिच्या मनाची धीरता भंग पावल्याचें दुसरें कांहीं चिन्ह दिसलें नाहीं. तिनें शांतपणें उत्तर केलें, 'फार उत्तम म्हटलें, तें काय उस्मान ?'

उस्मान पहिल्यासारख्याच आवाजानें म्हणाला, 'रात्रींच्या वेळीं नबाबाच्या कन्येनें एकटें कैद्याशीं बोलत राहावें हें उत्तम. कैद्याला भेटण्यासाठीं रात्रींच्या वेळीं नियमाच्या विरुद्ध त्याच्या कोठडींत येणें हेंहि उत्तमच! नाहीं तर काय ?'

आयेषेच्या पवित्र अंतःकरणाला हे तिरस्काराचे शब्द असह्य झाले. तिनें उस्मानाच्या तोंडाकडे पाहून उत्तर दिलें. त्या वेळच्या तिच्या मानीपणाच्या स्वरासारखा स्वर तिच्या तोंडून उस्मानानें पूर्वी कधीं ऐकिला नव्हता. ती म्हणाली, 'इतक्या रात्रीं कारागृहांत येऊन बंदिवानाबरोबर गोष्टी करण्याची माझी खुषी. माझें हें करणें उत्तम कीं अधम त्याच्याशीं तुला काय करायचें आहे ?'

हें उत्तर ऐकून उस्मानाला विस्मय वाटला. विस्मयापेक्षांहि त्याला तिचा रागच अधिक आला. तो म्हणाला, 'मला कांहीं करायचें आहे कीं नाहीं, तें उद्यां सकाळीं नबाबसाहेबांच्या तोंडून कळेल.'

आयेषेनें पुनः पूर्वींच्यासारख्या स्वरानें म्हटलें, 'जेव्हां बाबा मला विचारतील, तेव्हां मी उत्तर देईन. तूं नकोस त्याची काळजी करायला.'

उस्मान पुनः व्यंगोक्तीनें म्हणाला, 'बरें, मीं विचारलें म्हणून काय बिघडलें ?'

आयेषा एकदम उठून उभी राहिली, आणि पूर्वीप्रमाणें थोडा वेळ त्याच्याकडे बारीक नजरेनें पाहूं लागली. अगोदरच तिचे नेत्र विशाल होते. आतां तर ते अधिकच विस्तृत दिसूं लागले. तिचें मुखकमलहि आतां अधिक विकसित झालेलें दिसलें. भ्रमरांप्रमाणें काळेभोर असलेल्या केसांसह तिचा शिरोभाग किंचित् एका बाजूला झुकला. दाट शेवाळ उगवलेलें पाणी वाऱ्याच्या जोरानें जसें कंप पावतें तसें तिचें हृदय वर खालीं होऊं लागलें. अगदीं स्पष्ट आवाजानें ती म्हणाली, 'उस्मान! तूं विचारतो आहेस तेव्हां मीहि पण सांगत्यें कीं हे बंदिवान माझ्या प्राणांचे मालक आहेत.'

त्या कोठडीवर तत्क्षणीं जर वीज पडती तरी तिनें तो रजपूत ( राजपुत्र ) किंवा पठाण ( उस्मान ) चकित झाले नसते, इतके ते दोघे आयेषेच्या या भाषणानें चकित झाले. अंधकारांत एकाएकीं दिव्याचा प्रकाश यावा, त्याप्रमाणें राजपुत्राच्या अंतःकरणाची स्थिति झाली. आयेषेच्या निःशब्द रोदनाचा अर्थ आतां त्याला उमगला. घूणाक्षरन्यायानें कांहीं कांहीं गोष्टींवरून उस्मानाला या पूर्वीच या गोष्टीची शंका आली होती, आणि त्यामुळेंच तो तिचा असा तिरस्कार करूं लागला होता; पण आयेषा आपल्या तोंडावर अशा

रीतीनें उघड उघड बोलेल ही गोष्ट त्याच्या स्वप्नींहि आली नव्हती. आयेषेचें भाषण ऐकून उस्मान अगदीं निरुत्तर झाला.

आयेषा पुनः म्हणूं लागली, 'उस्मान ! ऐक मी पुनः सांगत्यें. हा बंदिवान् माझा प्राणेश्वर आहे. यावज्जीव आतां माझ्या हृदयांत दुसऱ्या कोणालाहि स्थान मिळणार नाहीं. उद्यां जरी वधस्थानची भूमि यांच्या रक्तानें भिजून गेली— हे शब्द उच्चारतांना तिच्या अंगावर शहारे येत होते—तरी या मूर्तीची स्थापना आपल्या हृदयांत करून अंतकालपर्यंत मी तिची आराधना करीत राहीन. या क्षणानंतर यावज्जीव जरी मला यांचें दर्शन घडलें नाहीं, उद्यां जरी हे मुक्त होऊन शेकडों स्त्रियांच्या मंडळाचे मध्यवर्ति बिंदु होऊन बसले आणि आयेषेच्या नांवाचा धिक्कार करूं लागले, तरी मी यांच्याप्रेमाची आकांक्षा करणारी यांची दासी होऊन राहीन. आणखी ऐक, मी इतका वेळ यांच्याशीं कसल्या गुजगुज गोष्टी करीत होत्यें तें! मी म्हणत होत्यें कीं, गोड बोलून म्हणा कीं द्रव्याची लालूच दाखऊन म्हणा, पाहारेवाल्यांना आपणास वश करून घेतां येईल. बाबांच्या अश्वशालेंतून मी एक घोडा आणून देववीन. त्यावर बसून या बंदिवानानें आपल्या छावणीला निघून जावें. पण यांनीं त्या गोष्टीला संमति दिली नाहीं. दिली असती, तर या वेळीं यांचें नखाग्रसुद्धां तुझ्या दृष्टीस पडलें नसतें.'

आयेषेनें पुनः डोळ्यांतले अश्रू पुसले. नंतर थोडा वेळ स्तब्धराहून आवाज बदलून ती म्हणाली, 'उस्मान ! या सगळ्या गोष्टी सांगून मी तुमच्या मनाला क्लेश देत आहें, या अपराधाबद्दल मला क्षमा करा. तुमचें माझ्यावर प्रेम आहे, तसें माझेंहि तुमच्यावर प्रेम आहे. मी तुमच्याशीं असें आचरण करणें योग्य नाहीं. पण तुम्ही मला आज विश्वासाला अपात्र समजत आहां. आयेषेनें दुसरे अनेक अपराध केले असले, तरी ती अविश्वासी नाहीं. ती जें जें कांहीं करते, तें तें दुसऱ्याला उघड सांगण्याला तिला भीति वाटत नाहीं. मी आज तुमच्याजवळ जें सांगत आहें तेंच उद्या प्रसंग पडल्यास मी बाबांना देखील सांगेन.'

नंतर जगत्सिंहाकडे वळून ती म्हणाली, 'राजपुत्र ! आपणहि माझ्या अपराधाची क्षमा करावी. जर आज उस्मानानें माझ्या मनाला त्रास दिला नसता, तर या दग्ध हृदयाचा ताप केव्हांहि आपल्यापुढें मीं प्रकट केला नसता, किंवा कोणाहि माणसाच्या कानीं त्याबद्दल अवाक्षर गेलें नसतें.'

राजपुत्र स्तब्ध उभा होता. त्याचें अंतःकरण संतापानें जळत होतें.

उस्मान कांहीं बोलला नाहीं. आयेषा पुनः म्हणाली, 'उस्मान ! आणखी सांगत्यें. माझ्या हातून कांहीं दोष घडल्यास क्षमा करा. मी पूर्वींप्रमाणेंच तुमची प्रेमळ बहीण आहें, आणि बहीण म्हणून तुम्हीहि आपल्या माझ्यावरच्या पूर्वींच्या प्रेमांत उणें पडूं देऊं नका. प्राक्तनाच्या दोषामुळें या संतापसागरांत मीं उडी घेतली आहे. भ्रातृप्रेमासंबंधानें माझी निराशा करूं नका आणि मला अगाध सागरांत बुडवूं नका.'

इतकें बोलून दासीच्या परत येण्याची वाट न पाहतां आयेषा एकटी बाहेर पडली. उस्मान अल्प काळपर्यंत मन व्याकुळ झालेल्या माणसाप्रमाणें स्तब्ध उभा राहून नंतर आपल्या महालाकडे चालता झाला.

---

## प्रकरण सोळावें.

# चरणांजवळची दासी.



त्याच रात्रीं कतलूखानाच्या विलासमंदिरांत नाच झाला. त्या वेळीं तेथें कोणी दुसऱ्या नाचनारणी नव्हत्या आणि दुसरे कोणी प्रेक्षकहि नव्हते. मोगल बादशहा ज्याप्रमाणें आपल्या जन्मगांठीच्या दिवशीं दरबारी मंडळी बरोबर आनंदोत्सव करीत त्याप्रमाणें कतलूखानाचें नव्हतें. कतलूखानाचें चित्त पूर्णपणें स्वतःला सुखोपभोग व इंद्रियांची तृप्ति करून घेण्यांत निमग्न असे. आज रात्रीं तो आपल्या रंगमहालांत भोंवतालीं स्त्रिया गोळा करून त्यांच्या नाचगाण्याच्या रंगांत दंग होता. खोजे लोकांवांचून इतरांना तेथें जाण्याची मनाई होती. स्त्रियांत कोणी गात होत्या, कोणी वाद्यें वाजवीत होत्या, व कोणी नाचत होत्या. बाकीच्या कतलूखानाच्या भोंवतीं घेरा घालून पाहत व ऐकत बसल्या होत्या. इंद्रियांना मुग्ध करणाऱ्या द्रव्यांची तेथें रेलचेल होती. चला, आपण त्या विलासमंदिरांत प्रवेश करूं. आंत जातांच सतत शिंपडल्या जाणाऱ्या सुगंधयुक्त पाण्याच्या स्निग्ध वासानें सर्व अंग कसें थंडगार होऊन जात आहे ! चांदीच्या, हस्तिदंताच्या व स्फटिकाच्या शामदानांतून जळणाऱ्या दिव्यांच्या ज्योतींच्या तीव्र प्रकाशानें डोळे कसे दिपून जात आहेत; फुलांच्या अपरिमित राशी, कोठें माळा, कोठें ढीग, कोठें

गुच्छ, कोठें स्त्रियांच्या केशांतल्या वेण्या, व गळ्यांतले हार यांच्या रूपानें स्निग्धतर प्रभा प्रकट करीत आहेत. कोणा स्त्रियांच्या हातांत फुलांचे पंखे आहेत; कोणाच्या अंगावर फुलांचा पोषाख आहे; कोणी दुसऱ्यांच्या अंगावर फुलें उधळीत आहेत; फुलांचा सुगंध, गुलाबपाण्याचा सुवास, अत्तराच्या दिव्यांचा परिमळ, विलासिनी स्त्रियांनीं अंगाला लाविलेल्या उटण्यांचा व गंधाचा सौरभ, जिकडे पहाल तिकडे सुगंधच सुगंध ! दिव्यांचा लखलखाट, पुष्पांचा टवटवीतपणा, स्त्रियांच्या रत्नालंकारांची प्रभा, आणि विशेषें करून नेत्रकटाक्षांचा वर्षाव करणाऱ्या कामी स्त्रियांच्या नेत्रांचें तेज हीं सर्वत्र दिसत आहेत; सप्तसुरांचें संमेलन झालेला वीणादि वाद्यांचा मधुर ध्वनि आकाश व्यापून राहिला आहे; त्याहून अधिक स्पष्ट व मधुर असा स्त्रियांच्या कंठांतून निघणारा गीत ध्वनि त्या वाद्यांच्या सुरांत मिळून गेला आहे; त्याच्याबरोबरच योग्य ठेक्यावर पडणाऱ्या नर्तकीच्या पावलांच्या विक्षेपामुळें होणारा पायांतल्या अलंकारांचा झुमझुम नाद मनाला मोहून टाकीत आहे.

वाचकहो ! पद्मवनामध्यें वाऱ्यामुळें उठणाऱ्या तरंगांच्या बरोबर वर खालीं होणाऱ्या पाण्यांत हंसी जशी नाचते, त्याप्रमाणें ही पहा कशी नाचत आहे. प्रफुल्लित मुखकमळें असलेल्या स्त्रिया पहा कशा तिच्याभोंवतीं घेरा घालून उभ्या आहेत. निळें वस्त्र नेसलेली ती स्त्री पहा. तिचा निळ्या रंगाचा शालू ताऱ्यांनीं व्यापून गेलेल्या आकाशाप्रमाणें जरीच्या बुंदक्यांनीं कसा शोभायमान दिसत आहे ! या स्त्रीनें आपल्या वेणींत हिऱ्याचीं फुलें घातलीं आहेत. त्या स्त्रीचें कपाळ पहा केवढें विस्तीर्ण, प्रशांत, आणि स्वच्छ आहे ! अशा या सुंदर कपाळीं विलासमंदिरांतला का वास विधात्यानें लिहिला होता ? ही जी पुष्पाभरणें घातलेली काळी सावळी स्त्री दिसत आहे, हिला तो फुलांचा साज किती छान शोभत आहे ! स्त्रियांच्या देहाला शोभा देण्यासाठींच देवानें पुष्पें निर्माण केलीं असलीं पाहिजेत. ही पहा ! पूर्ण सौंदर्ययुक्त, किंचित् रक्तवर्ण ओष्ट असलेली एक स्त्री. हिचा खालचा किंचित् दाबला गेलेला ओठ आणि तिचें नील वस्त्र तिला किती शोभा देत आहे ! आणखी ही एक सुंदरी पहा. हिची वाकडी मान हंसाच्या मानेलासुद्धां खालीं पाहण्यास लावील. ही हंसत हंसत बोलतांना तिचीं कर्णभूषणें कशीं डुलत आहेत ! ही सुंदर केशांची रमणी कोण बरें असेल ? हिनें आपले कुरळे केस छातीपर्यंत लांब कां बरें सोडले आहेत ? कृष्णसर्प कमलिनीला कसे वेटाळे वेटाळे घालून बसतो, हें का तिच्या मनांतून दाखवावयाचें आहे ?

आणखी कतलूखानाजवळ बसून सोन्याच्या पात्रांत त्याच्यासाठीं मद्य ओतणारी ही स्त्री कोण बरें आहे ? बाकीच्या स्त्रियांना सोडून हिच्या पूर्ण लावण्ययुक्त देहाकडे कतलूखान इतका सतृष्णदृष्टीनें वारंवार पाहत आहे, अशी ही कोण ? आणि ही आपल्या नेत्रकटाक्षांनीं कतलूखानाचें हृदय बिनचूक भेदून टाकीत आहे तो कां ? ते तिचे मधुर कटाक्ष तुम्हीं ओळखलेत काय ? ही तर आपली विमला ! ही इतकें मद्य कोणासाठीं ओतीत आहे ? ओत, ओत, आणखी ओत. हिच्या पदराखालीं कट्यार आहेना ? आहे तर ! मग ती अशी कां बरें हंसत आहे ? कतलूखानानें तिच्या चेहेऱ्याकडे सारखी दृष्टि लाविली आहे. हे काय ? कटाक्ष ! ते काय ? कटाक्षच ! पुनः पुनः पहावें तर कटाक्षच ! कटाक्षांनो ! तुम्ही तर सुरापानानें धुंद झालेल्या कतलूखानाला अगदीं वेड लाविलें आहे. या तुमच्या कुशलतेमुळेंच मला वाटतें विमला इतर स्त्रियांपेक्षां कतलूखानाला इतकी प्यार होऊन बसली आहे. कां नाहीं होणार ? असें हंसणें, असें नटणें मुरडणें, असें मरम गुजगुज गोष्टी करणें आणि असे कटाक्ष असल्या-वर आणखी काय पाहिजे ? शिवाय मद्य आहेच ! कतलूखान ! सावध रहा बरें ! तो तरी काय करील ? ती मोहिनी दृष्टि विमलेच्या हातीं मद्यपात्र देत आहेना ! आहा ! काय ही गोड अवाजी ! कोण बरें गात आहे ? काय हा सूर ! ही गाणारी माणूस आहे कीं कोण अप्सरा आहे ? विमलाच गाणारणींच्या बरोबर गात आहे. काय हा सूर ! काय तान ! काय लय ! कतलूखान, हें काय ? तुझें मन कोठें गेलें आहे ? तूं काय पाहातो आहेस ? गातांना प्रत्येक समेचे वेळीं ती हंसत आहे आणि कटाक्ष टाकीत आहे. तुझ्या हृदयांत कट्यारीच्या घावाहूनहि जास्त खोल घाव करीत आहे; हें तूं पाहतोस ना ? या नुसत्या कटाक्षांनींच तो तुझे प्राण हरण करून नेईल. मग संगीताची जोड मिळाल्यावर काय विचारायचें आहे ? त्या कटाक्षाबरोबर तिचें मस्तक किंचित् हलत आहे, हें तूं पाहतोस ना ? मस्तक हलण्याबरोबर तिच्या कानांतलीं भूषणेंहि डुलत आहेत हें तूं पाहतोसच. हां ! पाज, पाज, पुनः मद्य पाज. अरे हें काय ? विमला उठून नाचावयाला लागली ! किती सुंदर ! काय तिचे हावभाव ! पाज. मद्य पाज. काय तिच्या अंगाची ठेवण ! कतलूखान, अहो जगत् प्रभु ! शुद्धीवर या. ओहोहो. कतलूच्या अंगाचा भडका होऊं लागला ! मद्याचा प्याला ! प्याला दे ! मेरी प्यारी ! आणखी काय ? हो त्यावर हंसणें, आणि नेत्रकटाक्ष, आणखी—आणखी काय ? दारू ! दारू दे !

कतलूखान अगदीं धुंद झाला. विमलेला हाक मारून तो म्हणाला, 'प्यारी! तूं कोठें आहेस?'

विमला कतलूखानाच्या खांद्यावर एक हात टाकून म्हणाली, 'ही दासी आपल्या चरणापाशींच आहे.' दुसऱ्या हातांत कट्यार—तत्क्षणींच एक भयंकर आरोळी मारून कतलूखानानें विमलेला दूर लोटून दिलें, आणि स्वतःहि धाडकन् जमीनीवर पडला. विमलेनें त्याच्या छातींत आपली तीक्ष्ण कट्यार सबंध खुपसली होती.

'डाकीण! राक्षशीण!' असें कतलूखान मोठ्यानें ओरडला. 'डाकीण नाहीं, राक्षशीण नाहीं, वीरेंद्रसिंहाची पत्नी आहे!' असें बोलून विमला महालांतून त्वरेनें पळून गेली.

कतलूखानाची बोलण्याची शक्ति झपाट्यानें कमी होत गेली. तथापि तो आपल्याकडून शक्य तेवढा जोर करून ओरडत होता. इतर स्त्रियाहि त्याच्याबरोबर आरडाओरड करूं लागल्या. विमलाहि आरडत ओरडत निघाली. ती दुसऱ्या खोलींत गेली. तेथें कोणी आपापसांत बोलत आहेत असें दिसलें. विमला धापा टाकीत पळत सुटली. एक खोली टाकून पलीकडे गेली. तेथें पाहारेकरी व खोजे लोक बसले होते. आरडाओरड ऐकून आणि विमलेची घाबरी मुद्रा पाहून त्यांनीं 'काय झालें?' असें तिला विचारलें.

विमलेच्या अंगीं चांगलें प्रसंगावधान होतें. ती म्हणाली, 'सर्वस्वी घात झाला. लवकर जा. रंगमहालांत कोणी मोगल शिरला आहे. त्यानें नबाबसाहेबांना ठार केलेंसें दिसतें.'

पहारेकरी व खोजे तात्काळ वेगानें तिकडे पळत गेले. इकडे विमलेनेंहि धापा टाकित टाकित अंतःपुराच्या दाराकडे धूम ठोकली. दाराशीं पाहारेवाले होते ते रात्रींच्या चैनीनें थकून भागून स्वस्थ निजले होते. त्यामुळें विमलेला निर्विघ्नपणें दारांतून पार पडतां आलें. जिकडे पाहावें तिकडे पाहाऱ्यांची हीच स्थिति असल्यामुळें तिला हटकल्यावांचून पळून जातां आलें. बाहेरच्या फाटकापाशीं पाहिलें तर तेथले पाहारेवाले जागे झाले होते. त्यांपैकीं एकानें विमलेकडे पाहून विचारलें, 'कोण? कोठें जातां?'

त्या वेळीं अंतःपुरांत मोठा कोलाहल माजून राहिला होता. सगळे लोक जागे होऊन तिकडेच पळत सुटले होते. विमला पाहारेवाल्यांना म्हणाली, 'असे बसलांत काय? आंत गडबड चाललेली तुम्हांला नाहीं ऐकूं येत?'

**पाहारे०**—कसली गडबड ?

**विमला**—अंतःपुरांत सर्वस्वी घात झाला आहे. नवाबसाहेबावर कोणीं हात टाकिला आहे.

हें ऐकतांच पाहारेवाले फाटक सोडून तिकडे धावत सुटले आणि विमला निर्विघ्नपणें बाहेर पडली. तिनें थोडेंसें दूर जाऊन पाहिलें तेव्हां एक पुरुष एका झाडाखालीं उभा असलेला तिला दिसला. त्याला पाहतांच हे अभिरामस्वामी असें तिनें ओळखलें. विमला त्यांच्या जवळ जातांच ते म्हणाले, 'मी फार उद्विग्न झालों होतों. किल्ल्यांत कसली गडबड चालली आहे ?'

विमलेनें उत्तर केलें, 'मी वैधव्यदुःखाबद्दलचा सूड उगवून आल्यें आहें. या ठिकाणीं जास्त कांहीं बोलतां येत नाहीं. लवकर आश्रमाला चला. मग मी साग्र हकीकत सांगेन. तिलोत्तमा तर आश्रमांत गेलीना ?'

अभिरामस्वामी म्हणाले, 'तिलोत्तमा आस्मानीच्या बरोबर आपल्यापुढेंच चालली आहे. लवकरच आपणास भेटेल.'

इतकें बोलणें झाल्यावर दोघेंहि झपाट्यानें चालूं लागलीं. थोड्या वेळानें आश्रमांत जाऊन पोंचल्यावर पाहिलें तर आयेषेच्या मेहेरबानीनें तिलोत्तमा सुद्धां नुकतीच आस्मानीबरोबर तेथें येऊन पोंचली होती. तिलोत्तमेनें अभिरामस्वामीच्या चरणीं वंदन करून रडण्याला सुरुवात केली. अभिरामस्वामी तिचें सांत्वन करून म्हणाले, 'ईश्वरेच्छेनें दुष्टांच्या हातून तुमची सुटका झाली आहे; तेव्हां आतां क्षणभरहि या देशांत राहूं नये. यवनांना जर आपला सुगावा लागला, तर ते आपणांस ठार करून नबाबाच्या मृत्यूनें झालेल्या शोकाचें परिमार्जन करतील. आपण आजच रात्रीं हें स्थान सोडून जाऊं या.'

सर्वांनाच हा विचार पसंत पडला.

---

## प्रकरण सतरावें.

# अंतकाळ.



विमलेच्या पलायनानंतर लागलाच एक राजदूत राजपुत्राच्या कारागृहांत येऊन म्हणाला, 'युवराज ! नबाबसाहेबांचा अंतकाळ येऊन ठेपला आहे. त्यांनीं आपली आठवण केली आहे !'

युवराज आश्चर्यचकित होऊन म्हणाला, 'हें काय म्हणतां?'

दूत म्हणाला, 'अंतःपुरांत कोणा शत्रूनें प्रवेश करून नबाबसाहेबांवर शस्त्राघात करून पलायन केलें आहे. अजून थोडी धुगधुगी आहे. पण आतां फार काळ लोटणार नाहीं. आपण लवकर चला, नाहीं तर भेट होणें कठीण आहे.'

राजपुत्रानें विचारलें, 'अशा वेळीं मला भेटीला बोलावण्याचें कारण काय?'

दूत म्हणाला, 'तें कोणास ठाऊक? मी फक्त निरोप पोंचविणारा आहें.'

युवराज त्या दूताबरोबर नबाबाच्या अंतःपुरांत गेला. तेथें जाऊन पाहतो तों कतलूखानाचा जीवनदीप खरोखरच अगदीं मालवण्याच्या बेतांत होता. अंत होण्याला फारसा आवकाश नव्हता. मृत्युपंथास लागलेल्या त्या पुरुषाच्या भोंवतालीं उस्मान, आयेषा, अज्ञान पुत्रवर्ग, प्रभृति मंडळी गोळा झाली होती. त्यांचा आक्रांत सुरू होता. त्यामुळें मोठी गडबड उडाली होती. बहुधा सगळींच माणसें रडत होतीं. हीं सगळीं कां रडतात तें न कळल्यामुळें लहान मुलेंहि रडत होतीं. आयेषा मोठयामोठयानें रडत नव्हती. तिच्या नेत्रांतून वाहणाऱ्या अश्रूनीं तिचें मुख मलिन झालें होतें. तिनें मुकाट्यानें आपल्या पित्याचें शीर मांडीवर घेतलें होतें. जगत्सिंहानें पाहिलें तेव्हां तिची मूर्ति त्याला शांत, गंभीर आणि निश्चेष्ट अशी दिसली.

युवराजानें प्रवेश करतांच ख्वाजा इसा नांवाचा वजीर त्याचा हात धरून त्याला कतलूखानाजवळ घेऊन गेला. बहिऱ्याशीं बोलतांना जसे मोठ्यानें बोलावें लागतें त्याप्रमाणें मोठ्यानें ओरडून तो म्हणाला, 'युवराज जगत्सिंह आले आहेत.'

कतलूखान क्षीण स्वरानें म्हणाला, 'मी शत्रु-मरत आहें. राग द्वेष सोडून द्या.'

जगतत्सिंह तो प्रसंग जाणून म्हणाला, 'आतां मीं त्या सर्वांना सोडून दिलें आहें.'

त्याच स्वरानें कतलूखान पुनः म्हणाला, 'मागणें मागतों—कबूल करा.'

जगत्सिंहानें विचारलें, 'काय कबूल करायचें?'

कतलूखान पुनः म्हणूं लागला, 'मुलें सर्व–युद्ध–कोरड'

आयेषेनें तोंडांत थोडेंसें सरबत घातलें.

'युद्ध–काम–नाहीं–तह–'

कतलूखान स्तब्ध राहिला. जगत्सिंहानें कांहींच उत्तर केलें नाहीं. कतलूखान उत्तराची अपेक्षा करीत त्याच्या तोंडाकडे पाहत राहिला. उत्तर आलें नाहीं, असें पाहून अतिशय कष्टी होऊन तो म्हणाला, 'नाहीं कबूल?'

युवराज म्हणाला, 'पठाण जर दिल्लीच्या बादशहाचा अधिकार कबूल करतील, तर मीहि तह करण्याविषयीं आग्रह करण्याचें पतकरीन.'

कतलूखान अर्धवट स्पष्ट अशा वर्णोच्चारांनीं म्हणाला, 'ओरिसा ?'

राजपुत्र त्याचा भावार्थ समजून म्हणाला, 'जर तहाच्या कामीं मला यश आलें, तर आपले पुत्र ओरिसाच्या गादीपासून भ्रष्ट होणार नाहींत.'

मृत्यूच्या क्लेशांनीं पीडलेल्या कतलूखानाच्या चर्येवर आतां थोडी टवटवी दिसूं लागली.

मरणाच्या पंथाला लागलेला कतलूखान म्हणाला, 'आपण–मोकळे–अल्ला–कल्याण.'

जगत्सिंह जाण्यास निघाला. आयेषेनें तोंड खालीं करून बापाच्या कानांत कांहीं सांगितलें. कतलूखानानें ख्वाजा इसाकडे पाहून पुनः जाण्यास निघालेल्या राजपुत्राकडे पाहिलें. इसानें राजपुत्राला म्हटलें, 'आपणांशीं आणखी कांहीं बोलण्याचें मनांत आहे असें दिसतें.'

राजपुत्र परत आला. कतलूखानानें म्हटलें 'कान—'

राजपुत्र समजला, आणि जवळ जाऊन त्यानें आपला कान कतलूखानाच्या तोंडाजवळ नेला. कतलूखान पूर्वींच्यापेक्षांहि अधिक अस्पष्ट स्वरानें म्हणाला, 'वीर—'

क्षणभर स्तब्ध राहून पुनः म्हणाला, 'वीरेंद्रसिंह—तहान !'

आयेषेनें पुनः तोंडांत थोडें पाणी घातलें.

'वीरेंद्रसिंहाची कन्या.'

राजपुत्राला विंचवानें दंश केल्यासारखें झालें. तो दचकून थोडें दूर सरून उभा राहिला. कतलूखान म्हणूं लागला, 'पित्याविरहित—मी पापी—तहान—'

आयेषा पुनः पुनः पाण्यानें त्याचें तोंड ओलें करीत होती; पण आतां कतलूखानाच्या तोंडांतून वाक्य निघणें कठीण झालें. तो धापा टाकीत टाकीत बोलूं लागला. तो म्हणाला, 'भडका—साध्वी—तुम्ही पहा.'

राजपुत्रानें म्हटलें, 'काय ?' कतलूखानाच्या कानाला हा प्रश्न मेघगर्जनेसारखा वाटला .कतलूखान म्हणाला,'ही–क—कन्ये—सारखी—पवित्र—तुम्ही–तहान ! तहान !—जातों—आयेषा !'

यापुढें त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले नाहींत. त्याला शक्तीच्या बाहेर परिश्रम झाले होते. श्रमाचा अतिरेक झाल्यामुळें अतिशय थकवा येऊन त्याची

निर्जीव मान जमीनीवर पडली आणि कन्येचें नांव तोंडावाटे निघतां निघतांच नबाब कतलूखानाचा प्राण गेला.

---

## प्रकरण अठरावें.

# वैर.

—०—

जगत्सिंह कारागृहांतून मुक्त होऊन आपल्या बापाच्या छावणींत गेल्यावर कतलूखानापाशीं कबूल केल्याप्रमाणें मोगल व पठाण यांच्यामध्यें त्यानें तह घडवून आणिला. पठाणांनीं दिल्लीच्या बादशहाची ताबेदारी पतकरली, तरी ओरिसाप्रांतावरचें स्वामित्व त्यांच्याकडेसच राहिलें होतें. तहाची सविस्तर हकीकत इतिहासांत नमूद आहे. या ठिकाणीं ती देण्याचें कारण नाहीं. तह झाल्यानंतर कांहीं काळपर्यंत दोन्ही पक्षांच्या फौजा होत्या त्याच जागीं राहिल्या होत्या. मोगलांशीं नवीनच झालेला स्नेह वृद्धिंगत करण्यासाठीं ख्वाजा इसा आणि सेनापति उस्मान हे कतलूखानाच्या मुलांना बरोबर घेऊन राजा मानसिंहाच्या छावणीला गेले. दीडशें हत्ती व दुसऱ्या कांहीं मौल्यवान् वस्तु राजाला नजराणा ह्मणून दिल्यावर राजाचें मन प्रसन्न झालें. राजानेंहि त्यांचा बहुमान करून सर्वांना खिलाती देऊन निरोप दिला.

अशा प्रकारें तह घडवून आणण्यांत आणि छावणी उठविण्यांत कित्येक दिवस गेले.

अखेर रजपुतांची फौज पाटण्याला जाण्याचा काळ येऊन पोंचला. तेव्हां एके दिवशीं दोन प्रहरीं जगत्सिंह कांहीं लोकांसह पठाणांच्या किल्ल्यांत उस्मान प्रभृति सरदारांचा निरोप घेण्यासाठीं गेला. कारागृहांतल्या भेटीनंतर उस्माननें राजपुत्राशीं आतांपर्यंत मित्रभाव कधीं दाखविला नव्हता. आजहि सामान्य गोष्टी बोलून त्यानें राजपुत्राला निरोप दिला.

उस्मानाचा निरोप खिन्न मनानें घेतल्यानंतर जगत्सिंह ख्वाजा इसाकडे गेला, आणि तेथून आयेषेकडे निरोप घ्यावयाला गेला. त्यानें आधीं अंतःपुरावरील एका खोजाच्या हातीं पुढें निरोप पाठविला कीं 'नबाबसाहेबांच्या मरणानंतर पुनः कधीं आपली भेट झाली नाहीं. मी आतां पाटण्याला जाण्याला निघालों आहें. पुनः आपली भेट होण्याचा फारसा संभव नाहीं. म्हणून आपणास सलाम करून जावें अशी इच्छा आहे.'

खोजानें थोड्या वेळानें परत येऊन नबाबाच्या कन्येचा निरोप म्हणून सांगितलें कीं, 'माझी व आपली इतःपर भेट होणें नाहीं. अपराधाची क्षमा असावी.'

हें ऐकून राजपुत्राच्या मनाला वाटत असलेला खेद फारच वाढला आणि तो आपल्या छावणीकडे जाण्यास निघाला. किल्ल्याच्या दारापाशीं येतो तों उस्मान त्याचीच वाट पाहत उभा असलेला त्याला दिसला.

उस्मानाला पाहून राजपुत्रानें त्याला पुनः सलाम केला आणि आपली वाट धरली. उस्मानहि त्याच्या मागोमाग जाऊं लागला. राजपुत्र म्हणाला, 'सेनापतिसाहेब ! मला कांहीं आज्ञा करावयाची असली तर करावी. मी ती पाळून कृतार्थ होईन.'

उस्मान म्हणाला, 'आपल्यापाशीं कांहीं विशेष गोष्ट बोलावयाची आहे. ती या तुमच्या बरोबरच्या माणसांदेखत बोलतां येत नाहीं. यांना पुढें जाण्यास सांगावें, आणि आपण एकटे माझ्याबरोबर यावें'.

राजपुत्रानें निःसंकोच भावानें बरोबरच्या माणसांना पुढें जाण्यास सांगितलें आणि आपण एकटा घोड्यावर स्वार होऊन त्या पठाणाबरोबर जाण्यास तयार झाला. उस्मानहि एक घोडा आणवून त्यावर स्वार झाला. थोडें अंतर आक्रमण करून गेल्यावर उस्मान राजपुत्राला घेऊन एका दाट अरण्यांत शिरला. या अरण्यांतल्या झाडीच्या मध्यभागीं एक मोडका वाडा होता. हा फार प्राचीन काळीं कोणातरी बंडखोरानें लपून बसण्याची जागा म्हणून बांधिला असावा असें दिसत होतें. तेथें बाहेर झाडाला घोडे बांधून उस्मान राजपुत्राला वाड्यांत घेऊन गेला. हा वाडा अगदीं ओसाड पडलेला होता. त्याच्या मध्यभागीं एक मोठा चौक होता. त्यांत एका बाजूला दफन करण्यासाठीं एक खाच खणून ठेविली होती. दुसऱ्या बाजूला एक चिता रचून ठेविली होती. पण प्रेत मात्र नव्हतें.

चौकांत येऊन पोंचल्यावर राजपुत्रानें विचारलें, 'हें काय आहे ?'

उस्मान म्हणाला, 'हें सगळें माझ्या हुकुमानें करण्यांत आलें आहे. आज जर मला मृत्यु आला, तर आपण मला या कबरींत दफन करावें. आणि कदाचित् आपण मेलां तर या चितेंत ब्राम्हणाकडून आपल्या देहाला अग्निसंस्कार करण्यांत येईल. आपणा दोघांशिवाय तिसऱ्या माणसाला यांतलें कांहीं कळूं देणार नाहीं.'

हें ऐकून राजपुत्र चकित झाला आणि म्हणाला, 'या सगळ्याचा अर्थ काय ?'

उस्मान म्हणाला, 'आम्हीं पडलों पठाण. एकदां संतापलों म्हणजे आम्ही बरें वाईट पाहत नसतों. या पृथ्वीतलावर आयेषेवर प्रेम ठेवणाऱ्या दोघां

माणसांना पुरेशी जागा नाहीं. दोघांपैकीं कोणी तरी एकानें प्राणत्याग केलाच पाहिजे. '

आतां मात्र राजपुत्राला या साऱ्या गोष्टीचा साद्योपांत उमज पडला, आणि क्षुब्ध होऊन तो म्हणाला, ' मग आपला काय विचार आहे ? '

उस्मान म्हणाला, ' आपल्या हातांत हत्यार आहे.; माझ्याशीं युद्ध करा. साधलें तर मला मारून आपला मार्ग खुला करून घ्या; नाहींतर माझ्या हातून मारले जाऊन मला तरी रस्ता मोकळा करून द्या. '

इतकें बोलून उस्माननें जगत्सिंहाला उत्तर देण्याला सुद्धां अवकाश न देतां त्याच्यावर एकदम हल्ला केला. तेव्हां राजपुत्रानें आत्मरक्षणार्थ म्यानांतून तलवार उपसली, आणि उस्मानाचे आघात चुकविण्यास सुरुवात केली. उस्माननें राजपुत्राच्या प्राणनाशार्थ पुनः पुनः आडवे तिडवे प्रहार केले. राजपुत्र मात्र चुकून देखील उस्मानावर आघात करीत नव्हता. तो केवळ स्वतःचें रक्षण करीत होता. दोघेहि शस्त्रविद्येंत निपुण होते. पुष्कळ वेळ त्यांचें युद्ध चाललें, पण कोणी कोणाला हटवूं शकले नाहींत. अखेर त्या यवनाच्या हातांतल्या शस्त्रानें राजपुत्राच्या अंगावर अनेक जखमा केल्या. सर्व अंग रक्तानें माखलें गेलें. उस्मानाला त्यानें एकहि वार केल नव्हता. अर्थात् उस्मानाच्या शरीरावर जखम मुळींच झाली नव्हती. रक्तस्रावामुळें शरीर क्षीण झालेलें पाहून आणि आजच्या युद्धांत आपणाला मरण हें निश्चित ठेवलेलें आहे असें वाटून जगत्सिंह व्याकुलतेनें म्हणाला, ' उस्मान ! थांब. मी हारल्याचें कबूल करतों. '

उस्मान मोठ्यानें हंसून म्हणाला, ' रजपूत सेनापति मरणाला भितात हें मला ठाऊक नव्हतें. युद्ध करा. मी तुम्हांस मारीन; क्षमा करणार नाहीं. तुम्हांला जिवंतपणीं आयेषेची प्राप्ति होणार नाहीं. '

राजपुत्र म्हणाला, 'मला आयेषेचा अभिलाष नाहीं. '

उस्मान हातांतली तलवार परजीत म्हणाला, ' तुम्हांला नसेल आयेषेचा अभिलाष; पण तिला तुम्ही हवे आहां ना ? आतां युद्धच करा. क्षमेचें नांव काढूं नका. '

राजपुत्र हातांतली तलवार फेकून देऊन म्हणाला, ' मी युद्ध करीत नाहीं. माझ्या संकटाचे वेळीं तुम्हीं माझ्यावर उपकार केले आहेत. मी तुमच्याशीं युद्ध करणार नाहीं. '

उस्मानानें क्रुद्ध होऊन राजपुत्राला लाथ मारली, आणि म्हटलें, 'जो शिपाई-गडी युद्धास भितो, त्याला अशाच रीतीनें मी युद्ध करायला लावीत असतों.'

आतां मात्र राजपुत्राच्यानें सहन करवेना. त्यानें झटकन् फेकून दिलेलें हातचें शस्त्र जमिनीवरून पुनः उचलून घेतलें आणि जसा कोल्ह्यानें दंश केल्यामुळें चवताळलेला एखादा सिंह प्रचंड उडी मारून त्याच्यावर तुटून पडतो त्याप्रमाणें राजपुत्रानें त्या यवनावर उडी घातली. ती उस्मानाच्यानें सहन करवली नाहीं. राजपुत्राच्या विशाल देहाच्या आघातानें उस्मान जमिनीवर कोलमडून पडला. राजपुत्रानें त्याच्या छातीवर बसून त्याच्या हातांतली तलवार काढून घेतली व आपली तलवार त्याच्या मानेवर ठेवून म्हटलें, 'कां ? आतां तरी युद्धाची हौस पूर्ण झाली कीं नाहीं ? '

उस्मानानें उत्तर केलें, ' मी जिवंत असेन तोंपर्यंत ती पूर्ण होणार नाहीं.'

**राज०**—आतांसुद्धां तुझा जीव मला घेतां येईल.

**उस्मान**—घे तर मग. न घेतलास तर तुझा वध करूं इच्छिणारा शत्रु जिवंत राहील.

**राज०**—राहूं दे. रजपूत त्याला डरायचा नाहीं. तुझा प्राण मीं घेतला असता; पण तूं माझा जीव वांचविला आहेस, म्हणून मीहि तुला जिवंत सोडतों.

इतकें बोलून आणि त्याचे दोन्ही हात व दोन्ही पाय बांधून ठेवून राजपुत्रानें उस्मानाच्या अंगावरचीं सगळीं शस्त्रें क्रमाक्रमानें काढून घेतलीं. मग त्याला मोकळा सोडून राजपुत्र म्हणाला, ' आतां खुशाल घरीं जा, तूं यवन असून रजपूताच्या शरीरावर लाथ मारलीस येवढयाचसाठीं मीं तुझी अशी दशा केली. नाहीं तर रजपूत इतके कृतघ्न नसतात कीं ते आपल्या उपकारकर्त्याच्या अंगावर हात टाकतील.'

मोकळा झाल्यावर कांहीं एक न बोलतां उस्मान मुकाट्यानें घोड्यावर बसून किल्ल्याकडे त्वरेनें चालता झाला.

राजपुत्रानें चौकांतल्या विहिरींतून वस्त्राच्या साह्यानें पाणी वर काढलें आणि त्या पाण्यानें आपलें सारें अंग धुऊन स्वच्छ केलें, आणि नंतर झाडाला बांधलेल्या घोड्यावर बसून तो निघाला. घोड्यावर बसल्यावर घोड्याच्या लगामाला वेलींच्या तंतूंनीं कोणीं बांधून ठेविलेलें एक पत्र त्याला आढळलें. तें लगामापासून सोडवून घेऊन पाहतों तें माणसाच्या केसांनीं बांधलें होतें आणि वर लिहिलें होतें कीं, ' हें पत्र दोन दिवसपर्यंत उघडूं नये. जर उघडलें तर याचा उद्देश सिद्धीला जाणार नाहीं.'

राजपुत्रानें क्षणभर विचार करून तें लिहिणाऱ्याच्या मर्जीनुरूप करण्याचें ठरविलें, आणि तें पत्र खिशांत घालतां घालतां घोड्याला टांच देऊन तो आपल्या छावणीकडे जाण्यास निघाला.

छावणींत जाऊन पोंचल्याच्या दुसरे दिवशीं आणखी एक पत्र एका दूताच्या हातीं त्याला आलें. हें आयेषेनें पाठविलें होतें. पण त्याचें वर्णन पुढल्या प्रकरणांत देऊं.

---

## प्रकरण एकोणिसावें.

# आयेषेचें पत्र.

———:०:———

आयेषा हातांत लेखणी घेऊन पत्र लिहायला बसली. तिची चर्या या वेळीं गंभीर व शांत होती. ती जगत्सिंहाला पत्र लिहीत होती. तिनें एक कागद घेऊन लिहायला सुरवातहि केली. प्रथम ‘ प्राणाहून प्रिय ’ असे शब्द लिहिले. पण लागलीच ते खोडून नुसता ‘ राजकुमार’ हा शब्द त्या जागीं लिहिला. पूर्वीचे शब्द खोडून ‘ राजकुमार ’ हा शब्द लिहितांना तिच्या डोळ्यांतून अश्रु गळून कागदावर पडले. तेव्हां तिनें तो कागद फाडून टाकिला. दुसरा कागद घेऊन ती पुनः लिहूं लागली. पण कांहीं ओळी लिहून होतात न होतात तों पुनः पूर्वीप्रमाणें अश्रूंनीं कागद भिजला. तेव्हां तेंहि पत्र आयेषेनें फाडून टाकिलें. आणखी एक वेळ ती पत्र लिहिण्यास बसली. आतां मात्र अश्रु गळल्यावांचून तिचें पत्र शेवटास गेलें. पत्र लिहून झाल्यावर ती तें वाचून पाहूं लागली. वाचतां वाचतां डोळ्यांत अश्रू उभे राहून तिला दिसेनासें झालें. तेव्हां आयेषेनें तें कसें तरी एकदांचें बंद करून दूताच्या हातीं रवाना केलें. तें पत्र घेऊन दूत राजपुत्राच्या छावणीकडे जाण्यास निघाला. आयेषा एकटी पलंगावर बसून अश्रु ढाळूं लागली.

जगत्सिंहाच्या हातीं पत्र गेल्यावर तो तें वाचूं लागला. तें पत्र असें—

‘ राजकुमार !

मी जी आपणास भेटल्यें नाहीं, ती माझें मन माझ्या ताब्यांत नव्हतें म्हणून नाहीं. आयेषेच्या ठायीं मनाचा खंबीरपणा नाहीं, असें समजूं नका. तसें आपणास वाटल्यास माझ्या मनाला क्लेश होतील. उस्मानानें स्वतःच्या हृदयांत अग्नि पेटवून घेतला आहे. मीं आपली भेट घेतली तर न जाणों त्याला क्लेश होतील,

येवढयाच साठीं मीं आपली भेट घेतली नाहीं. मीं आपली भेट न घेतल्यामुळें आपल्या मनाला वाईट वाटेल ही गोष्ट माझ्या मनांतहि आली नाहीं. माझीं स्वतःचीं सारीं सुखदुःखें व क्लेश हीं मीं जगदीश्वराच्या चरणीं अर्पण केलीं आहेत. मीं आपली भेट घेऊन निरोप दिला असता तर ते क्लेश मीं कांहीं त्रास न वाटतां सहन केले असते. आणि तुमची भेट न झाल्यामुळें होत असलेले क्लेशहि मी पाषाणहृदयी होऊन सहन करीत आहें.

मग हें पत्र लिहिण्याचें कारण काय ? मला आपल्यापाशीं कांहीं मागावयाचें आहे. त्यासाठींच हें पत्र लिहीत आहें. माझें आपल्यावर प्रेम आहे असें आपल्या ऐकण्यांत आलें असलें, तर तें आतां विसरून जा. या कुडींत प्राण आहे, तोंवर ही गोष्ट उघड करूं नये असा माझा संकल्प होता. पण परमेश्वराच्या इच्छेनें ती गोष्ट आपणास कळली. आतां ती विसरा.

मी आपल्या प्रेमाची आकांक्षा धरीत नाहीं. मला जें कांहीं द्यावयाचें होतें, तें मी देऊन चुकल्यें आहें. त्याचा मोबदला आपणाकडून मिळावा ही माझी इच्छा नाहीं. माझें प्रेम इतकें दृढ आहे कीं आपण जरी उलट माझ्यावर प्रेम केलें नाहीं, तरी मला सुख वाटेल. पण या गोष्टी आतां उगाच कशाला बोलूं ?

मीं आपणाला दुःखी पाहिलें होतें. आतां कशाहि प्रकारें कां होईना पण आपण सुखी आहां, येवढी गोष्ट आयेषेचें स्मरण करून तिला कळवा. तसें करण्याची आपली इच्छा नसली तर नका कळवूं. जर कधीं आपल्या मनाला दुःख झालें तर आयेषेची आठवण होईल काय ?

मी आपणास जें पत्र लिहिलें किंवा पुढें लिहीन त्यावद्दल लोक नांवें ठेवतील. मी निर्दोषी आहें, तेव्हां लोकांनीं जरी निंदा केली, तरी ती मनावर घेऊं नका. जेव्हां इच्छा होईल तेव्हां पत्र लिहा.

आपण जात आहां—तूर्त तरी आपण हा देश सोडून जाण्यास निघालां आहां. मागें हे पठाण स्वस्थ बसायचे नाहींत. पुनः आपणाला इकडे यावें लागेल असा संभव दिसतो; पण आतां पुनः आपल्याशीं माझी भेट होणार नाहीं. पुनः पुनः विचार करून मीं हा निश्चय कायम केला आहे. स्त्रियांचें हृदय आवरून धरण्याचें काम कठीण असतें. त्याहून अधिक साहस करणें उचित नाहीं.

आतां एकदांच मात्र आपली भेट घ्यावी अशी इच्छा आहे. आपण या प्रांतांत विवाहसंबंध केला, तर मला कळवा. मी त्या मंगलकार्याच्या समयीं हजर राहून तुमचा विवाह झालेला पाहीन. तुमच्या भावी राणीसाठीं मीं कांहीं किडूक मिडूक

जतन करून ठेविलें आहे. संधी मिळाल्यास मी आपल्या हातानें तें तिच्या अंगा-वर घालीन म्हणत्यें.

आणखी एक प्रार्थना आहे. ती ही कीं, जेव्हां आयेषेच्या मृत्यूची खबर आपणांस कळेल, तेव्हां एकदां इकडे येण्याचें करावें आणि आपल्यासाठीं मी पेटीमध्यें जें कांहीं ठेवून जाईन त्याचा माझ्या आग्रहास्तव स्वीकार करावा.

जास्त काय लिहूं ? पुष्कळ गोष्टी लिहाव्याशा वाटतात; पण तें व्यर्थ आहे. परमेश्वर तुम्हांला सुखी ठेवो, आयेषेची गोष्ट मनांत आणून दुःखी होऊं नका."

जगत्सिंह पत्र वाचल्यानंतर तें हातांत घेऊन डेऱ्यांतल्या डेऱ्यांत बराच वेळ इकडून तिकडे व तिकडून इकडे अशा फेऱ्या घालीत राहिला होता. नंतर एका-एकीं चटकन् एक कागद घेऊन पुढील पत्र त्यानें लिहिलें आणि दूताच्या हातीं रवाना केलें. तें पत्र असें—

'आयेषे ! तूं स्त्रीरत्न आहेस. जगांत लोकांना मनःपीडा व्हावी, हीच विधा-त्याची इच्छा दिसते. मला तुला कांहीं एक उत्तर लिहितां येत नाहीं. तुझ्या पत्रानें मी अत्यंत व्याकुळ झालों आहें. तुझ्या या पत्राचें उत्तर आतांच मी लिहूं शकत नाहीं. मला विसरूं नकोस. जगलों वांचलों तर एक वर्षानंतर याचें उत्तर देईन.'

पत्राचें हें उत्तर घेऊन दूत आयेषेकडे जाण्यास निघाला.

---

## प्रकरण विसावें.

# मालवण्याच्या बेतांत आलेला दिवा.



तिलोत्तमा आस्मानी बरोबर आयेषेचा निरोप घेऊन गेल्यापासून तिची कोणा-लाच कांहीं खबर कळली नव्हती. तिलोत्तमा, विमला, आस्मानी व अभिरामस्वामी यांचा कोणालाच पत्ता लागला नव्हता. जेव्हां मोगल व पठाण यांच्यामध्यें तह झाला, तेव्हां वीरेंद्रसिंह व त्याच्या परिवारांतली मंडळी यांच्या अश्रुतपूर्व दुर्दशेची हकीकत ऐकून दोन्ही पक्षांचें असें ठरलें कीं वीरेंद्राच्या स्त्रीचा शोध लावून त्यांच्याकडे मांदारणगडाचें आधिपत्य पुनः देण्यांत यावें. त्यासाठीं उस्मान, ख्वाजा इसा, मानसिंह प्रभृति मंडळी त्यांच्या शोधार्थ विशेष खटपटीस लागली होती. पण तिलोत्तमा आयेषेचा निरोप घेऊन आस्मानीबरोबर गेली,

यापलीकडे तिच्यासंबंधानें कोणाला कांहीं माहिती मिळाली नाहीं. अखेर निराश होऊन मानसिंहानें एका विश्वासु नोकराला मांदारणगडावर ठेवून त्याला आज्ञा केली कीं ' तूं येथें राहून मृत जहागिरदाराच्या स्त्रीचा व कन्येचा शोध लागला, तर त्यांना किल्ल्यांत ठेवून आमच्याकडे ये. आम्ही तुला चांगलें इनाम देऊं व आणखी एखादी जहागीरहि देऊं.'

याप्रमाणें व्यवस्था लावून मानसिंह पाटण्याला जाण्याच्या तयारीस लागला.

कतलूखानाच्या मरणसमयीं त्याच्या तोंडून निघालेले जे शब्द जगत्सिंहानें ऐकले होते त्यावरून त्याच्या हृदयांतला भाव कांहीं पालटला होता कीं नाहीं, तें कोणास कांहीं कळलें नव्हतें. परंतु येवढें खरें कीं, तो तिलोत्तमेच्या शोधासाठीं शरीरकष्टाकडे व द्रव्यव्ययाकडे पाहत नव्हता. पण हें सगळें तो केवळ पूर्वसंबंध लक्षांत घेऊन करीत होता कां मानसिंह प्रभृति मंडळी जशी ज्या दुसऱ्या कांहीं कारणामुळें शोधाच्या उद्योगाला लागली होती, त्याच कारणामुळें हाहि शोध करीत होता, अथवा तिलोत्तमेविषयींच्या प्रेमाचा त्याच्या अंतःकरणांत पुनः संचार होऊन त्याच्या प्रेरणेनें तो शोध करीत होता तें कोणाला कांहीं समजलें नव्हतें. कोणत्याहि कारणानें तो उद्योग करीत असो, पण तो त्याचा उद्योग निष्फळ होत होता.

मानसिंहाचें लष्कर छावणी उठवूं लागलें. दुसरे दिवशीं कूच करावयाचें होतें. निघण्याच्या आदले दिवशीं घोड्याच्या लगामाला बांधलेलें पत्र वाचण्याची वेळ येऊन पोंचली. राजपुत्रानें मोठ्या उत्कंठेनें पत्र उघडून वाचलें. त्यांत केवळ एवढाच मजकूर होता—

' जर तुला धर्माचें भय वाटत असेल, जर ब्रह्मशापाची भीति तुझ्या ठायीं असेल, तर हें पत्र वाचतांच याच जागीं एकटा ये.

अहं ब्राह्मणः'

हा मजकूर वाचून राजपुत्राला फार आश्चर्य वाटलें. एकदां वाटलें कीं हें एखाद्या शत्रूचें कपट असेल, तेव्हां जावें कीं नाहीं ? रजपुताच्या मनांत ब्रह्मशापाहून अन्य कोणतेंहि भय प्रबळ नसतें. तेव्हां जाण्याचा निश्चय ठरला. त्यानें आपल्या नोकरांना हुकूम केला कीं लष्कराच्या कूचाच्या वेळेपर्यंत मला जर येतां आलें नाहीं, तर माझी वाट पाहूं नका. लष्कर पुढें गेलें तरी हरकत नाहीं. मी त्यांना वर्द्धमान किंवा राजमहाल येथें गांठीन. याप्रमाणें हुकूम देऊन जगत्सिंह एकटा त्या पूर्वीच्या अरण्याकडे जाण्यास निघाला.

पूर्वी वर्णन केलेल्या पडक्या जीर्ण वाड्याच्या दाराशीं जाऊन पोंचल्यावर त्यानें आपला घोडा एका झाडाला बांधिला, आणि चोहींकडे नजर फिरविली. पण कोणीं कोठेंहि दृष्टीस पडलें नाहीं. तेव्हां तो त्या वाड्यांत शिरला. पाहतों तों चौकाच्या एका बाजूला पूर्वीप्रमाणें दफनासाठीं खड्डा खणलेला व दुसऱ्या बाजूला चित्ता रचलेली दिसली. चितेच्या लाकडापाशीं एक ब्राह्मण बसलेला होता आणि तो खालीं मान घालून रडत होता.

राजपुत्रानें विचारलें, 'महाराज ! आपण मला येथें येण्याविषयीं आज्ञा केली काय ?'

ब्राह्मणानें वर तोंड केलें. राजपुत्रानें जिज्ञासेनें त्याच्याकडे पाहिलें, तों हे अभिरामस्वामी असें त्यानें ओळखलें.

राजपुत्राच्या मनांत एकाच वेळीं विस्मय, कुतूहल व आल्हाद, असे तीन प्रकारचे भाव उत्पन्न झाले. त्यानें स्वामीला प्रणाम करून आतुरतेनें विचारलें, 'आपल्या दर्शनासाठीं केवढी खटपट केली म्हणून सांगूं ? आपण येथेंच राहतां काय ?'

अभिरामस्वामी डोळे पुसून म्हणाले, 'होय. अलीकडे मी येथेंच राहतों.'

स्वामीचें उत्तर ऐकतांच राजपुत्रानें प्रश्नावर प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. 'आपण माझें स्मरण कां केलें ? रडण्याचें कारण काय ?'

**स्वामी**—ज्या कारणासाठीं मी रडत आहें त्याचसाठीं मीं आपणास बोलावलें. तिलोत्तमा अगदीं मृत्युच्या दारांत पडली आहे.

तें ऐकून धीरे धीरे, मंदगतीनें, तो वीरश्रेष्ठ राजपुत्र खालीं बसला. आतां त्याला मागच्या एकेक गोष्टी आठवूं लागल्या, आणि एकेका गोष्टीचें स्मरण होतांच त्याच्या अंतःकरणांत कट्यारीचा एकेक आघातच जणूं काय होत होता ! देवाच्या मंदिरांतली पहिली दृष्टादृष्ट, शैलेश्वराला साक्ष ठेवून केलेली प्रतिज्ञा, महालांत प्रथमच झालेल्या परिचयाच्या वेळीं उभयतांच्याहि नेत्रांत उभे राहिलेले प्रेमाश्रु, त्या काळरात्रीं घडून आलेली गोष्ट, तिलोत्तमेला मूर्च्छा आली त्या वेळची तिची चर्या, यवनांच्या येथें असतांना झालेले तिचे हाल, कारागृहांत आपण स्वतः तिच्याशीं केलेलें निष्ठुरपणाचें वर्तन, आणि नंतर या वनवासांत तिला येत असलेला मृत्यु, या सगळ्या गोष्टी राजपुत्राच्या मनांत एकीमागून एक येऊन पावसाळ्यांतल्या वादळाप्रमाणें त्याच्या अंतःकरणावर ताडताड प्रहार करूं लागल्या आणि त्याचा पूर्वीचा दुःखाग्नि आतां शतपटीनें जास्त भडकला.

राजपुत्र बराच वेळ स्तब्ध बसून राहिला. तेव्हां अभिरामस्वामी म्हणूं लागले, 'विमलेनें यवनाचा वध करून ज्या दिवशीं आपल्या वैधव्याचा सूड उगवला त्या दिवसांपासून मी माझी मुलगी व नात यांना घेऊन यवनाच्या भयानें अज्ञानवासांत भ्रमण करीत आहें. त्याच दिवसांपासून तिलोत्तमेच्या आजाराला प्रारंभ झाला. ज्यामुळें ती आजारी पडली तें कारण तुम्हांला ठाऊकच आहे.'

जगतसिंहाच्या हृदयाला हे शब्द शल्याप्रमाणें भेदून गेले.

'तेव्हांपासून मी तिला निरनिराळ्या ठिकाणीं ठेवून निरनिराळ्या तऱ्हेचे औषधोपचार करीत आहें. मी तरुणपणापासून वैद्यशास्त्राचा अभ्यास करीत आलों आहें; अनेक रोगांची चिकित्सा केली आहें; दुसऱ्या कोणाला ठाऊक नाहींत अशीं पुष्कळ औषधें मला माहीत आहेत; पण मनाच्या रोगावर वैद्यशास्त्रांत औषध नाहीं. हें ठिकाण निर्जन असल्यामुळें याच वाड्याच्या एका गुप्त भागांत मी आज पांच सात दिवस राहत आहें. दैवयोगानें तुम्हांला येथें आणलेलें पाहून तुमच्या घोड्याच्या लगामाला मीं एक पत्र बांधून ठेविलें. पूर्वीपासून माझी इच्छा ही होती कीं माझ्या हातून तिलोत्तमेचा जीव वांचविण्याचें काम न झालें तर निदान तिच्या अंतकाळीं तुमची व तिची भेट तरी करवून द्यावी म्हणजे तिच्या मनाचें समाधान होईल. त्यासाठीं तुम्हांला मीं बोलाविलें. त्या वेळींसुद्धां तिलोत्तमा दुखण्यांतून उठेल अशी आशा नष्ट झाली नव्हती; पण मला कळून चुकलें होतें कीं दोन दिवसांत कांहीं आराम न पडला तर मात्र अंतकाळ येऊन पोंचला म्हणून समजावें. याचसाठीं दोन दिवसांनंतर पत्र वाचण्याविषयीं मीं सूचना दिली होती. ज्याचें भय मला वाटत होतें, तोच प्रसंग आतां येऊन पोंचला आहे. आतां तिच्या जगण्याची आशा राहिलेली नाहीं. तिचा जीवनदीप मालवण्याच्या बेतांत आहे.'

इतकें बोलून अभिरामस्वामी पुनः रडूं लागले. जगत्सिंहहि रडत होता. स्वामी पुनः म्हणाले, 'तुम्हांला तिलोत्तमेच्या दृष्टीसमोर एकदम जातां कामा नये. तसें केल्यास न जाणों तिला अशा स्थितींत हर्षाचा अतिरेक सहन होणार नाहीं. बाकी मी तुम्हांला येण्याविषयीं लिहिलें आहे आणि तुम्ही येण्याचा संभव आहे, ही गोष्ट मीं तिला अगोदरच सांगून ठेविली आहे. तुम्ही आल्याचें मी तिला कळवून येतों, मग तुम्ही भेट घ्या.'

असें बोलून स्वामी त्या मोडक्या वाड्याच्या ज्या भागांत स्त्रियांची जागा होती तिकडे गेले आणि थोड्या वेळानें परत येऊन म्हणाले, 'चला.'

राजपुत्र स्वामीच्या बरोबर अंतःपुराकडे गेले. पाहातात तों एक पडकीशी खोली होती, तींत एक मोडकातोडका पलंग होता आणि त्यावर दुखण्यानें क्षीण झालेली पण जिच्या रूपांत विशेष कांहीं फरक पडलेला नाहीं, अशी सुंदरी तिलोत्तमा निजली होती. या वेळीं देखील तिच्या लावण्याची मृदुलतर प्रभा तिच्या देहयष्टीला वेष्टून राहिली होती. मावळत असणाऱ्या चांदणीप्रमाणें ती मृत्युशय्येवरसुद्धां मनाला मोहून टाकीत होती. तिच्याजवळ एक विधवा स्त्री बसली होती आणि ती तिचा हात चेपीत होती. तिच्या अंगावर कांहीं एक अलंकार नव्हते. ती दीन, मलिन, विधवा विमल ही होती. राजपुत्रानें प्रथम तिला ओळखलें नाहीं. कोणी झालें तरी कसें ओळखणार? जी पूर्वी भर तारुण्यांत होती, ती आतां वृद्धेसारखी दिसत होती.

राजपुत्र येऊन तिलोत्तमेच्या बिछान्यापाशीं उभा राहिला, तेव्हां तिलोत्तमेनें डोळे मिटले होते. अभिरामस्वामीनें तिला हाक मारून म्हटलें, 'तिलोत्तमे! राजकुमार जगत्सिंह आले आहेत.'

तेव्हां तिलोत्तमेनें डोळे उघडून राजपुत्राकडे पाहिलें. त्या वेळची तिची दृष्टि कोमल, केवळ स्नेहव्यंजक होती. तिच्यांत तिरस्काराचें कांहीं एक लक्षण नव्हतें. तिनें पाहातांबरोबर दृष्टि खालीं लाविली. पाहतां पाहतां तिच्या नेत्रांतून खळखळ अश्रुधारा वाहूं लागल्या. राजपुत्राच्यानें आतां राहवेना. लज्जा त्याच्यापासून पार पळाली. तिलोत्तमेच्या पायापाशीं मुकाट्यानें बसून नेत्रांतल्या अश्रुधारांनीं तो तिच्या कोमल देहाला सिंचन करूं लागला.

---

## प्रकरण एकविसावें.

# निष्फळ झालेलें स्वप्न.



बापावांचून अनाथ झालेली ती मुलगी अंथरुणाला खिळली होती. जगत्सिंह तिच्यापाशीं बसला होता. अशा रीतीनें दिवस गेला, रात्र गेली, पुनः दिवस उगवला; तोहि गेला. त्याच्या मागून रात्रहि गेली; पण रजपूतकुलाला भूषविणारा तो राजपुत्र त्या मोडक्यातोडक्या पलंगापाशीं बसून शुश्रूषा करीत होता. त्या दीन, शब्दहीन विधवेच्या कामांतहि तो सारखा मदत करीत होता. मानसिक व्यथेनें क्षीण झालेली ती सुंदरी आपल्याकडे पाहते कीं नाहीं, हिमदंवानें

कोमेजून गेलेल्या कमळाप्रमाणें दिसणाऱ्या तिच्या मुखावर पूर्वीसारखें हास्य दिसतें कीं नाहीं, तें पाहण्यासाठीं तो तिच्या मुद्रेकडे वारंवार पाहत होता.

त्याची छावणी कोठें ? सैन्य कोठें ? छावणी उठवून लवकर पाटण्याकडे निघून गेलेले, त्याचे नोकरचाकर तरी कोठें आहेत ? ते दारुकेश्वर नदीच्या तीरावर आपल्या धन्याच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत बसले आहेत. कोठें आहे तो त्यांचा धनी ? तो भयंकर उष्णतेनें सुकून गेलेल्या सुकुमार पुष्पकलिकेला नयनाश्रूंचें सिंचन करून टवटवी आणण्याच्या खटपटींत आहे.

ती फुलाची कळी हळू हळू पुनः प्रफुल्लित होऊं लागली. या जगांत प्रेम हा एक मोठा जादुगार आहे. व्याधीवर उत्तमांत उत्तम औषध म्हणजे प्रेम हेंच. तें नसतें तर हृदयाच्या व्याधी कशा बऱ्या झाल्या असत्या ?

जसा मालवण्याच्या बेतांत आलेला दिवा थेंब थेंब तेल मिळाल्यानें हळू हळू प्रज्वलित होतो, ज्याप्रमाणें उष्णतेनें वाळून चाललेली वेल आषाढांतल्या नव्या पर्जन्य वृष्टीनें हळू हळू पुनः विकास पावते, त्याप्रमाणें जगत्सिंहाची प्राप्ति झाल्यानें तिलोत्तमेला दिवसेंदिवस नवें जीवन मिळाल्यासारखें झालें.

हळूहळू शक्ति येऊन ती पलंगावर बसूं लागली. विमला नसली म्हणजे जवळ जवळ बसून इतके दिवसांच्या मनांतल्या गुजगोष्टी त्यांना बोलतां येत. त्यांनीं परस्परांना किती गोष्टी सांगितल्या, मनानें केलेल्या किती अपराधांची क्षमा करण्यांत आली, आणि किती आशा मनांतल्या मनांत उदय पावून मनांतच विलयाला गेल्या, त्याहि सांगितल्या. जागृतावस्थेंत किंवा निद्रेंत किती मनाला मोहित करणारीं स्वप्नें दिसलीं, तेंहि कथन केलें. आजारीपणांत अंथरुणावर तिलोत्तमा अचेतन पडून राहिली असतां एके दिवशीं तिला एक स्वप्न पडलें होतें. तें तिनें सांगितलें. ती म्हणाली,

'वसंत ऋतु नुकताच लागला होता. त्याच्या शोभेनें परिपूर्ण असा एक लहानसा डोंगर होता. त्या डोंगरावर आपण दोघें पुष्पक्रीडा करीत होतों. फुलें वेंचून आणून त्यांच्या राशी केल्या होत्या. मीं तीं फुलें गुंफून हार तयार केले. त्यांतला एक हार मीं स्वतःच्या कंठांत घातला आणि दुसरा आपल्या गळ्यांत घातला. पण आपल्या कमरेच्या तलवारींत अडकून तो तुटला. तेव्हां मीं म्हटलें, 'आतां आपल्या कंठांत मी हार घालायची नाहीं, पायांत बेडी मात्र घालीन.' असें म्हणून मीं फुलांची बेडी तयार केली, आणि ती आपल्या पायांत घालणार, इतक्यांत आपण मागें सरलां. आपण मागें मागें सरकत होतां आणि मी पुढें

पुढें जात होत्यें. शेवटीं मी आपल्या मागें लागल्यें. आपण झपाट्यानें डोंगर उतरूं लागलां. वाटेंत एक लहानसा ओढा लागला. त्याच्या वरून उडी मारून आपण पार गेलां. मी पडल्यें बायकोमाणूस. उडी मारून मला पार जातां येईना. ज्या ठिकाणीं ओढयाचें पात्र अरुंद होतें त्या ठिकाणीं तो उतरून जातां येईल या आशेनें ओढयाच्या कांठाकांठानें मी डोंगरावरून उतरूं लागल्यें. ओढयाचें पात्र अरुंद होण्याचें तर दूरच राहिलें, पण उलट जसेंजसें मी जाऊं लागल्यें तसतसें तें पात्र अधिकच रुंद होत गेलें. ओढयाची नदी झाली, आणि लहान नदीची पुढें मोठी नदी झाली. आपण दिसेनासे झालां. नदीची कड अतिशय उंच व जागा अतिशय उंचसखल होती. माझा पाय चालेना. त्यांतून माझ्या पाया-खालचीं मातीचीं ढेंकळें सुटून खालीं नदींत पडूं लागलीं. त्यांचा मोठा आवाज होऊं लागला. खालीं नदींत एक प्रचंड भोंवरा होता. त्याच्याकडे नुसतें पाहण्याचें सुद्धां मला धैर्य होईना. तेव्हां पुनः डोंगरावर चढून या नदीच्या प्रवाहांत पड-ण्यापासून आपली सुटका करून घेण्याचा यत्न मी करूं लागल्यें. वाट बिकट, पाय उठेनात. मी मोठ्यानें रडूं लागल्यें. इतक्यांत यमस्वरूपी कतलूखान अक-स्मात् पुनः जिवंत होऊन माझी वाट अडवून समोर उभा राहिला. माझ्या गळ्यांतला हार याच क्षणीं जड लोखंडी सांखळी बनला. फुलांचा केलेला गजरा हातांतून गळून पायांवर पडला आणि लोखंडाची बेडी होऊन माझ्या पायांत अडकला. एकाएकीं माझें अंग तेथें खिळल्यासारखें झालें. तेव्हां कतलूखानानें माझी मानगुटी धरून, गरगर फिरवून, खालीं नदीच्या प्रवाहांत फेकून दिलें.'

स्वप्नाची गोष्ट पुरी झाल्यावर तिलोत्तमा डोळ्यांत अश्रु आणून म्हणाली, 'युवराज ! माझें हें निवळ स्वप्न नाहीं. आपल्यासाठीं तयार केलेला फुलांचा गजरा खरोखरच लोखंडाची बेडी होऊन ती माझ्या पायांत पडली असें मला वाटतें. जो पुष्पहार मीं आपल्या गळ्यांत घातला होता तो मात्र आपण तलवारीनें तोडून टाकिलात.'

युवराजानें तेव्हां हंसून आपल्या कमरेची तलवार काढली आणि ती तिलो-त्तमेच्या चरणांपाशीं ठेविली. तो म्हणाला, 'तिलोत्तमे ! तुझ्यापुढें हा मी तल-वारीवांचून उभा आहें. आतां माझ्या गळ्यांत पुष्पहार घालून पहा, या तलवारीचे तुझ्यासमोर दोन तुकडे करून टाकतों.'

तिलोत्तमा यावर निरुत्तर झालेली पाहून राजपुत्र म्हणाला, 'तिलोत्तमे ! मी कांहीं थट्टा करीत नाहीं.'

तिलोत्तमा लज्जेनें खालीं तोंड घालून उभी राहिली.

त्याच दिवशीं संध्याकाळच्या वेळीं अभिरामस्वामी दुसऱ्या एका खोलींत बसून दिव्याच्या प्रकाशांत पोथी वाचीत होते. राजपुत्र तेथें जाऊन नम्रपणें म्हणाला, 'महाराज ! माझी एक विनंति आहे. तिलोत्तमेला आतां येथून दुसरीकडे जाण्याचे कष्ट सोसण्याइतकी शक्ति आली आहे. तेव्हां आतां येथें राहून हालांत दिवस काढण्याचें काय प्रयोजन आहे ? उद्यांचा दिवस प्रयाण करण्यास अशुभ नसला तर हिला मांदारणगडाला घेऊन जाऊं. या गोष्टीला जर आपली संमति असेल तर अंबराधिपतीच्या वंशांत आपली नात देऊन मला कृतार्थ करावें.'

अभिरामस्वामी पोथी दूर सारून उठले आणि राजपुत्राला त्यांनीं गाढ आलिंगन दिलें. त्या गडबडींत पोथीवर पाय पडल्याचें सुद्धां त्यांना कळलें नाहीं.

राजपुत्र स्वामींच्या भेटीस आला, तेव्हां त्याच्या मनांतला भाव ओळखून विमला व आस्मानी हळूहळू राजपुत्राच्या मागोमाग गेल्या होत्या. बाहेर उभ्या राहून त्यांनीं आंतलें सगळें कांहीं ऐकलें होतें. राजपुत्रानें बाहेर येऊन पाहिलें तों विमलेची चर्या पालटून पूर्ववत् झालेली दिसली. ती एकसारखी हंसत होती, थट्टेनें आस्मानीचे केश उडवीत होती व तिला बोटानें टोचीत होती. आपणास मारपीट केल्याचें आस्मानीच्या ध्यानींमनींहि नव्हतें. ती आपली विमलेपुढें नृत्यकौशल्याची परीक्षा देत होती. तें पाहून राजपुत्र आपला एका बाजूनें स्मित करीत निघून गेला.

---

## प्रकरण बाविसावें.

# समाप्त.



फूल फुललें. अभिरामस्वामीनें मांदारणगडाला जाऊन तेथें मोठ्या समारंभानें आपल्या नातीचा जगतसिंहाशीं विवाह करून दिला.

या समारंभासाठीं जगत्सिंहानें आपल्या बरोबरच्या मंडळीस जहानाबादेहून निमंत्रण करून आणिलें होतें. तिलोत्तमेच्या वडिलांचे बरेचसे नातलगहि निमंत्रण चिठ्ठयांवरून मंगलकार्यासाठीं आले होते. त्यामुळें लग्नघर आनंदमय झालें होतें.

आयेषेच्या विनंतीवरून जगत्सिंहानें तिलाहि निमंत्रण केलें होतें. तीहि पोर वय असलेला आपला धाकटा भाऊ व गडी माणसें यांच्यासह विवाहसमारंभाला आली होती.

आयेषा यवन जातीची होती, तरी जगत्सिंह आणि तिलोत्तमा यांचें तिच्यावर विशेष प्रेम असल्यामुळें इतर मैत्रिणींबरोबर तिलाहि अंतःपुरांतच ठेवण्यांत आलें होतें. वाचकांना कदाचित् वाटेल कीं आयेषेचें अंतःकरण पोळलें असल्यामुळें या विवाहोत्सवामुळें तिला आनंद वाटला नसेल; पण खरा प्रकार तसा नव्हता. आयेषा आनंदानें प्रफुल्लित होऊन सर्वांना आनंदित करीत होती. शरदृतूंतल्या प्रफुल्लित कमळाच्या मंद आंदोलनाप्रमाणें तिचें मृदु मधुर हास्य सर्वत्र शोभा पसरीत होतें.

विवाहसमारंभ संध्याकाळीं समाप्त झाला. नंतर आयेषा आपल्या परिवारांसह परत जाण्याच्या तयारीस लागली. तिनें हंसत हंसत विमलेचा निरोप घेतला. विमलेला कांहींच ठाऊक नव्हतें. म्हणून ती हंसून म्हणाली, 'नबाबजादी ! आतां आपल्या लग्नाच्या वेळीं आपण आम्हांला बोलवालच ?'

विमलेचा निरोप घेतल्यावर आयेषेनें तिलोत्तमेला बोलावून तिला एका एकांताच्या जागीं नेलें, आणि तिचा हात धरून म्हटलें, 'ताई ! मी येत्यें. तुम्ही दोघें अक्षयीं सुखानें कालक्रमणा करा, हा माझा तुम्हांला कायावाचामनेंकरून आशीर्वाद आहे.'

तिलोत्तमा म्हणाली, 'आतां पुनः किती दिवसांनीं आपली भेट होईल ?' आयेषा म्हणाली, 'भेटीची आशा कशी बाळगायची ?' तें ऐकून तिलोत्तमा खिन्न झाली. दोघीहि स्तब्ध उभ्या राहिल्या.

क्षणभरानें आयेषा म्हणाली, 'भेट होवो न होवो, तुम्ही आयेषेला विसरूं नका म्हणजे झालें.'

तिलोत्तमेनें हंसून उत्तर केलें, 'मी जर तुम्हांला विसरलें, तर युवराज माझें तोंड देखील पाहाणार नाहींत.'

आयेषा गंभीरतेनें म्हणाली, 'या बोलण्यानें माझें समाधान व्हावयाचें नाहीं. तुम्ही माझी गोष्ट युवराजाजवळ बोलूंसुद्धां नका. येवढें माझें तुम्ही ऐकाच.'

तिलोत्तमेला ठाऊक होतें कीं आयेषेनें जगत्सिंहासाठीं साऱ्या जन्माच्या सुखावर पाणी सोडलें आहे, आणि या गोष्टीमुळें जगत्सिंहाच्या अंतःकरणाला शल्यासारख्या टोंचण्या लागल्या आहेत. अर्थात् आयेषेचें नांव काढतांच त्यांच्या अंतःकरणाला दुःख होईल म्हणून तिलोतमेनें तसें करण्याचें कबूल केलें. तेव्हां आयेषा म्हणाली, 'मला तुम्हीं विसरूं नये, म्हणून आठवणी दाखल जें मी हें देत आहें त्याचा अव्हेर करूं नका.'

इतकें बोलून आयेषेनें एका दासीला बोलाविलें आणि तिला कांहीं सांगितलें. आयेषच्या आज्ञेप्रमाणें तिनें एक हस्तिदंती पेटी तबकांत घालून कांहीं रत्नालंकार आणिले. आयेषेनें आपल्या हातानें ते अलंकार तिलोत्तमेच्या अंगावर घातले.

तिलोत्तमा एका श्रीमंत जमीनदाराची मुलगी होती. तथापि ती देखील त्या अलंकारांची अद्भुत कारागिरी आणि त्यांतल्या अमूल्य हिरे वगैरे रत्नांचें विलक्षण तेज पाहून चकित झाली. वस्तुतः आयेषेनें बापानें तिला दिलेले दागिने मोडून इतरांना दुर्लभ असे हे रत्नांचे दागिने तिलोत्तमेसाठीं तयार करविले होते. तिलोत्तमा त्यांची प्रशंसा करूं लागली. तेव्हां आयेषा म्हणाली, 'ताई ! यांची येवढी प्रशंसा कशाला पाहिजे ? तूं जें रत्न आज हृदयांत धारण केलें आहेस त्याच्या पायाच्या धुळीच्या कणाचीहि बरोबरी या अलंकारांना करितां येणार नाहीं.' हे शब्द उच्चारतांना आयेषेच्या नेत्रांत जे अश्रु उभे राहिले, ते आवरून धरण्यास तिला किती कष्ट पडले ते तिलोत्तमेला कोठून कळणार ?

अलंकार घालणें झाल्यावर आयेषेनें तिलोत्तमेचे दोन्ही हात आपल्या हातांत धरले आणि तिच्या तोंडाकडे पाहत ती राहिली. ती मनांतल्या मनांत विचार करूं लागली कीं 'सरलप्रेमाची प्रत्यक्ष मूर्तिच कीं काय असें हें रूप पाहून वाटतें कीं प्राणेश्वराच्या मनाला दुःख असें कधीं व्हावयाचेंच नाहीं. विधात्याच्या मनांत अन्य कांहीं इच्छा नसला तर त्यांच्या चरणापाशीं मी एवढीच प्रार्थना करत्यें कीं हिच्यापासून राजपुत्राला चिरकाळ सुख लागावें.'

आयेषा तिलोत्तमेला म्हणाली; 'तिलोत्तमे ! मी आतां निघाल्यें. तुझे यजमान आतां गडबडींत असतील. त्यांचा निरोप घेण्याला गेल्यें तर उगाच उशीर होईल. म्हणून मी तसें करीत नाहीं. परमेश्वर तुम्हां दोघांना उदंड आयुष्य देवो. मीं जीं रत्नें तुला दिलीं आहेत, तीं अंगावर घालीत जा. आणि माझें—तुझें—जें मुख्य सारभूत रत्न तें आपल्या हृदयांत जपून ठेव.'

'तुझें मुख्य रत्न' हे शब्द उच्चारतांना आयेषेचा कंठ दाटून आला होता. तिलोत्तमेनें पाहिलें तो आयेषेच नेत्रांत अश्रूंचा लोट आला होता.

समदुःखिनीप्रमाणें तिलोत्तमेनें म्हटलें, 'अशा रडतां कां ?' या प्रश्नानें तर आयेषेच्या नेत्रांतले अश्रु अधिकच जोरानें खळखळां वाहूं लागले. आयेषा आतां क्षणभरसुद्धां न थांबतां जलदीनें घराबाहेर पडली आणि मेण्यांत जाऊन बसली.

आयेषा जेव्हां आपल्या घरीं जाऊन पोंचली; तेव्हां रात्र झाली होती. घरीं आल्याबरोबर पोषाख बदलून ती गार वारा येई अशा एका खिडकीपाशीं उभी राहिली. त्यावेळीं तिनें सोडलेल्या वस्त्रापेक्षांहि अधिक कोमल नीलवर्ण गगनमंडळांत लक्षावधि तारा चमकत होत्या. मंद मंद वाऱ्याच्या झुळुकीबरोबर अंधेरांत उभे असलेल्या वृक्षांच्या पानांचा आवाज होत होता. किल्ल्याच्या शिखरावर घुबड मृदुगंभीर शब्द करीत होते. समोर किल्ल्याच्या तटाच्या पायथ्यापाशीं जेथें आयेषा उभी होती, तेथें जलानें परिपूर्ण अशा खंदकांत आकाशाचें स्थिर प्रतिबिंब पडलें होतें.

आयेषा खिडकींत बसून बराच वेळ विचार करीत होती. तिनें आपल्या बोटांतून एक अंगठी काढली. त्या अंगठींत विष भरून ठेविलें होतें. एकदां तिला वाटे, ' तें विष पिऊन सर्व तृष्णा एकदम निवारण करून टाकावी.' पुनः तिला वाटे, ' याच साठीं का परमेश्वरानें आपणाला या जगांत पाठविलें आहे ? जर हें दुःख सहन करण्याची माझे ठायीं शक्ति नव्हती, तर मीं स्त्रीजन्म घेतलाच कां ? जगत्सिंहाला हें कळलें तर ते काय म्हणतील ? '

तिनें ती अंगठी पुनः बोटांत घातली. पुनः काय वाटलें कोण जाणे, तिनें ती बोटांतून काढली. पुनः तिनें विचार केला कीं हा लोभ आवरणें स्त्रीजातीला असाध्य आहे. म्हणून लोभ उत्पन्न करणाऱ्या या वस्तूचा त्यागच करणें चांगलें.

असा विचार करून आयेषेनें ती विषाची अंगठी किल्ल्याच्या खंदकांत टाकून दिली.

समाप्त.



कल्याणीहि अधिकाधिक खोल जाऊन लपण्याचा यत्न करूं लागली.

# आनंदमठ.

## उपोद्घात.

एक अतिविस्तृत अरण्य होतें. या अरण्यांत बहुतेक शालवृक्ष होते. तरी इतर जातींचेहि वृक्ष तेथें होते. झाडी इतकी गर्द होती कीं, वृक्षांच्या शेंड्यांत शेंडे, फांद्यांत फांद्या व पानांत पानें अडकून जणू काय गुंफा बनली होती! कोठें फट नाहीं कीं छिद्र नाहीं. फार काय, पण प्रकाश किरणांना आंत येण्याची सुद्धां मुष्किल! अशा रीतीनें पानांचा अनंत समुद्र—कित्येक कोसपर्यंत पसरलेला समुद्र—वाऱ्याच्या तरंगाबरोबर पानांच्या हालण्यानें वाऱ्यांच्या लाटावर लाटा उत्पन्न करीत होता. खालीं निबिड अंधकार होता. भर माध्यान्हीं सुद्धां उजेड लख्ख पडायचा नाहीं. किती भयानकता! त्या अरण्यांत मनुष्य केव्हांहि फिरकत नसे. पानांचा सतत होणारा मर्मर शब्द आणि वन्य पशुपक्ष्यांच्या गर्जना, यांच्याशिवाय दुसरा शब्द तेथें ऐकूं येत नव्हता.

अगोदरच इतकें विस्तृत आणि निबिड अंधकारमय अरण्य, आणि त्यांत पुन्हा रात्रीची वेळ. तीहि मध्यरात्र, अतिशय अंधाराची. अरण्याच्या आंत बाहेर सर्वत्र अंधकार. कांहींच दिसेना. भूगर्भांतल्या अंधाराप्रमाणें अरण्यांतला तो अंधकार होता.

सगळे पशुपक्षी बिलकुल स्तब्ध होते. लक्षावधि—कोट्यावधि—पशुपक्षी व कीटपतंग त्या अरण्यांत वास करीत होते; पण कोणी हूं का चूं करीना. त्या अंधकाराची कांहीं तरी कल्पना करतां येत होती; पण गजबजलेल्या या पृथ्वीतलावरच्या त्या स्तब्धतेची तर कल्पना सुद्धां करतां येत नव्हती. अशा त्या अनंत, शून्य अरण्यांत सूचिभेद्य अंधेराच्या रात्रीं कल्पनातीत स्तब्धतेमधून एकाएकीं एक शब्द आला, "माझी मनकामना पूर्ण होणार नाहीं काय?" हाच तो शब्द.

शब्द झाल्यावर तें अरण्य पुन्हां स्तब्धतेंत निमग्न झालें. या अरण्यांत मनुष्याचा शब्द ऐकूं आला, असें म्हणण्याला तरी तेथें कोण होतें ? थोड्या वेळानें पुन्हां शब्द झाला, आणि ' माझी मनकामना पूर्ण होणार नाहीं काय ?' हे शब्द त्या स्तब्धतेचें मंथन करून बाहेर पडले.

अशा रीतीनें त्या रात्रीं त्या अंधकार-समुद्राचें तीनदां मंथन झालें, तेव्हां उत्तर आलें, " तूं काय पणाला लाविलें आहेस ?"

यावर प्रत्युत्तर आलें कीं, " माझें जीवन-सर्वस्व."

यावर उत्तर आलें कीं, " जीवन तुच्छ आहे. सर्वस्वाचा त्याग करण्याची तयारी आहे काय ?"

" मजजवळ देण्यासारखें दुसरें काय आहे ? मीं काय देऊं ?"

तेव्हां उत्तर मिळालें " भक्ति."

---

# प्रथम खंड.

## प्रकरण पहिलें.

बंगाली सन ११७६ सालांतल्या ग्रीष्म ऋतूंतली गोष्ट. एके दिवशीं पदचिन्ह नांवाच्या गांवीं उष्णतेचें मान फारच वाढलें होतें. गांवांत पुष्कळ घरें होतीं, पण माणसें कोणी दिसेनात. बाजारांत दुकानांच्या रांगा होत्या. वाड्यांतून शेंकडों लहान लहान मातीचीं घरें होतीं. त्यांत मधून मधून मोठमोठ्या हवेल्याहि होत्या. पण आज सर्वत्र स्तब्धता होती. बाजारांतलीं दुकानें बंद होतीं. दुकानदार कोठें पळून गेले होते, त्यांचा पत्ता नव्हता. आज आठवड्याचा बाजार भरावयाचा पण एकहि दुकान उघडें नव्हतें. आजचा म्हणजे भिक्षेकऱ्यांचा प्राप्तीचा दिवस. पण भिक्षेकरी कोठें दिसत नव्हते. विणकरी हातमाग बंद करून घराच्या एका कोपऱ्यांत रडत बसले होते. वाणी उदमी मुलांना कडेवर घेऊन व उद्योग धंदा सोडून आक्रोश करीत होते. दानधर्म बंद होता. शाळांना कुलुपें लागलीं होतीं. लहान पोरांना रडण्याचें सुद्धां धाडस होत नव्हतें. राजमार्गांवर चिटपाखरूं दिसत नव्हतें. तळ्यावर कोणी स्नानास जात नव्हतें. घरांदारांतून माणसें फिरकत नव्हतीं. झाडावर पक्षी दिसत नव्हते. गायरानांतून गाई चरत नव्हत्या. नाहीं

म्हणायला स्मशानांत मात्र कुत्रीं कोल्हीं संचार करीत होतीं. एक मोठा वाडा होता, त्याचे मोठाले उंच विशाल स्तंभ दुरून दिसत होते. तो वाडा बाकीच्या लहान लहान घरांमुळें पर्वतशिखराप्रमाणें शोभायमान दिसत होता. शोभा तरी कसली ? वाडा ओसाड पडला होता. त्याचें दार बंद होतें. शब्दहीन वायूला सुद्धां त्यांत प्रवेश करणें अडचणीचें होतें. वाड्यांत दिवसा दोन प्रहरीं भयंकर अंधकार होता. त्या अंधकारांत निशिगंधाच्या एका फांदीवर शेजारीं शेंजारीं दोन फुलें उमललेलीं असावीं, तसें माणसाचें एक जोडपें बसून विचार करीत होतें. त्यांच्यापुढें एक मोठा प्रश्न येऊन पडला होता.

अकराशें चौऱ्याहत्तर सालीं पीक चांगलें झालें नव्हतें. अर्थात् पुढच्या वर्षी तांदूळ महाग झाले. लोक कष्टानें दिवस काढीत होते. परंतु, राजानें पैन पै कर वसूल केला. प्रजेनें एकवेळ खाऊन राजाचा कर दिला. अकराशें पंचाहत्तर सालीं चांगली पर्जन्यवृष्टि झाली. लोकांना वाटलें दैवाची कृपा झाली. गुराखी रानांत गाऊं लागले. शेतकऱ्यांच्या स्त्रिया हौशीच्या वस्तु घेण्यासाठीं पतीजवळ हट्ट धरूं लागल्या. इतक्यांत एकाएकीं आश्विनमासीं दैवाची अवकृपा झाली. आश्विनांत व कार्तिकांत पावसाचा एक थेंब पडला नाहीं. त्यामुळें आलेलें सगळें पीक वाळून गेलें. जें थोडें बहुत धान्य पिकलें, तें राजाच्या अधिकाऱ्यांनीं लष्करासाठीं खरेदी करून टाकलें. लोकांना खाण्याला मिळेना. प्रथम दिवसांतून एक वेळ ते उपास काढूं लागले. नंतर संध्याकाळीं सुद्धां अर्धपोटीं राहाण्याची वेळ आली; आणि त्यानंतर तर दोन्ही वेळां उपास काढण्याला आरंभ झाला. उन्हाळ्याच्या तोंडीं जें कांहीं थोडें पीक आलें, तेंसुद्धां कोणाच्या तोंडाला लागलें नाहीं. अशावेळीं राजाचा कारभारी महमंद रेझाखान याच्या मनांत दुर्बुद्धि झाली कीं आपण बढती मिळवावी. त्यानें शेंकडा दहा या प्रमाणांत कर वाढविले. त्यामुळें बंगाल्यांत मोठा हाहाःकार उडाला.

लोक प्रथम भिक्षा मागूं लागले. पण भिक्षा घालणार तरी कोण ? अर्थात्, लोक उपाशीं मरूं लागले. गुरें विकण्याची वेळ आली. नांगर विकले. बीजासाठीं ठेवलेलें धान्य खाऊन टाकलें. घरदार विकलें. शेतीचीं आउतें विकलीं. त्यानंतर पोरेंबाळें विकण्यास प्रारंभ झाला. अगोदर मुली विकल्या. मग मुलें, त्यानंतर स्त्री. पण त्यांना विकत घेणार कोण ! जो उठला तो विकणार. खरीददार कोणी नाहीं ! शेवटीं झाडांचीं पानें खाण्याची वेळ आली. गवत खाऊं लागले, झाडें झुडपें खाऊं लागले. किरकोळ प्राणी व जंगलीं कुत्रीं मांजरें यांच्यावर धाड

आली. शेवटीं पुष्कळ लोक पळून गेले. पळून गेलेल्यांपैकीं पुष्कळ परदेशीं जाऊन मेले. जे राहिले ते खाण्याला न मिळाल्यामुळें किंवा रोगाच्या सांथींत सांपडून मेले.

ज्वर, महामारी, क्षय, देवी अशा रोगांच्या सांथी एका मागून एक येत गेल्या. देवी गोंवरानें घरोघर लोक मरत होते. रोग्याला पाणी द्यावयाला किंवा औषध द्यावयाला माणूस राहिलें नाहीं. औषध देणार कोण आणि घेणार कोण! कोणी कोणाला भेटण्याची सुद्धां मारामार! मेले त्यांचा मृत देह उचलून फेंकून देण्याला सुद्धां कोणी नाहीं! मोठमोठ्या वाड्यांमधून सुंदरसुंदर स्त्रीपुरुष मरून कुजत पडले होते. ज्या घरांत रोगाची सांथ येई, तेथले लोक रोग्याला टाकून भयानें पळून जात होते.

महेंद्रसिंह हा त्या पदचिन्ह गांवांतला एक मोठा श्रीमंत मनुष्य होता. पण आज श्रीमान् आणि गरीब यांची एकच किंमत होती. याच संकटकाळीं तो व्याधिग्रस्त झाल्यामुळें त्याचे आप्त, स्वजन आणि दासदासी हीं सगळीं त्याला सोडून गेलीं होतीं. कोणी मेले, कोणी पळाले. त्याच्या कुटुंबांतल्या माणसांपैकीं तो स्वतः, त्याची बायको, व एक मुलगी, एवढीं तीनच माणसें काय तीं राहिलीं होतीं. त्यांच्याविषयींच आतां सांगावयाचें आहे.

महेंद्रसिंहाची पत्नी कल्याणी हिनें गाईचें दूध स्वतः काढून आणिलें. नंतर तें तापवून मुलीला पाजलें. गाईला चारावैरण घातली व पाणी पाजलें. परत येते तों महेंद्र म्हणाला, "असें कितो दिवस चालणार?"

**कल्याणीः**—फार दिवस नाहीं, हें दिसतेंच आहे. जितके दिवस चालेल तितके दिवस चालवायचें. मग आपण मुलीला घेऊन कुठें तरी शहरांत जाऊं.

**महेंद्रः**—शहरांत जायचेंच तर मग आतां तरी इतकें दुःख कां सोसा? आतांच जाऊं या.

यावर त्या दोघांत पुष्कळ वाद झाला.

**कल्याणीः**—शहरांत गेल्यानें काय मोठा उपयोग होणार आहे?

**महेंद्रः**—पण या ओसाड गांवांत तरी कशाला राहायचें? येथें प्राण-रक्षणाचा कांहीं उपाय आहे का?

**कल्याणीः**—तर मग मुर्शिदाबाद, काशीम बाझार, कलकत्ता, इथें तरी जाऊं, म्हणजे प्राणतरी वांचतील. पण हा गांव कांहीं केल्या सोडणें भाग आहे.

**महेंद्रः**—हा आपला वाडा वाडवडिलांपासून द्रव्यानें भरलेला आहे. हें सर्व द्रव्य चोर लुटून नेतील ना? त्याची वाट काय?

**कल्याणी:**—चोर लुटायला आले, तर आपण दोघेजण त्याचें रक्षण करूं शकूं असें थोडेंच आहे ? प्राणच वांचले नाहींत, तर धनाचा उपभोग घ्यायचा कुणी ? जगलों वांचलों तर फिरून येऊन धनाचा उपभोग घेऊं.

महेंद्रानें विचारलें, " पण तुला कसें चालतां येईल ? तुझ्या मेण्याचे भोई तर सगळे मरून गेले. गाडींत जावें तर गाडीवान नाहीं, आणि गाडीवान असला तर बैल नाहींत."

**कल्याणी:**—मी पायीं चालेन. त्याची काळजी आपणास नको.

तिनें मनांत विचार केला कीं चालतां येईल तेवढें चालावें, नाहीं चालवलें, तर रस्त्यांत मरून पडावें. आपण मेलों तरी दुसऱ्या दोघांचे प्राण वांचतील.

दुसर दिवशीं सकाळींच या दोघांनीं थोडेंसें द्रव्य बरोबर घेऊन गुराढोरांना सोडून दिलें, मुलीला कडेवर घेऊन घरादारांना कुलपें लाविलीं, आणि राजधानीची वाट धरली. निघतांना महेंद्र म्हणाला, 'रस्ता फार वाईट आहे. वाटेंत लुटारू लोकांच्या टोळया फिरताहेत. तेव्हां रिकाम्या हातानें जाणें बरें नहे." इतकें बोलून तो बंदूक व दारूगोळा घेण्यासाठीं घरांत परत गेला.

तें पाहून कल्याणी म्हणाली, " कांहीं हत्यार पात्यार बरोबर घेण्याचा विचार असला, तर मलाहि तसेंच केलें पाहिजे. आपण थोडा वेळ या मुलीला घ्यावें. म्हणजे मीहि घरांतून एक हत्यार घेऊन येत्यें. "

तिनें घरांत जाऊन एक विषाच्या गोळीची डबी वस्त्रांत लपवून आणिली. विपत्तीच्या काळीं कशी वेळ येईल त्याचा काय नेम आहे ? असा विचार करून तिनें तें विष अगोदरच आणून संग्रहाला ठेविलें होतें.

ज्येष्ठाचा महिना होता. अतिभयंकर उकडत होतें. वाऱ्याच्या प्रवाहाबरोबर उष्णतेच्या झळा येत होत्या. आकाश तापलेल्या तांब्याच्या पत्र्याच्या चांदव्यासारखें लाल झालें होतें. रस्त्यावर उडणाऱ्या धुळीचे कण विस्तवाच्या ठिणगीसारखे लागत होते. कल्याणी लवकरच घामाघूम झाली. कोठें बाभळीच्या झाडाखालीं तर कोठें खजूर वृक्षाच्या छायेंत बसावें व पुन्हा पुढें चालावें, असें चाललें होतें. तहान लागली तर वाळून शुष्क झालेल्या तळयांतल्या डबक्यांतलें कर्दममय पाणी पिऊन कसें तरी पुढें मार्गक्रमण करावें. मुलगी महेंद्राच्या कडेवर होती. तो वरचेवर तिला वारा घाली. अशा रीतीनें चालतां चालतां शेवटीं तीं एका सुगंधी कुसुमांनीं युक्त व लतांनीं वेष्टित अशा घनदाट छायेच्या एका वृक्षाखालीं विश्रांतीसाठीं बसलीं. आपल्या पत्नीची श्रमसहिष्णुता पाहून महेंद्राला विस्मय

वाटला. त्यानें कोठें जाऊन जवळच्या एका डबक्यांत वस्त्र भिजवून आणिलें, आणि तें कल्याणीच्या तोंडांत पिळून कपाळावर, हातापायांवर व सर्वांगावर थोडेसे पाण्याचे तुषार पाडले. त्यामुळें ती अंमळ हुषार झाली.

कल्याणीला थोडीशी हुशारी वाटली खरी; पण आतां तीं दोघें भुकेनें व्याकुळ झालीं होतीं. स्वतःची क्षुधा त्यांनीं कशी तरी सहन केली असती. पण त्या मुलीनें—त्या बिचाऱ्या अर्भकानें—तहान भूक कशी सहन करावी? तिच्यासाठीं तीं दोघें पुन्हां वाट चालूं लागलीं. आगीच्या लोळासारख्या त्या उष्ण हवेंतून जातां जातां संध्याकाळ होण्याच्या अगोदर तीं एका धर्मशाळेंत जाऊन पोंचलीं. महेंद्राच्या मनाला मोठी आशा वाटत होती कीं धर्मशाळेंत पोंचल्यावर तरी स्त्री व कन्या यांच्या मुखांत घांसभर अन्न व घोटभर पाणी घालण्यास मिळेल. निदान प्राणरक्षणापुरते तरी दोन घास खाण्याला देण्यास मिळतील. पण काय! धर्मशाळेंत चिटपाखरूंसुद्धां नव्हतें. गांवांत मोठमोठाले वाडे होते, पण माणसें सगळीं पळून गेलीं होतीं. महेंद्रानें इकडे तिकडे पाहून शेवटीं एका घरांत स्त्री व कन्या यांना नेऊन निजविलें, आणि आपण बाहेर उभा राहून मोठ्या मोठ्यानें हाका मारण्यास सुरवात केली; पण कोठूनहि उत्तर मिळालें नाहीं. तेव्हां महेंद्र कल्याणीला म्हणाला, "तूं धीर धरून येथें बैस. मी जाऊन पाहतों. श्रीकृष्णाच्या दयेनें एकादी गाय आढळली, तर दूध घेऊन येतों." इतकें बोलून तो मातीचें एक लहानसें गाडगें घेऊन बाहेर पडला.

अशीं मातीचीं गाडगीं तेथें पुष्कळ पडलीं होतीं.

---

## प्रकरण दुसरें.

महेंद्र गेला. कल्याणी लहान अर्भकाला घेऊन त्या निर्जन स्थानीं अंधकारमय घरांत एकटी बसून चोहोंकडे पाहूं लागली; तेव्हां तिला फार भय वाटलें. कोठेंहि मनुष्य दिसेना. मनुष्याचा शब्द ऐकूं येईना. कुत्र्यांचें रडणें आणि कोल्ह्यांची कुई एवढेच काय ते शब्द तिच्या कानीं पडत होते. ती मनांत म्हणूं लागली, "मीं उगाच तिकडे जाऊं दिलें. कांहीं वेळ तशीच तहान भूक सहन केली असती. आतां सगळीं दारें बंद करून तरी बसावें." पण बंद करणार काय! घराच्या एकाहि दाराला कडी नव्हती. चोहींकडे पाहतां पाहतां तिची नजर सहज समोरच्या दाराकडे गेली, तों तिला तेथें एक सावली दिसली. आकृति

तर मनुष्यासारखी होती; पण मनुष्य कसें म्हणावयाचें ? अतिशय शुष्क, जीर्ण, कृष्णवर्ण, विकटाकृति असें मनुष्यासारखें दिसणारें दाराशीं काय बरें असेल ? थोड्या वेळानें त्या छायेनें एक हात वर केला. केवळ अस्थिचर्म असलेल्या अतिदीर्घ व शुष्क हाताच्या बोटाच्या खुणेनें त्यानें कोणाला तरी संकेत केला असावा. तें पाहून कल्याणीची धाबरगुंडी उडाली व तिच्या तोंडचें पाणी पळालें. इतक्यांत तशाच नमुन्याची शुष्क, कृष्णवर्ण, दीर्घ, अशी दुसरी एक छाया पहिल्या छायेच्या जवळ येऊन उभी राहिली. तिच्या मागून आणखी एक आली. तिच्या मागोमाग आणखी एक आली. अशा कित्येक आल्या, आणि त्या हळूहळू मुकाट्यानें घरांत प्रवेश करूं लागल्या. अंधेराचें आणि भयाण असें तें घर त्या अंधेऱ्या रात्रीं स्मशानाप्रमाणें भयंकर वाटूं लागलें. भुतासारख्या दिसणाऱ्या त्या मूर्ती, कल्याणी व तिची मुलगी यांना घेरून उभ्या राहिल्या. तें पाहून कल्याणी बहुतेक मूर्च्छितच झाली. मग त्या पिशाचरूपी पुरुषांनीं कल्याणीला मुलीसह उचलून बरोबर आणिलें आणि मैदानांतून त्वरेनें पार नेऊन एका जंगलांत प्रवेश केला.

थोड्या वेळानें महेंद्र दुधाचें गाडगें घेऊन परत आला. पाहतो तों तेथें कोणीहि दिसेना. त्यानें शोध शोध शोधलें. अगोदर मुलीच्या नांवानें हांका मारल्या. अखेर स्त्रीच्या नांवानेंहि हांका मारल्या; पण कोणीच उत्तर देईना. कांहींच शोध लागेना.

---

## प्रकरण तिसरें.

ज्या अरण्यांत चोरांनीं कल्याणीला आणून ठेविलें होतें, तें अरण्य अतिशय मनोहर होतें. प्रकाश नव्हता. शोभा पाहण्यासारखी दृष्टीहि नव्हती. दरिद्री माणसाच्या हृदयाच्या अंतर्गत सौंदर्याप्रमाणें त्या वनाचें सौंदर्य त्यामुळें अदृष्ट राहिलें होतें. देशांत लोकांना खायला मिळो वा न मिळो, रानांत फुलें होतीं. आणि त्या फुलांच्या सुगंधाच्या रूपानेंच त्या अंधकारांत जणूं काय प्रकाश पडला होता. त्या रानांत एक स्वच्छ जागीं, जेथें कोमल पुष्पांचा खच पडला होता, अशा एके जागीं चोरांनीं कल्याणीला व तिच्या मुलीला आणून ठेविलें होतें. तेहि तिच्या भोंवतीं गराडा घालून बसले होते. यांना आपण आणलें खरें, पण यांचें पुढें करायचें काय याविषयीं त्यांच्यांत वादविवाद चालला होता. कल्याणीच्या अंगावर थोडे

अलंकार होते, ते त्यांनीं अगोदरच हस्तगत केले होते. त्या डागिन्यांची वांटणी झाल्यावर एक चोर म्हणाला, 'हें चांदी सोन्याचे अलंकार घेऊन मीं काय करूं? यांतला एखादा दागिना घेऊन मला कोणी मूटभर तांदूळ देईल तर बरें होईल. भुकेनें माझे प्राण जाऊं पाहत आहेत. आज मीं केवळ झाडांचीं पानें खाऊन दिवस काढला आहे." एक जणानें असें म्हटल्यावर बाकीचेहि सगळे तसेंच म्हणूं लागले, आणि "तांदूळ द्या, मूठभर तांदूळ द्या, भुकेनें प्राण जात आहेत. चांदी सोनें कांहीं नको." अशी आरडा-ओरड करूं लागले. चोरांच्या टोळीचा नायक त्यांना शांत करावयास पाहत होता; पण कोणी उगा राहीना. त्यांची आरडाओरड वाढतच चालली. शिवी-गाळ सुरू झाली. शेवटीं मारामारीवर आले. नायकानें एखाद्याला त्याच्या वांट-णीचा म्हणून एखादा अलंकार द्यावा, तर तो उलटा त्यानें त्या नायकाच्या अंगा-वर फेंकून द्यावा. शेवटीं त्या नायकानें एकादोघांनां चांगलें चोपलें; तेव्हां बाकी-च्यांनीं त्या नायकावरच हल्ला करून त्याला ते मारूं लागले. तो नाइकहि उपा-सानें अगदीं शुष्क व जर्जर झालेला होता. एकदोन जोराचे रपाटे बसतांच त्या बिचाऱ्यानें प्राण सोडला. तेव्हां क्षुधेनें ग्रस्त, क्षुब्ध, उत्तेजित व ज्ञानशून्य अशा त्या टोळींत एकजण होता. तो म्हणाला, "कोल्ह्या कुत्र्याचें मांस आपण खातों. आतां भुकेनें जीव जात आहे; तर चला, आपण आज या नाइकाचेंच मांस खाऊं या.' हें ऐकून सर्वांनी 'जयकाली' असा कालीदेवीच्या नावाचा जयजयकार केला. "बम्‌काली! आज नरमांस खावयाचें." असें बोलून त्या पिशाच मूर्ति अंधकारांत खो खो हासून टाळ्या वाजवीत नाचूं लागल्या. नायकाचें मांस शिज-विण्यासाठीं एकजण अग्नि पेटविण्यास सिद्ध झाला. त्यानें शुष्क वेली, लाकडें, तृण, वाळलेलीं पानें इत्यादि आणून चकमकीच्या साह्यानें विस्तव पेटविला. त्यानें पेटविलेल्या अग्नीची ज्वाला वाढतां वाढतां इतकी वाढली कीं, तिनें आंबे, चिंच, वड, पिंपळ इत्यादि उंच उंच वृक्षमुद्धां प्रकाशित झाले. कांहीं ठिकाणीं त्या प्रकाशा-मुळेंच अंधकाराची गाढता ज्यास्त भासमान होऊं लागली. अग्नि सिद्ध झाल्यावर एकानें त्या प्रेताची तंगडी ओढून तें प्रेत अग्नींत टाकूं लागला. तेव्हां दुसरा एक-जण त्याला म्हणाला, 'थांब. जर आज नरमांस खाऊनच प्राणरक्षण आपणांस करणें भाग आहे, तर मग या म्हाताऱ्या शुष्क माणसाचें मांस खाऊन काय होणार आहे? त्यापेक्षां आज मिळविलेल्या शिकारीचेंच मांस आपण खाऊं या. आज आपण या कोंवळ्या पोरीच्या मांसावरच हात मारूं.' तिसरा म्हणाला, 'काय

हवें त्याचें मांस शिजवा; पण या पोटाला घाला एकदांचें. अतां भुकेची ही पीडा सोसवत नाहीं.' हें ऐकतांच सर्वांच्या तोंडाला पाणी सुटून ते कल्याणी बसली होती तिकडे जाऊं लागले. पाहतात तों तेथें कोणी नाहीं! आई नाहीं आणि मुलगीहि नाहीं! चोरांच्या वादविवादाच्या गडबडींत कल्याणीनें गुपचिप मुलीला पोटाशीं धरून आणि तिनें ओरडूं नये म्हणून तिच्या तोंडांत स्तन देऊन तेथून केव्हांच पळ काढला होता! हातची शिकार निसटलेली दिसतांच ते लुटारू शिकारीच्या शोधासाठीं रानोमाळ धावूं लागले.

विशेष परिस्थितींत सांपडल्यानें मनुष्यसुद्धां हिंस्र पशुवत् आचारण करतो.

---

## प्रकरण चौथें.

रानांत निबिड अंधकार होता हें मागें सांगितलेंच आहे. कल्याणीला जाण्याला वाट दिसेना. वृक्षलतादिकांचे जाळ्यांनीं भरलेल्या त्या रानांत जाण्याला वाट नव्हती ही एक गोष्ट; आणि तेथें घोर अंधकार होता ही दुसरी. अर्थात् कल्याणीला कांट्याकुट्यांतून वाट काढीत जावें लागलें. मुलीच्याहि अंगाला कांटे बोंचूं लागले. थोड्या वेळानें चंद्रोदय झाला. इतका वेळ कल्याणीच्या मनाला येवढा तरी भरंवसा वाटत होता कीं अंधेरामुळें आपण सहसा लुटारू लोकांच्या दृष्टीस पडणार नाहीं, आणि त्यामुळें शोधता शोधतां कंटाळून ते आपला पिच्छा सोडतील; पण आतां चंद्रोदय झाल्यामुळें त्याहि बाबतींत तिची निराशा झाली. चंद्र चांगला डोक्यावर आला; तेव्हां तो आपला प्रकाश अरण्यावर जणूं ओतूं लागला आणि तो प्रकाश जिकडून वाट सांपडेल, तिकडून अरण्यांत भूमीपर्यंत शिरला. चंद्र जसजसा वर येत गेला, तसतसा त्याचा प्रकाशहि वाढत गेला, आणि त्याबरोबर कल्याणीहि अधिकाधिक खोल जाऊन लपण्याचा यत्न करूं लागली. इकडे लुटारू लोक आरडाओरड करीत तिच्या शोधासाठीं धुमाकूळ घालीत होतेच. त्यांच्या त्या आरोळ्यांनीं बिचारी पोर घाबरून रडूं लागली. तेव्हां कल्याणीनें पळण्याचें सोडून दिलें. एका विस्तीर्ण व प्रचंड वृक्षाच्या खालीं कांटेकुटे नाहींत अशी जागा पाहून तेथें गवताच्या थरावरच मुलीला मांडीवर घेऊन ती बसली आणि परमेश्वराचा धांवा करूं लागली कीं, 'हे मधुसूदना ' ज्याची मी नित्य पूजा करत्यें, ज्याला मी नित्य नमस्कार करत्यें, आणि ज्याच्या भरंवशावर मी या वनांत प्रवेश करण्याला समर्थ झाल्यें, असा तूं माझा पाठीराखा परमेश्वर कुठें आहेस?'

याच वेळीं भयामुळें उत्पन्न झालेल्या भक्तीच्या गाढतेच्या योगानें व तहान भूकेच्या व्याकुळतेमुळें आलेल्या भयंकर ग्लानीनें कल्याणी हळूहळू मूर्च्छित झाली. ती बाह्यज्ञानशून्य झाली होती; तथापि अंतर्यामीं ती पूर्ण चैतन्ययुक्त होऊन अंतरीक्षांतल्या स्वर्गीय स्वरानें म्हटलेलें पुढील गीत ऐकत होती—

**'हरे मुरारे मधुकैटभारे।**
**गोपाल गोविंद मुकुंद शौरे!**
**हरे मुरारे मधुकैटभारे!'**

कल्याणीनें लहापणापासून पुराणांतल्या गोष्टी ऐकलेल्या होत्या. देवर्षि वीणेच्या सुरांत हरिनामाचें कीर्तन करीत करीत त्रिभुवनांतून भ्रमण करीत असतात, ही गोष्ट तिला ठाऊक होती. तिच्या मनांत या वेळीं त्याच गोष्टींची आठवण जागृत झाली. तिच्या मनश्चक्षूपुढें गौरवर्ण व शुभ्रकेश, शुभ्र दाढी आणि शुभ्र वस्त्रें परिधान केलेले कोणी महामुनि हातांत वीणा घेऊन नीलवर्ण आकाशमार्गानें 'हरे मुरारे मधु कैटभारे' हें गीत गात चालले आहेत. असें चित्र उभें राहिलें.

हळू हळू तें गीत अधिक जवळून ऐकू येऊं लागलें. '**हरे मुरारे मधु-कैटभारे**!' हे शब्द अधिक स्पष्ट श्रुतिगोचर झाले. आणखी स्पष्ट—आणखी स्पष्ट—अखेर कल्याणीच्या डोक्यावर '**हरे मुरारे मधुकैटभारे**!' या शब्दांचा प्रतिध्वनि होऊं लागला. तें वन गाऊं लागलें. त्या अर्धवट आंधुक अशा चंद्रप्रकाशाच्या साह्यानें कल्याणीनें डोळे उघडून पाहिलें तों तीच गौरवर्ण व शुभ्रकेशांची शुभ्रवस्त्र परिधान केलेली ऋषिमूर्ति! लागलीच तिच्या भक्तियुक्त मनाला वाटलें कीं यांना नमस्कार करावा; पण तो तिला करतां येईना. डोकें टेकायला गेली, तो बेशुद्ध होऊन जमीनीवर पडली.

---

## प्रकरण पांचवें.

याच वनांत एका विस्तीर्ण प्रदेशावर एक मोठा मठ होता. या मठाच्या भोंवतालच्या भिंतींच्या कांहीं भग्न शिला अद्यापि अवशेष म्हणून होत्या. पुराणतत्त्ववेत्त्यांनीं त्या पाहिल्या असत्या, तर म्हटलें असतें कीं, या ठिकाणीं अगोदर एक मोठा बौद्धविहार होता व तोच पुढें हिंदूंचा मठ झाला होता. मठांत दोन मजली इमारती असून मध्यें नानाविध देवमंदिरें होतीं व पुढें एक मोठा सभामंडप होता. सर्वांच्या भोंवतीं एक मोठा तट होता व बाहेर मोठाल्या वृक्षांच्या रांगा लागून

गेल्या कारणानें त्या वृक्षांनीं तो इतका झाकून टाकलेला होता कीं, दिवसा जवळच्या माणसालासुद्धां असें वाटावयाचें नाहीं कीं, येथें म्हणजे एखादी इमारत आहे. इमारतींची आतां पुष्कळ ठिकाणीं पडझड झालेली आहे; पण दिवसा उजेडीं पाहिल्यास दिसून येण्यासारखें होतें कीं इमारतींची दुरुस्तीहि अलीकडे करण्यांत आली होती. या घोर दुर्भेद्य अरण्यांत मनुष्याची वस्ती होती. या मठाच्या एका कोठडींत लाकडाचें एक मोठें ढोण पेटलेलें होतें. या कोठडींत कल्याणी प्रथम शुद्धीवर येऊन पाहत्ये तों समोर तोच शुभ्र वस्त्र परिधान केलेला गौरवर्ण महापुरुष ! तिनें आश्चर्यचकित दृष्टीनें सगळीकडे पाहिलें; पण मागची आठवण तिला कांहीं होईना. तेव्हां तो महापुरुष म्हणाला, 'बाळ ! हें देवस्थान आहे. येथें मनांत कांहीं शंका आणूं नकोस. अगोदर थोडेंसें दूध देतों तें पी; मग आपण बोलूं.'

कल्याणीला प्रथम कांहींच समजलें नाहीं; पण नंतर हळूहळू तिची वृत्ति स्थिर झाल्यावर तिनें नम्रभावानें त्या महापुरुषाला वंदन केलें. त्या महापुरुषानें तिला मंगल आशीर्वाद दिल्यानंतर दुसऱ्या एका खोलींतून एका सुगंधयुक्त मृण्मय पात्रांत थोडें दूध आणून तें त्या जळत असलेल्या लाकडावरच तापविलें. दूध तापल्यावर तें कल्याणीला देऊन तो म्हणाला, 'बाळ ! हें अगोदर पी; मग आपण बोलूं.' कल्याणीनें हर्षित चित्तानें थोडें दूध अगोदर मुलीला पाजलें. मग 'मी लवकरच येतों. तोंपर्यंत येथें बैस. अगदीं फिकीर करूं नकोस' असें सांगून तो महापुरुष बाहेर कोठें चालता झाला. थोड्या वेळानें परत येऊन त्यानें पाहिलें, तेव्हां त्याला दिसलें कीं, कल्याणीनें मुलीला दूध पाजलें; पण स्वतः ती कांहीं प्याली नाहीं. तिला दिलेल्या दुधांतलें फारच थोडें खर्च झालेलें त्याला दिसलें. तेव्हां तो म्हणाला, 'बाई ! तूं दूध पीत नाहींस ? मी आतां बाहेर जाणार आहें. पण तूं दूध प्यायली नाहींस, तर मी परत येणार नाहीं.'

इतकें बोलून तो ऋषितुल्य पुरुष बाहेर जाण्यास निघाला. कल्याणीनें त्याला पुन्हां हात जोडून नमस्कार केला.

तो वनवासी पुरुष म्हणाला, 'कांहीं बोलायचें आहे ?'

कल्याणी म्हणाली, 'दूध पिण्याविषयीं मला आज्ञा करूं नये. कांहीं अडचणी-मुळें मला दूध पितां येत नाहीं.'

हें ऐकून वनवासी अतिशय कनवाळूपणानें म्हणाला, 'काय अडचण आहे, ती मला सांगशील ? मला सांगायला कांहीं हरकत नाहीं. मी वनवासी ब्रह्मचारी

आहें. तूं मला मुलीसारखी आहेस. कांहीं शंका मनांत न आणतां तुझी हकीकत मला कळूं दे. मीं तुला रानांतून आणिलें, तेव्हां तूं बेशुद्ध स्थितींत होतीस. तेव्हांच तुला पाहून मला वाटलें कीं, तूं क्षुधेनें आणि तृष्णेनें अत्यंत व्याकुळ झाली आहेस, आणि तुझ्या मुखांत अन्नपाणी गेल्याशिवाय तुझे प्राण जगावयाचे नाहींत. '

कल्याणीच्या नेत्रांतून अश्रु वाहत होते. ती म्हणाली, 'आपण देव आहां, आपणांला म्हणून सांगत्यें. माझे पति अद्याप उपाशी आहेत. त्यांचें दर्शन मला झालें नाहीं, किंवा त्यांनीं अन्नाचे चार घास खाल्ल्याविषयीं मला कांहीं कळलें नाहीं, तोंपर्यंत मीं तोंडांत अन्न कसें घालावें ?'

ब्रह्मचाऱ्यानें विचारलें, 'तुझा पति कोठें आहे ?'

कल्याणीनें उत्तर केलें, 'तें मला ठाऊक नाहीं. दूध आणण्यासाठीं म्हणून बाहेर निघणें झाल्यानंतर लुटारू लोक मला पळवून घेऊन गेले.' यावर ब्रह्मचाऱ्यांनीं तिला अनेक प्रश्न विचारून माहिती काढली, तेव्हां कल्याणी व तिचा पति यांचा सारा वृत्तांत त्याच्या ध्यानीं आला. कल्याणी नवऱ्याचें नांव सांगेना; तिला तें सांगतां येईना; पण अवांतर गोष्टींच्या संदर्भावरून त्यानें तें ओळखलें. त्यानें म्हटलें,' एकूण तूं महेंद्राची पत्नी ?' कल्याणीनें यावर कांहीं उत्तर न देतां ज्या लाकडावर दूध तापविलें होतें त्यावर त्या दुधांतले चार थेंब टाकिले. ब्रह्मचारी म्हणाला, 'माझें ऐक. थोडें दूध पी. मी तुझ्या पतीची खबर आणतों. तूं दूध न प्यालीस तर मी जाणार नाहीं.' 'येथें थोडें पाणी मिळेल काय ?' असें कल्याणीनें विचारलें. ब्रम्हचाऱ्यानें पाण्याच्या घागरीकडे बोट केलें. कल्याणीनें हातांची ओंजळ केली. ब्रम्हचाऱ्यानें ओंजळ भरून पाणी घातलें. कल्याणीनें तीच ओंजळ ब्रह्मचाऱ्याच्या पायाला लावून म्हटलें कीं, 'आपण याला अंगठा लावावा.' त्यानें त्याप्रमाणें केल्यावर कल्याणीनें तें तीर्थ प्राशन केलें आणि म्हटलें, 'मला आज अमृत पिण्यास मिळालें. आतां दुसरें कांहीं खायलाप्यायला सांगूं नका. तिकडचा कांहीं समाचार कळल्याशिवाय मी कांहीं खाणार नाहीं.' ब्रम्हचारी म्हणाला, 'आतां तूं अगदीं निर्भय चित्तानें या मंदिरांत पडून रहा. मी तुझ्या पतीच्या शोधाला जातों.'

---

## प्रकरण सहावें.

बरीच रात्र झाली होती. चंद्र डोक्यावर आला होता. पूर्ण चंद्र नव्हता. त्याचा प्रकाशहि तसा प्रखर नव्हता. एका अतिविस्तीर्ण निर्जन अरण्यावर वृक्षविस्ताराच्या छायेनें युक्त असा थोडासा अंधुक प्रकाश पडलेला होता. तेवढया प्रकाशानें अरण्यांतलें या टोंकापासून तों त्या टोंकापर्यंतचें दिसत नव्हतें. त्या निर्जन अरण्यांत कितीतरी अनंत, भयस्थानें असावींत असें वाटत होतें. याच अरण्यांतून मुर्शिदाबादेकडे व कलकत्त्याकडे रस्ते गेलेले होते. रस्त्याच्या बाजूनें एक लहानसा पहाड होता. पहाडावर पुष्कळ आम्रवृक्ष होते. त्या वृक्षांचीं शिखरें चंद्रप्रकाशानें उज्ज्वल होऊन चमकत होतीं. त्यांची छाया खालीं काळ्या पाषाणावर पडली होती व त्यामुळें ते अधिकच काळे दिसत होते. ब्रम्हचारी याच पहाडावर चढून उभा राहिला आणि स्तब्ध राहून कांहीं ऐकत होता. काय ऐकत होता तें सांगतां येत नाहीं. त्या विस्तीर्ण अरण्यांत कोठेंहि शब्द होत नव्हता. वृक्षांचा मर्मरध्वनि तेवढा होत होता. पहाडाच्या पायथ्यापाशीं एके जागीं मोठी झाडी होती. वर पहाड, खालीं रस्ता आणि मध्यें जंगल होतें. येथें कांहीं शब्द होत असला तर सांगवत नाहीं. ब्रम्हचारी त्या बाजूला गेला. त्यानें त्या दाट झाडींत शिरून पाहिलें, तों तिच्या घनदाट वृक्षपंक्तींच्या तळीं अंधेरांत कांहीं माणसें बसलेलीं त्याला दिसलीं. सगळीं माणसें धिप्पाड, काळींकभिन्न, व हत्यारबंद होतीं. वृक्षांच्या पानांच्या फटींतून आंत प्रविष्ट झालेले चंद्राचे किरण, घासून पुसून चकचकीत केलेल्या त्या हत्यारावर पडून तीं चमकत होतीं. सुमारें दोनशें लोक असतील; पण एक जणसुद्धां बोलत नव्हता. ब्रह्मचारी हळूहळू त्यांच्यांत जाऊन मिसळला. त्यानें कांहीं इषारा केला, त्यामुळें कोणी उठलें नाहीं कीं बोललें नाहीं. ब्रह्मचाऱ्यानें प्रत्येकाच्या पुढें जाऊन त्यांच्या तोंडाकडे बारीक नजरेनें पाहिलें. जणूकाय तो कोणाला तरी शोधीत आहे आणि तो माणूस त्याला सांपडत नाहीं, असें दिसलें. शोधतां शोधतां एकजण सांपडला. त्याला त्यानें ओळखलें, आणि त्याच्या अंगाला स्पर्श करून त्यानें कांहीं एक खूण केली. त्याबरोबर तो उठला. ब्रम्हचारी त्याला दूर घेऊन जाऊन उभा राहिला. हा मनुष्य तरुण वयाचा होता. वर्ण काळाकभिन्न होता. दाट मिशा व दाढी यांनीं त्याचा चेहरा झाकून गेला होता. त्याचें शरीर मजबूत असून अंगाची ठेवण सुंदर होती. त्याच्या अंगावर भगवें वस्त्र होतें

आणि सर्वांगाला चंदन चर्चिलें होतें. ब्रह्मचारी त्याला म्हणाला, ' भवानंद ! महेंद्राची कांहीं खबर तुला कळली आहे काय ?'

भवानंद म्हणाला, ' तो आज सकाळीं स्त्री व कन्या यांच्यासह धर्मशाळेच्या वाटेला लागलेला होता—'

इतकें तो बोलतो, तोंच ब्रह्मचारी म्हणाला, ' धर्मशाळेंत जें काय घडलें, तें ठाऊक आहे; पण हें कोणीं केलें ?'

**भवा०**—शेतकऱ्यांनीं केलें असलें पाहिजे. आजकाल सगळे नांगऱ्ये पोटांतल्या आगीमुळें लुटारू बनले आहेत. आतां लुटारू नाहींत कोण ? आम्ही सुद्धां आज लूट आणून खाल्ली. कोतवालसाहेबांच्या येथचे दोन मण तांदूळ लुटले गेले. ते आणून आम्हीं देवाचा नैवेद्य केला. '

ब्रह्मचारी म्हणाला, ' मीं आज लुटारूंच्या हातून महेंद्राच्या स्त्रीची व कन्येची सुटका केली आहे. सध्यां तिला मठांत ठेविलें आहे. आतां महेंद्राचा तपास लावून त्याची स्त्री कन्या त्याच्या हवालीं करण्याचें काम मी तुमच्यावर सोंपवितों. जीवानंद जर या वेळीं असता, तर छान झालें असतें.'

भवानंदानें ती कामगिरी पतकरली आणि ब्रह्मचारी दुसरीकडे निघून गेला.

---

## प्रकरण सातवें.

धर्मशाळेंत बसून राहिल्यानें कांहीं कार्यभाग व्हावयाचा नाहीं, असा विचार करून महेंद्र उठला, आणि शहरांत जाऊन सरकारी अधिकाऱ्यांच्या साह्यानें आपल्या स्त्रीकन्येचा तपास लावूं अशा विचारानें त्या दिशेनें जाऊं लागला. थोडें दूर गेल्यावर त्यानें पाहिलें, तों रस्त्यांत बैलांच्या कित्येक गाड्यांना घेरा देऊन कांहीं शिपाई चालले होते.

११७६ सालीं बंगालप्रांत इंग्रजांच्या अंमलाखालीं गेलेला नव्हता. इंग्रज तेव्हां बंगालचे नुसते दिवाण होते. ते सरकारचे कर वसूल करीत; पण बंगाली लोकांचे जीव व संपत्ति यांच्या रक्षणाची जबाबदारी त्यांनीं अद्याप आपल्यावर घेतली नव्हती. रयतेकडून पैसा काढण्याचें तेवढें काम ते करीत आणि रयतेचें रक्षण करण्याचें काम पापी, नराधम, विश्वासघातकी, मनुष्यकुलाला कलंक लावणाऱ्या मीर जाफराकडे होतें. ज्या मीर जाफराला स्वतःचें रक्षण करतां येईना; तो दुसऱ्याचें रक्षण काय करणार ? तो अफूची गोळी खाई आणि सारा दिवस

गुंगून पडे. इंग्रज लोक करांची वसुली करीत आणि खलिते लिहीत. बंगाली रयत रडे आणि मरे. सारांश, उत्पन्न मिळे इंग्रजांना, आणि रयत संभाळण्याची जबाबदारी पडे नबाबावर! अशी स्थिति होती. जेथें जेथें इंग्रजलोक करांची वसुली स्वतः करीत असत, तेथें तेथें त्यांचा एक कलेक्टर नेमलेला असे. तो कर वसूल करून कलकत्त्यास खजीना पाठवी. लोक खाण्यावांचून मरतना? त्यांना त्याच्याशीं काय करावयाचें होतें? करांची वसुली करण्याचें काम कधीं बंद नसे. इतकें करूनहि सगळा कर वसूल होत नसे. कारण, धान्य पिकलेंच नाहीं, तर लोकांजवळ पैसा कोठून येणार? जी कांहीं वसुली होई, तिचा खजिना बैलांच्या गाडींत लादून हत्यारबंद शिपायांच्या पाहाऱ्याखालीं कलकत्त्यास पाठविला जाई. आजकाल लुटारूंची भीति जास्त असल्यामुळें पन्नास हत्यारबंद शिपाई गाड्यांच्या मागें पुढें रांगेनें संगीनी लावून चालत असत. त्यांच्यावर एक गोरा अधिकारी असे. तो घोड्यावर बसून बरोबर जात असे. उन्हाळ्यामुळें शिपाई दिवसा वाट न चालतां रात्रीचे चालत. अशा गाड्या रस्त्यानें जात होत्या, म्हणून महेंद्राची वाट अडली होती. गाड्या व शिपाई यांनीं वाट अडविलेली पाहून महेंद्र बाजूला उभा राहिला. शिपाई त्याच्या अंगाला घासून जात होते. तरी पण ही भांडण करण्याची वेळ नव्हे, असा विचार करून तो रस्त्याच्या बाजूच्या जंगलाच्या कडेला थोड्या अंतरावर जाऊन उभा राहिला होता.

तेव्हां एक शिपाई म्हणाला, 'हा पहा! एक लुटारू पळत आहे.' महेंद्राच्या हातांत बंदूक होती, त्यामुळें त्याची ती समजूत दृढ झाली. त्यानें धावत जाऊन महेंद्राची मानगुटी धरली, आणि 'साला चोर!' असें म्हणून त्याला जोरानें एक ठोसा लगावला. इतकेंच नाहीं, तर त्याच्या जवळची बंदूकहि काढून घेतली. महेंद्रानें रिकाम्या हातानें परत ठोसा तेवढा दिला. त्याला या वेळीं त्वेष चढला होता हें सांगायला नकोच. महेंद्राच्या हाताचा ठोसा खातांच शिपाईबुवा बेशुद्ध होऊन रस्त्यांत पडले. हें पाहून दुसरे तीनचार शिपाई धावले, आणि त्यांनीं महेंद्राला पकडून जोरानें ढकलीत ढकलीत गोऱ्यासाहेबाकडे नेलें. त्यांनीं साहेबाला सांगितलें कीं या माणसानें आपले एका शिपायाचा खून केला आहे. साहेब चिरूट ओढीत होते. दारूची धुंदीहि त्यांच्या चर्येवर होती. ते म्हणाले, 'सालाको पकडलेके सादी करो.' शिपायांना कळेना कीं हत्यारबंद लुटारूचें लग्न लावून (सादी करो) द्यावयाचें कसें? पण साहेबांची धुंदी उतरल्यावर साहेबांची लहर फिरेल व लग्न लावून द्यावें लागणार नाहीं, असा विचार करून

तीन चार शिपायांनीं गाडीच्याच दोरीनें महेंद्राचे हातपाय गच्च आवळून त्याला गाडीवर चढविलें. महेंद्रानें पाहिलें कीं, इतक्या माणसांपुढें आपला जोर काय चालणार ? आणि चालला तरी त्याचा काय उपयोग आहे ? त्यापासून कोणता लाभ होणार आहे ? स्त्रीकन्येच्या शोकानें महेंद्राचें मन या वेळीं व्याकुळ झालेलें होतें. त्याला जगण्याची मुळींच इच्छा नव्हती. शिपायांनीं त्याला उचलून गाडीवर चांगला बांधून ठेविलें होतें, आणि खजिन्याच्या गाड्या जशा मंद व गंभीरगतीनें चालावयाच्या तशा चालल्या होत्या.

---

## प्रकरण आठवें.

ब्रह्मचाऱ्याची आज्ञा मिळतांच भवानंद हळूहळू हरिनामाचा उच्चार करीत करीत महेंद्र जेथें बसला होता त्या धर्मशाळेकडे जाण्यास निघाला. त्या ठिकाणींच महेंद्राचा शोध लागण्याचा संभव विशेष आहे, असें त्याच्या मनाला वाटलें.

त्या काळीं हल्लींच्या सारख्या इंग्रजांनीं केलेल्या सडका नव्हत्या. कोणत्याहि शहराहून कलकत्त्याला जावयाचें झालें, तर मुसलमान बादशाहांनीं बांधलेल्या सडकांनीं जावें लागे. पदचिन्हापासून महेंद्र निघाला, तो दक्षिणेकडून उत्तरेकडे गेला होता. म्हणून वाटेंत शिपायांशीं त्याची गांठ पडली होती. भवानंद तालपहाडाहून धर्मशाळेकडे जात होता, तोहि दक्षिणेकडून उत्तरेकडे जातां जातां मधून मधून त्यालाहि कारणपरत्वें खजिन्याचे संरक्षक शिपाई भेटले. त्यानेंहि महेंद्राप्रमाणें शिपायांना वाट दिली. एका शिपायाला साहजिकच वाटलें कीं, हा खजिना लुटण्याचा प्रयत्न लुटारू लोक अवश्य करतील. म्हणून त्यानें वाटेंत एक लुटारूला कैद केलें होतें. नंतर भवानंदाला रात्रीं पुन्हा पाहून त्या शिपायांना वाटलें कीं, हाहि एक लुटारूच आहे. म्हणून, शिपायांनीं त्याला तत्काळ पकडलें.

भवानंदानें किंचित् हसून विचारलें " कांरे बाबा ? "

शिपायानें उत्तर केलें, " तुम् साला डाकू है. "

**भवा०**—तुला दिसत नाहीं का कीं मी भगवीं वस्त्रें परिधान केलेला ब्रह्मचारी आहें ? लुटारू काय असा असतो ?

**शि०**—पुष्कळ बेटे ब्रह्मचारी, संन्यासी, लूटमार करतात.

इतकें बोलून शिपायानें भवानंदाला गचांड्या देण्यास सुरुवात केली. भवानंदाचे डोळे त्या अंधेरांत चमकूं लागले. पण अधिक कमी न बोलतां अतिशय नम्र भावानें तो म्हणाला, "महाराज ! काय हुकूम आहे ?"

भवानंदाच्या या नम्र उत्तरानें शिपाई संतुष्ट होऊन म्हणाला, "घे, साल्या, डोक्यावर एक गाठोडें घे."

इतकें बोलून शिपायानें त्याच्या डोक्यावर एक जड बोचकें दिलें. तेव्हां दुसरा एक शिपाई म्हणाला, "नको, नको. बेटा एखादा पळून जाईल. त्या एका चोराला जेथें बांधून ठेविलें आहे, त्याच गाडीवर यालाहि बांधून ठेवा." हें ऐकून दुसऱ्या कोणाला बांधून ठेविलें आहे तें पाहण्याची भवानंदाला इच्छा झाली. तेव्हां भवानंदानें डोक्यावरचें बोचकें फेंकून देऊन ज्यानें तें त्याच्या डोक्यावर दिलें होतें, त्या शिपायाच्या मुस्कटांत एक जोराची थप्पड दिली. अर्थातच शिपायानें भवानंदालाहि बांधून गाडीवर महेंद्राच्या जवळ ठेविलें. भवानंदानें ओळखिलें कीं हाच महेंद्रसिंह.

शिपाईलोक पुन्हा आरडाओरड करीत चालूं लागले. गाड्यांचा कचकच शब्द चाललाच होता. भवानंदानें केवळ महेंद्रालाच ऐकूं जाईल अशा हलक्या स्वरानें म्हटलें. "महेंद्रसिंह ! मीं तुम्हाला ओळखिलें. तुमच्या सहायासाठींच मी येथें आलों आहें. मी कोण तें तुम्हांला आतांच सांगण्याचें कारण नाहीं. मी जसें सांगतों तसें काळजीपूर्वक करा. तुमच्या हातांवरचा दोरीचा फांस चाकावर धरा."

महेंद्र चकित झाला. पण कांहीं न बोलतां त्यानें भवानंदाच्या सांगण्याप्रमाणें केलें. अंधेरांत गाडीच्या चाकाजवळ अंमळ सरकून त्यानें हात बांधलेली दोरी चाकावर धरली. चाकाच्या घर्षणानें ती थोड्या वेळानें तुटली. मग तशीच पायां-तल्या फांसाचीहि दोरी धरली. तीहि तुटली. अशा रीतीनें तो बंधनांतून मुक्त होऊन भवानंदाच्या सांगण्यावरून गाडीवरच गुपचुप पडून राहिला. भवानं-दानेंहि त्याच रीतीनें स्वतःची मुक्तता करून घेतली. दोघेहि गुपचुप बसले होते.

ज्या ठिकाणीं जंगलाच्याजवळ रस्त्यावर उभें राहून ब्रह्मचाऱ्यानें चोहींकडचें निरीक्षण केलें होतें, त्याच वाटेकडे हा रस्ता जात होता. त्या पहाडाच्या जवळ गेल्यावर शिपायांनीं पाहिलें तों पहाडाच्या खालीं एका उंचवट्यावर एक मनुष्य उभा असलेला दिसला. चंद्रप्रकाशानें उज्वल झालेल्या नीलवर्ण आकाशांत त्याचें काळें शरीर चित्रित झालेलें पाहून हवालदार म्हणाला, 'हा एक साला चोर पहा ! आणा त्याला पकडून. ओझें वाहण्यास उपयोगीं पडेल.' हुकूम होतांच एक शिपाई त्याला धरण्याला निघाला. तो मनुष्य अगदीं

स्थिर उभा होता. बिलकुल हालला नाहीं. शिपायानें त्याला पकडलें; पण त्यानें हूं कां चूं केलें नाहीं. त्याला हवालदाराजवळ नेण्यांत आलें, तरी तेथेंहि तो कांहीं बोलला नाहीं. हवालदार म्हणाला, 'याच्या डोक्यावर ओझें द्या.' शिपायांनीं तें दिलें आणि त्यानेंहि तें मुकाट्यानें घेतलें. तेव्हां हवालदार मागें फिरून गाडीबरोबर चालूं लागला. इतक्यांत एकाएकीं पिस्तुलाचा एक आवाज झाला, आणि हवालदाराच्या डोक्यांत गोळी शिरून तो मरून जमिनीवर पडला. "याच साल्यानें हवालदाराला मारलें." असें बोलून एका शिपायानें त्या भारवाहकाचा हात धरला. त्याच्या हातांत अद्याप पिस्तुल होतेंच. भारवाहकानें लागलीच डोक्यावरचें ओझें फेकून देऊन आणि पिस्तुल उलटें धरून शिपायाच्या डोक्याकडे नेम धरला. तोहि डोकें फुटून मरून पडला. इतक्यांत "जयहरी! जयहरी!" असा शब्द करीत दोनशें हत्यार बंद लोक येऊन त्यांनीं शिपायांना घेरा दिला. शिपाई तेव्हां साहेबाच्या येण्याची वाट पाहात होते. लुटारू आलेले पाहून साहेबहि सत्वर गाडीपाशीं आला आणि चौरस करून उभें राहण्याचा त्यानें हुकूम केला. इंग्रजाच्या डोळ्यावरची धुंदी अशा प्रसंगीं रहात नाहीं. शिपायांनीं तात्काळ हुकुमाप्रमाणें कवाईत करून चौरस केला. अंमलदाराचा दुसरा हुकूम होतांच त्यांनीं बंदुका वर उचलल्या. इतक्यांत एकाएकीं साहेबाच्या कंबरेची तलवार कोणीं काढून घेतली, आणि त्याच्या डोक्यावर तिचा वार केला. त्यानें त्याचें मस्तक फुटून तो घोड्यावरून खालीं पडला. गोळीबार करण्याचा हुकूम देण्याचें अर्थात् राहून गेलें. एक माणूस गाडीवर चढून हातांत तलवार धरून उभा होता, आणि 'जयहरी! जयहरी!' अशी गर्जना करीत 'शिपायांना मारा. शिपयांना मारा' असें सांगत होता. हें ज्यानें सांगितलें तोच भवानंद.

गोऱ्या अंमलदाराला ठार केलेला पाहून आणि स्वसंरक्षणाचा हुकूम दुसऱ्या कोणाकडून न मिळाल्यामुळें शिपाई कांहीं काळ भयभीत होऊन निश्चेष्ट उभे राहिले. येवढया अवकाशांत त्या दमदार लुटारूंनीं त्यांतल्या पुष्कळ शिपायांना लोळवून ठार केलें, व गाड्यांच्या जवळ जाऊन खजिन्याच्या पेट्या हस्तगत केल्या. शिपाई बिचारे हतवीर्य व पराभूत होऊन पळून गेले.

तेव्हां जो पुरुष उंचवट्यावर उभा होता, आणि अखेर ज्यानें त्या लढाईंत मुख्य भाग घेतला होता, तो भवानंदाच्या जवळ गेला. ते दोघे परस्परांना कडकडून भेटले. भवानंद म्हणाला, "भाई जीवानन्द! घेतलेल्या व्रताचें आज सार्थक झालें."

जीवानंद म्हणाला, " भवानंद ! धन्य तुमची ! "

लुटलेला खजिना योग्य ठिकाणीं नेऊन त्याची नीट व्यवस्था लावण्याचें काम जीवानंदाकडे देण्यांत आलें. त्याप्रमाणें तो आपल्या सोबत्यांबरोबर त्या कामासाठीं सत्वर दुसरीकडे गेला, आणि भवानंद एकटा एकीकडे उभा राहिला.

---

## प्रकरण नववें.

महेंद्र गाडीवरून उतरून व एका शिपायाचें हत्यार काढून घेऊन, त्या चकमकींत सामील होण्याच्या उद्योगांत होता; पण इतक्यांत त्याला स्पष्ट दिसून आलें कीं, हे लोक लुटारू आहेत. खजिना लुटण्यासाठींच यांनीं शिपायांवर हल्ला केला आहे. हा विचार मनांत येऊन तो त्या चकमकीच्या जागेपासून दूर जाऊन उभा राहिला होता. कारण, लुटारूंना साह्य करणें हें त्याच्या चित्ताला पटलें नाहीं. तेव्हां तरवार फेंकून देऊन हळूहळू तो तेथून निघून जाऊं लागला; इतक्यांत भवानंद त्याच्याजवळ जाऊन पोंचला. महेंद्रानें विचारलें, " महाराज ! आपण कोण ? "

भवानंद म्हणाला, " त्याच्याशीं तुम्हांला काय करावयाचें आहे ? "

**महेंद्रः**—" आहे, कांहीं काम आहे. आज तुमचे माझ्यावर फार उपकार झाले आहेत. "

**भवानंदः**—एवढी जाणीव तुम्हाला असेल असें मला वाटलें नव्हतें. तुमच्या हातांत हत्यार असून तुम्ही दूर उभे राहिलां ! ठीकच आहे ! तुम्ही श्रीमंतांचें चिरंजीव. दूध खीर खाण्यांत शूर ! कामाच्या वेळीं मात्र दूर !

भवानंदाचें हें वाक्य पुरें होतें न होतें, तोंच महेंद्र तिरस्कारानें म्हणाला, " पण हें वाईट कृत्य ! हा दरवडा !" भवानंद म्हणाला, " दरवडा असेल; पण आम्हीं तुझ्यावर उपकार केले आहेत व आणखीहि करण्याची इच्छा बाळगतों. "

**महेंद्रः**—तुमचे थोडेसे उपकार झाले आहेत खरे; पण आणखी उपकार कोणते करणार ? लुटारूंचे आणखी उपकार करून घेण्यापेक्षां ते न झालेलेच बरे.

**भवानंदः**—उपकाराचा स्वीकार करणें वा न करणें ही तुझ्या इच्छेची गोष्ट आहे. तुझी इच्छा असली, तर माझ्याबरोबर चल. तुझ्या स्त्रीची व मुलीची भेट करवून देतों.

महेंद्रानें विचारलें, " ती कशी ?"

भवानंद त्या प्रश्नाचें उत्तर न देतां चालूं लागला. अर्थात् महेंद्रहि त्याच्या बरोबर चालला; पण वारंवार तो मनांत म्हणे कीं, " हे कसले चमत्कारिक लुटारू ?"

---

## प्रकरण दहावें.

त्या चांदण्या रात्रीं हे दोघेजण मुकाट्यानें त्या अरण्यांतून चालले होते. महेंद्र स्तब्ध, शोकातुर, थोडा अभिमानी आणि कुतूहलयुक्त होता.

भवानंदानें एकाएकीं भिन्न स्वरूप धारण केलें. स्थिर, शांत, धीर प्रकृतीचा संन्यासी तो आतां राहिला नव्हता. रणधुरंधर वीरमूर्ति—इंग्रज सेनापतीचें मुंडकें मारणारा भीषण मूर्ति–हि तो आतां राहिला नव्हता. ज्या अभिमानानें त्यानें महेंद्राचा तिरस्कार केला होता, ती मानीपणाचीहि वृत्ति आतां त्याच्या ठायीं नव्हती. जणूं काय चंद्रप्रकाशानें उज्वलित व शांतियुक्त झालेल्या पृथ्वी-वरच्या नद्या, पर्वत, व अरण्य यांची शोभा पाहून त्याच्या चित्ताला कांहीं विशेष प्रकारची स्फूर्ति झाली होती. चंद्रोदय झाला म्हणजे समुद्र जसा हसतो, तसा आतां भवानंद हसतमुख झाला होता. तो आतां बोलण्यांत अघळपघळ आणि मिष्टभाषणी झाला होता. त्याला आतां खूप बोलावेंसें वाटत होतें. त्यानें पुष्कळ खटपट केली; पण महेंद्र मुळींच कांहीं उत्तर देईना. तेव्हां निरुपाय होऊन भवानंद आपल्याच मनाशीं पुढील गीत गाऊं लागला—

**वन्दे मातरम् ।**
**सुजलाम्, सुफलाम् मलयजशीतलाम्**
**शस्यशामलां मातरम्**

महेंद्र हें गीत ऐकून कांहींसा विस्मित झाला. सुजला, सुफला, मलयजशीतला, शस्यशामला, अशी माता कोण ? तें त्याला कांहीं कळेना, त्यानें विचारलें, "ही माता कोण ?" पण उत्तर न देतां भवानंद पुढें गाऊं लागला—

**शुभ्र-ज्योत्स्ना-पुलकित यामिनीम्,**
**फुल्लकुसुमित-द्रुमदल शोभिनीम्,**
**सुहासिनीम् सुमधुरभाषिणीम्**
**सुखदाम् वरदाम् मातरम् ॥**

महेंद्र म्हणाला, "अरे ! हें तर आपल्या देशाचें वर्णन ! ही कांहीं आई नव्हे—"

भवानंद म्हणाला. "आम्ही दुसऱ्या आईला ओळखीत नाहीं. 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी.' आम्ही म्हणतों जन्मभूमि हीच आमची आई. आम्हांला दुसरी आई नाहीं, बाप नाहीं, भाऊ नाहीं, स्त्री नाहीं, पुत्र नाहीं, घर नाहीं, कीं दार नाहीं. आम्हांला केवळ ही सुजला, सुफला, मलयजशीतला; शस्यशामला—"

मग महेंद्राच्या लक्षांत सारें आलें आणि तो म्हणाला, "पुन्हां तें गाणें गा पाहूं ?"

भवानंदानें गाइलें. तें असें—

वन्दे मातरम् ।
सुजलां सुफलां मलयजशीतलाम्
शस्यश्यामलां मातरम् ।
शुभ्र-ज्योत्स्ना-पुलकित यामिनीम्,
फुल्लकुसुमित-द्रुमदलशोभिनीम्,
सुहासिनीं सुमधुरभाषिणीम्
सुखदां वरदां मातरम् ॥
सप्तकोटिकंठ–कलकल-निनाद कराले,
द्विसप्तकोटिभुजैर्धृतखरकरवाले,
अबला केन मा एत बले,
बहुबलधारिणीं नमामि तारिणीम्
रिपुदल वारिणीं मातरम् ॥
तुमि विद्या तुमि धर्म,
तुमि हृदि तुमि मर्म,
त्वं हि प्राणाः शरीरे ।
बाहुते तुमि मा शक्ति,
हृदये तुमि मा भक्ति,
तोमारइ प्रतिमा गडि मन्दिरे मन्दिरे ।
त्वं हि दुर्गा दशप्रहरणधारिणी
कमला कमल-दल-विहारिणी
वाणी विद्यादायिनी नमामि त्वाम्
नमामि कमलां अमलां अतुलाम्

**सुजलां सुफलां मातरम्,**
**वंदे मातरम्**
**श्यामलां सरलां सुस्मितां भूषिताम्**
**धरणीं भरणीं मातरम् । ”**

महेंद्रानें पाहिलें, लुटारू गातां गातां रडूं लागला. तेव्हां त्यानें कौतुकानें विचारलें, ‘तुम्ही कोण आहां ? ’

**भवा०**—आम्ही ना ? मुलें.

**महें०**—म्हणजे काय ? कोणाचीं मुलें ?

**भवा०**—आमच्या मातेचीं.

**महेंद्र०**—ठीक ! मुलें लूटमार करून तिनें मातेची पूजा करतात काय ? ही कुठली मातृभक्ति ?

**भवा०**—आम्हीं लूटमार करीत नाहीं.

**महें०**—आतांच खजीना लुटलाना ?

**भवा०**—ही काय लूटमार म्हणायची ? कोणाचा पैसा आम्हीं लुटला ?

**महेंद्र०**—कोणाचा ? राजाचा.

**भवा०**—राजाचा ? हा सगळा पैसा तो जो घेऊन जात होता, तो घेऊन जाण्याला त्याला काय अधिकार आहे ?

**महेंद्र०**—तो पैसा राज्याच्या वसुलीचा होता. तो राजाचाच अंश आहे.

**भवा०**—जो राजा प्रजेचें पाळन करीत नाहीं, तो राजा कसचा ?

**महें०**—तुम्ही एखादे दिवशीं तोफेच्या तोंडीं उडून जाणार असें दिसतें. राजाचे शिपाई येतील तेव्हां कळेल.

**भवा०**—आजपर्यंत पुष्कळ शिपाई पाहिले आहेत ! आज नाहींत का दिसले ?

**महें०**—अजून चांगले पाहिले नाहींत. पाहाल एखादे दिवशीं.

**भवा०**—नसतील पाहिले. पण मरण तर माणसाला जन्मांत एकदांच येतें ना ? दुसऱ्यांदा तर येत नाहीं ?

**महें०**—तर मग अशी मरण्याची इच्छा कां करतां ?

**भवा०**—महेंद्रसिंह ! तुमच्यांत कांहीं पौरुषत्व असेल, असें मला अगोदर वाटलें होतें; पण आतां मला नव्यानेंच आढळून आलें कीं तुम्हीहि तसेच आहां. केवळ खायला काळ आणि भुईला भार ! पहा ! साप हा केवळ मातींतून छातीनें

सरपटत जाणारा क्षुद्र प्राणीना ? त्याच्यापेक्षां क्षुद्र जीव मीं तर दुसरा कोणता पाहिला नाहीं. पण त्याच्याहि शेपटीवर पाय देतांच तो फणा काढून उठतो. तुमच्यांतलें पाणी कशानेंच कांहीं उसळत कसें नाहीं ? पहा ! मगध, मिथिला, काशी, कांची, दिल्ली, काश्मीर, कोणताहि देश घ्या, कोणत्या देशाची इतकी दुर्दशा झाली आहे ? कोणत्या देशांतला मनुष्य खायला मिळत नाहीं, म्हणून गवत खाऊं लागला आहे ? कीं माती खातो आहे ? कीं रानांतल्या वेला खातो आहे ? कोणत्या देशांतला मनुष्य कोल्हीं कुत्रीं खातो आहे ? किंवा मढयाचें मांस खातो आहे ? आमच्या देशांतल्या माणसाला पेटींत बंद करून ठेवलेल्या पैशाविषयीं सुरक्षितपणा वाटून स्वस्थ झोप कां येत नाहीं ? देव्हाऱ्यांत ठेवलेल्या देवाविषयीं स्वस्थपणा कां वाटत नाहीं ? घरांतल्या बायकामाणसांना घरांत ठेवल्यावरहि सुरक्षितपणा वाटून झोप कां येत नाहीं ? नोकराचाकराजवळ पोरा-सोरांना संभाळण्यासाठीं दिल्यावर मनाला स्वस्थपणा कां वाटत नाहीं ? सगळ्या देशांत पहावें तर प्रजेच्या रक्षणाचें काम राजाकडेस असतें; पण आपले मुस-लमान राज्यकर्ते प्रजेचें रक्षण करीत आहेत काय ? धर्म बुडाला, जात गेली, मान नष्ट झाला, फार काय; पण प्राण सुद्धां जाऊं लागले ! आतां या धुंद व उन्मत्त झालेल्या राजाला येथून हाकून दिल्याशिवाय हिंदूचें हिंदुत्व राहील काय ?

**महें०**—पण यांना कसें हाकून देणार ?

**भवा**—कसें म्हणजे ? मारून.

**महें०**—तुम्ही एकटे त्याला मारणार ? थापटीनें नाहीं कां ?

लुटारू गाऊं लागला

**‘सप्तकोटिकंठ-कलकल--निनाद् कराले,**
**द्विसप्तकोटिभुजैर्धृतखरकरवाले,**
**अबला केन मा एत बले ।’**

**महें०**—पण मी तर तुम्हांला एकटे पाहतों ?

**भवा०**—कां बरें ? आतां दोनशें लोक तुम्ही नाहीं पाहिले ?

**महें०**—हे सगळे संतानच काय ?

**भवा०**—हो. सगळे संतानच.

**महें०**—आणखी किती आहेत ?

**भवा०**—हजारों. क्रमानें त्यांची संख्या वाढतच जायची.

**महें०**—फार झाली तर दहावीस हजार होईल. तरी येवढयानें कां तुम्हांला मुसलमानांना राज्यभ्रष्ट करवणार आहे ?

**भवा०**—प्लासीच्या लढाईंत इंग्रजांची फौज किती होती ?

**महें०**—पण ते इंग्रज आणि आपण बंगाली.

**भवा०**—यावरूनच पहा कीं, केवळ अंगांत जोर असला म्हणजे झालें असें नाहीं. अंगांत जोर अधिक असल्यानें बंदुकींतून गोळ्या अधिक सुटतात काय ?

**महें०**—मग इंग्रज आणि मुसलमान यांच्यांत इतका भेद काय म्हणून ?

**भवा०**—हें पहा. इंग्रज प्राण गेल्यानें कधीं पळ काढीत नाहीं, आणि मुसलमान अंगाला घाम सुटतांच सरबताच्या शोधाला आधीं लागतो ! तसेंच इंग्रजांत आणखी चिकाटीचाहि गुण आहे. तो जें कांहीं धरून बसतो, तें सोडीत नाहीं. मुसलमानांची सगळीकडेच ढिलाई. पैशासाठीं प्राण देऊनसुद्धां त्यांच्या शिपायांना चांगला पगार मिळत नाहीं ! अखेरीची गोष्ट म्हणजे धाडस. तोफेचा गोळा एके जागीं पडतो, दहावीस जागीं पडत नाहीं. अर्थात् एकादा गोळा पाहतांच दहा जणांनीं पळून जाण्याचें कारण नाहीं; पण तोफेचा एकादा गोळा पाहिला कीं, मुसलमान पहा कसे गुरांसारखे सैरावैरा धावूं लागतात ! बरें, गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला, तर इंग्रज एकटा कधीं पळावयाचा नाहीं.

**महें०**—तुमच्यांत हे सर्व गुण आहेत ?

**भवा०**—नाहीं. गुण कांहीं झाडावरून पडत नसतात ! ते अभ्यासानें अंगीं आणावे लागतात.

**महें०**—तुम्ही कसा काय अभ्यास केला ?

**भवा०**—मी संन्यासी आहें, हें तुम्हीं पाहतांना ? आमचा संन्यास या अभ्यासासाठींच आहे. कार्य भाग संपला, म्हणजे आमचा अभ्यासहि संपला. मग आम्ही परत गृहस्थाश्रम धर्मांत जाऊं. आम्हालाहि बायकापोरें आहेतच.

**महें०**—तुम्ही मायापाश तोडून सर्वांचा त्याग करण्यास समर्थ झालां आहां काय ?

**भवा०**—संतानाला खोटें बोलतां येत नाहीं. तुमच्यापाशीं मी खोटीच बढाई मारणार नाहीं. मायापाश कोणाच्यानें तोडवणार आहेत ? जे कोणी म्हणतात कीं आम्हीं मायापाश तोडले आहेत, त्यांना मी म्हणेन कीं एक तर तुमच्या ठायीं माया नसली पाहिजे, किंवा तुम्ही उगाच बढाई तरी मारीत

असलां पाहिजे. आम्हीं मायपाश तोडले नाहींत. आम्हीं व्रत धारण केलें आहे. तुम्ही याल का संतानाच्या पंथांत?

**महें०**—माझ्या स्त्रीकन्येची कांहीं खबर कळली नाहीं, तोंपर्यंत मला कांहीं एक सांगतां येत नाहीं.

**भवा०**—चला. तुमच्या स्त्रीकन्येशीं तुमची भेट करून देतों.

असें म्हणून दोघेजण निघाले. भवानंद पुनः 'वंदे मातरम्' हें पद गाऊं लागला. महेंद्राचा कंठ चांगला होता. तो संगीत विद्या शिकला असून तिची त्याला गोडीहि होती. अर्थात् दोघेहि बरोबर गाऊं लागले. गातां गातां दोघांचेहि डोळे अश्रूंनीं भरून आले. तेव्हां महेंद्र म्हणाला, 'चला, स्त्रीकन्येचा त्याग करावा लागत नसेल, तर हें व्रत मला द्या.'

**भवा०**—जो हें व्रत घेतो तो स्त्री कन्येचा त्याग करतो. जर तुम्हांला हें व्रत घ्यावयाचें असेल, तर स्त्री कन्येला तुम्हांला भेटतां येणार नाहीं. त्यांच्या संरक्षणाचा योग्य बंदोबस्त करण्यांत येईल. पण व्रताची सफलता होईपर्यंत त्यांचें मुखदर्शन करणें निषिद्ध आहे.

**महें०**—तर मग मी हें व्रत घेत नाहीं.

---

## प्रकरण अकरावें.

रात्र संपून प्रभात झाली. तेंच निर्जन अरण्य. इतका वेळ अंधकारमय आणि शब्दहीन होतें, तें आता प्रकाशमय झालें, आणि पक्ष्यांच्या किलकिलाटानें व आनंदानें भरून गेलें. त्या आनंदमय प्रभातकाळीं व आनंद काननांतल्या 'आनंद मठांत' सत्यानंद ठाकुर मृगचर्मावर बसून संध्यावंदनादि आन्हिक कृत्यें करीत होते. जवळ जीवानंद बसला होता. इतक्यांत भवानंद महेंद्रसिंहाला घेऊन तेथें गेला. ब्रह्मचारी कांहीं न बोलतां संध्या करीत होते. अशा वेळीं कोणाच्यानें-हि तेथें एक शब्द उच्चारण्याचें धाडस करवलें नाहीं. संध्याकृत्य आटोपल्या. बरोबर भवानंद व जीवानंद या दोघांनीं त्यांना नमस्कार केला, आणि त्यांच्या पायाची धूली वंदन करून ते नम्रभावानें खालीं बसले. मग सत्यानंद भवानंदाला खूण करून एकीकडे घेऊन गेला. त्यांच्या काय गोष्टी झाल्या त्या आम्हांला ठाऊक नाहींत. त्यानंतर दोघेहि मंदिराला परत आले. ब्रह्मचारी हसतमुखानें व करुणायुक्त स्वरानें महेंद्राला म्हणाला, 'बाबा! तुमचें दुःख ऐकून माझ्या मनाला अत्यंत वाईट वाटलें. केवळ त्या दीनबंधु परमेश्वराचीच कृपा म्हणून

काल रात्रीं तुमच्या स्त्री कन्येचें संरक्षण मी करूं शकलों.' इतकें बोलून ब्रह्मचाऱ्यानें आपण त्यांचें कसें रक्षण केलें ती सारी हकीकत सांगितली. नंतर तो म्हणाला, 'चला, ज्या ठिकाणीं तीं आहेत तेथें तुम्हांस घेऊन जातों.'

असें बोलून ब्रह्मचारी पुढें आणि महेंद्र मागें अशा रीतीनें ते दोघे मंदिराच्या आंत गेले. आंत गेल्यावर महेंद्रानें पाहिलें तर एक अतिविस्तृत आणि अतिशय उंच दालन होतें. नुकत्याच झालेल्या प्रभातकाळच्या समयीं इकडे जवळचें अरण्य सूर्यकिरणांनीं हिरकण्या जडलेल्या अलंकाराप्रमाणें चमकत होतें, आणि त्याच वेळीं इकडे या दालनांत तितकाच खचून अंधकार भरला होता. घरांत काय आहे तें महेंद्राला प्रथम कांहींच दिसेना. हळू हळू जसजसें दिसायला लागलें, तसतशी एकेक गोष्ट नजरेस पडूं लागली. एक प्रचंड चतुर्भुज मूर्ति होती. तिच्या हातांत शंखचक्रगदापद्म हीं आयुधें होतीं. छातीवर कौस्तुभमणि शोभत होता. समोर सतत फिरत असलेलें सुदर्शनचक्र स्थापित केलें होतें. वामभागीं लक्ष्मीची मूर्ति होती. तिचे केस मोकळे सुटलेले होते. तिच्या कंठांत शतदलकमलपुष्पांचा हार होता. तिची मुद्रा भयभीत दिसत होती. दक्षिणभागीं सरस्वतीची मूर्ति होती. तिच्या हातांत पुस्तक व वीणा हीं असून मूर्तिमान् रागरागिण्या तिच्या भोंवतीं उभ्या होत्या. विष्णूच्या अंकावर एक अतिशय मनोहर मूर्ति होती. ती लक्ष्मी आणि सरस्वती या दोघींच्याहून अधिक सुंदर आणि अधिक ऐश्वर्ययुक्त दिसत होती. गंधर्व, किन्नर, देव, यक्ष, राक्षस, प्रभृति त्या मूर्तीची पूजा करीत होते. ब्रह्मचाऱ्यानें अति गंभीर आणि भीत स्वरानें महेंद्राला विचारलें, 'हें सगळें पाहिलेंस ना?' महेंद्र म्हणाला, 'होय. पाहत आहें.'

**ब्रह्म०**—विष्णूच्या मांडीवर काय आहे पाहिलेंस ?

**महें०**—पाहिलें. कोण आहे ?

**ब्रह्म०**—माता.

**महें०**—माता कोण ?

**ब्रह्म०**—आम्ही जिचे उपासक आहों ती.

**महें०**—पण ती कोण ?

**ब्रह्म०**—तें तुला पुढें कळेल. बोला—'वंदे मातरम्.' आतां चल, आणखी पाहायला चल.

मग ब्रह्मचारी महेंद्राला दुसऱ्या एका दालनांत घेऊन गेला. तेथें एक अलौकिक रूपवान्, सर्वांगसंपन्न व सर्वाभरणभूषित अशी जगद्धात्री देवीची मूर्ति होती. महेंद्रानें विचारलें, ' ही कोणाची मूर्ति ?'

**ब्रह्म०**—मातेची–जी होऊन गेली तिची.

**महें०**—ती कोण ?

**ब्रह्म०**—हिनें कुंजर, केसरी प्रभृति सगळे वन्यपशु पायांखालीं तुडवून वन्यपशूंच्या वसतिस्थानावर आपलें पद्मासन स्थापित केलें होतें. ही सर्वालंकार विभूषित, हास्यमयी सुंदरी होती. हिचा वर्ण नुकत्या उगवलेल्या सूर्याप्रमाणें लाल असून ही मोठी ऐश्वर्यशालिनी होती. हिला नमस्कार कर.

महेंद्रानें भक्तिभावानें जगद्धात्री मातृभूमीला प्रणाम केल्यावर ब्रह्मचाऱ्यानें त्याला एक अंधकारमय भूयारांतली वाट दाखविली, आणि म्हटलें, 'ये'.

ब्रह्मचारी स्वतः पुढें पुढें चालला होता. महेंद्र भीतभीत मागून जात होता. भुयारांतल्या त्या दालनांत कोठून थोडासा प्रकाश येत होता. त्या मंद प्रकाशानें कालीची मूर्ति दिसत होती.

**ब्रह्म०**—मागें अवतार केलेली ही एक माता पहा.

महेंद्र भीतीनें म्हणाला, 'काली ?'

**ब्रह्म०**—होय काली.—अंधकारसमाच्छन्न कालिमामय. हिच्या अंगावरचें सगळें कांहीं काढून नेलें आहे म्हणून ही अशी नग्न आहे. आज आपला देश सर्वत्र स्मशानासारखा झाला आहे. म्हणूनच हिनें गळयांत ही रुंडमाला घातली आहे. आपल्या शिवाला तिनें आपल्या पादतळीं दडपलें आहे. हाय माते !

ब्रह्मचाऱ्याच्या डोळ्यांतून दरदरून अश्रुधारा वाहूं लागल्या. महेंद्रानें विचारलें, 'हातांत ही गदा व हें खापर कशासाठीं ?'

**ब्रह्म०**—आम्ही संतान आहों. आम्ही मातेच्या हातांत हेंच शस्त्र दिलें आहे. बोला 'वन्दे मातरम्.'

'वन्दे मातरम्' म्हणून महेंद्रानें कालीमातेला प्रणाम केला. मग ब्रह्मचारी म्हणाला, 'या वाटेनें या.' असें म्हणून तो भुयारांतली दुसरी एक वाट चढून जाऊं लागला. एकाएकीं त्यांच्या डोळ्यांवर सूर्याचे प्रकाशकिरण पडले, आणि चोहींकडून पक्ष्यांचें सुस्वर गायन ऐकूं येऊं लागलें. महेंद्रानें पाहिलें तेव्हां संगमरवरी दगडांच्या प्रशस्त मंदिरांत सोन्याची दशभुजा मूर्ति त्याला दिसली. तिच्या अंगावर बाल सूर्याचे किरण पडून ती चकाकत होती. जणूं काय ती हंसत होती ! ब्रह्म-

चारी तिला प्रणाम करून म्हणाला, 'हीहि अशीच मागें अवतार होऊन गेलेली माता आहे. हिनें दाही भुजा दाही दिशांना पसरल्या आहेत—त्यांच्या ठिकाणीं नानाविध शक्ति नानाविध रूपानें शोभत आहेत. पायांखालीं शत्रूला तुडविलें आहे. हिच्या चरणांच्या आश्रयानें एक वीरकेसरी बसला आहे. शत्रुनिपीडनाचें काम त्याच्याकडे दिलें आहे. दिग्भुजा–' बोलतां बोलतां सत्यानंदाचा कंठ सद्गदित होऊन तो रडूं लागला.'दिग्भुजा, नाना प्रहरणधारिणी, शत्रुविमर्दिनी, वीरेंद्रपृष्ठविहारिणी—दक्षिण भागीं भाग्यरूपिणी लक्ष्मी, वामभागीं विद्याविज्ञान दायिनी सरस्वती—बरोबर बलरूपी कार्तिकेय, व कार्यसिद्धिरूपी गणेश. ये, आपण दोघे यांना बरोबर प्रणाम करूं.' तेव्हां दोघांनीं हात जोडून, वर मान करून, पुढील स्तोत्र एकाच सुरानें म्हटलें—

'सर्व मंगल मांगल्ये शिवे सर्वार्थ दायिके।
शरण्ये त्र्यंबके गौरि नारायणि नमोऽस्तुते॥'

दोघेहि भक्तिभावानें प्रणाम केल्यानंतर उठले. महेंद्रानें सद्गदित कंठानें विचारलें, 'मातेची ही मूर्ति केव्हां पाहण्यास मिळेल?'

ब्रम्हचारी म्हणाला, 'जेव्हां मातेचीं सगळीं लेंकरें तिला 'माते' म्हणून तिचा धांवा करतील, त्याच दिवशीं ती प्रसन्न होईल.'

महेंद्रानें एकाएकीं विचारलें, 'माझी स्त्री कन्या कोठें आहे?'

**ब्रम्ह०**—चल, दाखवितों, चल.

**महेंद्र**—त्यांची एकदां भेट घेऊन निरोप घेईन.

**ब्रम्ह०**—निरोप कां घेणार?

**महें०**—मी हा महामंत्र घेणार आहें.

**ब्रम्ह**—स्त्री कन्येला कोठें ठेवणार?

महेंद्रानें थोडा वेळ विचार करून म्हटलें, "माझ्या घरीं कोणी नाहीं. मला दुसरें ठिकाणहि नाहीं. या महामारीच्या काळांत कोठें स्थान मिळणार?"

**ब्रम्ह०**—ज्या वाटेनें येथें आलास, त्याच वाटेनें मंदिराच्या बाहेर जा. मंदिराच्या दाराशीं तूं आपल्या स्त्रीकन्येला पाहशील. कल्याणीनें आतांपर्यंत कांहींएक खाल्लेलें नाहीं. ज्या ठिकाणीं तीं बसलीं आहेत, त्याच ठिकाणीं त्यांना खाण्याला मिळेल. त्यांचें खाणें पिणें झाल्यावर तुला वाटेल तसें कर. आतां आमच्यापैकीं कोणाचीहि भेट तुला होणार नाहीं. तुझा विचार आमच्यासारखा ठरला, तर तुझी भेट होईलच.

इतकें बोलून तो ब्रम्हचारी एकाएकीं दिसेनासा झाला. महेंद्र ब्रम्हचाऱ्यानें सांगितलेल्या वाटेनें मंदिराच्या दारापाशीं गेला. तेथें पाहतो तों सभामंडपांत कल्याणी मुलीला घेऊन बसली होती.

इकडे सत्यानंद दुसऱ्या भुयारांतल्या मार्गानें उतरून एका गुप्त तळघरांत उतरला. त्या ठिकाणीं जीवानंद व भवानंद बसून रुपये मोजून त्यांच्या चळथी लावीत होते. त्या घरांत सोनें, चांदी, तांबें, हिरे, प्रवाळ व मोत्यें यांच्या राशीच्या राशी पडल्या होत्या. आदल्या रात्रीची लूट नीट व्यवस्थेनें लाविली होती. सत्यानंद त्या घरांत येऊन म्हणाला, 'जीवानंद ! महेंद्र येणार आहे. तो आला तर चांगलें होईल. कारण, तो आल्यानें त्याची वडिलोपार्जित संपत्ति मातेच्या सेवेला अर्पण केली जाईल. पण जोंपर्यंत तो कायावाचामनेंकरून मातेचा भक्त बनला नाहीं, तोंपर्यंत त्याला आपल्यांत घेऊं नका. तुमच्या हातांतलें काम संपलें म्हणजे, तुम्ही निरनिराळ्या वेळीं त्याच्यामागून जा, आणि योग्य वेळ पाहातांच त्याला श्री विष्णुमंडपांत घेऊन या. कसाहि प्रसंग असो. याचें रक्षण करा. कारण, दुष्टांचें शासन करणें हा जसा आपला संतानांचा धर्म आहे, त्याप्रमाणें शिष्टांचें रक्षण करणें हाहि आपला धर्मच आहे.

---

## प्रकरण बारावें.

अनेक दुःखांतून पार पडल्यावर महेंद्र आणि कल्याणी यांची भेट झाली. कल्याणी रडून रडून जमीनीवर लोळूं लागली. महेंद्रहि रडूं लागला. बराच वेळ रडल्यावर त्यानें आपले डोळे पुसले. कितीहि वेळ पुसले तरी डोळ्यांतलें पाणी खळेना. तें येणें बंद व्हावें म्हणून कल्याणीनें खाण्यापिण्याच्या गोष्टी काढल्या. ब्रह्मचाऱ्याच्या शिष्यांनीं खाण्यासाठीं जें अन्न ठेविलें होतें, तें खाण्याविषयीं कल्याणी महेंद्राला आग्रह करूं लागली. दुष्काळाच्या दिवसांत अन्न मिळण्याची कोण मुष्किल ! पण देशांत जें कांहीं होतें, तें मिळणें संतानांना सुलभ होतें. तें अरण्य साधारण माणसाला अगम्य होतें. त्यामुळें, झाडांना जीं फळें लागलीं होतीं तीं पाहून कोणाहि उपाशी माणसाला आपली भूक शांत करतां येत असे. पण या अगम्य अरण्यांतल्या झाडांचीं फळें दुसऱ्या कोणालाहि मिळत नसत. यामुळें संतानांना नाना प्रकारचीं जंगलीं फळें आणि थोडेंसें दूध आणून तेथें ठेवण्यास फारसें जड गेलें नाहीं. या संतानांच्या संग्रहाला पुष्कळ गाई होत्या. कल्याणीच्या आग्रहावरून महेंद्रानें प्रथम थोडेंसें भोजन केलें. नंतर त्याचें उच्छिष्ट घेऊन कल्याणी

दूर खावयाला बसली. दुधापैकीं थोडें मुलीला पाजलें व पुन्हां पाजण्यासाठीं थोडें राखून ठेविलें. नंतर तीं दोघें निजलीं. थोडा श्रमपरिहार झाल्यावर तीं उठून बसलीं आणि विचार करूं लागलीं कीं, "आतां कोठें जाणार ?"

कल्याणी म्हणाली, 'घरीं त्रास होऊं लागला म्हणून घरदार सोडून आपण निघालों; पण आतां पाहातों तों घरच्या पेक्षां बाहेरच विपत्ति अधिक ! तेव्हां आपलें घरीं गेलेलेंच बरें नाहीं काय ?'

महेंद्रालाहि ती गोष्ट पटली. महेंद्राची इच्छा ही कीं, कल्याणीला घरीं ठेवून तिच्या रक्षणासाठीं एक माणूस नेमावा; आणि आपण स्वतः हें अत्यंत रमणीय अपार्थिव, पवित्र, मातृसेवाव्रत ग्रहण करावें. म्हणून त्यानें कल्याणीच्या म्हणण्याला तत्काळ रुकार दिला. अंगांतला सगळा शीण निघाल्यावर तीं दोघें मुलीला कडेवर घेऊन आपल्या पदचिन्ह गांवाकडे जाण्यास निघालीं.

पण आपल्या गांवचा रस्ता कोणचा, तें त्या दुर्भेद्य अरण्यांत त्यांना निश्चित करतां येईना. त्यांनीं विचार केला, कीं, या अरण्यांतून तर पार पडूं या. बाहेर पडलों म्हणजे रस्ता दिसेलच. पण अरण्यांतून तरी बाहेर पडण्याला रस्ता मिळायला हवाना ? तो न मिळाल्यामुळें बराच वेळ तीं त्या अरण्यांतच घुटमळत फिरत राहिलीं. फिरावें, फिरावें, आणि पुन्हा त्याच जागीं यावें, असें चाललें होतें. बाहेर जाण्याचा मार्गच सांपडेना. समोर एक अपरिचित ब्रह्मचारी हांसत उभा असलेला दिसला. त्याचें हासणें पाहून महेंद्रानें त्याला रागानें विचारलें, "गोसावी महाराज ! हांसतां कां ?"

गोसावी म्हणाला, "तुम्ही या रानांत शिरलां कसे ?'

**महेंद्रः**—कसे तें सांगतां येत नाहीं. शिरलों खरे.

**गोसावीः**—जर तुम्हांला शिरतां आलें, तर बाहेर कां जातां येत नाहीं ?

इतकें बोलून तो गोसावी पुन्हां हंसूं लागला.

महेंद्र रागानें म्हणाला, "तुम्ही हसतां, पण तुम्हाला तरी या अरण्याच्या बाहेर पडतां येईल काय ?"

**ब्रह्मचारीः**—माझ्या बरोबर या. मी वाट दाखवितों. तुम्ही कोणातरी ब्रह्मचाऱ्याच्या किंवा संन्याशाच्या संगतीनें या अरण्यांत आलां असलां पाहिजे. या ठिकाणाहून बाहेर जाण्याचा व येण्याचा मार्ग त्यांच्यावांचून दुसऱ्या कोणाला माहीत नाहीं.

तें ऐकून महेंद्रानें विचारलें, "आपण संतानसंप्रदायांले आहां काय ?"

ब्रह्म०:—हो, माझ्याबरोबर या. तुम्हांला वाट दाखविण्यासाठींच मी येथें उभा होतों.

महेंद्रानें विचारलें, " तुमचें नांव काय ?"

गोसाव्यानें उत्तर केलें. "माझें नांव धीरानंद गोस्वामी."

इतकें बोलून धीरानंद पुढें चालला. महेंद्र व कल्याणी त्यच्यामागून जात होतीं. धीरानंदानें त्यांना एका अतिबिकट मार्गानें अरण्यांतून बाहेर नेल्यावर तीं पुन्हा दुसऱ्या एका रानांत शिरलीं.

अरण्यारण्यांतून बाहेर आल्यावर त्यांना एक मोठें मैदान लागलें. तेथें बरीच झाडी होती. तें मैदान एका बाजूला राहिलें. रानाच्या कांठा कांठानें एक रस्ता जात होता. रानांतून एक लहानसा ओढा झुळझुळ शब्द करीत वाहात होता. त्याचें पाणी अतिशय स्वच्छ; पण निबिडमेघाप्रमाणें काळें होतें. त्या ओढयाच्या दोन्ही बाजूंनीं नाना जातींचे शोभिवंत वृक्ष वाढून त्यांची छाया ओढ्यावर पडली होती. त्या वृक्षांवर अनेक पक्षी बसून मंजुळ गाणीं गात होते. तो त्यांचा मधुर रव ओढयाच्या झुळझुळ नादाशीं मिळून गेला होता. त्याचप्रमाणें वृक्षांची छाया व पाण्याचा वर्ण हींहि तशींच मिळालीं होतीं. कल्याणीचें मनहि जणूं काय त्या छायेशीं मिळून गेलें होतें. ती एका वृक्षाच्या तळाशीं बसली होती. तिनें आपल्या पतीलाहि आपल्या जवळ बसविलें. त्याच्या जवळून मुलीला आपल्या जवळ घेतलें, आणि पतीचा हात आपल्या हातांत घेऊन ती थोडा वेळ स्तब्ध बसली. नंतर तिनें विचारलें, "आपली मुद्रा आज खिन्न दिसते. आपली संकटांतून मुटका झाली आहे; मग अशी खिन्नता कां ?"

महेंद्र लांब उसासा टाकून म्हणाला, "आतां मी तुमचा राहिलों नाहीं. काय करावें तें मला कळत नाहीं."

कल्याणी:—म्हणजे ?

महेंद्र:—तुझा वियोग झाल्यानंतर माझी काय हकीकत घडली ती ऐक.

असें बोलून त्यानें तिला सारी हकीकत विस्तारपूर्वक सांगितली.

कल्याणी:—मलाहि फार कष्ट झाले. माझ्यावरहि अनेक संकटें आलीं. तीं ऐकून आपल्याला काय करावयाचें आहे ? अतिशय संकटें आलीं तरी, काय असेल तें असो, पण मला चांगली झोंप लागली. त्या झोपेंत मला एक स्वप्न पडलें, तें असें, "माझी काय पूर्वपुण्याई असेल ती असो, पण मी एका अपूर्व स्थानीं गेलें. त्या ठिकाणीं जमीन नव्हती. नुसता प्रकाशच होता. तो प्रकाश अतिशय शीतल

मेघांचा भेद करून आलेल्या प्रकाशाप्रमाणें फार मधुर होता. त्या ठिकाणीं कोणी मनुष्य प्राणी नव्हता. केवळ तेजोमय मूर्ति ! शब्द नाहीं. पण अतिशय दूर चाललेल्या मधुर गीतवाद्याप्रमाणें एक प्रकारचा नाद ऐकूं येत होता. सर्वकाल नुकत्याच उमललेल्या लाखों सुगंधि पुष्पांच्या सुवासाप्रमाणें सुगंध पसरला होता. सर्वांच्या उच्चभागीं कोणी एक बसलेलें दिसत होतें. त्याची प्रभा अंतर्भागीं मंद मंद जळत असलेल्या नील पर्वतासारखी होती. त्याच्या डोक्यावर अत्यंत तेजस्वी मुकुट होता. त्याला चार हात होते. त्याच्या दोन्ही बाजूस कोण उभ्या होत्या तें मला ओळखतां आलें नाहीं. कोणीतरी स्त्री मूर्ति असाव्या. काय त्यांचें रूप ! काय प्रभा ! त्यांच्याकडे पाहतांच माझे डोळे तर दिपून गेले ! त्यांच्याकडे पुन्हां माझ्याच्यानें पाहवेना. त्या चतर्भुज मूर्तीपुढें आणखी एक स्त्री मूर्ति उभी असावी. तीहि अत्यंत तेजस्वी होती; पण चारी बाजूंनीं मेघांनीं आच्छादल्यामुळें तिची मूर्ति स्पष्ट दिसेना. ती अतिशय कृश असावी असें वाटलें. ती स्त्री मला सुगंध, मंद, पवनाच्या तरंगावरून त्या चतुर्भूज मूर्तीच्या सिंहासनाच्या तळापाशीं घेऊन गेली. तेव्हां ती कृश स्त्री माझ्याकडे बोट दाखवून म्हणाली, "हीच ती. तिच्यामुळें महेंद्र आमच्याकडे अजून येत नाहीं." तेव्हां एक अतिशय सुंदर व मधुर बांसरीचा नाद ऐकूं आला. ती चतुर्भूज मूर्ति जणूं काय मला म्हणाली, 'तूं आपल्या पतीला सोडून माझ्या जवळ ये. हीच तुझी आई. तुझा पती हिची सेवा करील. तूं पतीच्या जवळ राहिलीस, तर त्याच्या हातून सेवा होणार नाहीं. चल, ये.' मी रडत रडत म्हणाल्यें, "पतीला सोडून मी कशी येऊं ?" तेव्हां पुनः बांसरीचा शब्द झाला. त्या शब्दांनीं मला सांगितलें, "मीच स्वामी, मीच माता, मीच पुत्र, व मीच कन्या. माझ्याजवळ ये." मीं काय उत्तर केलें तें मला स्मरत नाहीं. इतक्यांत माझी झोंप उघडली." इतकें बोलून कल्याणी स्तब्ध राहिली.

महेंद्र विस्मित, कुंठित व भीत होऊन स्तब्ध राहिला. डोक्यावर भारद्वाजपक्षी शीळ घालूं लागले. चातक पक्षी आपल्या स्वरानें सगळें आकाश निनादित करूं लागले. कोकिल आपल्या रवानें दिङ्मंडल प्रतिध्वनित करूं लागले. भृंगराजाच्या कलकंठरवानें सगळें अरण्य कंपित होऊं लागलें. पायथ्याशीं नदीचा कल्लोलरव होतच होता. वायु वन्यपुष्पांचा मृदुगंध वाहून आणीत होते. कोठें कोठें नदीच्या प्रवाहांत प्रखर प्रकाशाचीं प्रतिबिंबें चमकत होतीं. कोठें तालपत्रांचा मृदु मर्मर शब्द होत होता. दूर अंतरावर पर्वतांची नीलवर्ण रांग दिसत होती. हा सर्व

देखावा पाहून दोघेंहिजण बराच वेळ मुग्ध होऊन स्तब्ध बसलीं होतीं. कांहीं वेळानें कल्याणीनें पुन्हा विचारलें, " कसला विचार चालला आहे ?"

**महेंद्रः**—काय करावें याचा विचार करतों आहें. स्वप्नें माणसाला उगाच भेवडावतात. वस्तुतः आपल्याच मनांत त्यांचा जन्म होतो आणि आपल्याच मनांत तीं लय पावतात. जीवनरूपी जलांतलीं तीं प्रतिबिंबें होत. आपण घरीं जाऊं.

**कल्याणीः**—ज्या ठिकाणीं देवी तुम्हांला बोलावते आहे, त्या ठिकाणीं तुम्ही जा.

असें म्हणून कल्याणीनें कन्येला आपल्या पतीच्या मांडीवर दिलें.

महेंद्रानें मुलीला मांडीवर घेऊन कल्याणीला विचारलें,

" आणि तूं कोठें जाणार ?"

कल्याणीनें आपल्या दोन्ही हातांनीं डोळे झांकले. आणि मग डोकें घट्ट धरून म्हटलें, "मलाहि ज्या ठिकाणीं जाण्याची देवीची आज्ञा आहे, त्या ठिकाणीं मी जात्यें." महेंद्र दचकून उठला आणि म्हणाला, "म्हणजे ? कोठें आणि कशी जाणार ?"

कल्याणीनें विषाची डबी दाखविली.

महेंद्र चकित होऊन म्हणाला, "हें काय ? तूं विष खाणार ?"

**कल्याणीः**—खाण्याचें मनांत होतें. पण–

कल्याणी स्तब्ध होऊन विचार करूं लागली. महेंद्र तिच्याकडे टक लावून पाहात राहिला. या वेळीं एक एक क्षण वर्षासारखा वाटूं लागला. कल्याणीनें आपलें वाक्य पुरें केलें नाहीं. हें पाहून महेंद्रानें विचारलें, "पण झालें, पुढें काय ?"

**कल्याणीः**—खाण्याचें मनांत आलें होतें, पण आपणाला मागें ठेवून–या लाडकीला मागें ठेवून—वैकुंठाला जावेंसें मनाला वाटत नाहीं. नाहीं. मी जीव देणार नाहीं.

इतकें बोलून कल्याणीनें विषाची डबी जमिनीवर ठेविली. नंतर दोघेंजण आपल्या भूतभविष्यासंबंधानें गोष्टी बोलूं लागलीं. बोलण्याच्या ओघांत तीं अगदीं गढून गेलीं. येवढया अवकाशांत मुलीनें खेळतां खेळतां ती विषाची डबी उचलून हातीं घेतली. कोणाच्याहि तें ध्यानांत आलें नाहीं.

मुलीला वाटलें चांगली वस्तु खेळायला मिळाली आहे. तिनें ती डाव्या हातांत घेऊन उजव्या हातानें तिला खूप फाकटावें, मग उजव्या हातांत घेऊन डाव्या हातानें फाकटावें, असें चाललें होतें. नंतर तिनें दोन्ही हातांनीं ती ओढली. अर्थात्, ती डबी उघडून तिच्यांतून एक वडी खालीं पडली.

महेंद्राच्या अंगावरील कपड्यावर पडलेली ती वडी पाहून मुलीला वाटलें ही एक खेळण्याची वस्तु आहे. तिनें ती डबी फेंकून दिली आणि वडी उचलून घेतली.

मुलीनें सबंध डबीच तोंडांत कशी घातली नाहीं कोण जाणे ! पण वडीच्या संबंधांत मात्र तेवढें घडून येण्याला उशीर लागला नाहीं. वडी हातीं लागतांच तिनें ती तोंडांत टाकली.

'काय खाल्लें ? काय खाल्लें ? अरे देवा ! घात झाला !' असें तें पाहतांच कल्याणी ओरडली. खाल्लेलें काढण्यासाठीं मुलीच्या तोंडांत तिनें बोट घातलें. विषाच्या वडीची डबी खालीं पडलेली दोघांनींहि पाहिली. ही एक गंमत झाली असें वाटून मुलीनें दातांनीं बोट दाबून धरलें. मुलीला सगळे दांत आले होते. आईच्या तोंडाकडे पाहून ती हंसूं लागली. इतक्यांत ती वडी कडू लागली म्हणून मुलीनें तोंड उघडलें आणि कल्याणीनें ती वडी तोंडांतून काढून बाहेर फेकून दिली. तेव्हां मुलगी रडूं लागली.

वडी मातींत पडून राहिली. कल्याणीनें नदीच्या पाण्यानें आपल्या लुगड्याचा पदर भिजवून आणिला, मुलीच्या तोंडांत तो पिळला, आणि भीत भीत महेंद्राला विचारलें, 'मुलीच्या पोटांत कांहीं अंश गेला तर नसेल ?'

मुलांविषयींची वाईट गोष्ट त्यांच्या आईबापाच्या मनांत अगोदर हटकून येते. जेथें प्रेम अधिक तेथें भयहि अधिक वाटतें. ती वडी मूळची केवढ्या आकाराची होती, तें महेंद्रानें पाहिलें नव्हतें. त्यानें आतां ती वडी हातांत घेऊन बारकाईनें चोहींकडून पाहिली आणि म्हटलें, 'बराच अंश पोटांत गेल्यासारखा दिसतो.'

कल्याणीलाहि साहजिक तसेंच वाटलें. कांहीं वेळानें तिनेंहि ती वडी हातीं घेऊन बारकाईनें पाहिली. इकडे मुलीनें वडी चघळून जे एक दोन घुटके घेतले होते, त्यांच्या प्रभावानें मुलीच्या शरीरांत विकृति उत्पन्न झाली. ती तडफडायला लागली, रडूं ओरडूं लागली, आणि शेवटीं अगदीं ग्लानि येऊन पडली. तेव्हां कल्याणी पतीला म्हणाली, 'पाहतां काय ? देवीनें जिकडे बोलाविलें होतें,

तिकडेच सुकुमारी ( हें त्या मुलीचें नांव होतें. ) चालली आहे. आतां मलाहि तिकडेच गेलें पाहिजे.'

इतकें बोलून तत्क्षणीं तिनें ती वडी खाऊन गिळूनहि टाकली.

महेंद्र शोक करीत म्हणाला, ' कल्याणी ! हें तूं काय केलेंस ! '

कल्याणीनें कांहीं उत्तर न देतां मुकाट्यानें पतीच्या चरणाचें वंदन केलें, आणि म्हटलें, ' प्रभु ! बोलण्यानें बोलणें वाढेल. मी आतां जात्यें.'

'कल्याणी ! हें तूं काय केलेंस !' असें म्हणून महेंद्र मोठ्यानें आक्रोश करूं लागला; तेव्हां अतिशय कोमल स्वरानें कल्याणी म्हणाली, 'मीं केलें तें चांगलेंच केलें. या क्षुद्र पामर स्त्रीसाठीं तुम्ही देवाच्या कार्यांत अंतर करीत होतां. पहा ! देवाच्या आज्ञेचें उल्लंघन माझ्या हातून घडलें, त्यामुळेंच मुलगी मेली. आणखी त्या आज्ञेचा अनादर कराल तर तुम्हीहि जाल.'

महेंद्र रडत रडत म्हणाला, 'मी तुला कोठें तरी ठेवून आलों असतों आणि देवाचें कार्य तडीस गेल्यावर पुनः तुला भेटून सुखी झालों असतों. कल्याणी ! तूं माझें सर्वस्व होतीस. तूं असें काम कां केलेंस ? ज्या हाताच्या जोरानें मीं तरवार धरायची, तो हातच तूं तोडून टाकिलास ! तुझ्यावांचून मी आतां काय करूं ?'

**कल्याणी**:—मला कोठें घेऊन गेलां असतां ? असें ठिकाण कोठें आहे ? आई, बाप, भाऊबंद सगळे तर या दुष्काळांत मेले. कोणाच्या घरीं जागा आहे ? कोठें जायला मार्ग आहे ? कोठें घेऊन जाणार ? तुमच्या गळ्यांत माझें लोढणें होतें. बरें झालें मी मरत्यें आहें ती ! मला असा आशिर्वाद द्यावा कीं त्यानें मी त्या प्रकाशाला जाऊन मिळेन आणि तेथून आपणास पाहीन.

इतकें बोलून कल्याणीनें महेंद्राच्या चरणाची धूळ घेऊन ती आपल्या शिरावर धारण केली. महेंद्राला कांहीं बोलवेना. तो पुनः रडूं लागला. कल्याणी पुनः म्हणाली—अतिशय क्षीण, कोमल, आणि प्रेमयुक्त स्वरानें म्हणाली, 'पहा ! देवाची इच्छा कोणाच्यानें मोडवणार आहे ? मला जाण्याची आज्ञा झाली होती. मी विचारांत पडल्यें असत्यें तर काय झालें असतें ? मीं आपल्या हातानें जीव दिला नसता तर दुसऱ्या कोणीं तरी मला मारून टाकिलें असतें. तेव्हां मीं स्वतः जीव दिला हें बरेंच केलें म्हणावयाचें ! आपण जें व्रत घेतलें आहे, तें कायावाचामनेंकरून पाळा; पुण्य लागेल. मलाहि त्यापासून स्वर्गप्राप्ति घडेल. आपण दोघे एकत्र स्वर्गांत वास करूं.'

इकडे मुलगी एकदां दूध प्याली, तें पोटांत राहिलें. तिच्या पोटांत अगदीं थोडें विष गेलें होतें. त्यामुळें तिचा प्राणघात होण्याची भीति नव्हती. पण त्या वेळीं महेंद्राच्या लक्षांत ती गोष्ट आली नाहीं. त्यानें मुलीला कल्याणीच्या पोटाशीं दिलें, आणि दोघांना गाढ आलिंगन देऊन तो रडत बसला. इतक्यांत त्या अरण्यांत मुदु आणि मेघासारखा गंभीर नाद होऊन पुढील शब्द उच्चारलेले ऐकूं आले—

**‘ हरे मुरारे मधुकैठभारे ! गोपाल गोविंद मुकुंद शौरे ! ’**

हे शब्द ऐकून कल्याणीहि म्हणूं लागली—

‘ हरे मुरारे मधुकैठभारे । ’

ती महेंद्राला म्हणाली, ‘ हरे मुरारे मधुकैठभारे !’ म्हणा.

अरण्यांतून निघालेला तो मधुर स्वर आणि त्याहून मधुर असा कल्याणीचा स्वर यांनीं विमुग्ध होऊन, भयाकुल चित्तानें, ईश्वरच आतां साह्यकर्ता आहे, असें मनांत आणून, महेंद्रहि ‘ हरे मुरारे मधुकैठभारे ! ’ असा धावा करूं लागला. तेव्हां चारी दिशांकडून ‘ हरे मुरारे !’ हेच शब्द ध्वनित होऊं लागले. त्या वेळीं झाडावरचे पक्षी सुद्धां ‘ हरे मुरारे मधुकैठभारे । ’ म्हणत आहेत कीं काय अशा प्रकारचा कलकलाट ते करीत होते. तो ऐकून महेंद्र आपला शोक-ताप विसरून गेला. उन्मत्त होऊन ‘ हरे मुरारे मधुकैठभारे ’ असेंच एकतानतेनें तो म्हणत सुटला. अरण्यांतूनहि जणूं काय एकताननेनेंच ‘ हरे मुरारे !’ हे शब्द निघत होते.

हळू हळू कल्याणीचा कंठ क्षीण होत चालला. तरीसुद्धां ‘ हरे मुरारे ! ’ हे शब्द तिच्या कंठांतून निघतच होते.

क्रमाक्रमानें ती अगदीं निचेष्ट पडली. तिच्या तोंडांतून आतां शब्द निघेना. डोळे मिटले, अंग थंड पडलें. महेंद्र समजला कीं ‘ हरे मुरारे ! ’ या शब्दांनीं धावा करतां करतां कल्याणीनें वैकुंठाची वाट धरली. तेव्हां वेड लागलेल्या माणसाप्रमाणें तो उंच स्वरानें ‘ हरे मुरारे मधुकैठभारे ! ’ उच्चारूं लागला. इतक्यांत कोणी येऊन त्याला मिठी मारली, आणि त्याच्याबरोबर ‘ हरे मुरारे !’ या शब्दांनीं ईश्वराचा धावा करण्यास सुरुवात केली.

तेव्हां ईश्वराच्या अगाध महिम्यामुळें त्या अमर्याद विस्तृत अरण्यांत अनंत मार्गानें जाण्यास निघालेल्या कल्याणीच्या देहाच्या सन्मुख बसून दोघे जण

ईश्वराचें नामसंकीर्तन करूं लागले. पशुपक्षी स्तब्ध राहिले. अपूर्व शोभायमान दिसणारी पृथ्वी—हेंच त्या गीताचें योग्य मंदिर—झाली. सत्यानंद महेंद्राचें डोकें आपल्या छातीशीं लावून बसला.

---

## प्रकरण तेरावें.

इकडे राजधानींत बाजारांत मोठी गडबड उडून गेली. शहरांत अशी वार्ता पसरली कीं, सरकारांतून कलकत्त्यास जेवढा खजिना जात होता, तेवढा संन्याशांनीं लुटला, आणि त्या दरवडेखोरांना पकडण्यासाठीं सरकारच्या हुकुमावरून हत्यारबंद शिपाई पाठविण्यांत आले आहेत. हा वेळपर्यंत त्या दुर्भिक्षपीडित प्रदेशांत संन्यासी म्हणजे कोणी मोठे लोक गणिले जात नव्हते. कारण, ते केवळ भिक्षान्नावर निर्वाह करणारे लोक होते. लोकांना स्वतःलाच खायला मिळेना, मग या संन्याशांना भिक्षा घालणार कोण ? म्हणून जेवढे खरे संन्यासी होते, तेवढे सगळे पोटांतल्या आगीमुळें काशीप्रयागाकडे निघून गेले होते. संतान नामक पंथांतले लोक मात्र इच्छेस येईल तेव्हां संन्याशाचा वेष धारण करीत आणि कार्यभाग आटोपला म्हणजे तो वेष टाकून देत. सध्याची गडबडीची वेळ पाहून पुष्कळांनीं संन्याशांचा वेष टाकिला होता. बुभुक्षित असे सरकारचे नोकर कोठेंहि संन्यासी न आढळल्यामुळें गृहस्थांच्या घरांतलीं हंडींमडकीं फोडून जें हातीं लागलें, त्यानें आपलीं अर्धीं पोटें भरून परत आले. सत्यानंदानें मात्र केव्हांहि आपलीं भगवीं वस्त्रें टाकिलीं नव्हतीं.

त्या कृष्णकल्लोलिनी क्षुद्रा नदीच्या कांठीं त्याच रस्त्याच्या बाजूनें एका झाडाखालीं कल्याणी पडली होती. महेंद्र व सत्यानंद परस्परांना आलिंगन देऊन व डोळ्यांत अश्रु आणून ईश्वराचा धावा करीत आहेत, इतक्यांत नाजिरुद्दिन जमादार शिपायांसहवर्तमान त्या ठिकाणीं येऊन उभा राहिला. एकदम सत्यानंदाच्या मानेवर हात ठेवून तो म्हणाला, ' हा साला संन्यासी पहा !'

दुसऱ्या एकजणानें महेंद्रालाहि तसेंच पकडलें. कारण, जो संन्याशाचा सोबती तेव्हां तोहि संन्याशीच असला पाहिजे ! तिसरा एकजण त्या कोमल तृणशय्येवर पडलेल्या कल्याणीच्या देहालाहि पकडूं लागला. पण त्यानें पाहिलें कीं हें कोणा स्त्रीचें प्रेत आहे, ही कांहीं संन्यासिनी नसेल, म्हणून त्यानें तो नाद सोडला. याच विचारानें मुलीलाहि पकडण्यांत आलें नाहीं. नंतर त्या दोघांचें

म्हणणें ऐकून न घेतां त्यांना बांधून नेण्यांत आलें. कल्याणी व तिची मुलगी या दोघींचीं प्रेतें तेथें तशींच कोणा रक्षकावांचून पडून राहिलीं.

प्रथम शोकाच्या व्याकुळतेनें व ईश्वरप्रेमाच्या उन्मादानें महेंद्र बहुतेक देह-भानावर नव्हता. काय होतें आणि काय झालें हें त्याला कांहींच समजलें नाहीं. बांधण्याच्या वेळीं त्यानें कांहीं हूं का चूं केलें नाहीं. पण दोन चार पावलें गेल्यानंतर त्याच्या लक्षांत आलें कीं आपणास कोणी बांधून नेत आहे. कल्याणीचें प्रेत तसेंच पडलें होतें. त्याचा अंत्य संस्कार झालेला नव्हता. मुलगीहि तशीच पडलेली होती. हिंस्रपशु तीं प्रेतें फाडून खातील ही गोष्ट मनांत येतांच महेंद्रानें दोन्ही हातांचा जोर करून बंधन तोडून टाकिलें. त्याच क्षणीं जमादाराला एक लाथ मारून त्यानें जमीनीवर लोळविलें व दुसऱ्या एका शिपायाच्या आंगावर तो धावून गेला. तेव्हां दुसऱ्या तिघाजणांनीं तीन बाजूंनीं त्याला धरलें आणि पुनः त्याला पकडून जखडून टाकिलें, तेव्हां दुःखानें व्याकुळ होऊन महेंद्र सत्यानंद ब्रह्मचाऱ्याला म्हणाला, ‘आपण थोडीशी मदत केली असती, तर या पांच दुष्टांना आज येथेंच ठार केलें असतें.’ सत्यानंद म्हणाला, ‘माझ्या या म्हाताऱ्याच्या शरीरांत कुठचें बळ असणार? मी ज्याचा धावा करीत होतों त्याच्यावांचून दुसरें बळ आम्हांला नाहीं. —तुम्हीहि जी गोष्ट अवश्य घडावयाची, तिच्याविरुद्ध आचरण करूं नका. आपण या पांच जणांचा पाडाव करूं शकणार नाहीं. चला. आपणाला कोठें घेऊन जातात पाहूं. परमेश्वर सगळ्यांचें रक्षण करणारा आहे.’

नंतर ते दोघेजण आपल्या सुटकेची कांहीं खटपट न करतां मुकाट्यानें शिपायांच्या मागोमाग चालूं लागले. थोडें दूर गेल्यावर सत्यानंदानें शिपायांना म्हटलें, ‘दादांनो! मला देवाचें नांव घ्यायचें आहे. तें घेण्याला तुमची कांहीं हरकत आहे काय?’ सत्यानंद हा भला माणूस आहे असें जमादार समजला. तो म्हणाला, ‘देवाचें नांव घ्या. तुम्हांला कोणी मना करणार नाहीं. तुम्ही बुढ्ढे ब्रह्मचारी आहां. तुमची सुटका होईल. हा बदमाष मात्र फाशीं जाणार.’ नंतर ब्रह्मचारी मृदुस्वरानें गाऊं लागला—

‘धीरसमीरे तटिनीतीरे वसति वने वरनारी।
मा कुरु धनुर्धर गमनविलंबनमतिविधुरा सुकुमारी॥’ इ०

शहरांत पोंचल्यावर त्यांना कोतवालाकडे नेण्यांत आलें. कोतवालानें सरकारांत त्याबद्दलचा इतल्ला पाठवून ब्रह्मचारी व महेंद्र यांना तूर्त फाटकावरच

ठेविलें. हा कैदखाना फारच भयंकर होता. जो तेथें जाई, तो प्रायः बाहेर येत नसे. कारण, चौकशी करायलाच कोणी नव्हतें. इंग्रजांचे जेल नव्हते. चौकशी करण्याचें कामहि त्यांच्याकडे नव्हतें. आजचा व्यवस्थेचा काळ आहे; तो अव्यवस्थेचा काळ होता. या दोन काळांमध्यें तुलना करून पहा, म्हणजे फरक समजेल.

---

## प्रकरण चौदावें.

रात्र झाली. कारागृहांत अडकून पडलेला सत्यानंद महेंद्राला म्हणाला, "आज मोठा आनंदाचा दिवस आहे. कारण, आपण कैदेंत बद्ध होऊन पडलों आहों. म्हणा, 'हरे मुरारे ! ' महेंद्रानें भीतभीत ते शब्द उच्चारले.

**सत्या०**—बाबा ! असा भितोस काय ? तूं हें महाव्रत घेतलें असतेंस तर स्त्रीकन्येचा त्याग तर करावा लागला असताच तुला. आणखी कोणी आप्त-संबंधाचीं माणसें नाहींतच.

**महेंद्र०**—त्याग करणें निराळें आणि यमदंड हा निराळा. ज्या शक्तीच्या जोरावर मीं व्रत घेतलें असतें, ती शक्ति माझ्या स्त्रीबरोबर गेली.

**सत्या०**—शक्ति येईल. मी देईन. महाव्रताची दीक्षा घे. त्या व्रताचा स्वीकार कर.

महेंद्र विरक्त होऊन म्हणाला, ' माझ्या स्त्रीकन्येला कोल्ह्या कुत्र्यांनीं खालें ! आतां माझ्याजवळ कोणत्याहि व्रताची गोष्ट बोलूं नका.'

**सत्या०**—त्यासंबंधानें निश्चित राहा. संतानांनीं तुझ्या स्त्रीचा अंत्य संस्कार केला आहे आणि मुलीला योग्य ठिकाणीं ठेविलें आहे.

महेंद्राला विस्मय वाटला; पण त्याचा त्या गोष्टीवर फारसा विश्वास बसला नाहीं. तो म्हणाला, ' हें आपणाला कसें कळलें ? आपण तर माझ्याबरोबरच होतां ? '

**सत्या०**—आम्हीं महाव्रताची दीक्षा घेतली आहे. देवतेची आमच्यावर कृपा आहे. आजच रात्रीं तुला ही खबर कळेल आणि आज रात्रीं तुझी सुटकाहि होईल.

यावर महेंद्र कांहींच बोलला नाहीं. सत्यानंद समजला कीं याचा विश्वास बसत नाहीं, तेव्हां सत्यानंद म्हणाला, 'प्रत्यंतर बघ.' इतकें बोलून तो तुरुंगाच्या दारा-पर्यंत गेला. त्यानें काय केलें तें अंधेरामुळें महेंद्राला दिसलें नाहीं. पण तो

कोणाशीं तरी बोलला येवढें त्याला कळलें. सत्यानंद परत आल्यावर महेंद्रानें विचारलें, 'कसलें प्रत्यंतर ?'

**सत्या०**—तुझ्या सुटकेचें.

हें तो बोलत आहे, इतक्यांत तुरुंगाचें दार उघडलें, आणि एक मनुष्य आंत येऊन महेंद्राला म्हणाला, 'महेंद्रसिंह कोणाचें नांव आहे ?'

महेंद्र म्हणाला, 'माझें.'

तो मनुष्य म्हणाला, 'तुमच्या सुटकेचा हुकूम झाला आहे. चला, बाहेर निघा.'

महेंद्राला प्रथम नवल वाटलें. मागाहून वाटलें कीं खोटी गोष्ट असेल. परीक्षा तर पहावी, म्हणून तो बाहेर पडला. त्याला कोणींहि अडविलें नाहीं. महेंद्र थेट सडकेपर्यंत गेला.

या अवकाशांत तो मनुष्य सत्यानंदाला म्हणाला, 'महाराज ! आपणहि कां जात नाहीं ? मी आपल्यासाठीं आलों आहें ?'

**सत्या०**—तुम्ही कोण ? धीरानंद गोसावी ?

**मनुष्य०**—होय, महाराज !

**सत्या०**—मग येथें पहाऱ्यावर कसे ?

**धीरा०**—भवानंदानें मला येथें पाठविलें. मी येथें नगरांत आलों. येथें ऐकिलें कीं आपण या तुरुंगांत आहां. म्हणून येथें धत्तुरामिश्रितसिद्धि ( भांग ) घेऊन आलों. जे खानसाहेब पाहाऱ्यावर होते, त्यांनीं ती घेतली आणि पडले जमिनीवर गुंगून. मीं जो हा पोषाक घातला आहे तो त्यांचाच.

**सत्या०**—तुम्ही याच पोशाकानें शहराच्या बाहेर पडा. मी असा जाणार नाहीं.

**धीरा०**— कां बरें ?

**सत्या०**—आज संतानांचो परीक्षेची वेळ आहे.

महेंद्र परत आला. सत्यानंदानें विचारलें, 'परत कां आलास ?'

**महेंद्र**—आपण खात्रीनें सिद्ध पुरुष आहां. मी आपली संगति सोडून जाणार नाहीं.

**सत्या०**—तर मग रहा. दोघेहि आज रात्रीं दुसऱ्या कांहीं प्रकारानें सुटूं.

धीरानंद बाहेर गेला. सत्यानंद व महेंद्र तुरुंगांतच राहिले.

---

## प्रकरण पंधरावें.

ब्रह्मचाऱ्याचें गाणें पुष्कळांनीं ऐकलें होतें. त्यांत जीवानंद हा एक होता. महेंद्राच्या मागोमाग जाण्याची त्याला आज्ञा होती, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. वाटेंत एका स्त्रीची व त्याची भेट झाली होती. ती सात दिवसांची उपाशी रस्त्याच्या बाजूला पडली होती. तिला जीवनदान देण्यासाठीं जावें लागल्यामुळें जीवानंदाला थोडा उशीर लागला. तिचा जीव वांचविल्यानंतर तिच्यामुळें उशीर झाल्याबद्दल दोष देत देत जीवानंद आपल्या कार्याला पुन्हां लागला. पण पाहतो तों आपल्या मुख्य नायकाला मुसलमान लोक पकडून नेत आहेत आणि तो गात गात त्यांच्यावरोबर चालला आहे.

जीवानंद सत्यानंदाच्या, " धीरसमीरे तटिनीतीरे वसति वने वरनारी " या पदांतला संकेत समजला. नदीच्या कांठीं आणखी कोणी स्त्री उपाशी तर पडली नाहीं ना ? असा विचार करीत जीवानंद नदीच्या कांठाकांठानें पाहत चालला होता. जीवानंदानें पाहिलें, कीं, ब्रह्मचारी स्वतः मुसलमानाकडून पकडला गेला आहे. या प्रसंगीं ब्रह्मचाऱ्याची सुटका करणें हें त्याचें प्रथम कर्तव्य होतें. पण तो म्हणाला कीं, पद्यांतल्या संकेताचा तो अर्थ दिसत नाहीं. तथापि ब्रह्मचाऱ्याच्या जीवाच्या रक्षणापेक्षां त्याच्या आज्ञेचें पालन करणें हें कार्य मोठें आहे. हाच धडा ब्रह्मचाऱ्यापासून आपण घेतला आहे. अतएव त्याच्या आज्ञेचें पालन आपण करूं.

नदीच्या कांठाकांठानें जीवानंद चालला होता. जातां जातां एके ठिकाणीं झाडाखालीं एक स्त्री मरून पडलेली व तिच्याजवळ जीवंत असलेली एक तान्ही मुलगी त्याला दिसली. वाचकांच्या लक्षांत हें असेलच, कीं, महेंद्राच्या स्त्रीकन्येला जीवानंदानें पूर्वी कधीं एक वेळसुद्धां पाहिलें नव्हतें. म्हणून तो मनाशीं म्हणाला, " हीच महेंद्राची स्त्री व ही कन्या असण्याचा संभव आहे; कारण, ब्रह्मचाऱ्याबरोबर महेंद्राला जातांना आपण आतां पाहिलें. कांहीं असो, ज्या अर्थी ह्या मुलीची आई मेली आहे, त्या अर्थी हिचें संरक्षण आधीं केलें पाहिजे. नाहींतर वाघ लांडगे हिला फाडून खातील. भवानंद ठाकुर येथेंच कोठें तरी आहे, तो या मृत स्त्रीला अंत्य संस्कार देईल. असा विचार करून जीवानंदानें त्या मुलीला कडेवर उचलून घेऊन पुढचा मार्ग धरला.

मुलीला घेऊन जीवानंद त्या निबिड अरण्यांत शिरला. अरण्यांतून पार पडल्यावर एक लहानसें गांव लागलें. त्या गांवांत तो गेला. गांवाचें नांव भैरवीपुर

होतें. तेथें सामान्य लोकांचीच वस्ती होती. जवळ दुसरें मोठें गांव नव्हतें. गांवांतून पलिकडे गेल्यावर पुन्हां जंगल लागलें. चारी बाजूंनीं जंगल व मध्यें एक लहानसें गांव होतें. गांव लहानसेंच पण फार सुंदर होतें. तेथें हिरवेंचार गवत उगवलेलें गायरान होतें. कोमल, श्यामल पल्लवयुक्त आम्रवृक्ष व इतर वृक्ष होते. तालवृक्षांची एक बाग होती. तिच्यांत मध्यभागीं नीलवर्ण जलानें परिपूर्ण अशी एक पुष्करणी होती. तिच्यांत बगळे व हंसपक्षी जलविहार करीत होते. तीरावर कोकिळ व चक्रवाक पक्षी होते. थोड्या अंतरावर मयूर पक्षी उच्चस्वरानें केकाध्वनि करीत होते. प्रत्येक घराच्या अंगणांत गोठ्यांतून गाई म्हशी इत्यादि गुरें होतीं. घरांत धान्यांचीं कोटारें होतीं. पण आजकाल दुष्काळामुळें तीं रिकामीं झालेलीं दिसत होतीं. कांहीं लोकांच्या घरांतून पोपट मैनांचे पिंजरे टांगलेले होते. कांहीं घरांच्या भिंतीवर चित्रें काढलेलीं होतीं. परसांत भाजीपाला लावलेला होता. बाकीचा सगळा प्रांत दुष्काळग्रस्त झाला होता. तथापि, या गांवच्या लोकांवर देवाची कृपा म्हणून जवळच्या जंगलांत अनेक प्रकारचे खाण्याचे जिन्नस कंद-फळें वगैरे होतीं. तीं खाऊन गांवकऱ्यांना आपल्या प्राणाचें रक्षण करतां येत होतें.

एका मोठ्या आंबराईंत एक लहानशी वाडी होती. तिच्या भोंवतीं एक मातीची भिंत होती. वाडीच्या चारी कोपऱ्यांला चार घरें होतीं. गुरें होतीं, शेळ्या होत्या, एक मोर होता, एक मैना होती, एक वानरहि पाळलें होतें. पण त्याला खाण्यास घालण्याची अडचण पडूं लाल्यामुळें सोडून दिलें होतें. भात कांडण्याची उखळी होती. बाहेर कांहीं अंतरावर एक खळें होतें. अंगणांत लिंबाचीं झाडें होतीं, कांहीं फुलझाडें होतीं; पण एकावरहि फुलें नव्हतीं. सर्व घरांतून ओसरीवर एक एक हातचरखा होता. पण वाडींत माणसांची विशेष गडबड दिसत नव्हती. जीवानंद मुलीला घेऊन याच वाडींत शिरला.

शिरल्याबरोबर एका घराच्या ओसरींत बसून तो चरखा फिरवूं लागला. त्या लहान मुलीनें चरख्याचा शब्द कधीं ऐकला नव्हता. त्यामुळें तो ऐकतांच ती इतकी भ्याली, कीं, एकदम सप्तम सुरांत रडण्यास तिनें प्रारंभ केला. तेव्हां घरांतून एक सत्रा अठरा वर्षांची मुलगी बाहेर येऊन आपल्या उजव्या गाला-वर उजव्या हाताचें बोट ठेवून ती आश्चर्यानें तटस्थ उभी राहिली. ती म्हणाली, “हें काय हो दादा? चरखा कां फिरवितां? ही मुलगी कोठून आणिली? तुम्हांला मुलगी झाली होय? दुसरें लग्न केलें कीं काय?”

जीवानंदानें त्या तरुणीच्या हवालीं मुलीला केलें, आणि तिच्यावर हात उगारून म्हटलें, "मूर्ख कुठली! मला आतां मुलगी होणार! चल जा! असला वात्रटपणा करूं नकोस. पण कायग? घरांत थोडेंसें दूध आहे काय?" तेव्हां ती तरुणी म्हणाली, "आहे तर! घेतां का थोडेंसें?'

जीवानंद म्हणाला, "हो, घेईन."

तेव्हां ती तरुण मुलगी गडबडीनें दूध तापवून आणण्यासाठीं घरांत गेली. मध्यंतरीं जीवानंद पुन्हां चरखा फिरवूं लागला. ती लहान मुलगी तरुण मुलीच्या कडेवर बसल्यानंतर रडेनाशी झाली. तिला काय वाटलें कोण जाणे! नुकत्याच उमललेल्या पुष्पाप्रमाणें ती सुंदर तरुणी आपली आईच आहे, असें तिला कदाचित् वाटलें असेल. चुलीची धग लागून मुलगी एकदां मोठ्यानें ओरडली. तिचें रडणें ऐकतांच जीवानंद म्हणाला, "ए कारटे! तुला अजून नुसतें दूधसुद्धां तापवितां येईना? तापलें कीं नाहीं अजून?"

निमी म्हणाली, "होय, तापलें."

इतकें बोलून तिनें एका दगडींत दूध ओतून जीवानंदाच्या जवळ नेऊन दिलें. जीवानंद रागाचा आविर्भाव आणून म्हणाला, "मला वाटतें हेंच तापलेलें दूध तुझ्या अंगावर फेंकून मारावें! तूं काय समजलीस मला दूध पाहिजे म्हणून?"

निमीनें विचारलें, "तर मग कोणासाठीं दूध मागितलें?"

जीवानंद म्हणाला, "या मुलीसाठीं. तिला हें दूध पाज."

निमी भूईवर मांडी घालून बसली. मांडीवर मुलीला निजविलें आणि बोंडल्यानें मुलीला दूध पाजूं लागली. इतक्यांत एकाएकीं तिच्या डोळ्यांतून एक अश्रुबिंदु गळला. तिला एक मुलगा झाला होता, पण तो लहानपणींच मेला. त्याचें तें बोंडलें होतें. निमीनें लागलीच डोळे पुसून मुद्दाम हंसत हंसत जीवानंदाला म्हटलें, "दादा! कोणाची मुलगी? सांगाना!"

जीवानंद म्हणाला, "तुला ग काय त्याच्याशीं करायचें? ही नसती उठाठेव तुला पाहिजे कशाला?"

**निमी**—मला ही मुलगी देऊन टाकाना!

**जीवा०**—तूं या मुलीला घेऊन काय करशील?

**निमी**—मी हिला दूध पाजीन, कडेवर घेईन. हिला वाढवीन.

बोलतां बोलतां त्या तरुणीच्या डोळ्यांत पुन्हा पाणी आलें. तिनें ते पुन्हा पुसले. पुन्हा हंसली.

**जीवा०**—तुला कशाला ही हवी? तुला स्वतःला पुष्कळ मुलेंबाळें होतील.

**निमी**—व्हायचीं असलीं तर होतील; पण आतां ही मुलगी द्या. मी नाहीं आतां हिला परत देणार.

**जीवा०**—असें असेल तर घे, जा. पण मी मधूनमधून तिला पाहायला येईन हो. ही एका कायस्थाची मुलगी आहे. मी आतां चाललों.

**निमी**—हें काय दादा! जेवल्यावांचून जाणार? तुमच्यापुढें डोकें फोडूं? भाताचे दोन घांस तरी खाऊन जा.

**जीवा०**—तुझें डोकें फुटल्यावर मला भात कोण करून घालील? पण डोकें कायम ठेवून भात करून घालशील तर खाईन.

निमीनें घरांत जाऊन चटकन् जेवण्याची तयारी केली. पाट मांडला, त्याच्यापुढें केळीचें पान मांडलें आणि त्यावर मीठ, तिळाची चटणी, आळवाची भाजी, आणि वरणभात वाढून पिण्यासाठीं वाटीभर दूध पानापाशीं आणून ठेविलें. जेवायला बसतां बसतां जीवानंद म्हणाला, " निमीताई! लोक म्हणतात काळ मोठा कठिण आला आहे; पण तुझ्याकडे पाहावें तर तसें कांहीं दिसत नाहीं!"

**निमी**—काळ बदलेला नाहीं कसा? पुष्कळच बदलला आहे. आम्ही काय, दोन माणसें. घरांत जें कांहीं आहे, तें आम्ही खातों व दुसऱ्यांनाहि घालतों. आमच्या गांवीं थोडासा पाऊस झाला. तुम्हांला नाहीं का आठवत? त्या दिवशीं पाऊस पडेल असें तुम्ही म्हणाला होतां, अन् तसा तो पडलाहि. त्यामुळें थोडें थोडें धान्य पिकलें. बाकीच्या लोकांनीं शहराला नेऊन धान्य विकलें. आम्हीं मात्र विकलें नाहीं.

**जीवा०**—तुझे यजमान कुठें आहेत?

हा प्रश्न ऐकून निमीनें लाजेनें खालीं मान घालून उत्तर केलें, " तीन चार शेर तांदूळ घेऊन गांवांत कोणी उपाशी आहे, कीं काय, हें पहाण्यासाठीं बाहेर जाणें झालें आहे."

त्या दिवशींच्यासारखें मिष्ट भोजन जीवानंदाला पुष्कळ दिवसांत मिळालें नव्हतें. म्हणून उगाच बोलण्यांत वेळ न घालवितां त्यानें गप्गप् सप्सप् मट्मट् अशा तऱ्हेचे शब्द करीत भराभर घांसामागून घांस घेत जेवण संपविलें.

निमीनें आपण व यजमान या दोघांपुरता स्वयंपाक केला होता. पैकीं आपल्या वांट्याचें अन्न दादाला वाढून बाकीचें पतीसाठीं राखून ठेविलें होतें. पण दादाच्या पानांत कांहीं नाहींसें पाहून तेंहि तिनें त्याला वाढलें. जीवानंदानें

यत्किंचित संकोच न करतां उदर नांवाच्या मोठ्या गर्तेंत तें ढकलून दिलें. निमीनें विचारलें, " दादा ! आणखी कांहीं पाहिजे ? "

**जीवा**—आणखी काय आहे ?

**निर्मी**—छानदार पिकलेला फणस आहे. आणूं ?

निमीनें फणसाचे गरे आणून वाढले. तेहि जीवानंदानें संकोच न करतां ध्वंसपुराला पाठवून दिले. तेव्हां निमी हंसत म्हणाली, " दादा ! आतां मात्र कांहीं राहिलें नाहीं !"

**दादा**—कांहीं हरकत नाहीं. आणखी एखादे दिवशीं येऊन आजचा वचपा काढीन.

निमीनें जीवानंदाला आंचवण्याला पाणी दिलें. तें देतांना ती म्हणाली, " दादा ! माझी एक गोष्ट ऐकाल ? "

**जीवा०**—कोणती ?

**निमी**—मी सांगत्यें तसें करण्याचें वचन द्या.

**जीवा०**—पण तूं काय करण्यास सांगणार, हें तर कळूं देशील ?

**निर्मी**—नाहीं. अगोदर वचन द्या, मग मी सांगेन.

**जीवा०**—माझ्या शब्दांवर विश्वास ठेव आणि सांग काय तुला हवें तें.

निमीनें एकदां खालीं मान करून जमिनीकडे पहावें, एकदां वर मान करून दादाच्या तोंडाकडे पहावें, असें करीत करीत अखेर हिय्या करून म्हटलें, "एकदां वहिनींना बोलावूं का ?'

जीवानंदानें आंचविण्यासाठीं हातांत घेतलेलें भांडें निमीला मारण्यासाठीं उगारलें आणि म्हटलें, "दे माझी मुलगी परत. मीं तुझें अन्न खाल्लें आहें, त्याचे तांदूळ सुद्धां मी तुला परत देईन. तूं फार शाहाणी झाली आहेस. जें बोलूं नये तेंच बोलतेस.'

**निमीः**—मला शाहाणी म्हणा, कीं आणखी कांहीं म्हणा; पण एकवार वहिनीला बोलावूं का ?

**जीवाः**—मी नाहीं आतां येथें बसत. हा चाललों पहा.

इतकें बोलून तणूतणू करीत जीवानंद घराबाहेर जाऊं लागला. तेव्हां निमी दार बंद करून त्याला पाठ लावून उभी राहिली, आणि म्हणाली, "अगोदर मला मारून टाका, आणि मग तुम्ही जा. वहिनीला दर्शन देण्याचें वचन घेतल्याखेरीज मी तुम्हांला जाऊं देणार नाहीं."

जीवानंद म्हणाला, " मीं आजपर्यंत किती लोक मारले आहेत हें आहे तुला ठाऊक ?"

हें ऐकून निमी रागावली, आणि म्हाणाली, "मोठें नांव मिळविलें ! बायकोला टाकली, लोकांना मारलें ! तुमचें मला भय वाटतें. आपण एका आईबापाचीं लेकरें. लोकांना मारण्यांत जर तुम्हांला प्रौढी वाटत असेल, तर मला मारून तिच्यांत भर कां टाकीत नाहीं ?"

जीवानंद हंसून म्हणाला, "बरें जा, बोलावून आण. कोणा पापी चांडळणीला बोलवायचें असेल तर बोलाव; पण हें एकदांच आँ ! पुन्हां बोलावण्याची गोष्ट काढशील, तर तुझ्या भावाचें मुंडण करून त्याची गाढवावर धिंड काढून देशाच्या बाहेर घालवीन."

निमी मनांत म्हणाली, "तसें झालें तर देव पावला !"

ती हसत हसत बाहेर गेली, आणि शेजारच्या घरांत शिरली. त्या घरांत लुगड्याला शेंकडों गांठी दिलेली व रुक्ष केश असलेली एक स्त्री चरख्यापाशी बसून सूत काढीत होती. निमी तिला म्हणाली, "वहिनीबाई लौकर उठा."

वैनीनें विचारलें, "कसली हो एवढी घाई ? तुमच्या पतिराजांनीं तुमची कणिक चांगली मऊ केली म्हणून अंगाला तेल लावून देऊं कीं काय ? "

**निमी**—हो, तसेंच. तेल आहे का पण घरांत ?

वहिनीबाईनेंहि थट्टेनें घरांतून तेलाचें भांडें आणिलें. निमीनें झटपट हातांत तेल काढून घेऊन तें वैनीच्या केसांना लाविलें व केश विंचरून त्यांचा अंबाडा बांधला. नंतर निमी म्हणाली, 'वैनी ! तुमचें नवें लुगडें कुठें आहे ? आणा तें.'

वैनी म्हणाली, ' तुम्ही काय माझी थट्टा मांडली आहे ? ' तिच्या पाठीवर टिचकी मारून निमी म्हणाली, 'होय थट्टा मांडली आहे. तूं अगोदर आण पाहूं.'

बाईनें तें जाऊन आणिलें, आणि तिनें थट्टेनें तें उलगडलें. थट्टेनें असें कां म्हटलें ? तर, अशा दुःखी स्थितींतसुद्धां मस्करीची तिची आवड नाहींशी झाली नव्हती. खरें म्हटलें तर तिला नुकतेंच तारुण्य प्राप्त झालें होतें. तिचें सौंदर्य नवीन उमलणाऱ्या फुलाप्रमाणें विकसत होतें. अशा वयांत तिला पोटभर खावयाला नाहीं, अंगभर वस्त्र नाहीं, कीं, केसाला लावण्याला तेलहि नाहीं. असें असून तिची उज्ज्वल कांति आणि अनुपम सौंदर्य त्या शतग्रंथियुक्त वस्त्रांतूनहि प्रफुल्लित दिसत होतें. तिच्या वर्णांत छाया आणि प्रकाश यांचें चांचल्य होतें. नेत्रांत कटाक्ष, अधरावर हास्य आणि हृदयांत धैर्य हीं वसत

होतीं. खाण्याची वाण होती; पण शरीराच्या ठायीं लावण्याची वाण नव्हती. अंगावर धड वस्त्र नव्हतें, पण सौंदर्य संपूर्णरीत्या प्रकट होत होतें. जशी मेघामध्यें विद्युत्, मनामध्यें प्रतिभा, शब्दामध्यें संगीत, किंवा मरणांत सुख, त्याप्रमाणें त्या लावण्यमयीच्या ठायीं अनिर्वचनीय असें कांहीं तरी होतें. तें कांहीं तरी म्हणजे अनिर्वचनीय माधुर्य, अनिर्वचनीय उन्नत भाव, अनिर्वचनीय प्रेम व अनिर्वचनीय भक्ति हीं होत. तिनें हसत हसत आपलें उंची लुगडें बाहेर काढून निमीच्या हातीं दिलें. निमी म्हणाली. "तूंच नेस."

बाईनें विचारलें. "मला तें नेसून कुठें जावयाचें आहे?"

तेव्हां निमीनें तिच्या गळ्यांत हात घालून म्हटलें, "दादा आला आहे. तुला बोलावलें आहे."

ती म्हणाली, "येवढेंच ना! मग त्याला नवें लुगडें कशाला पाहिजे? मी आपली अशीच येतें. चला."

निमीनें थट्टेनें तिच्या गालांवर हळूच एक चापट मारली, आणि निमीच्या खांद्यावर हात ठेवून ती स्त्री बाहेर पडली. तिनें म्हटलें, "चला, मी याच लुगड्यानं येतें."

तिनें लुगडें वदललें नाहीं. निमीनेंहि तिला फारसा आग्रह केला नाहीं. निमी तिला घराच्या दारापर्यंत घेऊन गेली, आणि तिला घरांत ढकलून बाहेरून दार लावून घेऊन आपण स्वतः दाराशीं उभी राहिली.

---

## प्रकरण सोळावें

त्या स्त्रीचें वय सुमारें पंचवीस वर्षांचें होतें; पण दिसण्यांत निमीपेक्षां ती मोठी दिसत नव्हती. मलीन व गांठी दिलेल्या लुगड्यानिशीं ती त्या घरांत शिरली होती, तरी आंत जातांच जणूं काय प्रकाश किरण आंत आले असें वाटलें. पर्णांनीं आच्छादिलेल्या वृक्षांवरच्या फुलांच्या कळ्या जणूं काय एकदम उमलल्या; किंवा गुलाबदाणी फुटून त्या पाण्याचा सुगंध एकदम चोहींकडे दरवळा; अथवा निखाऱ्यावर टाकिलेल्या उदाच्या सुगंधाचा लोट पसरला. ती सुंदरी आंत जाऊन आपल्या पतीला शोधूं लागली. प्रथम तो तिला कोठेंहि सांपडला नाहीं. मग पाहिलें तर घराच्या अंगणांत आंब्याचें एक झाड होतें, त्याच्या खोडावर डोकें टेकून जीवानंद रडत बसला होता. सुंदरीनें त्याच्या जवळ जाऊन हळूच त्याचा

हात धरला. तिच्या डोळ्यांना पाणी आलें नव्हतें, असें म्हणतां येत नाहीं. देवाला माहीत कीं तिच्या डोळ्यांत जो अश्रूंचा प्रवाह लोटत होता, तो जीवानंदाला वाहून नेण्याइतका प्रबल होता कीं नाहीं तें. पण तिनें तो प्रवाह आंवरून धरला होता. जीवानंदाचा हात आपल्या हातांत घेऊन ती म्हणाली, 'छीः ! असें काय मेलं रडत बसायचें ? माझ्यासाठीं हें रडणें चाललें आहे हें मी समजल्यें; पण तसें करायला नको. आपण जसें मला ठेविलें आहे, त्यांतच मी सुखी आहें.'

जीवानंदानें डोकें वर उचलून आणि डोळे पुसून विचारलें, 'शांते ! तुझें लुगडें असें मळलेलें आणि गांठी दिलेलें कां ? तुला अन्नवस्त्राची ददात आहे काय ?'

शांति म्हणाली, 'आपलें धन आपल्याचसाठीं आहे. मला तें घेऊन काय करायचें आहे कळत नाहीं. आपण आलां म्हणजे–जेव्हां माझा पुनः अंगिकार कराल—'

**जीवा०**—करीन बरें ! मीं काय तुला टाकिलें थोडेंच आहे ?

**शांति**—मी कुठें म्हणत्यें टाकिलें म्हणून ? आपलें व्रत समाप्त झालें, आणि आपण माझ्यावर पुनः प्रेम करूं लागलां—

तिचें वाक्य संपण्यापूर्वीच जीवानंदानें शांतीला गाढ आलिंगन दिलें, आणि तिच्या खांद्यावर डोकें टेकून तो कांहीं वेळ स्तब्ध राहिला. नंतर लांब उसासा टाकून तो म्हणाला, 'मी कां तुला भेटलों बरें ?'

**शांति**—खरेंच ! कां बरें असें केलें ?–आपल्या व्रताचा भंग कां केला ?

**जीवा०**—व्रताचा भंग होवो म्हणा ! त्याला प्रायश्चित्त सांगितलेलेंच आहे. त्याची नाहीं मला येवढी फिकीर वाटत; पण तुझी भेट झाल्यानंतर येथून परत जावेंसें वाटत नाहीं. येवढयाचसाठीं मीं निमीला म्हटलें होतें कीं, मला भेट घ्यायची नाहीं. तुला पाहिल्यावर परत जाण्याला पायच वाहत नाहींत. मला वाटतें कीं तराजूच्या एका पारड्यांत धर्म, अर्थ, काम, मोक्ष, सारा प्रपंच, व्रत, होम, याग, यज्ञ, हीं सगळीं घातलीं आणि दुसऱ्यांत तुला एकटीला बसविलें, तर कोणतें पारडें जड भरेल तें नक्की सांगतां येईलच असें नाहीं. देश म्हणजे काय निर्जीव भूमि ! त्याला घेऊन मला काय करायचें आहे ? राहण्यापुरता दहावीस हात जमिनीचा तुकडा घेऊन त्याच्यावर तुझ्यासह राहिलों, तर स्वर्गसुखाची प्राप्ति होईल. मला देशाशीं काय कर्तव्य आहे ? देशांतल्या लोकांच्या दुःखासाठीं तुझ्यासारख्या पत्नीचा त्याग करावा, त्यापेक्षां आणखी मोठें दुःख तें कोणतें असणार ? तुझा अंगावरच्या लुगड्याला असलेल्या या शेंकडों गांठी पाहिल्या

म्हणजे वाटतें कीं, यापेक्षां देशांत दुसरें कोणतें मोठें दारिद्र्य असेल? माझ्या सर्व धर्मांतील साह्यकर्ती तूं. त्या साह्याचा त्याग केल्यावर आपला सनातन धर्म कोठें राहिला? कोणत्या धर्मासाठीं मीं देशोदेशीं हिंडायचें, खांद्यावर बंदूक टाकून रानावनांतून फिरून प्राणिहत्या करावयाची आणि पापाची जोड करून ठेवावयाची? हा देश संतानांच्या हातीं पुनः येईल कीं नाहीं तें कोणीं सांगावें? पण तूं माझ्या हातीं आलेली मोठी पृथ्वी—नाहीं स्वर्गलोक—आहेस. चल, घरीं जाऊं. मी आतां परत जाणार नाहीं.'

शांतीच्यानें कांहीं वेळ मुळींच बोलवेना. कांहीं वेळानें ती म्हणाली, 'छेः छेः! आपण वीर आहां. मला या लोकीं सर्वांत जें मोठें सुख वाटतें, तें वीरपत्नी म्हणवून घेण्यांत. आपण या अधम स्त्रीसाठीं वीरधर्म सोडणार काय? आपण माझ्यावर प्रेम करूं नका. मला तें नको आहे; पण वीरधर्म सोडूं नये! पण मला अगोदर हें सांगावयाचें होतें कीं, या व्रताच्या भंगाला प्रायश्चित्त कोणतें आहे?'

जीवानंद म्हणाला, 'प्रायश्चित? दान–उपवास–१५३६० कवड्या.,

शांति किंचित् हंसून म्हणाली, 'तें मी समजल्यें; पण एका अपराधासाठीं जें प्रायश्चित्त तेंच शंभर अपराधांसाठींहि ना?'

जीवानंदानें विस्मित व खिन्न होऊन विचारलें; 'पण या गोष्टी काढल्येस कशासाठीं?'

**शांति**—मी एक मागणें मागत्यें. माझी भेट पुनः घेतल्यावांचून प्रायश्चित्त करूं नये गडे!

तेव्हां जीवानंद हंसून म्हणाला, 'याची फिकीर करूं नकोस. तुझी भेट घेतल्यावांचून मी मरणार नाहीं. मरण्याची काय येवढी घाई आहे? मला आतां येथें राहातां येत नाहीं. तुला आज डोळे भरून पुरतें पाहतांसुद्धां आलें नाहीं. पण एक दिवस असा येईल कीं, त्या दिवशीं माझ्या मनकामना पूर्ण होतील. मी आतां निघालों. माझें एक म्हणणें जरूर ऐक. हा वेष टाकून दे आणि माझ्या वाडवडिलांच्या वाड्यांत जाऊन राहा.'

शांतीनें विचारलें, 'आतां कुठें जाणें व्हावयाचें आहे?'

**जीवा०**—मठांत ब्रह्मचाऱ्याच्या शोधासाठीं. ते ज्या स्थितींत गेले आहेत तिच्यामुळें मनाला काळजी आहे. देवळांत त्यांचा शोध न लागला, तर शहराला जावें लागेल.

---

## प्रकरण सतरावें.

भवानंद मठांत हरिगुण गात बसला होता, इतक्यांत ज्ञानानंद नांवाचा एक तेजस्वी संतान त्याच्याजवळ येऊन खिन्न मुद्रेनें उभा राहिला.

भवानंदानें विचारलें, 'गोसावी ! तुमची मुद्रा अशी खिन्न कां ?'

ज्ञानानंद म्हणाला, 'कांहीं गडबड झाली आहे, असें समजतें. भगवीं वस्त्रें पाहिलीं कीं पकड त्या माणसाला, असा प्रकार चालला आहे. हें पाहून बाकीच्यांनीं तीं वस्त्रें टाकून दिलीं आहेत. एकटे सत्यानंद प्रभु भगव्या वस्त्रांनीं नगराकडे गेले आहेत. ते मुसलमानांच्या हातांत पडतील कीं काय, अशी भीति वाटते.'

**भवा०**—त्यांना अडकवून ठेवील, असा मुसलमान बंगाल प्रांतांत तरी कोणी नाहीं. धीरानंद त्यांच्या मागोमाग गेले आहेत असें समजतें. तरी पण मीहि एकदां नगरांत फिरून येतों. तुम्ही मठ संभाळा.

इतकें बोलून भवानंदानें एका कोठडींत जाऊन एका मोठ्या पेटींतून कांहीं कपडे बाहेर काढले. एकाएकीं भवानंदाचें रूपांतर झालें. भगव्या वस्त्रांच्या ऐवजीं चुणीदार पायजमा, मेरजाई ( गुडघ्यापर्यंतचा जामा ), घोळदार अंगरखा, डोक्याला मुसलमानी तऱ्हेची पगडी आणि पायांत नागरी जोडा, हा पोषाख दिसूं लागला. कपाळावरचा त्रिपुंड्र गेला. भ्रमराप्रमाणें काळ्या भोर केसांची दाढी मुखाला शोभा देऊं लागली. त्यावेळीं त्यांच्याकडे कोणीं पाहिलें असतें तर हा कोणी तरुण मोगल आहे असेंच त्याला वाटलें असतें. भवानंद याप्रमाणें मोगलाचा वेष घेऊन हातांत हत्यार घेऊन मठाबाहेर पडला. तेथून सुमारें एक कोसावर दोन लहान लहान टेंकड्या असून त्यांवर जंगल वाढलें होतें. त्या दोन टेकड्यांच्या मध्यें एक गुप्त स्थान होतें. तेथें पुष्कळसे घोडे ठेविलेले होते. मठवासी लोकांची ही अश्वशाला होती. भवानंदानें त्या तबेल्यांतून एक घोडा काढला आणि त्यावर बसून नगराकडे प्रयाण केलें.

जातां जातां एकाएकीं त्याच्या गतीला अडथळा झाला. रस्त्याच्या एका बाजूला खळखळ आवाज करीत वाहणाऱ्या नदीच्या तीरावर आकाशांतून तुटून पडलेल्या नक्षत्राप्रमाणें अथवा मेघांतून पडणाऱ्या विजेप्रमाणें देदीप्यमान अशी एक स्त्रीमूर्ति तेथें निजलेली दिसली. पाहिलें तों जिवंतपणाचें कांहीं लक्षण तिच्या ठायीं दिसेना. जवळ एक रिकामी झालेली विषाची

डबी पडली होती. ती पाहून भवानंदाला विस्मय व भीति वाटली. जीवानंदाप्रमाणें भवानंदानेंहि त्या स्त्रीला व तिच्या मुलीला कधीं पाहिलें नव्हतें. तथापि ही महेंद्राची स्त्री व कन्या असावी, अशी शंका ज्या कारणांवरून जीवानंदाला आली होती, तीं कारणें भवानंदाला ठाऊक नव्हतीं. त्यानें ब्रह्मचाऱ्याला व महेंद्राला पकडून नेलेलें पाहिलें नव्हतें. विषाची रिकामी डबी पाहून त्यानें तर्क केला कीं कोणी स्त्री विष खाऊन मेली असावी. भवानंद तिच्या शवाजवळ बसला, आणि कपाळावर हात ठेऊन बराच वेळ विचार करीत राहिला. डोक्याला, बगलेला व हाताला हात लावून त्यानें पाहिलें व दुसऱ्याहि अनेक प्रकारांनीं त्यानें परीक्षा केली. तेव्हां तो आपल्या मनाशीं म्हणाला, 'अजूनहि वेळ आहे; पण हिला वांचवून काय करणार ?' याप्रमाणें तो बराच वेळ विचार करीत बसला होता. मग रानांत जाऊन त्यानें कांहीं वनस्पतींचीं पानें आणिलीं, आणि तीं हातावर चुरगळून, त्यांचा रस काढून व बोटानें बसलेली दांतखिळी उघडून थोडासा रस तिच्या तोंडांत घातला, नाकांतहि थोडासा रस पिळला, आणि सर्वांगाला तो रस लाविला. असें त्यानें पुनः पुनः केलें. मधून मधून श्वासोच्छ्वास सुरू आहे कीं नाहीं, हें पाहण्यासाठीं त्यानें नाकाशीं हात न्यावा. शेवटीं त्याला कळून चुकलें कीं आपला प्रयत्न विफळ झाला. याप्रमाणें बराच वेळ परीक्षा पाहतां पाहतां अखेर भवानंदाचें मुख प्रफुल्लित झालें. नाकापाशीं नेलेल्या हाताला नाकपुड्यांतून श्वासोच्छ्वासाचा मंद प्रवाह सुरू असल्याचें कळलें. मग त्यानें आणखी रस काढून तो पूर्ववत् तिच्या तोंडांत व नाकांत घालून अंगाला लाविल्यावर जोरानें श्वासोच्छ्वास सुरू झाला. नाडीची गतीहि सुरू झाली. अखेर प्रभातकाळच्या पूर्वरंगाप्रमाणें, रक्तकमलाच्या प्रथम विकासाप्रमाणें, अथवा प्रेमाच्या प्रथम अनुभवाप्रमाणें कल्याणीनें प्रथमच डोळे उघडले. हें पाहून कल्याणीचा तो अर्धमृत देह घोड्याच्या पाठीवर घालून भवानंदानें वेगानें घोडा चालविला.

---

## प्रकरण अठरावें.

संध्याकाळ होण्याच्या पूर्वीच सत्यानंद ब्रह्मचारी व महेंद्र हे दोघे कलकत्ता शहरच्या कारागारांत अडकविले गेल्याची खबर सगळ्या संतान मंडळीला कळून चुकली होती. मग एकेक, दोघे दोघे, दहा दहा, शंभर शंभर असे संतान संप्रदायांतले पुष्कळ लोक तेथें आल्यानें सगळें अरण्य त्यांनीं भरून गेलें. सगळे लोक हत्यारबंद असून त्यांच्या डोळ्यांत क्रोधाग्नि चमकत होता, तोंडांवर अभि-

मान दृग्गोचर होत होता, आणि ओठावर दृढ प्रतिज्ञेचें चिन्ह दिसत होतें. प्रथम त्यांची संख्या शेंकड्यांनीं, आणि मागून तीच हजारांनीं वाढूं लागली होती. तेव्हां हातांत तरवार घेऊन ज्ञानानंद मठाच्या दाराशीं उभा राहून उच्च स्वरानें म्हणाला, 'आमच्या मनांत फारां दिवसांपासून होतेंच कीं ही बाबू लोकांची वस्ती मोडून-या यवनपुरीची राखरांगोळी करून नदींत फेकून द्यावी आणि या डुकरांच्या वस्तीची अपवित्र जागा जाळून पृथ्वीमातेला पुनः शुद्ध करावें. भाई हो! तो शुभ दिन आज आला आहे. आपले गुरु–परम गुरु–जे अनंत ज्ञानमय, सर्वदा शुद्धाचरणी, जे सर्वदा लोकहित चिंतणारे, जे देशहितेच्छु, ज्यांनीं सनातन धर्माचा पुनः प्रचार करण्याच्या कामीं आपला देह खर्ची घालण्याची प्रतिज्ञा केलेली, ज्यांना आपण विष्णूचा अवतार मानतों, ज्यांच्याकडून आपणाला मुक्ति प्राप्त व्हावयाची, असे आपले गुरुदेव आज मुसलमानांच्या बंदिवासांत पडले आहेत. आपल्या तरवारींना काय धारा नाहींत?' हात पसरून ज्ञानानंद म्हणाला, 'या बाहूंत काय बळ नाहीं?' छातीवर हात मारून त्यानें म्हटलें, 'या छातींत काय धाडस नाहीं? भाई हो! बोला, हरे! मुरारे! मधुकैठभारे! ज्यानें मधुकैटभांचा नाश केला, ज्यानें हिरण्यकशिपु, कंस, दंतवक्र शिशुपाल यांच्या सारख्या दुर्जय असुरांना मृत्युपंथाला लाविलें, ज्याच्या चक्राच्या घोर घर्घरनादानें मृत्युंजय शंभुसुद्धां भयभीत झाला, जो स्वतः अजेय व जो रणांत जयप्राप्ति करून देणारा, त्याचे आपण उपासक आहों. त्याच्या बळानें आपल्या बाहूंत अनंत बळ आलेलें आहे. तो इच्छामय आहे. इच्छा करतांच तो आपणांस रणांत विजय मिळवून देईल. चला तर. आपण ती यवनपुरी मोडून धुळीला मिळवून देऊं. डुकरांची ती अपवित्र जागा जाळून पोळून तिची राख नदींत टाकूं. बाबूलोकांची वस्ती मोडून कोंड्यासारखी वाऱ्याबरोबर उडवून देऊं. बोला, हरे मुरारे! मधुकैठभारे.'

तेव्हां त्या अरण्यांत हजारों लोकांच्या कंठांतून निघणाऱ्या 'हरे मुरारे' या शब्दांचा भयंकर नाद उठूं लागला. हजारों तरवारी एकदम म्यानांतून बाहेर पडल्या. हजारों भाल्यांचीं तीक्ष्ण पातीं वर उंच चमकूं लागलीं. वीरांच्या बाहु थोपटण्यानें वज्रासारखा कठोर नाद ऐकूं येऊं लागला. शेकडों भेरींचा नाद होऊं लागला. त्या महाकोलाहलानें अरण्यांतले पशुपक्षी भयभीत होऊन पळून गेले. पक्षी भयानें आक्रोश करीत आकाशांत उंच उडत होते, त्यांनीं आकाश व्यापून टाकिलें. शेकडों रणडंके दुमदुम् वाजूं लागले. 'हरे मुरारे! मधुकैठभारे'

असा जयघोष करीत संतान संप्रदायी लोकांच्या टोळया अरण्यांतून रांगेनें बाहेर पडूं लागल्या. धीर व गंभीर पावलें टाकीत आणि तोंडानें 'हरे मुरारे!' अशी गर्जना करीत हे लोक रात्रीं अंधेरांतून शहराकडे जात होते. त्यांच्या वस्त्रांचा मर्मर शब्द, शस्त्रांचा खणखणाट, कंठांतून निघणारा अस्फुट ध्वनि, आणि मधुनमधुन जयघोष, असा प्रकार सर्व रस्ताभर चालला होता. धीर, गंभीर, सरोष, व तेजस्वी अशी ही संतानसेना नगरांत येऊन पोंचली. तिनें नगरांत मोठी गडबड उडवून दिली. एकाएकीं वज्राघाताप्रमाणें ही धाड आलेली पाहून नागरिक लोक कोणीकडे पळून गेले त्यांचा पत्ता नाहीं. नगराचे संरक्षक बावरल्यासारखे होऊन तोंडाकडे पाहात उभे राहिले.

इकडे संतान लोकांनीं अगोदर तुरुंगाचा विध्वंस करून व पाहारेवाल्या शिपायांना मारून सत्यानंद व महेंद्र यांची सुटका केली. त्या दोघांना डोक्यावर घेऊन ते नाचूं लागले. तेव्हां तर हरिनामाचा फारच मोठा गजर झाला. त्या दोघांना मुक्त केल्यानंतर मुसलमानाचें घर दिसलें कीं, लाव त्याला आग असें ते करूं लागले; तेव्हां सत्यानंद म्हणाला, 'चला परत. निरर्थक नासधूस करण्याचें कारण नाहीं.' संतान लोकांनीं केलेल्या उच्छेदाची बातमी पोंचतांच अधिकाऱ्यांनीं त्यांच्या शासनासाठीं शिपायांची एक तुकडी रवाना केली. त्यांच्याजवळ नुसत्या बंदुकाच नव्हे, तर एक तोफहि होती. ही तुकडी आलेली पाहतांच संतान लोक युद्धार्थ आनंदकाननांतून बाहेर पडले; पण सोटे, काठ्या, भाले, किंवा दहावीस बंदुका यांचें तोफेपुढें काय चालणार? संतानलोक पराजित होऊन पळूं लागले.

---

# खंड दुसरा.



## प्रकरण पहिलें.

शांतीला तिच्या बाळपणींच मातृवियोग झाला होता. या गोष्टीचा तिच्या पुढील चरित्रावर बराच परिणाम घडलेला दिसून आला. तिचा बाप ब्राह्मण गुरु होता. घरांत दुसरें कोणी बायको माणूस नव्हतें. अर्थात्च तिचा बाप पाठशाळेंत शिष्यांना शिकविण्यास बसे, तेव्हां शांति त्याच्याजवळ बसलेली असे. त्या काळीं

विद्यार्थ्यांची राहण्याची सोय पाठशाळेंतच करण्यांत येत असे. त्यामुळें इतर वेळीं सुद्धां शांति विद्यार्थ्यांच्याजवळ बसून खेळत असे व त्यांच्या मांडीवर आणि पाठीवर चढून बसे. तेहि तिला प्रेमानें वागवीत असत.

अशा रीतीनें लहानपणीं तिला पुरुषांचा जो सहवास घडला, त्याचा पहिला परिणाम हा झाला कीं, शांतीला मुलीसारखें परकर साडी नेसणें, अंगांत चोळी घालणें, वगैरे गोष्टी करतां येईनात; अथवा, आल्या तरी ती करीना. कोणीं तिला परकर नेसविला, तर ती सोडून फेकून देई, आणि धोतर नेसून कांचा मारी. पाठशाळेचे विद्यार्थी शेंडी मोकळी ठेवीत, तशी शांतीहि केस मोकळे ठेवी व वेणी घालण्याचा कंटाळा करी; आणि तिची वेणी घालणार तरी कोण? विद्यार्थ्यांनीं लांकडाच्या फणीनें तिचे केश विंचरून तिचा अंबाडा बांधून द्यावा, अथवा केसाला शेवटीं एक गांठ देऊन ते तिच्या पाठीवर मोकळे सोडावे. विद्यार्थी कपाळीं गंधाचा टिळा लावीत. शांतीहि तसेंच करी. विद्यार्थ्यांसारखें माझ्या गळ्यांत जानवें घाला, म्हणून ती हट्ट धरून रडत बसे. संध्याकाळीं त्यांच्याबरोबर बसून त्यांचें पाहून पाहून ती संध्या करी. गुरुजी नसले म्हणजे विद्यार्थी, अश्लील संस्कृत शब्द उच्चारीत, किंवा शृंगाररसप्रधान गोष्टी बोलत. शांतीहि पोपटाप्रमाणें ते शब्द उच्चारण्यास शिकली होती. पोपटाला जसा अर्थ कळत नाहीं, तसा तिलाहि त्यांतला अर्थ कळत नव्हता.

दुसरा परिणाम हा झाला, कीं, शांति थोडी मोठी झाल्यावर विद्यार्थ्यांच्या बरोबर थोडें थोडें शिकूं लागली. तिला व्याकरणांतलें एक अक्षरसुद्धां कळत नव्हतें. पण भट्टी, रघु, कुमारसंभव व नैषधकाव्य यांतले श्लोक टीकेसह ती घडाघड तोंडानें पाठ म्हणूं लागली. हें पाहून तिच्या पित्यानें ' यद्भविष्यति तद्भविष्यति ' असें म्हणून तिला मुग्धबोध व्याकरण शिकविण्यास प्रारंभ केला. ती फार झपाट्यानें शिकूं लागली. तेव्हां गुरुजीला फार विस्मय वाटला. व्याकरणाबरोबरच एक दोन साहित्य ग्रंथ तिला शिकविण्यांत आले. त्यानंतर मात्र सगळा गोंधळ झाला. तिचे वडीलच निवर्तले.

शांति निराश्रित झाली. पाठशाला बंद झाली. विद्यार्थी निघून गेले; पण शांतीवर त्यांचें प्रेम असल्यामुळें तिला एकटीला सोडून त्यांच्यानें जाववेना. एकजणानें तिच्यावर दया करून तिला आपल्या घरीं नेलें. हाच विद्यार्थी पुढें संतान संप्रदायांत शिरून जीवानंद हें नांव धारण करता झाला. आपणहि त्याला जीवानंदच म्हणूं.

जीवानंदाचे आईबाप तेव्हां जिवंत होते. मुलानें आपल्या आईबापांला त्या मुलीविषयींची माहिती सांगितली, तेव्हां ते म्हणाले, " या दुसऱ्याच्या मुलीची जन्माची जबाबदारी कोणीं घ्यावी ? " जीवानंद म्हणाला, " मीं तिला आणिलें आहें, तेव्हां मी ती घेईन. " त्याचे आईबाप म्हणाले, ' ठीक आहे. ' जीवानंद अविवाहित होता. शांतिहि विवाहास योग्य वयाची झाली होती. तेव्हां जीवानंदानेंच तिच्याशीं विवाह केला.

त्यांचें लग्न झाल्यावर सगळे पश्चात्ताप करूं लागले, आणि म्हणूं लागले, " झाली ही गोष्ट कांहीं बरी झाली नाहीं. शांति मुलीसारखा पोषाख करीना व वेणी घालीना. ती घरांतसुद्धां राहीना. नेहमीं शेजारच्या मुलांशीं खेळत असे. जीवानंदाच्या घराजवळच रान होतें. त्या रानांत ती एकटी जाई, आणि कोठें मोर, कोठें हरीण, कोठें दुर्मिळ फुलें फळें यांच्या शोधांत हिंडत असे. तिच्या सासूसासऱ्यांनीं ' असें करूं नकोस ' म्हणून प्रथम गोड शब्दांनीं सांगून पाहिलें, नंतर रागानें सांगितलें, नंतर तिला मारलें, आणि अखेर खोलींत कोंडून ठेविलें. तेव्हां ती रागानें चडफडूं लागली, आणि एके दिवशीं दार उघडें आहे, असें पाहून, कोणाला न सांगतां, घर सोडून ती निघून गेली.

रानांत तिनें चांगलीं चांगलीं फुलें वेंचून व तीं कुस्करून आपलें वस्त्र रंगविलें, आणि जोगीण बनली. त्या काळीं बंगाल्यांत संन्यासी टोळ्या करून फिरत होते. शांति भिक्षा मागत फिरत फिरत जगन्नाथ क्षेत्राच्या रस्त्यानें चालली होती. लवकरच वाटेंत तिला एक संन्याशांची टोळी दिसली, आणि तिला ती जाऊन मिळाली.

तेव्हांचे संन्यासी आतांच्या संन्याशासारखे नव्हते. ते सुशिक्षित, धट्टे कट्टे, युद्धविशारद व निरनिराळ्या विद्येंत निपुणता संपादलेले होते. ते टोळ्या करून राहत. ते एक प्रकारें राजद्रोही होते. राजाचा खजिना लुटीत. धट्टें कट्टें मूल पाहिलें म्हणजे त्याला उचलून नेत, आणि त्याला शिक्षण देऊन आपल्या संप्रदायांत प्रविष्ट करून घेत. यामुळें त्यांना पोरें पळविणारे असें नांव मिळालें होतें.

शांति बाल संन्याशाच्या वेषांत या संप्रदायांत राहत असे. तिच्या अंगाची कोमलता पाहून संन्यासी तिला आपल्या संप्रदायांत घेण्यास प्रथम कबूल नव्हते; पण तिच्या बुद्धीची प्रखरता, तिच्या अंगचें चातुर्य, आणि कार्यदक्षता पाहून त्यांना

तिच्या विषयीं आदर वाटला व त्यांनीं तिला आपल्यांत घेतलें. शांति संन्याशाच्या संगतींत असतां नेमानें व्यायाम करी व शस्त्रविद्येचें शिक्षण घेई. यामुळें तिच्या अंगीं श्रम सोसण्याची ताकद चांगली आली होती. संन्याशांच्या बरोबर ती देशोदेशीं हिंडली, शस्त्रविद्या शिकली, आणि पुष्कळ लढायाहि तिनें पाहिल्या.

क्रमाक्रमानें तिच्याठायीं यौवनाचीं लक्षणें दिसूं लागलीं. ही पुरुषवेषधारी स्त्री आहे, हें पुष्कळ संन्याशांना ठाऊक होतें; पण ते जितेंद्रिय असल्यामुळें कोणी कांहीं बोलेना. त्या संन्याशांत पुष्कळ चांगले मोठे पंडित होते. शांति संस्कृतांत थोडीशी व्युत्पन्न आहे, असें पाहून एक पंडित संन्यासी तिला पढवूं लागला.

संन्यासी जितेंद्रिय होते म्हणून वर सांगितलें आहे; पण सगळेच संन्यासी असे नव्हते. हा पंडितहि त्यांतला नव्हता. शांतीच्या यौवन विकासजनित अभिनव-लावण्यानें मुग्ध होऊन या पंडिताची जितेंद्रियता हळूहळू ढळूं लागली. त्यानें आपल्या शीष्येला शृंगारिक कवितांच्या अश्राव्य व्याख्या ऐकविण्यास प्रारंभ केला. त्यानें तिला कांहीं अपकार न होतां उलट उपकारच झाला. लज्जा कशाला म्हणतात, तें तिला अद्याप ठाऊक नव्हतें; पण आतां स्त्रीस्वभावसुलभ लज्जा आपोआप तिच्या ठायीं उत्पन्न झाली. पुरुषाच्या चरित्रावर निर्मळ स्त्रीचरित्राचा अपूर्व प्रभाव पडून शांतीच्या अंगचे गुण जास्त शोभायमान दिसूं लागले. तिनें शिकणें सोडून दिलें.

वाघ जसा हरिणीकडे धाव घेतो, तसा शांतीचा हा पंडित गुरु तिला पाहतांच तिच्याकडे धांव घेऊं लागला. पण तिनें व्यायामाच्या द्वारें पुरुषांनाहि दुर्लभ असा बलसंचय केला होता. पंडित जवळ येतांच ती त्याची मुष्टिमोदकानें यथेच्छ पूजा करूं लागली. तिच्या मुष्टींचा आघात कांहीं सामान्य नव्हता. एके दिवशीं शांतीला निर्जन स्थानीं एकटी पाहून त्या पंडितानें मोठा जोर करून शांतीचा हात धरला. तो तिला सोडवितां आला नाहीं; पण संन्याशाच्या दुर्दैवानें त्यानें धरलेला हात डावा होता. तिनें उजव्या हातानें पंडिताच्या कपाळावर असा जोरानें मुष्टिप्रहार केला, कीं, तो संन्यासी मूर्च्छा येऊन खालीं पडला. नंतर ती संन्यासी संप्रदाय सोडून पळून गेली.

तिला भय कसें तें ठाऊकच नव्हतें. ती एकटी आपल्या देशीं जाण्यास निघाली. धाडस आणि बाहुबल यांच्या जोरावर तिचा प्रवास निर्विघ्नपणें चालला होता. भिक्षा मागून किंवा जंगली फळें खाऊन निर्वाह करीत करीत

आणि अनेक मारामारीच्या प्रसंगांतून विजयी होत होत ती एकदांची आपल्या सासरीं जाऊन पोंचली. पाहाते तों तिचा सासरा निवर्तला होता. पण सासू होती. जातिबहिष्काराच्या भयानें ती शांतीला घरांत घेईना. अर्थात् ती पुनः घराबाहेर पडली.

जीवानंद तेव्हां घरीं होता. तो शांतीच्या मागोमाग गेला. वाटेंत त्यानें तिचा हात धरून विचारलें, 'तूं हें घर सोडून कां गेली होतीस? आणि इतके दिवस कोठें होतीस?" तिनं सगळी खरीखरी हकीकत सांगितली. जीवानंदाला खरें खोटें जाणण्याची शक्ति होती. त्यानें तिच्या म्हणण्यावर विश्वास ठेविला.

अप्सरांच्या भ्रूविलासयुक्त कटाक्षांतलें तेज घेऊन देवांनीं अतिशय यत्नानें जें संमोहनास्त्र निर्माण केलें आहे, त्याचा पुष्पधन्वावीर विवाहित जोडप्याच्या संबंधानें अपव्यय करीत नसतो. इंग्रज लोक पोर्णिमेच्या रात्रीं राजमार्गावर गॅसच्या बत्त्या जाळतात. बंगाली लोक तेलानें थबथबलेल्या डोक्यावर आणखी तेल ओततात. ही मनुष्याची गोष्ट तर राहोच; पण सूर्य प्रकाशत असतां केव्हां केव्हां आकाशांत चंद्र उदय पावतो. इंद्र समुद्रांत पर्जन्यवृष्टि करतो. द्रव्यानें गच्च भरलेल्या खजिन्यांतच कुबेर आणखी द्रव्य आणून टाकतो. यम ज्या घरांतल्या बहुतेकांना घेऊन गेला आहे, तो त्याच घरांतल्या उरलेल्यांनाहि घेऊन जातो. असलें मूढपणाचें काम रतिपति मात्र करतांना दिसत नाहीं.

ज्या ठिकाणीं ब्रह्मदेवानें पतिपत्नींची गांठ बांधून दिली आहे, त्या ठिकाणीं तो विशेषसे परिश्रम करीत नाहीं. त्यांच्या संबंधाचो सगळी जबाबदारी ब्रह्मदेवावर सोंपवून ज्यांचें हृदय शोणित शोषून पितां येईल, अशांच्याच शोधासाठीं तो जातो. पण आज मदनाला कांहीं काम नव्हतेंसें दिसलें. ह्मणून त्यानें आपल्या दोन बाणांचा अपव्यय केला. यांपैकीं एक जीवानंदाचें हृदय भेदून गेला, आणि दुसरा शांतीच्या हृदयाला लागून तिला त्यानें प्रथमच जागविलें कीं स्त्रीचें हृदय किती झालें तरी कोमल असतें. पावसाळयाच्या तोंडीं आकाशांत ढग येऊन प्रथमच पडलेल्या जलबिंदूनीं आर्द्र झालेल्या पुष्पकलिकेप्रमाणें शांति एकाएकीं हृदयांत उमाळा येऊन प्रफुल्लित दृष्टीनें जीवानंदाच्या तोंडाकडे पाहूं लागली.

जीवानंद म्हणाला, "मी तुझा त्याग करणार नाहीं. मी घरीं जाऊन येतों तोंपर्यंत तूं उभी राहा."

शांति म्हणाली, "पण परत येणें होईल ना ?"

जीवानंदानें कांहीं उत्तर न देतां आणि इकडे तिकडे न पाहतां रस्त्यांतच वृक्षाच्या छायेंत तिच्या अधराशीं अधर मिळवून सुधापान केल्यानंतर तो तेथून निघाला.

आईला समजुतीच्या चार गोष्टी सांगून जीवानंद तिचा निरोप घेऊन आला. भैरवीपुरींत सध्यां त्याची बहीण निमी ही होती. मेहुण्यामेहुण्यांत मोठें प्रेम होतें. जीवानंद शांतीला घेऊन त्या ठिकाणीं राहिला. मेहुण्यानें त्याला थोडी जमीन दिली. तिच्यावर त्यानें एक लहानसें घर बांधलें आणि तेथें शांतीसह तो सुखानें राहूं लागला. पतीच्या सहवासांत शांतीच्या चरित्रांतले पौरुष विलीन किंवा प्रच्छन्न होऊं लागलें, आणि नारीचरित्राचा रोज नवा नवा उन्मेष होऊं लागला. सुखस्वप्नाप्रमाणें त्यांचे दिवस जाऊं लागले. पण एकदां एकाएकीं तें सुखस्वप्न भंग पावलें.

जीवानंद सत्यानंदाच्या हातांत पडला आणि संतान धर्माचा स्वीकार करून शांतीला सोडून चालता झाला. त्यानंतर त्यांची पुनः भेट निमीनें मोठ्या कुशलतेनें घडवून आणिली. त्याचें वर्णन मागच्या प्रकरणांत आलेंच आहे.

## प्रकरण दुसरें.

जीवानंद निघून गेल्यावर शांति निमीच्या घराच्या ओसरीवर जाऊन बसली. निमीहि मुलीला कडेवर घेऊन तेथें येऊन बसली. शांतीच्या डोळ्यांत प्रथम थोडे अश्रु आले तेवढेच. एकदां डोळे पुसल्यावर तिचें मुख प्रफुल्लित होऊन ती हसूं लागली. तरी पण तिची वृत्ति गंभीर व थोडीशी चिंतायुक्त झाली होती आणि तिचें चित्त जागेवर नव्हतें. निमी हें ओळखून म्हणाली, 'एकदांची भेट तर झाली?'

शांतीनें कांहीं उत्तर केलें नाहीं. ती गप बसली. निमीनें पाहिलें कीं, ती आपल्या मनांतली गोष्ट बोलत नाहीं. शांतीचा तो स्वभाव निमीला ठाऊक होता. म्हणून तिनेंहि बोलण्याचा विषय बदलला, आणि म्हटलें, 'वहिनी! पहा पहा! कशी मुलगी आहे!'

शांतीनें विचारलें, 'कोठून ही मुलगी आणिली? तुम्हांला का झाली? अन् कधीं?'

**निमी०**—वात्रट कुठली? अग! ही दादाची मुलगी!

निमी हें शांतीला चिडविण्यासाठीं बोलली नव्हती. 'दादाची मुलगी' म्हणजे दादाजवळ होती, ती, इतकेंच सांगण्याचा तिचा आशय होता. पण शांतीला तो समजला नाहीं. तिला वाटलें कीं, निमी मुद्दाम टोंचून बोलली. म्हणून तिनें उत्तर केलें, 'मी मुलीच्या आपासंबंधानें कुठं काय विचारलें ? आईसंबंधानें विचारलें होतें.'

निमीला यथायोग्य टोमणा मिळाल्यामुळें ती निरुत्तर होऊन म्हणाली, 'कोणाला ठाऊक कोणाची मुलगी आहे ? दादानें हिला कोठून आणिली आहे खरी. कोठून आणिली हें त्यांना विचारायला वेळच मिळाला नाहीं. ही पडली गडबडीची वेळ. कित्येक लोक पोरांबाळांना रस्त्यांत किंवा घाटावर सोडून देऊन चालते होतात. माझ्याकडेसुद्धां पुष्कळ मुलें विकायला आलीं होतीं; पण दुसऱ्यांचीं मुलें कशाला घ्यायचीं ? ' हें बोलतांना निमीच्या डोळ्यांना पाणी आलें होतें. पण तिनें तें पुसून म्हटलें, 'मुलगी कशी सुरेख आहे ! चांगली गुटगुटीत अन् चांदणीसारखी पाहून दादापासून मीं हिला मागून घेतली.'

यावर बराच वेळपर्यंत दोघी बोलत बसल्या होत्या. मग निमीचे यजमान घरीं आलेले पाहून शांति उठून आपल्या घरीं गेली आणि दार लावून घेऊन चुलींतला फुपाटा तिनें बाहेर ओढला आणि त्याच्यावर तिनें स्वत:साठीं शिजवून ठेविलेल्या भाताचें भांडें ऊन करण्यासाठीं ठेविलें. मग बराच वेळ ती विचार करीत उभी राहिली, आणि शेवटीं आपल्या मनाशीं म्हणाली, 'इतके दिवस जें करायचें मनांत आहे, तें आज करून टाकावें. ज्या आशेला जीव टांगून राहिल्यामुळें इतके दिवस केलें नाहीं, ती आशा आतां सफळ झाली आहे. सफळ कीं निष्फळ—निष्फळ ! हें जीवनच निष्फळ आहे. जो संकल्प केला आहे, तो पार पाडावा. एका वेळचें जें प्रायश्चित्त तेंच शंभर वेळचें.'

असा विचार करून शांतीनें भात अग्निसमर्पण केला, आणि रानांत जाऊन कांहीं फळें आणिलीं आणि खाल्लीं. मग ज्या उंची लुगड्यावर निमीचा येवढा रोख होता, तें लुगडें काढून त्याचे कांठ तिनें फाडून फेकून दिले आणि बाकीच्या भागाला भगवा रंग देऊन लुगडें वाळविते आहे, तोंच संध्याकाळ झाली. मग तिनें दार लावून घेतलें, आणि एका चमत्कारिक उद्योगांत ती गुंतली. आपल्या डोक्याचे रुक्ष जटा झालेले पण लांब केस तिनें थोडथोडे कात्रीनें कापून टाकिले, आणि राहिलेल्या केसांच्या जटा वळल्या. मग भगवा रंग दिलेलें लुगडें अर्धें फाडून तें ती नेसली आणि बाकीचें अर्धें आंगावर घेऊन

तिनें आपली छाती झाकली. घरांत एक लहानसा आरसा होता. फारा दिवसांनीं तो आज बाहेर काढून त्यांत तिनें आपला वेष पाहिला आणि स्वतःशींच म्हटलें, ' हाय ! काय मी हें करत्यें आहे !' मग आरसा फेकून देऊन कापून टाकलेल्या केसांची दाढीमिशासारखी तिनें रचना केली; पण त्या लावण्याला तिचा धीर होईना. ती मनांत म्हणाली, 'छिः छिः छिः ! असें कुठें झालें आहे? ते दिवस कुठें आले आहेत ? या दाढीमिशा मुलाला भय दाखविण्यासाठीं अशाच ठेवून द्याव्या हें बरें. ' असें म्हणून तिनें त्या एका फडक्यांत गुंडाळून ठेविल्या. नंतर तिनें घरांतून एक मोठें हरणाचें कातडें बाहेर काढलें आणि मानेपाशीं गांठ देऊन त्यानें मानेपासून खालपर्यंत आपलें अंग झांकलें. अशा रीतीनें सगळा शृंगार करून हा तरुण संन्यासी घरांत हळूहळू चोहींकडे बारकाईनें पाहूं लागला. दोन प्रहर रात्र झाल्यावर दार उघडून अंधेरांत शांति संन्यासीवेषानें एकटी बाहेर पडली आणि रानांत चालती झाली. वनदेवता रात्रीं त्या रानांत पुढील अपूर्व गाणें ऐकूं लागल्या.

( ' धीर समीरे यमुना तीरे ' या चालीवर )

**वसुनि वाजिवर कुठें चाललां दौडत सांगा, वेगें ।**
**युद्धाला मी पहा निघालों; मज न परतवा मागें ॥**
**रणभूमीवरि ' हरि हरि हरि हरि ' करा मुखानें ध्यान ।**
**समर सागरीं उड्या घेऊनि अर्पा त्याला प्राण ॥**
**तुम्ही कोण ? कवणाचे ? तुमच्यासंगें असती कवण ।**
**दुजें न इच्छी तुमची स्त्री ही, करा जयश्री गान ॥**

( साध्या फटक्याच्या चालीवर )

**प्राण विसाव्या ! पायां पडत्यें. मजला, सखया ! नचि सोडा ।**
**ऐका, हीं रण वाद्यें वाजति, नाचे थय थय हा घोडा ॥**
**रणासि जावें वाटे मजला, गृहकृत्यांवरि मन न जडे ।**
**होईन धन्यचि जरि या कर्णी रण जय गीत ध्वनि पडे ॥**

---

## प्रकरण तिसरें.

एके दिवशीं आनंदमठांत एका गुप्त स्थळीं बसून भग्नोत्साह संतान लोकांचे तिघे पुढारी कांहीं संभाषण करीत होते. जीवानंदानें सत्यानंदाला म्हटलें, 'महाराज,

देव आपणावर इतका रुष्ट झाला आहे याचें कारण काय? आमच्या हातून कोणता असा अपराध घडला कीं, त्यामुळें मुसलमानांच्या हातून आमचा पराभव घडावा ? '

सत्यानंद म्हणाला, 'देव रुष्ट झालेला नाहीं. युद्ध म्हटलें म्हणजे त्यांत जयपराजय दोन्हीं असायचेच. त्या दिवशीं आपण विजयी झालों होतों, आज पराभूत झालों. पण अखेर आपलाच जय ठेविलेला आहे. मला पक्की खात्री आहे कीं, ज्यानें एकवार आपल्यावर कृपा केली होती, तो शंकचक्रगदापद्मधारी वनमाळी पुनःहि कृपा करील. त्याच्या चरणांवर हात ठेऊन आपण जें महाव्रत घेतलें आहे, तें आपण अवश्य पाळलें मात्र पाहिजे. त्यापासून पराङ्मुख झालों, तर नरक भोगावा लागेल. आपल्या भावी मंगलाविषयीं मला बिलकुल संदेह नाहीं; पण ज्याप्रमाणें दैवाच्या अनुकूलतेवांचून कोणतेंहि कार्य सिद्ध होत नाहीं, त्याप्रमाणें पुरुषाच्या प्रयत्नावांचूनहि तें होत नाहीं. आपला पराभव झाला, त्याचें कारण हेंच कीं आपल्या जवळ हत्यारें नव्हतीं. बंदुकीच्या गोळया आणि तोफ यांच्यापुढें आपल्या सोट्यांचें आणि भालाबर्च्यांचें काय चालणार ? आपल्या प्रयत्नांत कमीपणा झाल्यामुळें आपला पराभव झाला आहे. तेव्हां आतां आपलें कर्तव्य हेंच कीं शस्त्राच्या व दारूगोळयाच्या पुरवठ्यांत कांहीं कमीपणा होऊं देऊं नये.

**जीवा०**—ही तर मोठी कठीण गोष्ट आहे.

**सत्या०**—जीवानंद ! ही काय कठीण गोष्ट आहे ? संतान असून अशी गोष्ट तुम्ही तोंडावाटे काढतां ? संतानाला कठीण असें काय आहे ?

**जीवा०**—कशा रीतीनें हत्यारें मिळवावयाचीं त्याची आज्ञा व्हावी.

**सत्या०**—त्यासाठीं आज रात्रीं मी तीर्थयात्रेला जाणार आहें. मी परत येईपर्यंत एकाद्या कामाला हात घालूं नका. पण संतानांमध्यें एकी कायम राहील असें जरूर करा. त्यांच्या अन्नवस्त्राची योग्य बंदोबस्त ठेवा, आणि रणांत जय मिळविण्यासाठीं मातेचें भांडार भरपूर करून ठेवा. याबद्दलची जबाबदारी तुमच्या दोघांवर आहे.

भवानंद म्हणाला, ' तीर्थयात्रा करण्यानें हत्यारें कशीं गोळा करतां येतील ? बंदुकी, दारूगोळा, तोफा वगैरे विकत घेऊन पाठविल्यानें मोठी गडबड उडेल. आणि इतकी सामग्री मिळणार तरी कोठें ? कोण विकत देईल ? आणि आणणार कशी ?

**सत्या०**—ती विकत आणून आपलें काम चालायचें नाहीं. मी कारागीर पाठवून देतों. आपणास ती तेथेंच तयार करावी लागेल.

**जीवा०**—कोठें ? या आनंदमठांत ?

**सत्या०**—त्याला काय झालें ? या उपायाचें चिंतन मी आज बरेच दिवस करीत आहें. ईश्वरानें आज तो सुयोग आणून दिला आहे. तुम्ही मघां म्हणालां कीं भगवान् आपणाला प्रतिकूळ झाला आहे ! मी म्हणतों उलटा तो अनुकूळ झाला आहे.

**भवा०**—कारखाना कोठें काढावयाचा ?

**सत्या०**—पदचिन्ह गांवीं.

**जीवा०**—कां बरें ? तेथें काय विशेष आहे ?

**सत्या०**—एरव्हीं महेंद्रसिंहाला व्रत घ्यायला लावून त्याला आकिंचन करण्याचें मला काय प्रयोजन होतें ?

**भवा०**—महेंद्रानें व्रत ग्रहण केलें काय ?

**सत्या०**—अजून केलें नाहीं, पण करील. आज रात्रीं त्याला दीक्षा द्याव-याची आहे.

**जीवा०**—काय ? महेंद्रसिंहाला व्रत ग्रहण करण्यासाठीं अकिंचन व्हावें लागलें आहे ! तें माझ्या ऐकण्यांत सुद्धां नाहीं. त्याच्या स्त्रीकन्येची काय अवस्था आहे आणि त्यांना कोठें ठेविलें आहे ? मला आज एक मुलगी नदीच्या कांठीं सांपडली. ती मी आपल्या बहिणीपाशीं ठेवून आलों आहें. त्या मुलीजवळ एक बाई मरून पडली होती. ती तर महेंद्राची स्त्री नसेल ? मला असेंच वाटतें.

**सत्या०**—होय. तीच त्याची स्त्री आणि मुलगी.

हें ऐकून भवानंद चकित झाला. आतां कळलें कीं ज्या स्त्रीला आपण औषध देऊन उठविलें, ती महेंद्राची स्त्री कल्याणी. पण या वेळीं ती गोष्ट उघड करून सांगण्याची अवश्यकता त्याला वाटली नाहीं.

**जीवा०**—महेंद्राची स्त्री कशानें मेली ?

**सत्या०**—विष खाऊन.

**जीवा०**—तिनें विष कां खाल्लें ?

**सत्या०**—तिला प्राणत्याग करण्याविषयीं स्वप्नांत देवानें आज्ञा केली होती.

**भवा०**—ही देवाची आज्ञा संतानांच्या कार्यसिद्धीसाठींच झाली होती काय ?

**सत्या०**—मला असें महेंद्राकडूनच कळलें. असो. आतां संध्याकाळ होऊं लागली आहे. मी आतां सायंसंध्येसाठीं जातों. नंतर आपणाला नव्या संतानांना दीक्षा देण्याची तयारी करायला पाहिजे.

**भवा०**—संतानांना ? महेंद्राशिवाय आणखी कोणाची शिष्यवर्गांत येण्याची इच्छा आहे कीं काय ?

**सत्या०**—हो. आणखी एक तरुण आहे. मीं त्याला पूर्वी कधीं पाहिलेलें नाहीं. तो आजच पहिल्यानें माझ्याकडे आला. तो अतिशय तरुण वयाचा आहे. त्याची बोलण्याचालण्याची आणि वागण्याची रीत पाहून मला फार आनंद झाला. शुद्ध शंभर नंबरी सोनें आहे ! त्याला संतानाच्या कामाचें शिक्षण देण्याचा भार मी जीवानंदावर टाकतों. कारण, दुसऱ्याचें चित्त आकर्षून घेण्याची विद्या त्याला फार चांगली ठाऊक आहे. मी आतां निघालों. तुम्हांला आतां एकच गोष्ट सांगायची राहिली आहे. ती तुम्ही अतिशय लक्षपूर्वक ऐकून ठेवा.

तेव्हां दोघांनीं हात जोडून म्हटलें, ' आज्ञा व्हावी.'

सत्यानंद म्हणाला, ' तुमच्या दोघांच्या हातून कदाचित् एखादा अपराध घडला असला, किंवा मी परत येण्याच्या अगोदर घडला; तर त्याबद्दलचें प्रायश्चित्त मी येईपर्यंत करूं नका. मी आल्यावर तें अवश्य करण्यांत येईलच.'

इतकें बोलून सत्यानंद स्वस्थानीं चालता झाला. भवानंद व जीवानंद जागचे जागीं परस्परांच्या तोंडाकडे पाहत राहिले.

भवानंदानें विचारलें, ' हा कटाक्ष तुमच्यावर होता वाटतें ?'

**जीवा०**—मलाहि तसेंच वाटतें. मी महेंद्राच्या मुलीला बहिणीच्या जवळ ठेवण्यासाठीं गेलों होतों.

**भवा०**—मग त्यांत काय दोष आहे ? त्या गोष्टीला कांहीं मनाई नव्हती. त्या वेळीं कुटुंबालाहि भेटून तुम्ही आलां कीं काय ?

**जीवा०**—तेंच गुरुजीच्या मनांत असावें असें दिसतें.

## प्रकरण चौथें.

संध्याकाळचीं संध्यावंदनादि कृत्यें आटोपल्यावर सत्यानंदानें महेंद्राला बोलावून घेऊन म्हटलें, 'तुमची मुलगी जिवंत आहे.'

**महेंद्र०**—कोठें आहे महाराज ?

**सत्या०**--तुम्ही मला 'महाराज' कां म्हणतां ?

**महेंद्र०**—सगळे लोक म्हणतात, म्हणून मीहि म्हणतों. मठाधिकाऱ्याला 'महाराज' म्हणण्याचा प्रघातच आहे. माझी मुलगी कोठें आहे महाराज ?

**सत्या०**—तें ऐकण्याच्या अगोदर एका प्रश्नाचें खरें खरें असेल तें उत्तर द्या. तुम्ही संतानधर्म स्वीकारणार काय ?

**महेंद्र०**—तें करण्याचा माझ्या मनाचा निश्चय झाला आहे.

**सत्या०**—तर मग मुलगी कोठें आहे, तें जाणण्याची इच्छा करूं नका.

**महेंद्र०**—असें कां महाराज ?

**सत्या०**—हें व्रत जे ग्रहण करतात, त्यांना स्त्री, पुत्र, कन्या, आप्त संबंधीं वगैरे कोणाहि लोकांशीं संबंध ठेवतां येत नाहीं. स्त्री, पुत्र, कन्या यांचें सुद्धां मुख पाहिल्यास प्रायश्चित्त करावें लागतें. जोंपर्यंत संतानांची इष्ट गोष्ट सिद्धीस गेली नाहीं, तोंपर्यंत तुम्हांला कन्येचें मुख पाहतां येणार नाहीं. म्हणून म्हणतों कीं संतानधर्म स्वीकारण्याचा तुमचा निश्चय झाला असेल, तर ती कोठें आहे वगैरे गोष्टी कळून तुम्हांला काय करायचें आहे ? तिला भेटतां तर येणारच नाहीं.

**महेंद्र०**—प्रभु ! इतका कडक नियम कशासाठीं ?

**सत्या०**—संतानांचें काम अतिशय कठीण आहे. ज्यांनीं सर्वस्वाचा त्याग केला आहे, अशावांचून दुसऱ्यांचा त्या कामीं उपयोग नाहीं. ज्यांचें चित्त माया-रज्जूनें बद्ध झालें आहे, तो दोरी गुंडाळून फिरविलेल्या भोवऱ्याप्रमाणें सतत मातींतच फिरत राहावयाचा. जमिनीला सोडून कधीं स्वर्गाला जाणार नाहीं.

**महेंद्र०**—मला हें नीटसें समजलें नाहीं. जो स्त्रीपुत्रांचें तोंड पाहतो, तो काय एखादें मोठें कार्य करण्यास पात्र नसतो ?

**सत्या०**—स्त्रीपुत्रांचें तोंड पाहिलें म्हणजे मनुष्याला देवकार्याचा विसर पडतो. संतानधर्माचा हाच नियम आहे कीं, ज्या दिवशीं कारण पडेल, त्या दिवशीं त्याला प्राणत्यागहि करावा लागेल. तुम्हांला तुमच्या मुलीचें तोंड दिसल्या-वर तुम्ही तिला टाकून मरायला तयार व्हाल काय ?

**महेंद्र०**—तिचें तोंड न पाहिलें तरी तिचें विस्मरण थोडेंच होणार आहे ?

**सत्या०**—विसरतां येत नसेल, तर हें व्रत घेऊं नका.

**महेंद्र०**—सगळ्या संतानांनीं अशा प्रकारें स्त्रीपुत्रांना विसरून जाऊनच व्रत ग्रहण केलें आहे काय ? तसें असेल तर संतानांची संख्या फारच अल्प असली पाहिजे.

**सत्या०**—संतानांत दोन प्रकार आहेत. एक दीक्षा घेतलेल्यांचा व दुसरा ती न घेतलेल्यांचा. दीक्षा न घेतलेले ते प्रापंचिक किंवा भिक्षा मागणारे आहेत. ते केवळ युद्धाच्या वेळीं येऊन उभे राहतात, आणि जी कांहीं लूट मिळेल ती किंवा बक्षीस घेऊन चालते होतात. जे दीक्षा घेतलेले आहेत त्यांनीं सर्वस्वाचा त्याग केलेला असतो. ते संप्रदायांतले खरे कर्ते पुरुष होत. तुम्हांला अदीक्षित संतान होण्याबद्दल मी आग्रह करीत नाहीं. युद्धाचे वेळीं सोटे काठ्या घेऊन येणारे पुष्कळ मिळतात. दीक्षा न घेतली तर संप्रदायाच्या कोणत्याहि महत्त्वाच्या कामांत तुम्हांला अधिकारी होतां येणार नाहीं.

**महेंद्र०**—दीक्षा काय असते ? दीक्षाच कशाला घ्यायला पाहिजे ? मीं तर अगोदरच मंत्र घेतलेला आहें.

**सत्या०**—तो मंत्र टाकून माझ्या जवळून पुनः मंत्र घ्यावा लागेल.

**महेंद्र०**—मंत्राचा त्याग कसा करावयाचा ?

**सत्या०**—मी त्याची पद्धति सांगेन.

**महेंद्र०**—नवा मंत्र कां घ्यावयाचा ?

**सत्या०**—संतान वैष्णव आहेत.

**महेंद्र०**—संतान वैष्णव कसे, तें मला नाहीं कळत. अहिंसा हा तर वैष्णवांचा श्रेष्ठ धर्म आहे !

**सत्या०**—ते वैष्णव चैतन्याच्या संप्रदायांतले होत. बौद्ध धर्मांच्या अनुकरणानें तो वैष्णवपणा त्यांच्या ठायीं आलेला आहे. आमच्या सारख्या वैष्णवांच्या धर्माचें लक्षण दुष्टांचें दमन आणि पृथ्वीचा उद्धार हें आहे. कारण विष्णु हा जगाचा पालनकर्ता आहे. त्यानें दहा वेळां अवतार घेऊन पृथ्वीचा उद्धार केला आहे. केशी, हिरण्यकशिपु, मधुकैठभ, मुर, नरक प्रभृति दैत्यांना, रावणादिक राक्षसांना, व कंस, शिशुपाल वगैरे दुष्टांना त्यानें युद्धांत मारलें. तोच जेता, जयदाता व पृथ्वीचा उद्धारकर्ता असून संतानांचें इष्ट दैवत आहे. चैतन्यदेवाचा वैष्णव धर्म हा खरा वैष्णव धर्म नव्हे. तो अर्धमात्र वैष्णवधर्म आहे. चैतन्यदेवाचा विष्णु केवळ प्रेममय आहे—संतानांचा विष्णु केवळ शक्तिमय आहे. दोन्ही धर्म अर्धे अर्धे वैष्णवधर्म आहेत. आतां नीट समजलें ना ?

**महेंद्र०**—नाहीं. मी आज या नवीनच गोष्टी ऐकतों. काशीमबाजार येथें एका पाद्र्याशीं माझी गांठ पडली होती. तो अशाच प्रकारें सांगत होता. म्हणजे

ईश्वर प्रेममय आहे—तुम्ही येशूवर प्रेम करा—असें तो म्हणत होता. तशीच ही गोष्ट दिसते.

**सत्या०**—आमचे चौदा पिढयांचे पूर्वज जशा गोष्टी सांगत आले, तशाच मीं तुम्हांला सांगितल्या. ईश्वर त्रिगुणात्मक आहे, हें तुम्हीं ऐकलें असेलच ?

**महेंद्र०**—होय. सत्त्व, रज, तम हे ते तीन गुण आहेत.

**सत्या०**—ठीक. या तीन गुणांची पृथक् पृथक् उपासना सांगितली आहे. सत्त्व गुणापासून दयादाक्षिण्यादिकांची उत्पत्ति होते. त्याची उपासना भक्तीच्या द्वारें करावी. चैतन्य संप्रदाय ती करतो. रजोगुणापासून शक्तीची उत्पत्ति होते. त्याची उपासना युद्धाच्या द्वारें—देवाच्या शत्रूंचा विध्वंस करण्यानें—करावयाची असते. ती आम्ही करतों, आणि तमोगुणापासून भगवान् शरीर—चतुर्भुजादिरूप—धारण करतात. गंध पुष्पादिकांच्या द्वारें त्या गुणांची पूजा करावयाची असते. सर्वसाधारण लोक ती करतात. आतां तरी समजलें कीं नाहीं ?

**महेंद्र०**—समजलें. एकूण संतान हा उपासकांचाच संप्रदाय आहे तर ?

**सत्या०**—बरोबर. आम्हांला राज्य नको आहे. मुसलमान हे भगवंताचा द्वेष करणारे म्हणूनच केवळ त्यांचें निःसंतान करायला आम्ही पाहतों.

---

## प्रकरण पांचवें.

याप्रमाणें संभाषण झाल्यानंतर सत्यानंद महेंद्राला घेऊन त्याच मठांतल्या मंदिराच्या अंतर्भागीं—ज्या ठिकाणीं अपूर्व शोभायमान प्रचंड चतुर्भुज मूर्ति होती तेथें—गेला. त्या ठिकाणीं अपूर्व शोभा दिसत होती. चांदी सोन्याच्या रत्नखचित दीपांच्या प्रकाशानें मंदिर देदीप्यमान दिसत होतें. तेथें फुलांच्या राशींच्या राशी स्तूपाकार रचून ठेविल्या होत्या. त्यांच्या घमघमाटानें मंदिर दरवळून गेलें होतें. मंदिरांत आणखी एक जण 'हरे मुरारे' नांवाचा जप मृदुस्वरानें करीत होता. सत्यानंदानें आंत प्रवेश करतांच त्या माणसानें उठून त्याला प्रणाम केला. ब्रह्मचाऱ्यानें त्याला विचारलें, 'तुम्हांला दीक्षा घ्यावयाची आहे ?'

तो म्हणाला, 'माझ्यावर अनुग्रह करावा.'

तेव्हां त्याला व महेंद्रालाहि उद्देशून सत्यानंद म्हणाला, 'तुम्ही यथाविधि स्नान करून, संयम करून, कांहीं न खातां आलां आहां ना ?'

**उत्तर**—होय.

**सत्या०**—तुम्ही भगवंताला साक्षी ठेवून प्रतिज्ञा करा कीं, आम्ही संतान-धर्माचें नियमाप्रमाणें पालन करूं.

**उत्तर**—करूं.

**सत्या०**—जोंपर्यंत मातेचा उद्धार होणार नाहीं, तोंपर्यंत गृहस्थधर्माचा त्याग करूं.

**उत्तर**—करूं.

**सत्या०**—मातापित्यांचा त्याग करूं.

**उत्तर**—करूं.

**सत्या०**—भाऊ व बहिणींचा त्याग करूं.

**उत्तर**—करूं.

**सत्या०**—स्त्रीपुत्रांचा त्याग करूं.

**उत्तर**—करूं.

**सत्या०**—आप्तसंबंधी, नोकरचाकर यांचा त्याग करूं.

**उत्तर**—सर्वांचा त्याग केला आहे.

**सत्या०**—धनदौलत, भोग यांचाहि.

**उत्तर**—सर्व सोडलें आहे.

**सत्या०**—इंद्रियदमन करूं. स्त्रीबरोबर एका आसनावर बसणार नाहीं.

**उत्तर**—बसणार नाहीं. इंद्रियजय करूं.

**सत्या०**—भगवंताच्या समक्ष प्रतिज्ञा करा कीं, स्वतःसाठीं किंवा स्वजना-साठीं अर्थार्जन करणार नाहीं. जें मिळेल तें वैष्णवभांडाराला देऊं.

**उत्तर**—देऊं.

**सत्या०**—सनातन धर्मासाठीं स्वतः हत्यार हातीं धरून युद्ध करूं.

**उत्तर**—करूं.

**सत्या०**—रणांत कधीं पाठ दाखविणार नाहीं.

**उत्तर**—नाहीं.

**सत्या०**—जर आमच्या हातून प्रतिज्ञेचा भंग झाला—

**उत्तर**—तर अग्निकाष्ठें भक्षण करून किंवा विष प्राशन करून प्राण देऊं.

**सत्या०**—आणखी एक गोष्ट—जात. तुमची जात कोणती ? महेंद्र कायस्थ आहे. तुमची जात कोणती ?

**दुसरा**—मी ब्राह्मणकुमार आहें.

**सत्या०**—उत्तम. तुम्ही जात सोडण्याला तयार आहां काय? सगळ्या संतानांची जात एक असते. या महाव्रताच्या वेळीं ब्राम्हणशूद्र हा विचार नाहीं. तुमचें काय म्हणणें आहे?

**दोघे**—आम्हीहि तो विचार करणार नाहीं. आपण सर्व एका मातेचीं लेंकरें आहों.

**सत्या०**—तर मग मी तुम्हांला दीक्षा देतों. तुम्हीं आतां ज्या प्रतिज्ञा केल्या आहेत, त्यांचा भंग करूं नका. मुरारी स्वतः या गोष्टीला साक्षी आहे. रावण, कंस, हिरण्यकशिपु, जरासंध, शिशुपाल प्रभृति यांचा नाश ज्यानें केला, जो सर्वांतर्यामीं वास करणारा, सर्वत्र विजयी, सर्वशक्तिमान् व सर्वनियंता आहे, तो जसा इंद्राच्या वज्राच्या ठिकाणीं त्याचप्रमाणें मांजराच्या नखाच्याहि ठायीं सारखा वास करतो. तो केलेली प्रतिज्ञा मोडणाराचा नाश करून त्याला अनंत नरकांत टाकील.

**दोघे**—तथास्तु.

**सत्या०**—बोला 'वंदे मातरम्.'

दोघेहि त्या गुप्त मंदिरांत मातृस्तोत्र गाऊं लागले. नंतर ब्रह्मचाऱ्यानें त्यांना यथाविधि दीक्षा दिली.

---

## प्रकरण सहावें.

दीक्षा देण्याचा विधि समाप्त झाल्यावर सत्यानंद महेंद्राला एका अति गुप्त स्थानीं घेऊन गेला. दोघेहि तेथें बसल्यावर सत्यानंद म्हणाला, 'हें पहा! तुम्हीं जें महाव्रत घेतलें आहे, त्याला भगवान् अनुकूळ आहे, असें माझें मन सांगतें. तुमच्या हातून मातेचें महत्कार्य सिद्धीला जाणार आहे. तुम्ही लक्षपूर्वक माझें म्हणणें ऐकून घ्या. तुम्हांला मी जीवानंद व भवानंद यांच्याबरोबर रानावनांत फिरून युद्ध करायला सांगत नाहीं. तुम्ही आपल्या गांवाला परत जा. घरीं राहूनच संन्यासधर्म पाळा म्हणजे झालें.'

हें ऐकून महेंद्र विस्मित व खिन्न झाला; पण कांहीं बोलला नाहीं. ब्रम्हचारी पुढें म्हणाला, 'सध्याच्या काळीं आम्हांला आश्रयस्थान नाहीं. असें एखादें स्थान नाहीं, कीं एखादी प्रबळ सेना येऊन तिनें आम्हांला वेढा दिला, तर अन्नसामग्री घेऊन दार बंद करून दहा दिवस आम्हांला निर्विघ्नपणें तेथें काढतां येतील.

आमच्या पाशीं एखादा गड नाहीं. तुमचा जंगी वाडा आहे. तुमच्या गांवांवर तुमची सत्ता आहे. माझी इच्छा आहे कीं तुमच्या गांवीं एखादा किल्ला बांधावा. गांवाभोंवतीं तटबंदी करून त्याच्या सभोंवार खंदक खणिला आणि मधून मधून चौक्या बसविल्या, आणि बांधावर तोफ लावून ठेविली म्हणजे उत्तम बंदोबस्ताचा किल्ला तयार करतां येईल. तुम्ही आतां आपल्या घरीं जा. हळू हळू दोन हजार संतान त्या ठिकाणीं येऊन पोंचतील. त्यांच्याकडून गड, बांध, चौक्या वगैरे बांधण्याचें काम तयार करण्यांत येईल. तुम्ही त्या ठिकाणीं एक उत्तम लोखंडी तळघर बांधा, म्हणजे त्या ठिकाणीं संतानांचा खजिना ठेवतां येईल. सोन्यानें भरलेल्या सगळया पेट्या एकेक तुमच्याकडे पाठविण्यांत येतील. त्या पैशानें तुम्ही हीं सगळीं कामें करा; आणि मी ठिकठिकाणीं हिंडून चांगले चांगले कारागीर मिळवून आणितों, ते आले म्हणजे तुम्ही आपल्या गांवीं कारखाना काढा. त्या कारखान्यांत तोफ ओतण्याचें व बंदुका, दारूगोळा वगैरे तयार करण्याचें काम करण्यांत येईल. यासाठीं तुम्हांला आपल्या घरीं जायला मी सांगत आहें.'

महेंद्रानें तें कबूल केलें.

---

## प्रकरण सातवें.

महेंद्र सत्यानंदाला वंदन करून व त्याचा निरोप घेऊन निघून गेल्यावर त्या दिवशीं दीक्षा घेतलेला दुसरा शिष्य सत्यानंदाकडे आला आणि त्याला वंदन करून गुरूच्या आज्ञेवरून कृष्णाजिनावर बसला. अगोदर दुसऱ्या कांहीं गोष्टी झाल्यावर सत्यानंदानें त्याला विचारलें, "कृष्णाच्या ठायीं तुमची गाढ भक्ति आहे कीं नाहीं ?" शिष्य म्हणाला, 'मीं या प्रश्नाला उत्तर काय देऊं ? मी जिला भक्ति समजतों ती कदाचित् शाठ्य असेल, किंवा आत्मप्रतारणा असेल."

सत्यानंद संतुष्ट होऊन म्हणाला, "ठीक म्हणालांत. जिच्या योगानें दिवसें दिवस भक्ति दृढतर होत जाईल, तीच गोष्ट करा. तुमचा यत्न सफळ होईल, हा माझा आशीर्वाद आहे. तुम्ही वयानें तरुण आहां. तुम्हांला मीं कोणत्या नांवानें हांक मारावें, तेंहि मीं आतांपर्यंत तुम्हांला विचारलें नाहीं.'

तरुण संतान म्हणाला, "आपणांस ज्या नांवाची अभिरुचि असेल, तें नांव द्यावें. मी तर वैष्णवांचा दासानुदास आहें.''

**सत्यानंदः**—तुमचें तरुण वय पाहून तुम्हांला नवीनानंद असें नांव द्यावेंसें वाटतें. तेव्हां तुम्ही तेंच नांव घ्या. हो, पण पूर्वी तुमचें नांव काय होतें ? सांगण्यास कांहीं अडचण नसली, तर सांगा. माझ्याजवळ सांगितल्यानें ती गोष्ट षट्कर्णी होणार नाहीं. संतान धर्मांतली हीच खुबी आहे, कीं, जें बोलण्यासारखें नसेल, तेंसुद्धां गुरूजवळ सांगावें लागतें. सांगितल्यापासून कांहीं हानि होणार नाहीं.

**शिष्यः**—माझें नांव शांतिराम देवशर्मा होतें.

**सत्यानंदः**—तुमचें नांव शांतिमणि पापिष्ठा !

इतकें बोलून सत्यानंदानें शिष्याची काळया केसांची दीड हात लांब दाढी डाव्या हातानें धरून एक हिसडा दिला. तेव्हां ती कृत्रिम दाढी तत्काळ निघून आली.

सत्यानंद म्हणाला, "छोः ! छीः ! माझ्याशीं असें कपट ! तुमच्या मनांतून मला फसवायचेंच होतें, तर या वयांत ही दीड हात लांब दाढी कशाला लाविली ! खोटी दाढी लाविल्यानें मंजुळ कंठस्वर आणि डोळ्यांतलें पाणी का कुठें लपणार आहे ! असा मी फसण्यासारखा भोळा असतों, तर येवढया मोठ्या कार्याला कसा हात घातला असता ?"

काळतोंड्या शांतीनें दोन्ही हातांनीं डोळे झांकून खालीं मान घातली; पण लागलींच हात खालीं करून त्या वृद्धाच्या चर्येकडे आपले विलोल कटाक्ष फेकून ती म्हणाली, 'प्रभु ! मीं काय अपराध केला आहे ? स्त्रीच्या बाहूंत का बळ नसतें ?'

**सत्यानंदः**—हो. गाईच्या पदचिन्हांत जितकें जल मावतें तितकें.

**शांतिः**—संतानांच्या बाहुबळाची आपण कधीं परीक्षा केली आहे का ?

**सत्यानंदः**—होय.

इतकें बोलून सत्यानंदानें एक पोलादाचें धनुष्य आणि लोखंडाची तार तिच्यापुढें आणून ठेविली आणि म्हटलें, 'या लोखंडाच्या धनुष्याला ही तार दोरीसारखी लावावयाची आहे. दोन हात लाविली पाहिजे. तार लावतां लावतां धनुष्य ताठ होईल आणि त्याच्या झटक्यानें तुम्ही कोलमडून पडाल कदाचित् ! जर तार लावाल तर बळवान् खरे.'

शांतीनें धनुष्य व ती तार बारकाईनें पाहून म्हटलें, 'सगळे संतान या परीक्षेंत उत्तीर्ण झाले आहेत काय ?'

**सत्यानंद**--नाहीं. याच्या योगानें त्यांचें बळ किती आहे, तेवढें मी अजमावून घेतों.

**शांतिः**--मग या परिक्षेंत अजून कोणीहि उत्तीर्ण झाले नाहींत का ?

**सत्यानंद**--फक्त चारच जण झाले आहेत.

**शांति**--ते कोण कोण ? हें विचारण्यास कांहीं हरकत नाहीं ना ?

**सत्यानंदः**—कांहीं नाहीं. एकजण मीं.

**शांतिः**—आणखी ?

**सत्यानंदः**—जीवानंद, भवानंद व ज्ञानानंद.

शांतीनें धनुष्य हातीं घेतलें, त्याला तार लाविली, आणि तें सहज लीलेनें सत्यानंदाच्या चरणापाशीं फेकून दिलें.

तें पाहून सत्यानंद विस्मयानें आणि भीतीनें अगदीं चकित झाला. थोड्या वेळानें तो म्हणाला, 'तुम्ही काय माणूस आहां ! कीं देवी आहां !'

शांतीनें हात जोडून उत्तर केलें, "मी एक सामान्य मनुष्य आहें; पण ब्रह्मचारिणी आहें."

**सत्यानंदः**--हें कसें ? तूं काय बालविधवा आहेस ? छेः ! पण बालविधवा एक भुक्त असतात. त्यांच्या अंगीं इतकें बळ कोठलें ?

**शांतिः**—नाहीं. मी सधवा आहें.

**सत्यानंदः**—तुझे यजमान काय फरारी झाले आहेत ?

**शांतिः**—नाहीं. कांहीं उद्देशानेंच ते येथें आले आहेत.

एकाएकीं मेघांची फळी फोडून सूर्याचे किरण पृथ्वीवर यावे, त्याप्रमाणें सत्यानंदाला पूर्वीचें स्मरण झालें. तो म्हणाला, 'आतां आठवलें. जीवानंदाच्या स्त्रीचें नांव शांति होतें. तुम्हीच त्यांचें कुटुंब काय ?'

एकदम नवीनानंदानें जटाभारानें आपलें मुख झांकून घेतलें. कमलपुष्पावर जशी हत्तीची सोंड पडावी, तसें हें झालें. सत्यानंदानें म्हटलें, 'असलें पापाचरण करण्यासाठीं का तूं येथें आलीस ?'

शांतीनें एकदम तो जटाभार पाठीवर टाकून मान वर करून विचारलें, 'कोणतें पापाचरण प्रभु ? संतान-धर्मशास्त्र जर याला पापाचरण म्हणत असेल, तर मी म्हणेन कीं तो धर्मच खोटा--तो अधर्म ! मी त्यांची सहधर्मिणी आहें, ते धर्माचरणाला प्रवृत्त झाले आहेत. मी त्यांच्याबरोबरच धर्माचरण करायला आलें आहें.'

शांतीचे हे तेजस्वि वज्रगंभीर उद्गार ऐकून आणि तिची ती ताठ मान, बाहेर निघालेली छाती, कंपायमान ओष्ठ, व उज्ज्वल पण अश्रुपूर्ण नेत्र पाहून सत्यानंद संतुष्ट होऊन म्हणाला, "बाई ! तुम्ही साध्वी आहां. पण मातोश्री ! असें पाहा, कीं, पत्नी ही गृहधर्मांतच पतीची सहधर्मिणी असते. वीरधर्मांत स्त्रीचें काय काम आहे ?"

शांति म्हणाली, 'आजपर्यंत कोणता महावीर पत्नीवांचून खरा वीर झाला आहे ? सीता नसती, तर राम वीर झाला असता काय ? अर्जुनाचे किती विवाह झाले ते एकदां मोजून पहा बरें ? भीमाच्या अंगीं जेवढें मोठें बळ होतें, तितकीच त्याच्या पत्नींचीहि संख्या मोठी होती. तुम्हांला अशीं किती उदाहरणें सांगूं; आणि सांगून तरी काय उपयोग म्हणा !'

**सत्यानंद**—तें खरें; पण रणक्षेत्रांत कोणता वीर पत्नीला घेऊन जात असतो ?

**शांतिः**—कां बरें ? अर्जुन जेव्हां यादव सैन्याबरोबर अंतरिक्षांतून युद्ध करीत होता, तेव्हां त्याचें सारथ्य कोणीं केलें ? द्रौपदी बरोबर नसती, तर कुरुक्षेत्रावर पांडवांनीं युद्ध केलें असतें काय ?

**सत्यानंदः**—मोठ्यांची गोष्ट राहो. सामान्य मनुष्यांचें मन स्त्रीच्या ठायीं आसक्त होतें आणि त्याला कार्यापासून पराङ्मुख करतें. याचसाठीं स्त्रीच्याबरोबर एकासनावर संतानानें बसूं नये असा नियम येथें करण्यांत आला आहे. जीवानंद माझा उजवा हात आहे. तो माझा हात तोडण्यासाठीं का तुम्ही येथें आलां आहां ?

**शांतिः**—आपल्या उजव्या हाताचें बळ वाढविण्यासाठीं मीं आल्यें आहें. मी ब्रह्मचारिणी आहें, आणि प्रभूच्या जवळ ब्रह्मचारिणीच्या व्रतानें राहीन. मी केवळ धर्माचरणासाठीं आल्यें आहें. पतिदर्शनासाठीं नाहीं. विरहव्यथेनें मी व्याकुळ झालेली नाहीं. माझ्या पतीनें जो धर्म स्वीकारला आहे, त्याचा वांटा मी कां न घ्यावा ? तो घेण्यासाठींच मी आल्यें आहें.

**सत्यानंदः**—ठीक आहे. कांहीं दिवस तुमची परिक्षा पाहूं.

**शांतिः**—आनंद मठांत मला राहतां येईल काय ?

**सत्यानंदः**—आज दुसरीकडे कोठें जाणार ?

**शांतिः**——आणि पुढें ?

**सत्यानंदः**—मातोश्री, भवानीप्रमाणें तुमच्याहि ललाट भागीं अग्नि आहे. संतानसंप्रदायाला तुम्ही जाळून टाकणार काय ?

इतकें बोलून आणि आशिर्वाद देऊन सत्यानंदानें शांतीला निरोप दिला.

ती मनांत म्हणाली,' अरे लेका म्हाताऱ्या ! माझ्या कपाळीं अग्नि आहे काय ! माझें जळकें तोंड आहे कीं तुझ्या आईचें ?'

शांतीनें जो अर्थ घेतला, तसा अर्थ वस्तुतः सत्यानंदाच्या मनांत नव्हता. तिच्या डोळ्यांत विद्युत्तेजाची मोहिनी आहे, असा त्याच्या म्हणण्याचा भावार्थ होता; पण म्हाताऱ्याला पोरांसोरांशीं अशी गोष्ट कशी बोलतां येईल ?

---

## प्रकरण आठवें.

त्या रात्रीं मठांत राहण्याला शांतीला परवानगी मिळाली. तेव्हां आपल्या योग्य जागा ती शोधूं लागली. मठांत पुष्कळ खोल्या रिकाम्या होत्या. गोवर्धन नांवाच्या एका परिचारक-संतानानें हातांत कंदिल घेऊन तिला पुष्कळ खोल्या दाखविल्या; पण त्यांतली एकहि तिला पसंत पडली नाहीं. शेवटीं हताश होऊन गोवर्धन तिला सत्यानंदाकडे घेऊन जाऊं लागला. शांति म्हणाली, 'भाई संतान ! या इकडच्या खोल्या पाहायाच्या राहिल्या आहेत.'

गोवर्धन म्हणाला, 'या सगळ्या चांगल्या आहेत; पण त्यांतून लोक राहात आहेत.'

**शांति**—कोण राहात आहेत ?

**गोवर्धन**—मोठमोठे सेनापति.

**शांति**—ते कोण कोण ?

**गोवर्धन**—भवानंद, जीवानंद, धीरानंद, ज्ञानानंद, वगैरे. हा आनंदमठ आनंदमय आहे !

**शांति**—बरें, पण खोल्या पाहायला कोणती हरकत आहे ? दाखविनास.

तेव्हां गोवर्धन शांतीला प्रथम धीरानंदाच्या खोलीकडे घेऊन गेला. धीरानंद त्या वेळीं महाभारतांतलें द्रोणपर्व वाचीत होता. अभिमन्यूनें सप्तरथींच्या बरोबर कसें युद्ध केलें, त्याचें वर्णन वाचण्यांतच तो गढून गेला होता. तो कांहीं बोलला नाहीं. शांतीहि कांहीं न बोलतां तेथून पुढें चालती झाली.

त्यानंतर ती भवानंदाच्या खोलीकडे गेली. भवानंद त्या वेळीं वर दृष्टि लावून एका मुखाकडे विचारपूर्वक पाहत होता. तें कोणचें मुख होतें तें ठाऊक नाहीं;

पण तें फार सुंदर होतें. काळेभोर, कुरळे व सुगंधित केश कानापर्यंत लांब पसरलेल्या भिंवयावर पडले होते. मधला त्रिकोणाकृति ललाट प्रांत मृत्यूच्या भयंकर कृष्ण छायेनें आच्छादित झालेला होता. जणूं काय तेथें मृत्यु आणि मृत्युंजय यांचें द्वंद्वयुद्धच चाललें होतें ! डोळे मिटले होते. भिंवया स्थिर होत्या. ओठ नीलवर्ण, गाल पांढुरके व ऊर उन्नत होतें. आंगावरचें वस्त्र वाऱ्यानें हलत होतें. त्यानंतर ज्याप्रमाणें शरदृतूंत चंद्रमा मेघमंडळाला दूर सारून आपलें सौंदर्य प्रकट करतो, ज्याप्रमाणें प्रभातकाळचा सूर्य तरंगाकृति मेघमालेला सोनेरी रंग चढवून स्वतः प्रदीप्त दिसूं लागतो, दशदिशांना प्रकाशमान करतो व स्थल, जल, कीटपतंगांना प्रफुल्लित करतो, त्याप्रमाणें त्या मृत देहांत जीवनाच्या शोभेचा संचार झाला आहे ! काय ती शोभा ! भवानंद ती पाहण्यांतच दंग झाला होता. तोहि कांहीं बोलला नाहीं. कल्याणीच्या लावण्यानें त्याचें हृदय विव्हळ केलें होतें. शांतीच्या रूपाकडे त्यानें पाहिलेंसुद्धां नाहीं.

शांति तेथून तिसऱ्या एका खोलीकडे गेली. ‘ येथें कोण असतात ?’ असें तिनें विचारलें.

गोवर्धन म्हणाला, ‘ जीवानंद ठाकुर. ’

**शांति**—ते कोण ? अरे ! पण येथें कोणी दिसत नाहीं कसें ?

**गोवर्धन**—कोठें बाहेर गेले असतील. येतील लवकरच.

**शांति**—ही खोली सर्व खोल्यांत चांगली दिसते.

**गोवर्धन**—पण ही तुम्हांला मिळायची नाहीं.

**शांति**—कां बरें ?

**गोवर्धन**—जीवानंद ठाकुर येथें राहतात.

**शांति**—ते आले तर पाहतील दुसरी एखादी खोली.

**गोवर्धन**—असें कोठें झालें आहे ? जे येथें राहतात, तेच येथचे मालक म्हटले पाहिजेत. ते म्हणतील तें होईल.

**शांति**—बरें तर तूं आतां जा. मला जागा न मिळाली, तर मी एखाद्या झाडाखालीं निजेन.

इतकें बोलून गोवर्धनाला शांतीनें निरोप दिला व ती त्या खोलींत शिरली, आणि जीवानंद बसत असे, तें कृष्णाजिन पसरून व दिव्याची वात सारून जीवानंदाची एक पोथी ती वाचीत बसली.

थोड्या वेळानें जीवानंद तेथें येऊन उभा राहिला. शांति पुरुषाच्या वेशांत होती, तरी तिला पाहतांच त्यानें तिला ओळखलें आणि म्हटलें, 'कोण ? शांति ?'

शांतीनें शांतपणानें पोथी बाजूला ठेवून जीवानंदाच्या मुद्रेकडे पहून म्हटलें, 'शांति कोण महाराज ?'

हा प्रश्न ऐकून जीवानंद चकित होऊन स्तब्ध राहिला. शेवटीं म्हणाला, 'शांति कोण ? तूं शांति नव्हेस काय ?'

शांतीनें अंमळ तिरस्कार दाखवून म्हटलें, 'मी नवीनानंद गोस्वामी आहें.' इतकें बोलून ती पुनः पोथीकडे पाहूं लागली.

जीवानंद मोठ्यानें हसला आणि म्हणाला, 'हा रंग कांहीं नवाच दिसतो ! बरें तर, नवीनानंद ! तूं या ठिकाणीं कोणत्या हेतूनें आला आहेस ?'

शांति म्हणाली, 'दुसऱ्याला उद्देशून बोलतांना 'आपण' म्हणणें हा शिष्टाचार आहे. मी आपल्याशीं बोलतांना हा शिष्टाचार सोडला नव्हता. मग आपण मला 'तूं' कां म्हणतां ?'

'जशी आज्ञा.' असें म्हणून जीवानंद हात जोडून नम्रपणें उभा राहिला. तो पुढें म्हणाला, 'या दासाची आपणास नम्रभावानें अशी विनंति आहे कीं, आपण भैरवपुराहून या गरिबाच्या घरीं पायधूळ झाडण्याची कृपा कशासाठीं केली, त्याविषयीं आज्ञा व्हावी.'

शांति अतिशय गंभीरपणानें म्हणाली, 'असलें वांकडें बोलण्याचें कारण नाहीं. भैरवपूर मला माहीत नाहीं. मी संतान धर्माचा स्वीकार करण्यासाठीं येथें आलों व त्याची दीक्षा आज घेतली.'

**जीवा०**—खरेंच कीं काय ? अरेरे ! घात झाला !

**शांति**—कां वरें ? आपणमुद्धां दीक्षा घेतली आहेना ?

**जीवा०**—पण तूं स्त्री आहेस ?

**शांति**—हें काय भलतेंच बोलतां ? आपणाला हें कोणीं सांगितलें ?

**जीवा०**—माझी खात्री होती कीं, माझें कुटुंब ब्राह्मण स्त्री आहे म्हणून.

**शांति**—ब्राह्मण स्त्री ? मग ती अद्याप आहे ना ?

**जीवा०**—होती येवढें मला ठाऊक आहे.

**शांति**—मग मीच आपलें कुटुंब असें आपणास वाटतें कीं काय ?

जीवानंद पुनः हात जोडून नम्रपणानें म्हणाला, 'होय महाराज.'

**शांति**—जर अशी हास्यापद गोष्ट आपल्या मनांत उभी राहिली आहे, तर मग आपलें कर्तव्य क"य तें सांगा पाहूं ?

**जीवा०**—तुझ्या अंगावरचा पदर जब्बरीनें धरून तुझें अधरपान करणें हा.

**शांति**—आपल्या बोलण्यावरून आपली दुष्टबुद्धि किंवा गांजेखोरपणाची वृत्ति मात्र दिसून येते. आपण दीक्षा घेतांना शपथ घेतली होतीना कीं, स्त्रीच्या बरोबर मी एकासनावर बसणार नाहीं ? मी स्त्री आहें असा आपला विश्वास आहे—असे दोरीला साप समजणारे पुष्कळ असतात—तर आपणास हें उचित आहे कीं, आपण पृथक् आसनावर बसावें. माझ्याशीं आपण भाषण सुद्धां करूं नये.

इतकें बोलून शांति पुनः पोथी वाचूं लागली. शांतीपुढें हार खाऊन जीवानंद निराळें आंथरूण घालून निजला.

---

# खंड तिसरा.



## प्रकरण पहिलें.

शहात्तर साल ईश्वरकृपेनें पार पडलें. बंगालच्या लोकसंख्येपैकीं रुपयांत सहा आणे इतकी लोकसंख्या–किती कोटि तें ईश्वर जाणे !—यमपुरीला पाठवून देऊन हें दुर्वत्सर स्वतः काळाच्या उदरीं पडलें. पुढच्या सालीं ईश्वर प्रसन्न झाला. पर्जन्यवृष्टि चांगली झाली. पीक चांगलें आलें. जे दुष्काळांतून वांचले, त्यांना पोटभर खावयास मिळालें. पुष्कळ लोक उपासामुळें किंवा अल्पहारामुळें रोगग्रस्त झाले होते, त्यांना एकदम पोटभर आहार सोसला नाहीं. त्यामुळें पुष्कळ लोक मेले. पृथ्वी धान्यसंपन्न झाली खरी; पण गांवचीं गांवें उज्जाड झालीं. वाडेचे वाडे रिकामे पडले; आणि ते गुराढोरांचीं विश्रामस्थानें व भुताखेतांचीं विहारस्थलें बनलीं. अनेक गांवांतून जमीन नांगरण्यास माणसें नसल्यामुळें जमीनी रिकाम्या पडल्या आणि जंगलानें भरून गेल्या. सारा देश अशा प्रकारें जंगलमय झाला ! ज्या ठिकाणीं पिकांच्या श्यामल वर्णामुळें भूमि प्रफुल्लित दिसत होती, तेथें असंख्य गाई म्हशी चरूं लागल्या. जे बागबगीचे गांवच्या तरुण-तरुणीचीं प्रमोदस्थानें होतीं, त्या ठिकाणीं घोर जंगल माजलें. एक दोन तीन वर्षें अशीं गेलीं.

जंगल वाढूं लागलें. मनुष्याच्या सुखस्थानीं नरमांस लोलुप व्याघ्र येऊन, हरिणादिकांची शिकार करूं लागले. ज्या ठिकाणीं सुंदर तरुण स्त्रिया अळत्यानें तळपाय रंगवून पायांतल्या अलंकारांचा झुम् झुम् नाद करीत आणि सखीशीं थट्टा मस्करी करीत, उच्चहास्यानें मनाची करमणूक करून घेत असत, त्याच ठिकाणीं आतां कोल्हीं कुत्रीं लोळूं लागलीं. ज्या ठिकाणीं कोमल बालकें संध्याकाळच्या वेळीं प्रफुल्लित चित्तानें खेळ खेळत व पोटभर हसत, त्या ठिकाणीं आज जंगली हत्तींचे कळप मदोन्मत होऊन झाडांचा विध्वंस करूं लागले होते. ज्या ठिकाणीं दुर्गोत्सव होत असे, त्या ठिकाणीं आतां कोल्हे नाचूं लागले. वाड्यांच्या गच्च्या व दोलोत्सवांतल्या झोंके घेण्याच्या उंच जागा घुबडांचीं आश्रय स्थानें झाल्या होत्या. नाट्यमंदिरांतून दिवसा ढवळ्या सर्प वावरत होते. बंगाल्यांत धान्य पिकलें खरें; पण खाण्याला लोकच नव्हते. माल होता; पण गिऱ्हाईक नव्हतें. शेतकऱ्यांचीं कोठारें भरलीं होतीं; पण जमीनदारांचा सारा देण्यास त्यांच्याजवळ पैसे नव्हते. जमीनदाराकडून सरकारास पैशाचा भरणा न झाल्यामुळें त्यांच्याकडच्या जमीनदाऱ्या सरकारनें काढून घेतल्याकारणानें ते लोक दरिद्री होऊन बसले होते. कोणाच्याहि घरांत पैसा दिसेना. चोर व दरोडेखोर यांचा सुळसुळाट झाला होता. शिष्ट लोक घरामध्यें लपून रहूं लागले होते.

इकडे संतानसंप्रदायी लोक नित्य गंध, पुष्पें व तुळसीपत्रें विष्णूच्या चरणीं वाहून त्याची पूजा करीत होते. ज्यांच्या घरांत बंदुका व पिस्तुलें होतीं, त्यांनीं तीं घरून आणलीं. भवानंदाचें सर्वांना सांगणें होतें कीं, 'भाई ! एकाद्या घरांत हिरे माणिकादि रत्नें दिसलीं आणि त्याच घरच्या दुसऱ्या भागांत एकादी मोडकी तोडकी बंदुक दिसली, तर रत्नांना हात न लावतां प्रथम ती बंदुक अवश्य आणा.'

नंतर त्यांनीं प्रत्येक गांवीं प्रचारक पाठविले. ते गांवोगांव जाऊन हिंदूलोकांना विष्णूची पूजा करण्याचा उपदेश करीत आणि वीस पंचवीस जणांची टोळी जमवून मुसलमानांच्या एखाद्या गांवीं जाऊन त्यांच्या घराला आग लावीत. मुसलमान लोक प्राणरक्षणासाठीं पळून जात आणि इकडे संतान त्यांचें सर्वस्व लुटून तें नव्या विष्णुभक्तांनां वांटून देत. लुटीचा भाग दिल्यामुळें गांवढळ लोक आनंदित होत. मग त्यांना विष्णुमंदिरांत आणून मूर्तीच्या पायांवर त्यांच्या कडून हात ठेववून संप्रदायांत घेत. अर्थातच लोकांची समजूत झाली कीं, संतान संप्रदायांत जाण्यापासून मोठा विलक्षण लाभ आहे. मुसलमान राज्यांतली अरा-

जकता व अंदाधुंदी पाहून लोक त्या राज्याला कंटाळलेच होते आणि हिंदुधर्माचा लोप झाल्यामुळें पुष्कळ हिंदूंना हिंदुराज्य स्थापण्याविषयीं दृढ इच्छा होती. त्यामुळें ही संतानांची संख्या सारखी वाढत गेली. एकेका दिवसांत शंभर शंभर व प्रतिमासीं हजार हजार, संतान येऊन भवानंद व जीवानंद यांच्या चरणीं प्रणाम करून, टोळयाटोळयांनीं चोहींकडे मुसलमानांची खोड मोडण्यासाठीं बाहेर पडूं लागले. सरकारी अधिकारी सांपडला, कीं त्याला धरून चोपावें. वेळेस ठारहि मारावें, सरकारी खजिना असलेल्या जागीं जाऊन तो लुटावा व मुसलमानांच्या वस्तीला आग लावावी, असें चाललें होतें. सरकाराकडून संतानांच्या बंदोवस्तासाठीं सैन्य पाठविण्यांत येऊं लागलें. पण या वेळीं संतानांची संख्या मोठी असून ते हत्यारबंद आणि फार चढेल झाले होते. त्यांच्या दर्पापुढें मुसलमान सैन्याला उभें राहण्यास भय वाटे. यदाकदाचित् मुसलमान सैन्य त्यांच्यावर चालून गेलेंच, तर असंख्य संतान त्या सैन्यावर तुटून पडून त्याला मारून टाकीत, आणि 'हरे मुरारे हरे मुरारे !' असा जयघोष करीत. चुकून माकून संतानांच्या एखाद्या टोळीला यवन सैन्यानें पळायला लावलेंच, तर कोठून तरी संतानांची दुसरी टोळी येऊन विजयी मुसलमानांची डोकीं कापून 'हरि हरि,' म्हणत चालती होई. या वेळीं इंग्रजांच्या उदयकाळचा सूर्य—सुप्रसिद्ध वॉरन हेस्टिंग्ज—हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होता. त्यानें कलकत्त्यांत बसून लोखंडाचा एक सांखळदंड तयार केला होता, आणि या सांखळदंडानें समुद्रवलयांकित भारत-भूमीला मी जखडून टाकीन, असा मनांत विचार केला होता. एके दिवशीं जगदीश्वरानें सिंहासनावर बसून त्याच्या त्या इच्छेला ' तथास्तु ' म्हटलें. पण तो काळ अद्याप दूर होता. सध्यां तर अशी स्थिति होती कीं, संतानांच्या हरि-नामाच्या भयंकर घोषानें वॉरन हेस्टिंग्जची छाती धडधडत होती.

हेस्टिंग्ज साहेबानें प्रथम पोलिस-सैन्याकडून संतानांचें बंड मोडण्याचा यत्न करून पाहिला; पण त्या सैन्यांतल्या लोकांची अशी गाळण उडाली कीं, एखाद्या वृद्ध स्त्रीच्या तोंडून देखील 'हरे मुरारे' हे शब्द उच्चारलेले ऐकतांच ते पळून जाऊं लागले ! तेव्हां निरुपाय होऊन त्यानें कॅप्टन टॉमस नांवाच्या एका हुषार लष्करी अंमलदाराची त्या कामावर नेमणूक केली व त्याच्या हाताखालीं कंप-नीचें सैन्य देऊन त्याला पाठविलें.

कॅ० टॉमस त्याप्रमाणें जाऊन आपल्याकडे दिलेल्या कामाचा उत्तम बंदोबस्त करूं लागला. त्यानें राजाचें निवडक सैन्य व जमीनदारांची फौज गोळा केली

आणि कवाईत शिकून तयार झालेल्या हत्यारबंद व बळवान् देशी व विलायती शिपायांची सळमेसळ केली. मग या फौजेच्या निरनिराळ्या पलटणी करून त्यांवर योग्य अधिकारी नेमिले आणि या पलटणी देशांतल्या निरनिराळ्या भागांतून पाठवून दिल्या. त्यांना असा हुकूम देऊन ठेविला कीं 'तुम्ही मासे धरणाऱ्या कोळ्याप्रमाणें जिकडे तिकडे फौजेचें जाळें पसरा, आणि बंडखोर सांपडला कीं कीडमुंगीप्रमाणें त्याला चिरडून टाका. कंपनीचे शिपाई कोणी गांज्याचा दम मारून, तर कोणी रमची बाटली झोकून, बंदुकीवर संगिनी चढवून संतानांचा वध करण्यास निघाले. पण संतानांची संख्या फार मोठी व अजिंक्य असल्यामुळें शेतांतल्या उभ्या पिकाची शेतकरी ज्याप्रमाणें सपासप कापणी करतो त्याप्रमाणें कॅप्टन् साहेबांची फौज संतानांकडून कापली गेली, आणि हरिनामाच्या गजरानें टॉमस साहेबाच्या कानठाळ्या बसल्या.

---

## प्रकरण दुसरें.

त्या काळीं जागजागीं कंपनीच्या रेशमाच्या वखारी होत्या. शिवग्रामीं एक वखार होती. डॉनवर्थ साहेब त्या वखारीवर मुख्य अधिकारी होता. सगळ्या वखारींच्या रक्षणाची योग्य तजवीज करण्यांत आली होती. त्यामुळें त्या साहेबाला आपलें स्वतःचें प्राणरक्षण कसें तरी करतां आलें. पण बंडखोरांच्या भीतीनें आपल्या स्त्री-कन्येला त्यानें कलकत्त्याला पाठवून दिलें होतें. त्या ठिकाणीं या वेळीं टॉमस साहेब आपल्या दोनचार पलटणी घेऊन गेले होते. चांडाळ, मांग, डोम, वगैरे हलक्या जातींच्या आणि जंगली लोकांचा उत्साह पाहून साहेबाच्याहि आंगीं परद्रव्याची लूट करण्याचा उत्साह चढला होता. या लोकांनीं साहेबाच्या रसदीवर हल्ला केला. कंपनीच्या शिपायांसाठीं उत्तम तांदूळ, तूप, कणीक इ. सामानांच्या गाड्या भरून चाललेल्या पाहून या लोकांच्यानें मोह आवरेना. त्यांनीं त्या गाड्यांवर हल्ला केला; पण कंपनीच्या हातांतल्या बंदुकांपुढें त्यांचें कांहीं न चालल्यामुळें त्यांना परत फिरावें लागलें. टॉमस साहेबानें लागलीच कलकत्त्याला रिपोर्ट पाठविला कीं आज मीं फक्त १५७ शिपाई घेऊन शत्रूंवर चालून गेलों, आणि १४७०० बंडखोरांचा पराभव केला. शत्रूंकडचे २१५३ लोक मारले गेले, १२२३ जखमी झाले, आणि ७ जण पकडले गेले. यांतली शेवटची गोष्ट तेवढी खरी होती. टॉमस साहेब लागलीच शेफारून गेला. त्याला वाटलें

कीं जणूं काय आपण क्लेनहीमच्या विजयी वीरासारखेच आहों. तो मारे दाढीमिशांवर ताव देऊन निर्भयपणानें इकडे तिकडे फिरूं लागला. त्यानें डॉनवर्थ साहेबाला सल्ला दिली कीं या ठिकाणच्या वंडाचा मोड झाला आहे. आतां तुम्ही खुशाल आपल्या मंडळीला कलकत्त्याहून आणा. डॉनवर्थ म्हणाला, 'आपण येथें दहापांच दिवस राहा. देशांत शांतता होऊं द्या, मग कुटुंबाला आणतां येईल.' डॉनवर्थ साहेबांच्या येथें मद्यमांसाची रेलचेल होती. त्याचा दाढीवाला बबर्ची म्हणजे मूर्तिमंत अन्नपूर्णा होती. तेव्हां अर्थातच टॉमस साहेब तेथें मोठ्या आनंदानें राहिला.

इकडे भवानंदाच्या डोक्यांत सारखें भ्रमण सुरू होतें. या साहेबबहादुरांचें डोकें कापून 'संवरारि' ही पदवी आपणांस कशी धारण करतां येईल, याचा विचार त्याच्या डोक्यांत चालला होता. इंग्रज लोक भारतोद्धारासाठीं इकडे आले आहेत, ही गोष्ट संतानाला बिलकुल कळली नव्हती. कळावी कशी ? टॉमस साहेबाच्या वेळच्या दुसऱ्या इंग्रजांनासुद्धां ती ठाऊक नव्हती ! त्या वेळीं ती गोष्ट केवळ विधात्याच्याच डोक्यांत होती. भवानंदाचा विचार चालला होता कीं, या असुरकुळाचा आपण विध्वंस करूं. सर्वांनी गोळा व्हावें आणि सावधगिरीनें राहावें, व आपसांतली दुही मोडावी, ही त्याची इच्छा; पण तें घडलें नाहीं. त्यामुळें साहेबाचा मार्ग निष्कंटक होऊन तो निर्भयपणें चैन करीत राहिला.

साहेबाला शिकारीचा फार नाद होता. तो मधून मधून शिवग्रामाच्या लगतच्या रानांत शिकारीला जात असे. एके दिवशीं तो व डॉनवर्थ साहेब घोड्यावर बसून कांहीं शिकारी लोक बरोबर घेऊन शिकारीसाठीं बाहेर पडले होते. टॉमस साहेब मोठा धाडसी होता. त्याच्यासारखा बळवान् व धैर्यशाली पुरुष इंग्रज लोकांतसुद्धां दुसरा कोणी फारसा नव्हता. त्या निबिड अरण्यांत वाघ, रानरेडे, आस्वलें, वगैरे हिंस्र व भयंकर पशु होते. त्यामुळें रानांत फार दूरपर्यंत जाण्यास शिकारी लोक कबूल होईनात. डॉनवर्थसाहेब स्वतः एकदां त्या रानांत एका वाघाच्या तडाख्यांत सांपडला होता त्यामुळें तोहि दूर जाण्यास भीत होता. त्यांची सर्वांची परत फिरण्याची इच्छा होती; पण टॉमस साहेब त्यांना म्हणाला, 'तुम्ही परत फिरा पाहिजे तर; पण मी नाहीं तसें करणार !' असें म्हणून तो साहेब एकटाच रानांत शिरला.

वस्तुतः त्या रानांत जाण्याला वाटसुद्धां नव्हती, मग घोडा कसा जाणार ? तेव्हां साहेबानें घोड्याला सोडून दिलें, आणि खांद्यावर बंदूक टाकून तो एक-

टाच रानांत शिरला. वाघाच्या शोधार्थ पुष्कळ हिंडला; पण कोठेंहि त्याला तो आढळला नाहीं. मग काय आढळलें ? तर एका मोठ्या वृक्षाखालीं विकसित पुष्पांनीं आच्छादित अशा एका लतागुंजांत एक संन्यासी बसलेला त्याला दिसला. त्या तरुण संन्याशाच्या कांतीनें तें वन सुशोभित केलें होतें. त्या दिव्य शरीराच्या संसर्गानें उमललेलीं फुलें अधिक सुगंधित झालेलीं दिसत होतीं. ती मूर्ति पाहून साहेबाला फार विस्मय वाटला. लवकरच विस्मयाची जागा क्रोधानें पटकाविली. साहेबाला देशी भाषा उत्तम प्रकारें येत होती. त्यानें विचारलें 'तूमी कोण ?'

संन्यासी म्हणाला, 'मी संन्यासी आहें.'

**साहेब**—टू Rebel आहे.

**संन्यासी**—म्हणजे काय ?

**साहेब**--मी टूला गोडी ( गोळी ) घालून मारीन.

**संन्यासी**--मारा.

याला गोळी घालावी कीं नाहीं या विचारांत साहेब होता. इतक्यांत तो संन्यासीच विद्युद्वेगानें साहेबाच्या अंगावर तुटून पडला आणि त्यानें साहेबाच्या हातांतली बंदूक काढून घेतली. अंगावरचें पांघरलेलें कातडें फेकून दिलें व जटाहि काढून फेकून दिल्या. साहेबानें पाहिलें तेव्हां एक अपूर्व स्त्रीमूर्ति पुढें उभी असलेली त्याला दिसली. ती हसत हसत म्हणाली, 'साहेब ! मी स्त्री कोणावरहि हात टाकीत नसत्यें. मी तुम्हांला विचारत्यें कीं हिंदु व मुसलमान यांच्या मधल्या मारामारींत तुम्ही इंग्रज उगाच कां पडतां ? आपल्या घरीं चालते व्हा ना ?

**साहेब**—तूं कोण आहेस ?

**शांति**—मी संन्यासिनी आहें हें तुम्हांला दिसतें ना ? ज्यांच्याशीं तुमची लढाई चालली आहे, त्यांपैकींच एकाची पत्नी आहें.

**साहेब**—टूमि आमच्या गरीं ( घरीं ) राहशील ?

**शांति**—कशी ? राख म्हणून ?

**साहेब**—बायको परमाने; पण लगीन नाहीं व्हायचें.

**शांति**—मलाहि एक प्रश्न करायचा आहे. आमच्या घरीं रूपी नांवाचें एक वानर होतें. तें मरून गेलें. त्याची जागा खाली पडली आहे. कमरेला साखळी

बांधून घेऊन तूं बसशील का त्याच्या जागीं ? आमच्या बागेंत तुला खायला खूप केळीं मिळतील.

**साहेब**—टू बडी Spirited Woman आहेस. टूमचा Courage आणि हसणें यावर आमी फार खुष झालों. आमच्या खांद्यावर बसून चल. टूमचा नवरा लढाईंत मरून जाईल. मग टूमचा कसा होईल ?

**शांति**—तर मग एक गोष्ट आपण करूं या. लढाई चार दोन दिवसांत होईलच. जर तूं लढाई जिंकलीस आणि मी जिवंत राहिल्यें, तर मी तुझ्या घरीं राहायला येईन. जर आम्हीं ती जिंकली, तर तूं आमच्या येथें वानरासारखा केळीं खाऊन राहा. आहे कबूल ?

**साहेब**—केळीं खायला उट्टम असटाट. येठें आहेत ?

**शांति**—घेऊन जा तुझी बंदूक. तुझ्यासारख्या हलकटाशीं काय बोलायचें आहे ?

शांति बंदूक फेकून देऊन चालती झाली.

---

## प्रकरण तिसरें.

शांति साहेबाला सोडून दिल्यावर हरिणीसारखी त्वरेनें पाय उचलीत रानांत कोठच्या कोठें निघून गेली. थोड्या वेळानें साहेबाच्या कांनीं स्त्रीच्या कंठांतलें पुढील गीत पडलें—

### पद.

**" यौवन-जल-लहरि-दमनिं शक्त कवण बा ?**
**मुरमथना ! मधुहनना ! सांग माधवा ? "**

यावर लागलीच हे शब्द सारंगीच्या सुरांतहि वाजूं लागले. सारंगीच्या सुराबरोबर पुरुषाचा कंठ मिळून एक सूर निघाला—

**" यौवन जल-लहरि-दमनिं शक्त कवण बा ?**
**मुरमथना ! मधुहनना ! सांग माधवा ! "**

तीन सूर एकांत एक मिळून गाऊं लागले, तेव्हां सगळया लता कंपायमान झाल्या. शांति गात गात चालली—

**" यौवन-जल-लहरि-दमनिं शक्त कवण बा ?**
**मुरमथना ! मधुहनना ! सांग माधवा ! ॥ ध्रु० ॥**
**क्षुब्धसिंधु ! नाव नवी चालली बरी ॥**

**नाविक हा बघ ! सुकाणुं निज करीं धरी ॥**
**वाळूचा बांध भंगुं, हौस करुं पुरी ॥**
**भरति येउं पाहि ! कवण रक्षि यादवा ! ॥**
**मुरमथना मधुहनना ! सांग माधवा ॥"**

सारंगींतूनहि "**भरति येऊं पाहि ! कवण रक्षि यादवा ! मुरमथना ! मधुहनना ! सांग माधवा !**" असे सूर निघूं लागले.

जेथें झाडी इतकी दाट होती कीं, आंतलें कांहीं एक बाहेरून दिसत नव्हतें, अशा एका जागीं शांति गेली. त्या ठिकाणीं वृक्षांच्या फांद्या व पानें यांनीं झाकून टाकलेली एक पर्णकुटी होती. लतांनीं आच्छादिलेलें तिचें दार उघडून तिनें आंत प्रवेश केला. तेथें जीवानंद सारंगी वाजवीत बसला होता.

शांतीला पाहून त्यानें विचारलें, ' इतक्या दिवसांनीं गंगेच्या जलाला वाट फुटली वाटतें ? '

शांतीनें हंसत उत्तर केलें, ' नाल्याचें पाणी येऊन मिळाल्यानें का कुठें गंगेच्या पाण्यांत वाढ होत असते ? '

जीवानंद खिन्न होऊन म्हणाला, ' हें पहा ! एक दिवसाच्या व्रतभंगामुळें माझ्या प्राणाचा तर उत्सर्ग झालाच आहे. घडलेल्या पापाबद्दल प्रायश्चित्त करावें लागणारच. मीं तें यापूर्वीच केलें असतें, पण केवळ तुझ्या आग्रहास्तव केलें नाहीं. पण आतां लवकरच मोठें घोर युद्ध होणार आहे. या युद्धांत रणभूमीवर मला तें करावें लागेल. ह्या प्राणांचा त्याग करावा लागेल. माझा अंतकाळ येऊन पोंचला आहे.'

शांतीनें त्याला पुढें बोलू दिलें नाहीं. ती मध्येंच म्हणाली, ' मी आपली धर्मपत्नी—सहधर्मिणी—आहें. आपल्या धर्मात साह्य करणें माझें कर्तव्य आहे. आपण फार मोठा धर्म स्वीकारला आहे. त्या धर्मात आपणास साह्य करण्यासाठींच मी गृहत्याग करून आल्यें आहें. आपण दोघेंहि एकाच धर्माचें आचरण करण्यासाठीं गृहत्याग करून या अरण्यांत वास करीत आहों. मी आपली धर्मपत्नी होऊन आपल्या धर्माची वृद्धि करीन. त्यांत विघ्न कशी आणीन? विवाह हा जसा इहलोकासाठीं तसाच परलोकासाठींहि असतो. इहलोकासाठीं जो विवाह असतो, तो आपला झाला नाहीं असें समजावें. आपला विवाह केवळ परलोकासाठीं आहे. अशा विवाहाचें फळ दुप्पट मिळेल. मग प्रायश्चित्ताची गोष्ट कशाला बोलायची?

आपण काय पाप केलें आहे ? स्त्रीबरोबर एकासनावर बसावयाचें नाहीं, हीच शपथ घेतली आहेना ? आपण तर केव्हांहि एकदांसुद्धां एकासनावर बसलों नाहीं. मग प्रायश्चित्ताचें प्रयोजन काय ? हाय प्रभु ! आपण माझे गुरु ! मीं आपणास धर्म काय शिकवायचा आहे ? आपण वीर आहां. मी काय आपणास वीराचा धर्म शिकवायचा ? '

जीवानंदाचा कंठ आनंदानें सद्गदित झाला. तो म्हणाला, ' शिकविलास तर खरा ! ' शांति प्रफुल्ल चित्तानें म्हणाली, 'आणखी असें पहा गोस्वामी महाराज ! या लोकींसुद्धां आपला विवाह निष्फळ का झाला आहे ? आपण माझ्यावर प्रेम करतां मीहि आपल्यावर करत्यें. यापेक्षां इहकाळचें मोठें फळ दुसरें कोणतें असावयाचें ? वंदे मातरम्.'

यानंतर दोघांनीं एकाच सुरांत ' वंदे मातरम् ' हें गीत म्हटलें.

---

## प्रकरण चौथें.

भवानंद एकदां कलकत्त्यास गेला. तेथें राजमार्गानें न जातां तो एका गल्लींत शिरला. गल्लीच्या दोन्ही बाजूला उंच उंच हवेल्यांच्या रांगा लागलेल्या होत्या. तेथें सूर्य मध्यान्हाच्या वेळेला तेवढा एकदां डोकावून पाहत असे. त्यानंतर नेहमीं तेथें अंधकाराचेंच साम्राज्य होतें. गल्लीजवळच्याच एका दुमजली वाड्यांत तो शिरला. तळमजल्यावर एका खोलींत मध्यम वयाची एक बाई स्वयंपाक करीत होती, तेथें भवानंद जाऊन उभा राहिला. ती मध्यम वयाची स्त्री एक जाडें भरडें, मळकें सळकें असें वस्त्र नेसली होती. कपाळावर गोंदलेलें होतें. डोक्यावरचे केस मोराच्या तुऱ्यासारखे शोभायमान दिसत होते. चुलींत लाकडें फुरफुर आवाज करीत होतीं. तोंडानें तिची वटवट चालली होती. अशा वेळीं भवानंद महाप्रभूनें घरांत प्रवेश केला आणि 'अक्कासाहेब ! ' म्हणून तिला वंदन केलें.

भवानंदाला पाहून त्या बाईनें लगबगीनें आपलें वस्त्र सावरलें. डोक्यांतलें सोन्याचें फूलहि काढून टाकण्याची तिची इच्छा होती, पण तसें करण्यास तिला सवडच मिळाली नाहीं. कारण, तिचा हात खरकटा होता. तिचे केस तेल लाविल्यामुळें चांगले तुळतुळीत दिसत होते. हाय ! पूजेच्या वेळीं त्या केसांत एक फूलहि जाऊन पडलें होतें. डोक्यावरच्या पदरानें तें झाकण्याचा तिनें प्रयत्न केला, पण तें जुळलें नाहीं. कारण तिच्या अंगावरचें लुगडें अगदींच अपुरें होतें. तिच्या

विशाल दोंदाला फेरा घालण्यांतच त्याची लांबी बहुतेक संपली होती! तशांत लज्जारक्षणासाठीं ऊर तर झाकलाच पाहिजे. तो झांकतां झांकतांच तें बिचारें थकलें. शेवटीं वर चढावयाचे वेळीं त्यानें साफ जबाब दिला कीं कानाच्यावर माझ्यानें येववत नाहीं. त्यामुळें अत्यंत मर्यादशील अशा त्या गौरी ठाकुराणीनें त्या वस्त्राला कानापाशींच धरून ठेविलें आणि यापुढें लांब लुगडें विकत आणण्याचा मनांत पक्का निश्चय ठरवून म्हटलें, 'कसें काय गोसावी महाराज! यावें भाई! आज सकाळींच मला नमस्कार ठोकलात याचें काय कारण?'

**भवा०**--तुम्ही आमच्या अक्का ना!

**गौरी०**—असं असं. एकूण मनाचा हा नमस्कार झाला. ठीक ठीक! तुम्ही पडलां गोसावी! देवता! जें वाटेल तें तुम्हांस करतां येतें. कांहीं असो म्हणा; पण मी तुमच्यापेक्षां वडील आहें ही गोष्ट तर कांहीं खोटी नाहीं?

गौरीदेवी खरोखरच भवानंदापेक्षां वयानें पंचवीस वर्षांनीं मोठी होती. तथापि भवानंदानेंच चतुराईनें उत्तर केलें, 'तें कसें अक्कासाहेब? तुम्ही मोठ्या आनंदी म्हणून तुम्हांला मी अक्कासाहेब म्हटलें. पण खरें म्हटलें तर तुम्ही माझ्याहून सहा वर्षांनीं लहानच आहां, हें नाहीं का तुमच्या लक्ष्यांत? हें पाहा आम्हां वैष्णवांमध्यें सगळे कांहीं प्रकार आहेत. माझी खरी खरी मनापासून इच्छा आहे कीं मठांतल्या एकाद्या ब्रह्मचाऱ्याला बोलावून आणून त्याच्याशीं तुमचें लग्न लावून द्यावें. हें तुम्हांला सांगण्यासाठींच आलों होतों.

**गौरी०**—हें काय बोलणें! छिः! असें काय बोलतां? अहो! मी विधवा ना?

**भवा०**—मग? विधवांचीं काय लग्नें होत नाहींत?

**गौरी**—भाई! तुम्हांला काय वाटेल तें करा. तुम्ही आहां मोठे पंडित. मी पडल्यें बाई माणूस! मला काय समजतें आहे! मग लग्नाचा बेत कधींचा ठरवितां?

भवानंदानें मोठ्या कष्टानें आलेलें हसें आंवरून म्हटलें, "त्या ब्रह्मचाऱ्याची एकदां गांठ घेतली पाहिजे. बरें पण ती कशी काय आहे?

हें ऐकून गौरी खिन्न झाली. ही विवाहाची गोष्ट निव्वळ थट्टा तर नसेलना? अशी शंकाहि तिच्या मनांत आली. ती म्हणाली, "असणार आणखी कशी, जशी असावयाची तशी आहे."

**भवानंद**—तर मग तुम्हीच एकदां जाऊन तिला पाहून या; आणि तिला सांगा, कीं, मी तुम्हाला भेटण्यासाटीं आलों आहें.

गौरी देवीनें मग हातांतलें काम बाजूला ठेविलें, हात धुतले, आणि झपाझप पावलें टाकीत जिना चढून वरच्या मजल्यावर गेली. त्या घरांत एका फाटक्या तुटक्या चटईवर बसलेली एक अपूर्व सुंदर स्त्री होती. पण तिच्या सौंदर्यावर एक भयंकर छाया पडली होती. ऐन मध्यान्हकाळीं तुडुंब भरून वाहणाऱ्या नदीच्या वक्षःस्थलावर ज्याप्रमाणें अतिनिबिड मेघाची छाया पडावी, त्याप्रमाणें ती छाया होती. नदीच्या प्रवाहांत लाटांवर लाटा उसळत आहेत, तीरावरचे कुसुमित वृक्ष वायूच्या योगानें डुलत आहेत, फुलांच्या भारानें ते वांकले आहेत, तरुण स्त्रियांच्या ताडनानें जल आंदोलन पावत आहे, मध्यान्हाचा काळ; पण नदी कृष्ण छायेनें कालिमामय दिसत आहे, त्याचप्रमाणें या स्त्रीची स्थिति होती. तिच्या डोक्यावरचा केशभार पूर्वीच्या सारखाच सुंदर, तुळतुळीत, चंचल व दाट होता. पूर्वीच्या प्रमाणेंच तिच्या विस्तीर्ण व शांत ललाटभागावर चतुर चित्रकारानें भिवया रेखिल्या होत्या. पूर्वींप्रमाणेंच तिचे पाणीदार, काळेभोर, उज्ज्वल व विशाल नेत्र, कटाक्षमय किंवा लोलतायुक्त नसले, तरी नम्र होते. ओष्ठ तसेच रक्तवर्ण होते. हृदय तसेंच प्रत्येक श्वासाबरोबर भरून येत होतें. बाहु पूर्वीच्या सारखेच वनलतांनाहि दुष्प्राप्य अशा कोमलतेनें युक्त होते. पण आज तिच्या चर्येवर तें तेज नव्हतें, ती उज्वलता नव्हती, ती प्रखरता नव्हती, ती चंचलता नव्हती, ती रसिकता नव्हती, फार काय सांगावें, तें तारुण्यहि नव्हतें, असें दिसलें. केवळ सौंदर्य आणि माधुर्य होतें. धैर्य आणि गांभीर्य हे गुण नवीन आले होते. पूर्वी तिला पाहिलें म्हणजे असें वाटे, कीं, या मनुष्यलोकांत तिच्या सौंदर्याला तुलना नाहीं. आतां पाहिलें म्हणजे असें वाटतें, कीं ही देवलोकची कोणी शापग्रस्ता देवी आहे. तिच्या आजूबाजूंस दोन तीन मळकट रंगाच्या पोथ्या पडल्या होत्या. भिंतीला एक जपाची माळ टांगली होती, आणि भिंतीवर जगन्नाथ, बलराम व सुभद्रा यांचा एक चित्रपट होता. दुसरीकडे कालिया-दमन, नवनारीकुंजर, गोपींचें वस्त्रहरण, गोवर्धनधारण प्रभृति व्रजलीलेचीं रंगित चित्रें काढलेलीं होतीं. चित्रांच्या खालीं ‘ चित्र कीं विचित्र ’ असे शब्द लिहिले होते. गौरीच्या मागून भवानंदहि याच गृहांत हळूहळू आला.

भवानंदानें विचारलें, ‘कसें काय, कल्याणी बाई, प्रकृति ठीक आहे ना ?’

**कल्याणी**--आपण हे प्रश्न कशाला विचारतां ? माझ्या प्रकृतीशीं आपणाला काय करायचें आहे ? आणि मलाहि काय करायचें आहे ?

**भवानंद**—जो वृक्ष लावतो, तो त्याला रोज पाणी घालतोच. वृक्ष वाढलेला पाहण्यांतच त्याला सुख वाटतें. तुमच्या मृत देहांत मीं जीवनवृक्ष लाविला, तेव्हां तो वाढतो आहे कीं नाहीं, हें मीं विचारूं नये ?

**कल्याणी**:—विषवृक्षाला क्षय असतो काय ?

**भवानंद**--जीवन हें विष काय ?

**कल्याणी**--तसें नसतें, तर मीं अमृत ओतून टाकलें असतें काय ? त्याचा नाश व्हावा, अशीं मीं कां इच्छा केली असती ?

**भवानंद**—तें विचारण्याचें माझ्या मनांत फार दिवस होतेंच. पण विचारण्याचें धाडस मीं केलें नाहीं. तुमचें जीवन कोणीं विषमय केलें ?

कल्याणीनें शांत चित्तानें उत्तर दिलें. 'कोणी नाहीं. जीवनच मुळीं विषमय आहे. माझें, तुमचें, सर्वांचेंच जीवन विषमय आहे.'

**भवानंद**—कल्याणी ! खरोखरच माझें जीवन विषमय आहे. ज्या दिवशीं—तुमचा व्याकरणाचा अभ्यास संपला ?

**कल्याणी**—नाहीं.

**भवानंद**—कोश ?

**कल्याणी**—त्यांत माझें मन रमत नाहीं.

**भवानंद**—त्या वेळीं तर विद्यासंपादनाची प्रबळ इच्छा तुमच्या ठायीं दिसत होती ! आतां तिचा इतका वीट कां आला ?

**कल्याणी**—आपल्यासारखे पंडित जर महापापी दिसतात, तर मग विद्या न शिकणेंच बरें. प्रभु ! माझ्या पतीची कांहीं खबर आहे काय ?

**भवानंद**—पुनः पुनः तीच गोष्ट कशाला विचारतेस ? तुझ्या लेखीं तर तो मेल्यासारखाच आहे !

**कल्याणी**:—मी त्यांच्या लेखीं मृत आहें. ते माझ्या दृष्टीनें नाहींत.

**भवानंद**:—तो तुमच्या दृष्टीनें मृतवत् समजूनच तर तुम्हीं मरण पत्करलें होतें. मग पुनः पुनः तीच ती गोष्ट कशाला काढतां ?

**कल्याणी**:—मेल्यानें काय संबंध तुटतो ? ते कसे काय आहेत ?

**भवानंद**:—खुशाल आहेत.

**कल्याणी**:—कोठें ? पदचिन्ह गांवीं ?

**भवानंदः**—होय. तेथेंच.

**कल्याणीः**—काय करीत आहेत ?

**भवानंदः**—किल्ला बांधीत आहेत व हत्यारें तयार करीत आहेत. त्यांनीं तयार केलेलीं हत्यारें आज हजारों संतानांच्या हातीं आहेत. त्यांच्या कृपेनें तोफा, बंदुका, दारूगोळा वगैरे कशाचीहि आम्हांला वाण नाहीं. संतानांमध्यें तेच आज श्रेष्ठ आहेत. त्यांचे आमच्यावर मोठे उपकार आहेत. ते आज आमचा उजवा हात आहेत म्हणाना !

**कल्याणीः**—मीं प्राणत्याग केला नसता, तर येवढें झालें असतें का ? ज्याच्या छातीला चिखलानें भरलेली घागर बांधलेली आहे, तो या भवसमुद्रांतून कसा पार होणार ? ज्याच्या पायांत लोखंडाची बेडी अडकविलेली आहे, तो कसा धांवणार ? संन्यासी महाराज, तुम्ही हें तुच्छ गृहस्थजीवन कसें काय राखिलें आहे ?

**भवानंदः**—अहो ! स्त्री ही सहधर्मिणी आहे–धर्मकार्यांत सहाय देणारी आहे.

**कल्याणीः**—क्षुद्र धर्मांत तुम्ही म्हणतां तसें आहे खरें. पण मोठमोठ्या धर्मांत ती कांट्यासारखीच आहे. मीं विषरूपी कंटकानें तिकडचा अधर्म कंटक काढून टाकला. छेः ! दुराचारी, पामर ब्रह्मचाऱ्या ! माझे प्राण तूं कां वांचविलेस ?

**भवानंदः**—बरें तर. मीं जें दिलें तें नको असलें, तर तें माझेंच आहे. कल्याणी ! मीं जे प्राण तुला दिले, ते माझे मला परत देतां येतील काय ?

**कल्याणीः**—माझी मुलगी सुकुमारी कशी काय आहे, याची खबर तुम्हांस आहे काय ?

**भवानंदः**—बऱ्याच दिवसांत कांहीं खबर नाहीं. पुष्कळ दिवस झाले जीवानंद तिकडे गेले नाहींत.

**कल्याणीः**—तिची खबर मला आणून देतां येणार नाहीं काय ? पतीनें तर मला सोडलें; पण मी वांचलयें आहें. तेव्हां कन्येचा त्याग मीं कसा करावा ? सुकुमारी मला पुनः भेटली, तर आयुष्यांत कांहीं सुख लागण्याचा संभव आहे. पण माझ्यासाठीं आपण येवढी तसदी घ्याल काय ?

**भवानंद**—घेईन. कल्याणी ! तुझी कन्या तुला परत आणून देईन. पण मग ?

**कल्याणी**:—ठाकुर ! मग काय ?

**भवानंद**:—पति ?

**कल्याणी**:—त्यांनीं तर जाणूनबुजून मला सोडलेंच आहे.

**भवानंद**:—जर त्याचें व्रत संपलें असलें तर ?

**कल्याणी**:—तर मग मी त्यांचीच आहें. मी जीवंत आहें, हें त्यांना ठाऊक आहे काय ?

**भवानंद**:—नाहीं.

**कल्याणी**:—आपली व त्यांची कधीं गांठ पडली नव्हती ?

**भवानंद**:—पडली होती.

**कल्याणी**—माझ्याविषयीं तिकडून कधीं विचारपूस करण्यांत आली नव्हती ?

**भवानंद**:—नाहीं. जी स्त्री मेली, तिच्याशीं पतीचा संबंध काय राहिला ?

**कल्याणी**:—हें काय आपण म्हणतां ?

**भवानंद**:—तुझा आतां पुनर्जन्म झाला आहे. आतां तुला माझ्याशीं विवाह करतां येईल.

**कल्याणी**:—माझी मुलगी आणून द्या.

**भवानंद**:—देईन, पण माझ्याशीं विवाह करशील ना ?

**कल्याणी**:—तुमच्याशीं ?

**भवानंद**:—होय. विवाह करशील ना ?

**कल्याणी**:—तुमच्याशीं ?

**भवानंद**:—जर झाला तर—

**कल्याणी**:—मग संतान धर्म कसा कोठें राहील ?

**भवानंद**:—अथांग पाण्यांत.

**कल्याणी**:—आणि हें महाव्रत ?

**भवानंद**:—तेंहि अथांग पाण्यांत.

**कल्याणी**:—कशासाठीं तुम्ही हें सगळें अथांग पाण्यांत बुडविणार ?

**भवानंद**:—तुझ्यासाठीं ! हें पहा, मनुष्य असो, ऋषि असो, सिद्ध असो, कीं देव असो. मन कोणाच्याहि स्वाधीन राहणारें नाहीं. संतानधर्म माझा प्राण आहे; पण आज मी प्रथम सांगतों कीं, तूं मला प्राणाहून प्रिय आहेस. ज्या दिवशीं मीं तुला जीवदान दिलें, त्या दिवसांपासून मी तुझ्या चरणांचा दास बनलों आहें. या जगांत अशी लावण्याची खाण कोणी आहे, हें मला ठाऊक

नव्हतें. अशी रूपवती स्त्री माझ्या दृष्टीस पडणार आहे, हें मला अगोदर कळतें, तर हा संतानधर्म मीं कधींच स्वीकारला नसता. आग लागो त्या धर्माला ! धर्म जळून खाक झाला. हा प्राण मात्र राहिला आहे. हा प्राण देखील आज चार वर्षें आंतल्याआंत जळतो आहे. आतां त्याच्यानें राहावत नाहीं. कल्याणी ! दाह होतो आहे ग ! ज्वाला पेटली आहे; पण जळण्याला आतां इंधनच उरलें नाहीं. प्राण जात आहेत. चार वर्षें ही आग कशी तरी सहन केली. आतां ती सहन करवत नाहीं. तूं माझी होशील ना ?

**कल्याणी**:—तुमच्याच तोंडून मीं ऐकिलें कीं, संतानधर्मात असा एक मुख्य नियम आहे कीं, इंद्रियें परवश झालीं, तर त्याबद्दलचें प्रायाश्चित्त मृत्यु हें आहे. ही गोष्ट खरी ना ?

**भवानंद**:—होय, खरी आहे.

**कल्याणी**:—तर मग तुम्हांला प्रायश्चित्त म्हणजे मृत्यूच !

**भवानंद**—होय. मृत्यु हेंच एक प्रायश्चित्त आहे.

**कल्याणी**—मीं तुमची मनकामना पूर्ण केली, तर तुम्ही मरायला सिद्ध व्हाल ?

**भवानंद**—होय, खात्रीनें होईन.

**कल्याणी**—आणि न केली तर ?

**भवानंद**—तरी मृत्यु हें प्रायश्चित्त आहेच. कारण, माझें मन इंद्रियाधीन झालें आहे.

**कल्याणी**—मी तुमची मनकामना पूर्ण करणार नाहीं. तुम्ही केव्हां मराल ? बोला.

**भवानंद**—येत्या युद्धांत.

**कल्याणी**:—तर मग तुम्ही निरोप घ्या. माझ्या मुलीला तेवढी इकडे पाठवाल काय ?

भवानंद डोळ्यांत अश्रु आणून म्हणाला, 'देईन; पण मी मेल्यावर माझी आठवण तरी पुनः ठेवाल काय ?' कल्याणी म्हणाली, 'ठेवीन. व्रतभ्रष्ट व अधर्मी म्हणून ठेवीन.'

भवानंदानें निरोप घेतला. कल्याणी पोथी वाचावयाला बसली.

---

## प्रकरण पांचवें.

भवानंद विचार करीत करीत मठाकडे गेला. जातां जातां रात्र झाली. तो एकटा चालला होता. त्यानें एकठ्यानेंच रानांत प्रवेश केला; पण पाहतो तों एक मनुष्य त्याच्या पुढें पुढें चालला होता. भवानंदानें त्याला विचारलें, 'कोण तुम्ही ?' त्यानें प्रश्नावरून ओळखलें आणि म्हटलें, 'मी एक वाटसरू आहें.'

**भवा०**—'वन्दे'

**मनुष्य**—'मातरम्.'

**भवा०**—मी भवानंद.

**मनुष्य**—मी धीरानंद.

**भवा०**—धीरानंद ! कोणीकडे गेलां होतां ?

**धीरा०**—आपल्याच शोधासाठीं.

**भवा०**—कां बरें ?

**धीरा०**—कांहीं सांगायचें होतें.

**भवा०**—तें काय ?

**धीरा०**—कोणीं नसेल अशा ठिकाणीं सांगण्यासारखें तें आहे.

**भवा०**—येथेंच सांगाना ? येथें कोणी नाहीं.

**धीरा०**—आपण नगराला गेलां होतां काय ?

**भवा०**—होय.

**धीरा०**—गौरीदेवीच्या घरीं ?

**भवा०**—तुम्ही पण नगरालाच गेलां होतां ?

**धीरा०**—तेथें एक अतिशय सुंदरी स्त्री राहते ना ?

भवानंदाला आश्चर्य वाटलें, थोडें भयहि वाटलें. तो म्हणाला, 'मग त्याचें काय ?'

**धीरा०**—आपण तिची भेट घेतली ?

**भवा०**—बरें मग ?

**धीरा०**—तिच्यावर आपण अतिशय अनुरक्त झालां होतां ?

**भवा०**—( किंचित् विचार करून )-धीरानंद ! पण येवढा शोध कशासाठीं ? पहा धीरानंद ! तुम्ही म्हणतां तें सगळें खरें आहे. तुमच्यावांचून आणखी कोणाला ही गोष्ट कळली आहे कीं काय ?

**धीरा०**—नाहीं.

**भवा०**—तर मग तुम्हांस मारून टाकल्यानेंच मी या कलंकांतून मुक्त होईन.

**धीरा०**—तसें तर खरेंच.

**भवा०**—या तर. आपण या निर्जनस्थानीं दोघे युद्ध करूं. एक तर तुम्हांला मारल्यानें मी निष्कंटक होईन, किंवा दुसरें तुम्हीं मला मारल्यानें माझी आग शमेल. तुमच्याजवळ हत्यार आहे ?

**धीरा०**—आहे. रिकाम्या हातानें तुमच्याशीं अशी गोष्ट कोण बोलूं शकेल ? तुमच्या मनांत युद्धच करणें असेल, तर अवश्य करा. संतानासंतानांत विरोध निषिद्ध आहे; पण आत्मरक्षणासाठीं केल्यास तो निषिद्ध नाहीं. तथापि जें सांगण्यासाठीं मी तुम्हांस शोधीत होतों, तें सगळें ऐकून न घेतां युद्ध करणें चांगलें होणार नाहीं.

**भवा०**—मग कोणती हरकत आहे ? सांगा.

भवानंदानें म्यानांतून तरवार उपसून धीरानंदाच्या खांद्यावर ठेविली.

**धीरा०**—मी हेंच सांगणार होतों कीं तुम्ही कल्याणीशीं विवाह करा.

**भवा०**—कल्याणी ? तीसुद्धां तुम्हांला ठाऊक आहे काय ?

**धीरा०**—विवाह कां करीत नाहीं ?

**भवा०**—पण तिचा पति जिवंत आहे ना ?

**धीरा०**—वैष्णवांत अशीं लग्नें होतात.

**भवा०**—तीं नेडा ( मुंडित ) बैराग्यांत होतात. संतानांत नाहींत. संतानांना विवाहच सांगितलेला नाहीं.

**धीरा०**—संतान धर्म काय टाकून देतां येण्यासारखा आहे ! तुमचे काय प्राण चालले आहेत ? छिः छिः ! माझ्या खांद्यांतून पहा रक्त वाहत आहे. ( खरोखरीच या वेळीं धीरानंदाच्या खांद्यांतून रक्त वाहत होतें. )

**भवा०**—तुम्ही कोणत्या हेतूनें मला ही अधर्माची सल्ला देत आहां ? त्यांत तुम्हांला कांहीं तरी स्वार्थ साधावयाचा असला पाहिजे.

**धीरा०**—त्याच्यासंबंधानेंहि मला कांहीं बोलायचें आहे, येवढी तरवार खांद्यावर टेंकूं नका म्हणजे सांगतों. या संतानधर्माच्या पायीं माझीं तर बुवा हाडें खिळखिळीं झालीं आहेत. मी या धर्माचा त्याग करून स्त्रीपुत्रांचें मुख केव्हां पाहीन आणि आनंदानें कालक्रमणा केव्हां करीन, असें मला झालें आहे. मी हा संतानधर्म सोडणार आहें. पण घरीं जाऊन काय स्वस्थ बसतां येणार आहे ?

मी राजद्रोही म्हणून मला सर्वजण ओळखतात. घरीं आलों हें कळतांच अधिकारी येऊन माझें डोकें कापून नेतील, अगर संतानच मीं विश्वासघात केला म्हणून मला मारून टाकून चालते होतील. याचसाठीं तुम्हांलाहि आपल्या मार्गानें मी नेऊं पहात आहें.

**भवा०**—तें कसें ?

**धीरा०**—त्यांतली खरी गोष्ट अशी आहे कीं, हे संतानलोक तुमच्या आज्ञेंत आहेत. सत्यानंद या वेळीं येथें नाहींत. तुम्ही अशा वेळीं हें सैन्य नेऊन युद्ध केलें तर तुम्हांस जय मिळेल ही माझी पक्की खात्री आहे. जय मिळवून तुम्ही स्वतः-चेंच राज्य कां स्थापीत नाहीं ? सैन्य तुमच्या हुकुमांत आहे. तुम्हीं राजे व्हा. कल्याणी तुमची राणी होईल. मी तुमचा एक सेवक होऊन स्त्रीपुत्रांचें मुखावलोकन करून आनंदांत दिवस काढीन, आणि तुम्हांला आशिर्वाद देत राहीन. या संतानधर्माला द्या एकदाची अगाध जलांत समाधी !

भवानंदानें धीरानंदाच्या खांद्यावरून आपली तरवार हळूहळू खालीं नेली. तो म्हणाला, ‘ धीरानंद ! युद्ध करा. मी तुमचा वध करीन. मी विषयाधीन होईन; पण दगलबाजी करणार नाहीं. तुम्हीं मला विश्वासघात करण्याची मसलत दिली आहे, आणि स्वतःहि दगलबाज झालां आहां. तुम्हांला मारल्यानें मला ब्रह्महत्त्येचें पातक लागावयाचें नाहीं. तुम्हांला आतां मी मारणार.’

भवानंदाचें बोलणें संपतें न संपतें तोंच धीरानंद पळून गेला. भवानंदानें त्याचा पाठलाग केला नाहीं. थोडा वेळपर्यंत भवानंदाचें मन दुसरीकडेच गुंतलें होतें. जेव्हां तें ठिकाणावर आलें; तेव्हां तो पाहूं लागला; पण धीरानंद त्याला दिसला नाहीं.

---

## प्रकरण सहावें.

मठांत गेल्यावर भवानंद एका घोर अरण्यांत शिरला. त्या अरण्यांत एके जागीं एका जुनाट वाड्याचा कांहीं मोडकातोडका भाग अवशेष राहिला होता. याच्या विटांच्या राशीवर वेलीं झुडपें वगैरे दाट उगवलीं होतीं. त्या ठिकाणीं असंख्य सर्पांची वस्ती होती. त्या मोडक्या इमारतीचा एक लहानसा भाग मात्र शाबूत आणि साफसूफ ठेवलेला होता. भवानंद त्या जागीं जाऊन बसला, आणि मनांत विचार करूं लागला.

रात्रीं भयंकर काळोख पडला होता. तशांत तें अरण्य अतिशय विस्तृत, अगदीं निर्जन व अतिशय निबिड होतें. वृक्षलतांचीं दुर्भेद्य जाळीं माजलेलीं होतीं. वन्य पशूंनाहि त्यामुळें जाण्यायेण्यास मोठी पंचाईत पडे. जिकडेतिकडे सामसूम. अंधेर म्हणतो मी ! दुरून वाघाच्या आरोळ्या किंवा इतर जंगली पशूंच्या क्षुधा, भीति किंवा हालचाली यांचे भीषण शब्द होत होते. क्वचित् एखाद्या मोठ्या पक्ष्याचें पंख फडफडविणें, किंवा एखादा पक्षी दुसऱ्याला मारीत असतां दोघांच्या तोंडून निघणाऱ्या कर्कश आरोळ्या, अथवा एक जंगली पशु दुसऱ्याच्या मागें लागला असतां त्याच्या त्वरेच्या गतीनें होणारा शब्द ऐकूं येत होता. अशा त्या निर्जन आणि अंधकारमय प्रदेशांत भवानंद एकटा बसला होता. त्याच्या दृष्टीनें जणूं काय पृथ्वी नव्हतीच ! अथवा असलीच तर अगदीं मूळच्या स्थितींत होती ! अशा वेळीं भवानंद कपाळावर हात देऊन विचार करीत होता. त्याच्या हृदयाचें स्पंदन बंद होतें, श्वास बंद होता, भीतीचा लेश नव्हता, अति गाढ विचारांत तो निमग्न होता. तो मनांत म्हणत होता, ' जें व्हावयाचें असेल तें चुकावयाचें नाहीं. भागीरथीच्या प्रवाहाच्या लाटांच्या जवळ गेलेल्या एखाद्या क्षुद्र हत्तीप्रमाणें मी इंद्रियांच्या जोरदार प्रवाहाबरोबर वाहत गेलों, येवढीच दुःखाची गोष्ट आहे. या देहाचा नाश एका क्षणांत होऊं शकतो. देहाचा नाश म्हणजेच इंद्रियांचा नाश. अशा इंद्रियांच्या अधीन मी झालों आं ? आतां मीं मरावें हेंच श्रेयस्कर आहे. मी धर्मभ्रष्ट ! छिः ! मरावेंच ! ' इतक्यांत त्याच्या डोक्यावर एका घुबडानें शब्द केला. तेव्हां भवानंद उच्च स्वरानें म्हणाला, " कसला हा शब्द माझ्या कानीं आला ? यम का मला बोलावीत आहे ? कोणीं मला ही आज्ञा केली ? कोणीं मला 'मर' म्हणून सांगितलें ? हे पुण्यमयी अनंत शक्ति ! तूं शब्दमय आहेस; पण तुझ्या शब्दांचें मर्म जाणण्यास मी असमर्थ आहें. धर्माचे ठायीं माझी मति राहूं दे. पापापासून मला निवृत्त कर. धर्माच्या ठायीं—अहो, गुरु महाराज !—धर्माच्या ठायीं माझी मति राहील असें करा. "

त्यावेळीं त्या भयंकर अरण्यांतून अतिशय मधुर पण गंभीर मर्मभेदी असा एक मनुष्याचा शब्द ऐकूं आला. कोणी तरी म्हटलें कीं, 'धर्माच्या ठायीं तुझी बुद्धि राहील, हा तुला आशिर्वाद देतों'

तो शब्द ऐकून भवानंदाचें शरीर रोमांचित झालें. 'अरे ! हें काय ? हा तर गुरुमहाराजांचा शब्द ! महाराज ! आपण कोठें आहां ? या वेळीं या दासाला दर्शन द्यावें.' असें भवानंदानें म्हटलें.

पण कोणीं दिसेना. कोणीं उत्तरहि देईना. भवानंदानें पुनः पुनः काकुळतीनें ाका मारल्या; तरी उत्तर मिळालें नाहीं. इकडे पाहिलें, तिकडे शोधलें, पण ोठें कोणीं दिसलें नाहीं.

जेव्हां रात्र संपून प्रभात झाली, सूर्य उगवला, आणि त्यानें आपल्या किर- ांनीं त्या अरण्यांतल्या वृक्षाच्या शिखरावरच्या श्यामल पत्रराशीला प्रकाशमान ेलें, तेव्हां भवानंद मठांत गेला. तेव्हां 'हरे मुरारे ! हरे मुरारे !' हे शब्द याच्या कर्णात प्रविष्ट झाले. हा सत्यानंदाचा शब्द असें त्यानें ओळखलें, आणि ुरु महाराज परत आले असें तो समजला.

---

## प्रकरण सातवें.

जीवानंद पर्णकुटींतून बाहेर गेल्यावर शांति देवी पुनः सारंगी हातांत घेऊन मृदु मृदु स्वरानें पुढील पद गाऊं लागली.--

**'प्रलयपयाधिजले धृतवानसि वेदम्**
**'विहित-बहित्र-चरित्रमखेदम्,**
**केशव धृतमीनशरीर**
**जय जगदीशहरे !'**

तेव्हां गोस्वामिविरचित हें मधुर स्तोत्र शांति देवीच्या मधुर कंठांतून निघून, राग-तालांनीं संपूर्ण होऊन, त्या अफाट अरण्यांतली अनंत स्तब्धता विदीर्ण करून, भरतीच्या वेळीं वसंतवायूनें ताडित झालेल्या तरंगभंगाप्रमाणें मधुर स्वरानें म्हटलेलें ऐकूं येऊं लागलें.

**'निंदसि यज्ञविधेरहह श्रुतिजातम्**
**सदय-हृदय-पशुघातम्.**
**केशव धृतबुद्धशरीर**
**जय जगदीश हरे !'**

तेव्हां बाहेरून कोणीं गंभीररवानें गाऊं लागला. मेघगर्जनेप्रमाणें त्या गाण्याची गंभीर तान होती. तें पद असें--

**'म्लेच्छनिवहनिधने कलयसि करवालम्;**
**धूमकेतुमिव किमपि करालम्ः**

**केशव धृतकल्किशरीर**
**जय जगदीश हरे ! '**

शांतीनें भक्तिभावानें नम्रतापूर्वक सत्यानंदाला वंदन केलें आणि म्हटलें, 'प्रभो ! माझें भाग्य म्हणावयाचें कीं आज आपल्या चरणांचें दर्शन मला घडलें. मीं काय करावें त्याविषयीं आज्ञा व्हावी. ' इतकें म्हणून सारंगीच्या सुरांत सुर मिळवून ती पुनः गाऊं लागली.

**'तव चरणप्रणता वयमिति भावय**
**कुरु कुशलं प्रणतेषु ।'**

सत्यानंद म्हणाला, 'तुझें कल्याण असो.'

**शांति**—तें कसें महाराज ? आपली तर आज्ञा आहे–मला वैधव्य–'

**सत्यानंद**—तुझी माझी ओळख नव्हती. दोरीची बळकटी किती आहे, तें न जाणतां मी जास्त जोरानें ताणलें. तूं माझ्यापेक्षां अधिक ज्ञानी आहेस. आतां याला इलाज तूंच कर. मला सगळें कळलें आहे, हें जीवानंदाला सांगूं नकोस. तुझ्या लोभानें तो जीवाचें रक्षण करूं शकेल. इतके दिवस त्याच लोभानें तो जगला आहे, तसें झालें म्हणजे आमचा कार्यभाग होऊं शकेल. '

हें ऐकून त्या विशाल, नीलवर्ण, उत्फुल्ल नेत्रांत, उष्णकाळच्या मेघमालेंत विद्युत् चमकावी त्याप्रमाणें, घोर रोषकटाक्ष दिसूं लागले. शांति म्हणाली, ' महाराज ! मी व माझे यजमान या दोघांचा आत्मा एक आहे. तेव्हां माझें व आपलें जें जें संभाषण झालें, तें मी सगळें तिकडे सांगेन. तिकडे प्राणत्याग करायचा असला तर करतील. मला त्याचें काय होय ? आम्ही तर बरोबरच मरणार. तिकडे स्वर्गप्राप्ति झाली, तर मला नाहीं का होणार तिकडच्या बरोबर ?'

ब्रह्मचारी म्हणाला, ' मला आतांपर्यंत कोठेंहि हार जावें लागलें नव्हतें. पण आज तुझ्यापुढें हार खावी लागली आहे. मातुश्री ! मी तुझें लेंकरूं आहें. संतानांवर प्रेम कर. जीवानंदाच्या प्राणांचें रक्षण कर. आणि स्वतःच्याहि प्राणांचें रक्षण कर. माझें कार्य सिद्धीला जाऊं दे.'

बिजली-शांति-हसली. ती म्हणाली, 'माझ्या पतीचा धर्म त्यांच्या हातांत आहे. मी त्यांना धर्मापासून परावृत्त करणारी कोण ? इहलोकीं पति हेंच स्त्रीचें दैवत आहे; पण परलोकीं धर्म हें सर्वांचेंच दैवत आहे. माझ्या दृष्टीनें माझे पति मोठे, त्यापेक्षांहि माझा धर्म मोठा आणि त्यापेक्षांहि माझ्या पतीचा धर्म मोठा

आहे. माझ्या स्वतःच्या धर्मावर मला वाटेल तेव्हां पाणी सोडतां येईल; पण पतीच्या धर्मावर मी पाणी कशी सोडूं? महाराज! तुमच्या सांगण्यावरून माझे पति प्राणत्याग करतील तर करोत, मी त्यांच्या आड जाणार नाहीं.'

यावर ब्रह्मचारी लांब उसासा टाकून म्हणाला,'बाई! या घोर व्रतांत बलिदान करावें लागतें. आम्हां सर्वांनाच यांत बळी पडावें लागेल. मी मरेन, जीवानंद, भवानंद, सगळेच मरतील! मला वाटतें तूंहि मरशील. पण हें पहा, कार्य केल्यावर मग मरावें लागणार आहे; काम केल्यावांचून मरण्यांत काय हंशील आहे? मी याच भूमीला माता म्हणतों. तिच्याशिवाय अन्य कोणाला माता म्हणत नाहीं. कारण, अशा सुजला, सुफला भूमीवांचून आम्हांला दुसरी माता ठाऊक नाहीं. हें एक झालें आणि दुसरें–तुला मातुश्री म्हटलें. तूं माता होऊन संतानाचें कार्य कर. ज्याच्या योगानें आमचें कार्य सिद्धीला जाईल, तेंच कर. जीवानंदाच्या प्राणांचें व तुझ्याहि प्राणांचें रक्षण कर.'

इतकें बोलून सत्यानंद ' हरे मुरारे ! मधुकैठभारे ! ' हें गाणें म्हणत निघून गेला.

---

## प्रकरण आठवें.

हळूहळू संतानांमध्यें अशी बातमी पसरली कीं, सत्यानंद आले आहेत आणि संतानांना कांहीं गोष्ट सांगण्यासाठीं त्यांनीं आपल्या सगळ्या शिष्यांना पाचारण केलें आहे. तेव्हां संतानांच्या टोळ्या तेथें गोळा होऊं लागल्या. चांदण्या रात्रीं नदीच्या वाळवंटाच्या बाजूस आंबे, फणस, ताड, चिंच, पिंपळ, बेल, वड, इत्यादि वृक्षांनीं शोभित अशा गहन वनांत दहा हजार संतान गोळा झाले. सर्वच परस्परांच्या तोंडून सत्यानंदाच्या आगमनाची वार्ता ऐकून मोठी गडबड करूं लागले. सत्यानंद कशासाठीं व कोठें गेले होते, तें सामान्य लोकांना ठाऊक नव्हतें. लोकप्रवाद असा होता कीं, ते संतानांच्या मंगलकामनेसाठीं तपश्चर्येकरितां हिमालयांत गेले होते. आज सगळे परस्परांच्या कानांत कुजबुजत होते कीं महाराजांची तपश्चर्या सिद्धीस गेली आणि आतां आपलें राज्य होणार. तेव्हां आनंदाचा मोठा कोलाहल होऊं लागला. कोणी ओरडून म्हणूं लागले. ' मारा, ठोका. ' कोणी ' जय जय ! महाराजकी जय.' असा जयघोष करीत होते. कोणी ' हरे ! मुरारे ! मधुकैठभारे ! ' हें पद गात होते. कोणी म्हणत

होते कीं ' भाई ! तुच्छ समजले गेलेल्या बंगाली लोकांनीं रणक्षेत्रावर आपले देह ठेविले असें म्हणण्याचा सुदिन कधीं येईल काय ? ' कोणी म्हणत कीं 'मशिदींचा नाश करून त्यांच्या जागीं राधाकृष्णाचीं मंदिरें उभारलीं जातील असा दिवस उजाडेल काय ?' कोणी म्हणत, 'असा दिवस परमेश्वर दाखवील काय कीं त्या दिवशीं आपले धनाचा उपभोग आपण घेऊं ?' दहा हजार माणसांच्या स्वरांचा कलकलाट, मंद वायूनें ताडित वृक्षपर्णांचा मर्मर ध्वनि, वाळवंटांतून वाहणाऱ्या नदीप्रवाहाचा मृदु तरतर असा नाद, वर आकाशांत चंद्र, तारा, श्वेतवर्ण मेघसमुदाय; श्यामलवर्ण भूमीच्या पृष्ठभागावरचें हिरवें चार अरण्य, श्वेतवर्ण वालुकाप्रदेश, प्रफुल्लित कुसुमांचे समुदाय, आणि मधून मधून 'वंदे मातरम्' या पदाचा घोष, या सर्वांची शोभा कांहीं अवर्णनीय होती ! सत्यानंद येऊन त्या गोळा झालेल्या संतान मंडळींत उभा राहिला; तेव्हां त्या दहा हजार संतानांचीं मस्तकें —वृक्षांच्या फटींतून येणाऱ्या चंद्र किरणांनीं उज्वल दिसणारीं तीं मस्तकें—श्यामल तृण उगवलेल्या भूमीवर नम्र झालीं. अति उच्च स्वरानें, डोळयांत अश्रु आणून, आणि दोन्ही हात वर करून सत्यानंद म्हणाला, 'शंखचक्रगदापद्मधारी वनमाली वैकुंठनाथ, ज्यानें केशि दैत्याचा नाश केला; मधु, मुर, नरकादिक दैत्यांचें मर्दन केलें; व जो लोकांचा पालनकर्ता, तो तुमचें मंगल करो ! तुमच्या बाहूंना बळ देवो, तुमच्या मनांत भक्तीचा उदय करून धर्माच्या ठायीं तुमची श्रद्धा दृढ करो; तुम्ही एकदां त्याचा महिमा गा.' असें म्हणतांच दहा हजार कंठांतून उच्च स्वरानें पुढील गीत निघालें—

'जय जगदीश हरे !
प्रलय-पयोधिजले धृतवानसि वेदम्
विहितबहित्रचरित्रमखेदम्
केशव धृतमीनशरीर
जय जगदीश हरे !

सत्यानंद त्यांना पुनः आशीर्वाद देऊन म्हणाला, 'अहो संतानांनो ! तुम्हांला मला आज कांहीं विशेष गोष्ट सांगावयाची आहे. तामस नांवाच्या एका विधर्मी दुरात्म्यानें पुष्कळशा संतानांचा नाश केला आहे. आज रात्रीं आपण सैन्यासह जाऊन त्याचा वध करावा, अशी जगदीशाची आज्ञा आहे. यावर तुमचें काय म्हणणें आहे ?'

यावर हरिनामाचा भयंकर जयध्वनि होऊन त्यानें अरण्य गर्जून गेलें. 'आत्तां मारूं. कोठें आहे ? दाखवा.' 'मारा ! मारा ! शत्रूला धरून ठोका !' इत्यादि शब्दांचा प्रतिध्वनि दूरच्या डोंगरावरून आला. तेव्हां सत्यानंद म्हणाला, 'त्यासाठीं आपण धैर्य धरलें पाहिजे. शत्रूपाशीं तोफा आहेत. तोफांवांचून त्यांच्याशीं युद्ध करण्यांत अर्थ नाहीं. विशेष गोष्ट ही कीं, शत्रु असे तसे नाहींत, चांगले लढवय्ये आहेत. पदचिन्हाच्या किल्ल्याहून १७ तोफा येत आहेत. त्या येऊन पोंचल्या म्हणजे आपणाला लढाईला निघायला पाहिजे. ही पहा पहाट झाली. चार प्रहर होतांच—अरे ! पण हें काय ?'

'गुड्डम्–गुड्डम्–गुम् !' असे अकस्मात् चोहींकडून त्या अफाट अरण्यांत तोफेचे आवाज होऊं लागले. तोफा इंग्रजांच्या होत्या. जसा जाळ्यांत माशांचा थवाच्या थवा धरावा, तसा टॉमस साहेबानें संतानसंप्रदायाला या अंबराईला वेढा घालून मारण्याचा उद्योग चालविला होता.

---

## प्रकरण नववें.

'गुड्डम्–गुड्डम्–गुम्' असा इंग्रजांच्या तोफांचा आवाज झाला. त्या आवाजानें तें अफाट अरण्य कंपित करून सोडलें. 'गुड्डम्-गुड्डम्-गुम्' असा त्याचा प्रतिध्वनि होऊं लागला. नदीच्या प्रत्येक बांधावर तो ध्वनि आपटून दूर आकाशप्रांतांत प्रतिध्वनीच्या रूपानें पसरूं लागला. नदीच्या पार दूरच्या अरण्याच्या अंतर्भागींहि त्यानें प्रवेश केला होता. ही कोणाची तोफ चालली आहे; तें पाहून येण्यास सत्यानंदानें आपल्या लोकांस सांगितलें. तत्क्षणीं कांहीं संतान घोड्यावर बसून बातमी आणण्यास निघाले. पण अरण्याच्या बाहेर ते पडतात न पडतात तोंच श्रावणांतल्या पर्जन्य धारांप्रमाणें गोळ्यांची त्यांच्यावर वृष्टि होऊन ते मारले गेले. सत्यानंदानें हें दुरून पाहिलें आणि म्हटलें, "उंच झाडावर चढून काय प्रकार आहे तो पहा." त्यांनीं हें सांगण्याच्या अगोदरच जीवानंद झाडावर चढून प्रातःकालच्या प्रकाशांत तो प्रकार पाहत होता. झाडाच्या शेंड्यावरून तो ओरडून म्हणाला, 'इंग्रजांच्या तोफा आहेत.' सत्यानंदानें विचारलें. 'बरोबर घोडेस्वारांची पलटण आहे कीं, पायदळाची आहे ?'

**जीवानंदः**—दोन्ही आहेत.

**सत्यानंदः**—कितीसे लोक आहेत ?

**जीवानंदः**—अंदाज करतां येत नाहीं. आतांच ते रानांतून बाहेर पडूं लागले आहेत.

**सत्यानंदः**—गोरे का काळे शिपाई ?

**जीवानंदः**—गोरे.

**सत्यानंदः**—जीवानंद ! तुम्ही झाडावरून खालीं उतरा.

जीवानंद उतरला. सत्यानंद म्हणाला, 'दहा हजार संतान हजर आहेत. काय करतां येईल. तें पहा तुम्हीच आज सेनापति.

जीवानंद हत्यारबंद होऊन उडी मारून घोड्यावर चढला. त्यानें एकदां नवीनानंदाकडे पाहिलें. डोळ्याचा संकेत करून त्यानें काय सांगितलें, तें सांगतां येत नाहीं. नवीनानंदानेंहि नेत्रसंकेतानें काय उत्तर दिलें, तेंहि कोणाला कळलें नाहीं. केवळ त्या दोघांनींच मनांत ताडलें कीं, हा आतां शेवटाचाच निरोप आपण घेत आहों. मग नवीनानंद, उजवा हात वर करून सर्वांना म्हणाला, "भाई हो ! जय जगदीश हरे असा घोष करा." त्याबरोबर दहा हजार संतानांच्या कंठांतून निघालेल्या हरिनामाच्या घोषानें नदी, अरण्य आणि आकाश हीं सर्व व्यापून त्यांत तोफेचे आवाजहि लोपून टाकले. हजारों बाहू वर झाले, आणि संतान,

**'जय जगदीश हरे !'**

**म्लेंच्छ निवहनिधने कलयसि करवालम् ।"**

असें गाऊं लागले.

इतक्यांत, त्या इंग्रजांच्या गोळ्यांची वृष्टि अरण्यांतल्या संतानलोकांवर होऊं लागली. गातांगातांच कोणाचीं शिरें उडालीं, कोणाचे हात तुटले, कोणाची छाति फुटून ते जमिनीवर पडले, तरी अजून कोणी कोणी गीत गातच होते ! तें संपतांच एकदम सगळा शुकशुकाट झाला. त्या निबिड अरण्यांत नदीच्या वाळवंटांत, त्या अमर्याद निर्जन स्थानीं, एकदम सर्वत्र गंभीर स्तब्धता पसरली. फक्त तोफांचा अतिभयंकर ध्वनि, इंग्रज फौजेच्या शस्त्रांचा खणखणाट व पायांचा पिट्पिट् आवाज ऐकूं येत होता.

सत्यानंद अशा गंभीर निःस्तब्धतेंत अत्युच्च स्वरानें म्हणाला, 'जगदीशानें तुमच्यावर कृपा केली आहे. तोफ किती दूर आहे ?'

वरून एकजण म्हणाला, 'या रानाच्या बाहेर अगदीं जवळ एका लहानशा मैदानाच्या पलिकडे.'

सत्यानंदानें विचारलें, 'तुम्ही कोण ?'

वरून उत्तर आलें, 'मी नवीनानंद.'

**सत्यानंदः**—तुम्ही दहा हजार संतान आहां. तुमचा जय होईल. तोफ बाहेर काढा.

तेव्हां सर्वांच्या पुढें घोड्यावर बसून चाललेला जीवानंद म्हणाला, 'या !'

ते दहा हजार संतान—घोडेस्वार व पायदळ मिळून—जीवानंदाच्या मागून अतिशय वेगानें चालले. पायदळांतल्या शिपायांच्या खांद्यावर बंदुक, कंबरेला तलवार आणि हातांत भाला, अशीं हत्यारें होतीं. ही फौज रानांतून बाहेर पडण्याचाच काय तो अवकाश होता. लागलीच गोळ्यांची तिच्यावर वृष्टि होऊन फौजेंतले लोक छिन्नभिन्न होऊं लागले. पुष्कळसे संतान तर युद्धाला सुरुवात करण्यापूर्वीच मरून पडले. तेव्हां एकजण जीवानंदाला म्हणाला, 'जीवानंद ! निरर्थक प्राणहत्या कां करतां '

जीवानंदानें पाहिलें तों—भवानंद !

जीवानंदानें उत्तर केलें, 'मग करावयाचें काय ? बोला.'

**भवानंदः**—रानांतच वृक्षांच्या आश्रयानें राहून जीवांचें रक्षण करा. उघड्या मैदानांत येवढें सैन्य घेऊन तोफेच्या तोंडासमोर उभे राहिल्यानें घटकाभर तरी टिकाव लागेल काय ? पण झाडीच्या आडून लढाई कराल तर कांहीं वेळ तरी लढतां येईल.

**जीवानंदः**—तुमचें म्हणणें खरें आहे; पण गुरुजींची आज्ञा आहे, कीं, शत्रूची तोफ काढून आणावी. म्हणून, आम्ही ती काबीज करण्यास निघालों आहों.

**भवानंदः**—अहो ! हें काम साधण्यासारखें का आहे ? त्यासाठीं जाणेंच असलें तर तुम्ही मागें व्हा. मी जातों.

**जीवानंदः**—नाहीं, तें होणार नाहीं. भवानंद ! आज मी मरणार आहें.'

**भवानंदः**—माझाहि आज मरण्याचा दिवस आहे.

**जीवानंदः**—मला आज प्रायश्चित्त करावें लागेल.

**भवानंदः**—तुम्ही निष्पाप-शरीर आहां. तुम्हांला प्रायश्चित्त करण्याचें कारण नाहीं. माझें मन कलंकित आहे. मला मेलें पाहिजे. तुम्ही रहा, मी जातों.

**जीवानंदः**—भवानंद ! तुम्हीं काय पाप केलें आहे, तें मला कळत नाहीं. पण तुम्ही राहिलांत तर संतानाचें कार्य पार पडेल. मी जातों.

भवानंद कांहीं वेळ स्तब्ध राहून शेवटीं म्हणाला, ' मरण्याचें कारण पडलें, तर आजच मरेन. ज्या दिवशीं कारण पडेल त्याच दिवशीं मरेन. मरायचेंच, मग आज काय आणि उद्यां काय ? '

**जीवानंदः**—तर मग चला.

याप्रमाणें बोलणें झाल्यावर भवानंद सर्वांच्यापुढें निघाला. तेव्हां त्याच्या फौजेवर वरून गोळ्यांचा वर्षाव होऊन संतान लोकांच्या चिंधड्या उडाल्या.

लोक जखमी होऊन जमिनीवर तळमळत पडले होते. त्यांच्यावर शत्रूकडच्या बंदुकवाल्या शिपायांनीं नेम धरून गोळ्या सोडल्या. इतक्यांत भवानंद म्हणाला, 'या गडबडींत कोणी तरी संतानानें उडी घातली पाहिजे. कोण घालतो? म्हणा, 'वन्दे मातरम्.'

तेव्हां उच्च स्वरानें मेघमल्हार रागांत हजारों संतानांच्या कंठांतून तोफेच्या तालांत ' वंदे मातरम् ' असा घोष निघाला.

## प्रकरण दहावें

ते दहा हजार संतान ' वंदे मातरम् ' हें पद गात गात भाले उंच करून अतिशय त्वरित वेगानें तोफखान्यावर जाऊन पडले. गोळ्यांच्या वृष्टीमुळें त्यांचीं शरीरें छिन्नविच्छिन्न झालीं होतीं; तरी ते मागें फिरले नाहींत. याच वेळीं कॅप्टन टॉमस याच्या हुकुमानें एका पलटणीनें बंदुकांवर संगिनी चढवून प्रबळ वेगानें संतानांच्या उजव्या बगलेवर हल्ला केला, तेव्हां दोन्ही बाजूंनीं कैचींत पडल्यासारखें होऊन संतान अगदीं निराश झाले. मिनिटामिनिटाला शेंकडों संतानांचा फडशा उडूं लागला. हें पाहून जीवानंद म्हणाला, ' भवानंद ! तुम्ही म्हणालां तेंच खरें. वैष्णवांचा निष्कारण नाश होऊं देण्यांत अर्थ नाहीं. धीरे धीरे मागें हटत गेलें पाहिजे. '

**भावानंदः**—आतां कस फिरणार ? आतां जो मागें फिरेल तोच मरेल.

**जीवानंदः**—तो पहा. उजव्या बाजूनें हल्ला आला. डाव्या बाजूला कोणीं नाहीं. चला. हळूहळू त्या बाजूला जाऊन सरकत सरकत चालते होऊं.

**भवानंदः**—सरकत सरकत तरी कोठें जाणार ? तिकडे तर नदी आहे आणि तिला पूर आलेला आहे. इंग्रजांच्या गोळ्यांतून वांचून तुम्ही संतानांच्या फौजेला जलसमाधि देणार वाटतें !

**जीवानंदः**—नदीवर एक पूल आहे, असें मला स्मरतें.

**भवानंदः**—ही येवढी फौज पुलावरून जाऊं लागली, तर इतकी गर्दी होईल, कीं, एकच तोफ आपल्या सगळ्या फौजेचा सहज लीलेनें नाश करण्यास पुरे होईल.

**जीवानंदः**—आतां एक काम करा. थोडीशी फौज तुम्ही आपल्याजवळ ठेवा. या युद्धांत तुम्ही जें साहस व चातुर्य दाखविलें आहे, त्यावरून हें काम तुम्हांला असाध्य होईलसें वाटत नाहीं. तुम्ही थोडीशी फौज घेऊन आघाडीला-उभे राहा. मी तुमच्या आड राहून उरली सुरलेली फौज पुलाच्या पार नेऊन सोडतों. तुमच्या बरोबरच्या फौजेचा नाश निश्चित ठरलेला आहे. माझ्याबरोबर जे येतील त्यांचे तरी प्राण अशानें वांचले तर वांचतील.

**भवानंदः**—ठीक. मी तें करतों.

मग भवानंदानें दोन हजार संतान घेऊन पुन्हां 'वंदे मातरम्'चा घोष करून मोठ्या उत्साहानें इंग्रजांकडील तोफखान्यावर हल्ला केला. तेथें त्यांचें घोर युद्ध झालें. पण येवढीशी क्षुद्र फौज तोफेपुढें किती वेळ टिकणार ? धान्याच्या कापणीप्रमाणें इंग्रज गोलंदाजांनीं त्यांना कापून काढलें !

येवढया अवकाशांत जीवानंदानें बाकीच्या फौजेचें तोंड किंचित् फिरवून उजव्या बाजूस रानाला वेढा देऊन हळूहळू रस्ता सुधारला. कॅप्टन टॉमस याचा एक सरकारी अधिकारी ले. वॉटसन यानें दुरून पाहिलें कीं, संतानांची कांहीं फौज हळूहळू पळ काढीत आहे. तेव्हां त्यानें दोन तुकड्या घेऊन जीवानंदाचा पाठलाग केला.

कॅ. टॉमस यानें हें पाहिलें. संतानांची बरीचशी फौज पळून जात आहे, असें पाहून त्यानें कॅ. हे नांवाच्या एका लष्करी अंमलदाराला म्हटलें, ' मी दोनचारशें शिपायांनिशीं येथें राहून या बंडखोरांचा निःशेष समाचार घेतों. तुम्ही तोफा व बाकीचें सैन्य घेऊन या पळपुट्यांवर धांवून जा. वॉटसन् डाव्या बाजूनें जात आहे; तुम्ही उजव्या बाजूनें जा. आणखी हें पहा, कीं, अगोदर पुलावर नाकेबंदी केली पाहिजे. ती केली म्हणजे शत्रूंला तीन बाजूंनीं वेढा घातल्यासारखें होऊन पारध्याच्या जाळ्यांत अडकलेल्या पक्ष्याप्रमाणें त्यांचा संहार करतां येईल. ही देशी फौज म्हणजे पळ काढण्यांत शूर ! तेव्हां ती सहज तुमच्या हातीं लागणार नाहीं. तुम्ही घोडेस्वारांच्या पलटणीला आड बाजूनें नेऊन पुलाच्या तोंडाशीं जाऊन उभे राहा, म्हणजे कार्यभाग होईल.'

कप्तानानें त्याप्रमाणें केलें.

‘ अति दर्पे हता लंका ’

कॅप्टन टॉमसनें संतानांना अतिशय तुच्छ समजून भवानंदाबरोबर युद्ध करण्यासाठीं आपल्याजवळ फक्त दोनशें पायदळ ठेवून बाकीचें सगळें पाठवून दिलें होतें. चतुर भवानंदानें जेव्हां पाहिलें, कीं, इंग्रजांच्या तोफा गेल्या, सगळें सैन्यहि गेलें आणि अगदीं थोडे लोक राहिले आहेत, ते आपणास सहज मारतां येतील; तेव्हां तो आपल्या लोकांना म्हणाला; “ या थोड्याशा लोकांना मारून आपणास जीवानंदाच्या सहायाला गेलें पाहिजे. आतां पुन्हां एकदां ‘ जय जगदीश हरे ’ असा घोष करा.” तेव्हां त्याचे लोक तसा घोष करून वाघासारखे टॉमसच्या फौजेवर तुटून पडले. त्या हल्ल्याची उग्रता थोड्या इंग्रजांबरोबरच्या तेलंगी शिपायांच्यानें सहन करवली नाहीं. त्यांचा नाश झाला. भवानंदानें तेव्हां स्वतः जाऊन टॉमसच्या झिंझ्या धरल्या. भवानंद म्हणाला, ‘ कप्तानसाहेब ! आम्ही तुम्हांला मारणार नाहीं. इंग्रज लोक आमचे शत्रु नाहींत. तुम्ही मुसलमानांच्या साह्यासाठीं कां आलांत ? या; तुम्हांला प्राणदान देतों आणि फक्त कैद करून ठेवतों. इंग्रज विजयी होवोत. तुमची आमची मैत्री आहे. ”

टॉमसनें भवानंदाला ठार करण्यासाठीं संगीन लावलेली बंदूक वर केली; पण भवानंदानें वाघासारखी उडी मारून ती पकडली. टॉमसला पळून जातां आलें नाहीं. तेव्हां भवानंद आपल्याबरोबरच्या संतानांना म्हणाला, “याला बांधा. ”

लगेच दोन तीन संतानांनीं येऊन टॉमसला बांधलें. भवानंद म्हणाला, ‘याला घोड्यावर घालून घेऊन चला. याला घेऊन आपण जीवानंदाच्या मदतीला जाऊं. त्याप्रमाणें टॉमसला घोड्यावर बांधून ‘वंदे मातरम्’ या मंत्राचा घोष करीत करीत ते वॉटसन् गेला होता, तिकडे त्वरेनें निघाले.

जीवानंदाची निरुत्साह झालेली फौज पळत होती. जीवानंद आणि धीरानंद यानीं तिला आवरून धरण्याचा प्रयत्न केला; पण सर्वांना त्यांना आंवरून ठेवतां आलें नाहीं. कांहीं जणांनीं पळून जाऊन आंबराईचा आश्रय केला. बाकीच्या फौजेला जीवानंद व धीरानंद पुलाकडे घेऊन गेले; पण त्या ठिकाणीं हे व वॉटसन् या दोघांनीं दोन बाजूंनीं त्यांना घेरलें. आतां रक्षणाचा कांहीं मार्ग राहिला नाहीं.

---

## प्रकरण अकरावें.

अशा प्रकारें टॉमस साहेबांच्या तोफा योग्य वेळीं दक्षिणेच्या बाजूला जाऊन पोहोंचल्या. त्या वेळीं संतानाच्या फौजेची दाणादाण झाली होती व बरेच लोक मारले गेले होते. कोणालाहि वांचण्याची आशा उरली नव्हती. संतान लोक वाट दिसेल तिकडे पळत सुटले होते. धीरानंद आणि जीवानंद यांनीं त्यांना धीर देण्याचा व न फुटूं देण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण तो व्यर्थ झाला. इतक्यांत 'पुलावरून जा, पुलावरून पार व्हा. नाहीं तर नदींत बुडून मराल. हळूहळू इंग्रज फौजेकडे तोंड करून पुलावरून जा.' अशी एक मोठी गर्जना झाली. जीवानंदानें पाहिलें तों भवानंद! भवानंद म्हणाला, 'जीवानंद, पुलावरून फौज घेऊन जा; नाहीं तर वांचणें कठोण आहे.' तेव्हां धीरे धीरे मागें हटत संतानांची फौज पुलाच्या पार जाऊं लागली. पुष्कळ संतान लोक एकाच वेळीं गर्दी करून पुलावरून चालले आहेत, तेव्हां तोफ चालविण्याला ही चांगली संधी आहे, असें पाहून इंग्रजांनीं तोफांच्या गोळयांचा भडिभार सुरू केला. तेव्हां संतानांचा फडशा पडूं लागला. भवानंद, जीवानंद व धीरानंद हे तिघे एकाच जागीं होते. इंग्रजाची एकच तोफ होती; पण तिनें भयंकर संहार चालविला होता. तो पाहून भवानंद म्हणाला, 'जीवानंद व धीरानंद! या, आपण तिघे तरवारीच्या जोरावर तोफ काबीज करूं!' तेव्हां ते तिघे तरवारीचे हात फिरवीत तोफखान्याच्या गोलंदाजाच्या जवळ जाऊन त्यांना कापून काढूं लागले. हें पाहून आणखी कांहीं संतान त्यांच्या मदतीला गेले. भवानंदानें तोफ सर केली. ती हातीं येतांच भवानंद तिच्यावर चढून उभा राहिला, आणि हातांच्या टाळया वाजवून म्हणाला, 'बोला वंदे मातरम्.' तेव्हां सर्वांनीं 'वंदे मातरम्' उच्चारून त्याला उत्तर दिलें. तेव्हां भवानंद म्हणाला, 'याच तोफेचें तोंड फिरवून, या बेट्यांची कणीक चांगली तिंबूं या.' सर्व संतानांनीं हात लावून तोफेचें तोंड फिरविलें, आणि ती शत्रूवर चालू केली. तेव्हां त्या तोफेंतून जणूं काय हरिनामाचा उच्चार निघालेला संतानांना ऐकूं गेला. पुष्कळ शिपाई मरूं लागले. भवानंदानें तोफ ढकलीत ढकलीत पुलाच्या तोंडापाशीं नेली, आणि तेथेंच ती ठेवून म्हटलें, 'तुम्ही दोघेजण संतानांच्या रांगा लावून त्यांना पूल उतरून पलीकडे न्या. मी एकटा या व्यूहमुखाचें रक्षण करण्यास उभा राहतों. तोफ चालविण्यासाठीं माझेजवळ थोडेसे गोलंदाज असले म्हणजे पुरेत.' तेव्हां सुमारें वीस एक संतान भवानंदाजवळ राहिले.

असंख्य संतान पुलाच्या पार होऊन जीवानंद आणि धीरानंद यांच्या आज्ञेप्रमाणें रांगेनें जाऊं लागले. एकटा भवानंद मात्र आपल्या वीस जण सोबत्यांच्या साह्यानें एका तोफेच्या भडिमारानें शत्रूंचे पुष्कळ लोकांचा फडशा पाडीत होता. यवनसेना फार मोठी होती. समुद्रावर वादळानें जशा लाटांवर लाटा उसळतात, त्याप्रमाणें शत्रूंच्या पलटणीवर पलटणी येऊन भवानंदाला वेढा घालीत होत्या. पण भवानंद अश्रांत, अजिंक्य, व निर्भीक राहिला. तोफेच्या प्रत्येक गोळ्या बरोबर शत्रुपक्षाच्या लोकांचा नाश करण्याचें त्याचें काम चाललेंच होतें. शत्रूचे त्याच्यावर हल्ल्यांवर हल्ले येऊं लागले. तरी संतान पुलाचें तोंड रोखून उभे होते. संतान वीर अजिंक्य होते. त्यांचें जीवन अविनाशी होतें. येवढया अवकाशांत पुढें गेलेली संतानांची फौज बरीचशी पूल उतरून गेली होती. आणखी थोडा वेळ पुलाचें रक्षण केलें, म्हणजे काम झालें असतें; इतक्यांत अकल्पित रीतीनें कोठून तरी दुसऱ्या एका तोफेचा ' गुड्म्-गुम, गुडम्-गुम ' असा शब्द ऐकूं आला. हा आवाज कोठून येतो, म्हणून दोन्ही पक्षाचे लोक पाहूं लागले; तों त्यांना दिसलें, कीं अरण्यांतून कित्येक तोफा देशी गोलंदाजांच्या हाताखालीं बाहेर पडल्या आहेत. आणि त्या तोफांच्या तोंडांतून धुराचे लोटच्या लोट बाहेर पडून इंग्रजांच्या फौजेवर अग्निवृष्टि करीत आहेत. त्या तोफांच्या घोर शब्दांचा प्रतिध्वनि पर्वत व रान यांतून होत होता. सर्व दिवसभर लढाई करून थकलेल्या शत्रुसैन्याला, आपल्या प्राणांवर हें नवें संकट आलेंसें वाटून त्यांच्या अंगावर भयानें कांटा उभा राहिला. त्या अग्नीच्या वर्षावापुढें तेलंगी, मुसलमान व हिंदुस्थानी शिपाई पळ काढूं लागले. फक्त दोन चार गोरे लोक उभे राहून युद्ध करण्याला सिद्ध झाले.

भवानंद हा सगळा रागरंग पहात होता. तो म्हणाला, ' भाई हो ! लांडे पळत आहेत. चला, आपण त्यांच्यावर हल्ला करूं. ' तेव्हां मुंग्यांच्या रांगाप्रमाणें संतानांची फौज नव्या दमानें व उत्साहानें परत पूल उतरून आली, आणि शत्रूंच्या मागें लागली. संतान यवनांच्या अंगावर जाऊन पडले. ज्याप्रमाणें भागीरथी नदीची जंगी लाट मोठ्या पर्वताकार मस्त हत्तीला सहज वाहून नेते, त्याप्रमाणें संतानांनीं शत्रूला ढकलीत नेलें. मागून भवानंदाची पायदळ फौज आणि पुढें महेंद्राची तोफ ! मग शत्रूच्या फौजेचा सत्यानास व्हायला काय उशीर आहे ! शत्रुसैन्याचें संतानांपुढें कांहीं चाललें नाहीं. बल, वीर्य, साहस, कौशल्य, लष्करी शिक्षण, अभिमान, सर्व व्यर्थ झालें ! फौजदारी, बादशाही,

इंग्रजी, देशी, विलायती, काळी, गोरी, सगळी फौज मरून पडूं लागली. कांहीं विधर्मी लोक पळूं लागले. ‘ मारा, मारा ’ असा शब्द करून जीवानंद व धीरानंद तिच्यामागें लागले. तिची तोफहि संतानांनीं काढून घेतली. या लढाईंत पुष्कळ गोरे काळे शिपाई मारले गेले. आतां सर्वांचा नाश होणार, हें पाहून हे व वॉटसन यांनीं भवानंदाकडे निरोप पाठविला, कीं, आम्ही सगळे आपले बंदिवान होतों. आपण आतां जास्त प्राणिहत्त्या करूं नये. ” जीवानंद भवानंदाच्या तोंडाकडे पाहूं लागला. भवानंद मनांत म्हणाला, ‘ छे, ! हें होणार नाहीं. तसें केलें तर आमचेंच मरण आमच्यापुढें उभें राहील. ’ भवानंदानें उच्च स्वरानें व दोन्ही हात वर करून हरिनामाचा गजर केला, व ‘ मारा, मारा, ’ असा हुकूम केला.

एक सुद्धां प्राणी वांचला नाहीं. नाहीं म्हणायला एके ठिकाणीं वीसपंचवीस गोरे जमून आत्मसमर्पण करण्याच्या निश्चयानें अतिशय निकरानें लढत होते. जीवानंद म्हणाला, ‘भवानंद !’ यांच्याशीं लढण्याचें कारण नाहीं. यांच्यावांचून आतां कोणींच जीवंत राहिलें नाहीं. यांना प्राणदान देऊन परत फिरवूं या.’

भवानंदानें उत्तर केलें, ‘ जीवानंद ! यांच्यांतला एक मनुष्य जीवंत आहे, तोंपर्यंत हा भवानंद परत फिरणार नाहीं. दूर उभें राहून तुमच्या दिव्य दृष्टीनें एकदां पाहा, मी एकटा कित्येक इंग्रजांना कसा लोळवतों तें !’

कॅ. टॉमस घोड्याच्या पाठीवर बांधलेला होता. भवानंदानें हुकूम केला, ‘ याला माझ्यासमोर उभा करा. अगोदर हा मरेल, मग मी मरेन.’

टॉमसला बंगाली भाषा समजत होती. तो इंग्रज लोकांना म्हणाला, “देशबांधवहो ! मी तर मेल्यासारखाच आहें. आतां आपल्या इंग्लंड देशाचें नांव राखणें तुमच्याकडे आहे. तुम्हांला प्रभु येशु ख्रिस्ताची शपथ आहे. तुम्ही अगोदर मला मारा व मग या बंडखोरांना.”

इतक्यांत सूं सूं करीत बंदुकीची एक गोळी सुटली. कोणी तरी आयरिश माणसानें टॉमसवर नेम धरून ती सोडली होती. टॉमसच्या कपाळांत ती शिरतांच कपाळमोक्ष होऊन त्यानें प्राण सोडला. तेव्हां भवानंद मोठ्यानें म्हणाला, “आमचें ब्रह्मास्त्र व्यर्थ झालें ! असा कोणचा अर्जुन, भीम, किंवा नकुल सहदेव आहे कीं, तो आतां आमचें रक्षण करील ? पहा ! पोटांत बाण लागून चिडलेल्या वाघाप्रमाणें गोरा माणूस आमच्यावर तुटून पडत आहे.

मी तर मरायला सिद्धच आहें; पण माझ्याबरोबर मरायला आणखी कोण संतान तयार आहेत ?"

प्रथम धीरानंद पुढें झाला. मागाहून जीवानंद, आणि त्याच्याबरोबर दहा, पंधरा, वीस, पन्नास संतान पुढें झाले. धीरानंदाला पाहून भवानंदानें विचारलें, 'तुम्ही कां माझ्याबरोबर मरतां ?'

**धीरानंदः**—कां बरें ? मरण्याचा मक्ता तुम्हांला एकाट्यालाच का कोणीं दिला आहे ?

असें बोलतां बोलतां धीरानंदानें एका गोऱ्याला ठार केलें.

**भवानंदः**—तसें नाहीं; पण तुम्ही मेलांत तर स्त्रीपुत्रांचें मुखावलोकन करून तुम्हांला सुखानें काळ काढतां येणार नाहीं ?

**धीरानंदः**—पुढच्या काळाविषयीं म्हणतां काय ?

**भवानंदः**—नाहीं—( इतक्यांत एका गोऱ्याची बंदुकीची गोळी लागून भवानंदाचा उजवा हात जखमी झाला. )

**धीरानंदः**—तुमच्यासारख्या पुण्यात्म्याला त्या सगळ्या गोष्टी सांगण्याची माझी काय पात्रता आहे ? मी सत्यानंदानें पाठविल्यावरून हेर म्हणून तुमच्या मागून गेलों होतों.

**भवानंदः**—हें काय प्रकरण आहे ? महाराजांना माझ्यासंबंधानें सुद्धां इतका अविश्वास ! ( भवानंद तेव्हां एका हातानें लढत होता. )

धीरानंद त्याचें रक्षण करीत करीत म्हणाला,' कल्याणीशीं तुमच्या ज्या कांहीं गोष्टी झाल्या, त्या त्यांनीं आपल्या कानांनीं ऐकल्या ! '

**भवानंदः**—त्या कशा ?

**धीरानंदः**—ते स्वतः त्या ठिकाणीं होते. ( इतक्यांत भवानंदावर एका गोऱ्यानें वार केला व त्याला भवानंदानें उलट केला. )

**धीरानंदः**—ते कल्याणीला गीता शिकवीत होते. इतक्यांत तुम्ही त्या ठिकाणीं गेलां. सावध राहा ! ( भवानंदाच्या डाव्या हातालाहि जखम झाली. )

**भवानंदः**—मी मेल्याची खबर महाराजांना द्या आणि त्यांना सांगा कीं, मी अविश्वासी नाहीं.

धीरानंदाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. युद्ध करतां करतां तो म्हणाला, 'तें ते पूर्णपणें जाणत आहेत. कालच्या रात्रींचें त्यांचें आशीर्वाद वाक्य लक्ष्यांत

ठेवा. त्यांनीं मलाहि बजावून सांगितलें कीं, भवानंदाच्या जवळ राहा. आज तो मरणार आहे. मी त्याला आशीर्वाद देतों कीं मेल्यावर तो वैकुंठलोकीं जाईल.'

भवानंद म्हणाला, 'संतानांचा जय होवो ! भाई, माझ्या मरणकाळीं मला एकदां वंदे मातरम् हें गाणें ऐकवा.'

तेव्हां धीरानंदाच्या आज्ञेनें युद्धोत्साहानें प्रेरित झालेल्या सर्व संतानांनीं मोठ्या उत्साहानें 'वंदे मातरम्'चा घोष केला. त्यानें त्या संतानांच्या बाहूंत दुप्पट बलसंचार झाला आणि त्याच भयंकर क्षणीं उरले सुरलेले सगळे गोरे मारले गेले. आतां रणभूमीवर एकदम शुकशुकाट झाला.

त्याच क्षणीं भवानंदानें मुखानें वंदे मातरम्चा उच्चार करीत करीत आणि मनांत विष्णुपदाचें ध्यान करीत करीत प्राणत्याग केला.

हाय ! स्त्रीसौंदर्या ! तुला धिक्कार असो !

---

## प्रकरण बारावें.

या युद्धानंतर अजय नदीच्या तीरीं सत्यानंदाच्या भोंवतीं गोळा होऊन विजयी संतान वीर जयोत्सव करीत होते. सत्यानंद मात्र भवानंदाच्या मृत्यूमुळें अतिशय खिन्न झाला होता. हा वेळपर्यंत संतानांच्या जवळ फारशीं रणवाद्यें नव्हतीं. पण याच वेळीं हजारों नगारे, शिंगें, सनया वगैरे वाद्यें कोठून तरी जमा झालीं. या वाद्यांच्या शब्दाच्या प्रतिध्वनीनें तो सगळा प्रांत व्यापून टाकला होता. बराच वेळ उत्सवाचे निरनिराळे प्रकार चालल्यानंतर सत्यानंद म्हणाला, 'जगदीश्वरानें आज कृपा केली आहे. संतान धर्माचा जय झाला आहे. पण अद्याप एक कार्य व्हावयाचें आहे. ज्यांना आजच्या उत्सवांत सामिल होतां आलें नाहीं व आजच्या उत्सवासाठीं ज्यांनीं आपल्या प्राणांचा बळी दिला, त्यांचें विस्मरण करून चालावयाचें नाहीं. जे आज धारातीर्थीं पडले आहेत, त्यांचा सत्कार आपण जाऊन करूं या. विशेषतः आपल्यासाठीं प्राणत्याग करून ज्यानें जय मिळवून दिला, त्या महात्मा भवानंदाचा सत्कार आपण करूं.''

हें ऐकून 'वंदे मातरम्' चा घोष करीत संतान लोक रणभूमीकडे निघाले ! त्यांनीं आपल्या खांद्यावर चंदनकाष्ठाचे भारे वाहून नेऊन भवानंदासाठीं चिता रचिली, आणि तिच्यावर भवानंदांचें शव ठेवून अग्निसंस्कार दिला. त्यानंतर 'हरे मुरारे' म्हणत म्हणत त्यांनीं त्या चितेला प्रदक्षिणा घातल्या. हे लोक विष्णुभक्त होते; पण वैष्णवसंप्रदायांतले नसल्यामुळें त्यांनीं अग्निसंस्कार केला.

त्यानंतर त्या रानांत सत्यानंद, जीवानंद, महेंद्र, नवीनानंद व धीरानंद असे पांचजण एके वेळीं बसून गुप्तपणें सल्ला मसलत करीत होते. सत्यानंद म्हणाला, " ज्या व्रतासाठीं आपण सर्व कर्मांचा, सर्व धर्मांचा, व सर्व सुखांचा त्याग केला होता, तें व्रत सफळ झालें. आतां या प्रांतांत यवनसेना राहिली नाहीं. जे थोडे लोक राहिले आहेत, त्यांचा आपल्या पुढें घटकाभर सुद्धां टिकाव लागणार नाहीं. तेव्हां आतां पुढें काय विचार करावयाचा ? "

जीवानंद म्हणाला, " चला, आतांच आपण जाऊन राजधानी आपल्या ताब्यांत घेऊं. "

**सत्यानंदः**—माझेंहि तेंच मत आहे.

**धीरानंदः**—पण फौज ?

**जीवानंदः**—कां बरें ? हीच फौज.

**धीरानंदः**—हें काय सैन्य म्हणावयाचें ! कोणी तरी दिसतें आहे काय ?

**जीवानंदः**—अहो, सगळे लोक विश्रांतीसाठीं आपापल्या ठिकाणीं गेले आहेत. नौबत वाजली कीं आतां गोळा होतील.

**धीरानंद**—एकजण सुद्धां येणार नाहीं.

**सत्या०**—कां बरें ?

**धीरा०**—सगळे लूट करण्यासाठीं बाहेर पडले आहेत. गांवाला कोणी रक्षणकर्तांच राहिला नाहीं. गांव व रेशमाची वखार लुटून सगळे घरोघर जातील. आतां कोणी सांपडणार नाहीं. मी शोध करूनच आलों आहें.

हें ऐकून सत्यानंद खिन्न झाला. तो म्हणाला, "तें कांहीं असो, हा सर्व प्रांत आपल्या स्वाधीन होणार. आतां आपणाला कोणी शत्रु राहिला नाहीं. तेव्हां वरेंद्रभूमींत तुम्ही संतानांचें राज्य स्थापा. रयतेकडून कर वसूल करा. पदरीं सैन्य ठेवा. हिंदूंचें राज्य झालें, हें ऐकून संतानांच्या निशाणाखालीं पुष्कळ सैन्य गोळा होईल."

तेव्हां, जीवानंद प्रभृति संतान सत्यानंदाला प्रणाम करून म्हणाले, "महाराजाधिराज ! आम्ही प्रणाम करतों. आपली आज्ञा झाल्यास याच अरण्यांत आपल्या सिंहासनाची स्थापना करूं."

सत्यानंद–त्याच्या साऱ्या आयुष्यांत–आतां प्रथमच राग प्रकट करून म्हणाला, ' छे ! मला काय तुम्ही बेअकली समजतां ? मी कांहीं राजा नाहीं. मी संन्यासी आहें. आतां या देशाचा राजा स्वतः वैकुंठपति आहे. नगर काबीज केल्यावर

तुम्हांला वाटेल त्याच्या डोक्यावर राजमुकुट ठेवा; पण, हें पक्कें ध्यानांत ठेवा, कीं, ब्रह्मचर्यावांचून मी कोणताहि आश्रम स्वीकारणार नाहीं. आतां तुम्ही आपापल्या कामाला जा. तेव्हां चौघेजण ब्रह्मचाऱ्याला प्रणाम करून उठले. सत्यानंदानें इतरांना न दिसूं देतां महेंद्राला खूण करून ठेवून घेतलें. तेव्हां महेंद्र राहिला. बाकीचे तिघेजण गेले. ते गेल्यावर सत्यानंद महेंद्राला म्हणाला, "तुम्ही सर्वांनीं विष्णूसमोर शपथ घेऊन संतान धर्माचा स्वीकार केला. पैकीं भवानंद व जीवानंद यांनीं आपल्या प्रतिज्ञा मोडल्या. त्याबद्दलचें प्रायश्चित्त आज त्यांनीं केलें. जीवानंदहि एखादे दिवशीं प्राणत्याग करून असेंच प्रायश्चित्त करील कीं काय असें मला भय वाटतें; पण मला एक आशेला जागा आहे. कांहीं एका गूढ कारणामुळें या वेळीं त्याला प्राणत्याग करतां येणार नाहीं. प्रतिज्ञापालन करणारे तुम्ही एकटेच आहां. आतां लवकरच संतानांचें कार्य सिद्धीला जाणार आहे. तें कार्य शेवटास गेल्याशिवाय आपण स्त्रीकन्येचें मुख पाहाणार नाहीं, अशी तुमची प्रतिज्ञा होती. आतां आपला कार्यभाग संपला आहे. तेव्हां तुम्हांला पुनः संसारी होण्यास हरकत नाहीं.'

हें ऐकून महेंद्राच्या डोळ्याला पाणी आलें. तो म्हणाला, 'गुरुमहाराज ! आतां कोणासाठीं संसारी व्हावयाचें ? स्त्रीनें तर आत्महत्या करून घेतली आणि मुलीचा मला पत्ता नाहीं ! तिचा शोध कोठें लागणार ? ती जीवंत आहे, असें आपण सांगितलें. यापेक्षां तिची कांहीं माहिती नाहीं.''

तेव्हां सत्यानंदानें नवीनानंदाला बोलावून महेंद्राला म्हटलें, "हे नवीनानंद गोस्वामी फार पवित्र अंतःकरणाचे माझे प्रिय शिष्य आहेत. हे तुमच्या कन्येचा शोध लावून देतील." इतकें बोलून सत्यानंदानें शांतीला कांहीं खूण केली. ती ओळखून नमस्कार करून तिनें निरोप घेतला. तेव्हां महेंद्र तिला म्हणाला, "पुनः तुमची भेट कोठें होईल ?"

शांति म्हणाली, "माझ्या आश्रमांत चला." इतकें बोलून ती पुढें चालूं लागली.

महेंद्र ब्रह्मचाऱ्याला नमस्कार करून व त्याचा निरोप घेऊन शांतीच्या बरोबर तिच्या आश्रमांत गेला. तेव्हां बरीच रात्र झाली होती, तरी विश्रांति न घेतां ती नगराला जाण्यास निघाली.

सर्वजण निघून गेल्यावर ब्रह्मचारी खालीं जमिनीवर नम्रभावानें बसून आणि भुईवर डोकें टेंकून मनांत परमेश्वराचें ध्यान करूं लागला. पहाटेची वेळ झाली,

तेव्हां कोणीं येऊन त्याच्या मस्तकाला स्पर्श केला आणि म्हटलें. "मी आलों आहें."

ब्रह्मचारी दचकून उठला आणि व्यग्र होऊन म्हणाला, "तुम्ही आलांत! कां बरें?"

आलेली व्यक्ति म्हणाली, "दिवस भरले."

ब्रह्मचारी म्हणाला, "हे प्रभो! आज माफ करा. येत्या माघी पौर्णिमेच्या दिवशीं मीं आपल्या आज्ञेप्रमाणें करीन."

---

# खंड चौथा.

## प्रकरण पहिलें.

त्या रात्रीं हरिनामाच्या गजरानें तो सारा प्रांत व्यापून टाकिला होता. संतान लोक प्रत्येक ठिकाणीं उच्चस्वरानें कोणी 'वंदे मातरम्' तर कोणी 'जगदीश हरे' हीं गीतें गात गात फिरत होते. कोणी शत्रूच्या शिपायांचीं शस्त्रें, तर कोणी त्यांचीं वस्त्रें, लुटीत होते; कोणी मृतदेहाच्या तोंडावर लाथा मारीत होते, तर कोणी अन्य प्रकारानें अत्याचार करीत होते; कोणी गांवाकडे तर कोणी नगराकडे धावत जाऊन वाटसरांना पकडून "वंदे मातरम्" म्हणा, नाहींतर मारून टाकतों, असा धाक घालीत होते. कोणीं हलवायांचीं दुकानें लुटून मिठाई खात होते; कोणी गवळ्यांच्या घरांत शिरून दह्याची हंडी फोडून त्यावर हात मारीत होते; कोणी म्हणत होते, आम्ही व्रजांतले गोपाळ आहों; पण गोपी कोठें आहेत?" त्या एका रात्रींत गांवोंगांवीं व शहरीं शहरीं मोठी गडबड दिसत होती. मुसलमानांचा पराभव झाला. पुन्हां हिंदूचें राज्य झालें. आतां मोकळेपणानें हरीचें नांव घ्या. हाच ध्वनि जिकडे तिकडे दुमदुमत होता. गांवढळ लोक मुसलमान पाहिला कीं त्याला मारीत. कोणी टोळ्या करून मुसलमानांच्या वस्तींत जाऊन व त्यांचीं घरें लुटून त्यांना आगी लावीत. पुष्कळ मुसलमान मारले गेले; पुष्कळ मुसलमान दाढी काढून आंगाला राख फासून तोंडानें हरि हरि म्हणूं लागले; आणि कोणी विचारलें तर 'आम्ही हिंदु आहों.' असें सांगूं लागले.

याप्रमाणें त्रासून गेलेले मुसलमान नगराकडे पळून जाऊं लागले. सरकारी अधिकारी चोहींकडे बंदोबस्तासाठीं निघाले. राहिलेले शिपाई हत्यारबंद होऊन

शहराचें रक्षण करूं लागले. शहराच्या वेशीपाशीं व प्रत्येक घाटावर हत्यारबंद शिपाई सावधान चित्तानें पहारा करूं लागले. त्या रात्रीं कोणाचा डोळ्याशीं डोळा लागला नाहीं. जो तो काळजींत होता. हिंदु म्हणत होते, ' बरें झालें, संन्यासी आले. ईश्वर करो आणि हिंदूंचें राज्य होवो. ' मुसलमान म्हणत, " अल्ला हो अकबर ! इतक्या दिवसांनीं कुराणशरीफमधलें वचन कसें खोटें झालें ! आम्ही रोज पांच वेळ निमाज पढतों, तरी कपाळीं गंध लावणाऱ्या या हिंदूंची फत्ते झाली आं ! ही सगळी दुनिया निवळ भ्रम आहे.' अशा रीतीनें कोणी रडून व कोणी हसून, ती सारी रात्र काढली.

या सगळ्या गोष्टी कल्याणीच्या कानीं गेल्या. आबालवृद्धांना त्या कळल्याच होत्या. कल्याणी मनांत म्हणाली, ' जय जगदीश्वर ! आज तुझें कार्य संपलें. आतां मी पतीच्या भेटीला जात्यें. प्रभो ! तुझें साह्य मला असूं दे. '

त्या गंभीर रात्रीं शय्येचा त्याग करून ती उठली, आणि खिडकी उघडून कोणी नाहीं, असें पाहून, ती हळूहळू गौरीदेवीच्या घरांतून बाहेर येऊन राजमार्गानें जाऊं लागली. मनांत इष्ट देवतेचें स्मरण करून ती म्हणाली, ' परमेश्वरा ! पद-चिन्ह गांवीं त्यांची माझी भेट होईल असें कर. '

धर्मशाळेपाशीं ती आली, तेव्हां पहारेकऱ्यानें " कोण ? " असें तिला विचारलें. कल्याणी घाबऱ्या स्वरानें म्हणाली, " एक स्त्री." पहारेकरी म्हणाला, ' जाण्याचा हुकूम नाहीं.' ती गोष्ट दफेदाराच्या कानीं गेली. दफेदारानें सांगि-तलें, ' बाहेर जायला मनाई नाहीं. आंत येण्याला मात्र आहे. ' तेव्हां पहारे-करी कल्याणीला म्हणाला, ' जा बाई. जाण्याला मनाई नाहीं. पण आजची रात्र मोठ्या संकटाची आहे. तुमचें काय होईल कोण जाणे ! तुम्ही काय दरोडेखो-रांच्या हातीं सांपडाल, का एखाद्या खड्ड्यांत पडून मराल, तें कोणीं सांगावें ? माझें ऐकाल तर आजची रात्र तुम्ही बाहेर पडूं नका. "

**कल्याणीः**—बाबा ! मी भिकारीण. माझ्याजवळ फुटकी कवडी देखील नाहीं. मला दरवडेखोर कशासाठीं त्रास देतील ?

**पहारेकरीः**—माई ! तुम्ही ज्वानींत आहां. ही ज्वानी दुनियेंत एक मोठें रत्न आहे. त्याचा काय नेम ? अशावेळीं मलासुद्धां दरवडेखोर होण्याची बुद्धि व्हावयाची. '

कल्याणीला वाटलें कीं हें मोठें संकटच प्राप्त झालें. पण ती कांहीं न बोलतां हळूहळू रस्ता सोडून देऊन तशीच निघाली. पहारेकऱ्यानें पाहिलें कीं, बाई

अगदींच भाबडी ! तिला आपल्या बोलण्यांतली खुबीच कळली नाहीं. तेव्हां मनाला वाईट वाटून त्यानें गांज्याचा एक दम मारला आणि झिंजोटी, खमाज, सोरट, टप्पा इत्यादि राग गाऊं लागला. कल्याणी आपली चालती झाली.

त्या रात्रीं रस्त्यानें लोकांचे थवेचे थवे चालले होते. कोणी ' मारा, मारा ' म्हणत होते; कोणी 'पळा, पळा,' म्हणत होते; कोणी हसत होते; कोणी रडत होते; कोणीं कोणाला पाहिलें कीं त्याला पकडलेंच. कल्याणी मोठ्या संकटांत पडली. रस्ता तिच्या ध्यानांत नव्हता. कोणाला विचारण्याचीहि सोय नव्हती. कारण, सर्वच विजयोत्साहानें धुंद झालेले ! ती छपत छपत अंधारांतून चालली होती; पण असें जात असतांहि ती आडदांड बंडखोरांच्या हातीं पडली. तिला पाहून मोठ्यानें ओरडून तिला धरण्यासाठीं ते धावले. तेव्हां कल्याणी दम न छाटतां पळत सुटली आणि जंगलांत शिरली. तेथेंहि तिच्या मागें दोन चोर धांवले. एकानें तिचा पदर धरला ,आणि म्हटलें, "वाः ! चांदणी खूप हातीं लागली !' इतक्यांत मागून एकजण अकस्मात् आला आणि त्या अत्याचारी माणसाला त्यानें काठीचा एक चांगला तडाखा दिला. तेव्हां तो मागें हटला. हा तडाखा देणारा माणूस एक अल्पवयी संन्यासी होता. त्यानें आपलें अंग कृष्णाजिनानें झांकलें होतें. तो कल्याणीला म्हणाला, 'भिऊं नका. माझ्याबरोबर चला. तुम्हांला कोठें जावयाचें आहे ?'

**कल्याणीः**—पदचिन्हाला.

तें ऐकून तो माणूस चकित होऊन म्हणाला, " काय ! पदचिन्हाला ?' इतकें बोलून कल्याणीच्या दोन्ही खांद्यांवर दोन्ही हात ठेवून तिच्या तोंडाकडे तो अंधारांत बारकाईनें पाहूं लागला.

अकस्मात् पुरुषाच्या हाताचा स्पर्श होतांच कल्याणी रोमांचित, भीत, क्रुद्ध व विस्मित झाली. तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. भीतीनें व्याकुळ झाल्यामुळें पळून जाणेंहि तिला आतां साध्य नव्हतें. बारकाईनें तिच्याकडे पाहून तो माणूस म्हणाला, 'हरे मुरारे ! ओळखलें. तूंच ती काळतोंडी कल्याणी !"

कल्याणीनें भीत भीत विचारलें. "तुम्ही कोण ?"

तो माणूस म्हणाला, "मी तुझा दासानुदास. हे सुंदरी ! माझ्यावर तूं प्रसन्न हो."

ते शब्द ऐकतांच कल्याणीनें त्वरेनें पाऊल उचललें आणि रागारागानें म्हटलें, "माझा असा अपमान करण्यासाठीं का तुम्ही माझें रक्षण केलें ? तुमचा वेष

तर ब्रह्मचाऱ्याचा दिसतो. ब्रह्मचाऱ्याचा हाच का धर्म? मी आज जर अशी असहाय नसतें, तर लाथ मारून तुमचें थोबाड फोडलें असतें." असें म्हणून कल्याणी पळूं लागली.

ब्रह्मचारी म्हणाला, 'हे सुहास्य वदने! तुझ्या या सुंदर देहाला स्पर्श करण्याची माझी फार दिवस इच्छा होती.'

इतकें बोलून ब्रह्मचारी तिच्या मागें त्वरेनें धावला आणि तिला पकडून त्यानें दृढ आलिंगन दिलें; तेव्हां कल्याणी खो खो हंसून म्हणाली, 'हायरे माझ्या दैवा!'

शांति म्हणाली, 'मी ब्रह्मचारी—संतानांचा सेनापति—एक मोठा वीर पुरुष आहें. मला सर्व ठाऊक आहे. वाटेंत शिपाई लोक व संतान यांनीं अत्याचार मांडला आहे. तुला आज पदचिन्हाला जातां येणार नाहीं.'

कल्याणी रडूं लागली.

शांति डोळे फिरवून म्हणाली, "काय भय आहे? माझ्या नेत्रकटाक्षरूपी बाणांनीं मी हजारों शत्रूंना ठार करीन. चल, पदचिन्हाला जाऊं."

अशा प्रकारच्या बुद्धिमान् स्त्रीचें साह्य मिळाल्यावर आपल्या हातीं जणूं काय स्वर्गच आला, असें कल्याणीला वाटलें आणि ती म्हणाली, 'तुम्ही जिकडे न्याल तिकडे मी येईन.'

तेव्हां शांति तिला बरोबर घेऊन जंगलांतल्या वाटेनें गेली.

---

## प्रकरण दुसरें

जेव्हां शांति आश्रम सोडून रात्रीं नगराकडे जाण्यास निघाली, तेव्हां जीवानंद आश्रमांत येऊन पोहोंचला होता. ती त्याला म्हणाली, 'मी नगराला चाललें आहे. महेंद्राच्या स्त्रीला घेऊन येत्यें. त्याची स्त्री जीवंत आहे, येवढें महेंद्राला सांगून ठेवा.

कल्याणीचा जीव कसा वांचला, ती सारी हकीकत भवानंदाकडून जीवानंदाला ठाऊक झाली होतीच. सध्यां ती कोठें आहे, हेंहि सर्व ठिकाणीं भटकणाऱ्या शांतीकडून जीवानंदाला कळलें. क्रमाक्रमानें ती सारी हकीकत त्यानें महेंद्राला सांगितली.

प्रथम महेंद्राचा त्याच्या शब्दावर विश्वास बसेना; पण जेव्हां विश्वास बसला, तेव्हां आनंदित होऊन वेड्यासारखा मूढ झाला.

त्याच रात्रीं पहाटेस शांतीच्या साह्यानें महेंद्राची व कल्याणीची भेट झाली. त्या निःस्तब्ध अरण्यांत शालवृक्षांच्या घनदाट छायेंत पशुपक्षी निजून उठण्यापूर्वीं त्यांचें परस्परांना दर्शन झालें. या गोष्टीला साक्ष केवळ नीलवर्ण आकाशांत विहार करणारा अंधुकप्रकाशाचा आकाशांतला नक्षत्रसमूह आणि तें निष्फल असंख्य शालवृक्ष होते. आणि तसेंच दूर खडकावर आपटल्यामुळें नाद करणाऱ्या नदीचा शब्द व कोठें कोठें पूर्वेस उदय पावलेल्या व उषारूपी मुकुट धारण करणाऱ्या ज्योतीच्या दर्शनानें आल्हादित झालेल्या कोकिळांचा शब्द हे त्याला साक्ष होते.

एक प्रहर दिवस आला. त्यावेळीं जीवानन्द होता तेथें शांति जाऊन पोहोंचली. कल्याणी शांतीला म्हणाली, 'मला आपण फुकटांतच विकत घेतलें ! आतां माझ्यावर तुम्ही आणखी एक उपकार करा. माझ्या मुलीचा पत्ता मला सांगा."

जीवानंदाच्या तोंडाकडे पाहून शांति म्हणाली, 'मला झोंप येते आहे. गेल्या आठ प्रहरांत मी जमिनीला अंग देखील टेकलें नाहीं. दोन रात्री झोंपेवांचून गेल्या. मी पुरुष आहें."

कल्याणी किंचित् हंसली. जीवानंद महेंद्राच्या तोंडाकडे पाहून म्हणाला, 'तें काम माझ्याकडे लागलें. तुम्ही पदचिन्हाला जा. त्या ठिकाणीं तुमची मुलगी तुम्हांला मिळेल.'

जीवानंद भैरवीपुराला कल्याणीच्या मुलीला—निमीच्या मुलीला—आणण्यासाठीं गेला. तें काम कांहीं सोपें नव्हतें.

निमीनें प्रथम उमाळा गिळून मग इकडे तिकडे पाहिलें. मग तिचे ओठ व नाक हीं फुरफुरूं लागलीं. त्यानंतर तिनें रडायला सुरुवात केली आणि शेवटीं म्हटलें, 'मी मुलीला देणार नाहीं.'

निमीनें पालथ्या हातानें डोळे चोळून चोळून ते पुसल्यानंतर जीवानंद तिला म्हणाला, 'हें काय ताई ! अशी रडतेस कां ! ती कांहीं कुठें दूर जात नाहीं. तिच्या घरीं मधून मधून जाऊन तूं तिला भेटून येत जा.'

निमी गाल फुगवून म्हणाली, 'तुमची मुलगी तुम्ही आपली घेऊन जा कशी ?' इतकें बोलून तिनें सुकुमारीला जीवानंदाच्या स्वाधीन करून रागानें हातपाय आपटीत रडायला सुरवात केली. जीवानंदानें मग इकडच्या तिकडच्या गोष्टी काढल्या; पण निमीचा राग कमी झाला नाहीं. निमीनें उठून सुकुमारीच्या कप-

ध्यांचें गांठोडें, अंगाखांद्यावरच्यांची पेटी, चेंडू, बाहुली, वगैरे खेळणीं, झटपट आणून जीवानंदाच्या पुढें आदळलीं. सुकुमारी स्वतःच तीं सगळीं गोळा करूं लागली. ती निमीला विचारूं लागली. "आई ! आपणाला कोठें जावयाचें ?"

निमीच्यानें रहावेना. ती सुकुमारीला मांडीवर घेऊन मोठ्यानें रडूं लागली.

---

## प्रकरण तिसरें.

पदचिन्ह गांवीं नव्या किल्ल्यांत महेंद्र, कल्याणी, जीवानंद, शांति, निमी व तिचा नवरा आणि सुकुमारी हीं सगळीं माणसें आनंदानें गोळा झालीं होतीं. शांति नवीनानंदाच्या वेषांत आली होती. कल्याणीला तिनें आपल्या आश्रमांत आणिलें, त्याच रात्रीं तिनें कल्याणीला बजावलें होतें कीं, नवीनानंद हा स्त्री आहे, ही गोष्ट कल्याणीनें आपल्या पतीपाशीं बोलूं नये. एके दिवशीं कल्याणीनें नवीनानंदाला आपल्या अंतःपुरांत बोलावून घेतलें. त्याप्रमाणें तो आला. नोकराचाकरांनीं त्याला आंत जाण्यास अर्थातच मनाई केली; पण त्यानें जुमानलें नाहीं.

शांतीनें कल्याणीच्या जवळ जाऊन विचारलें, ' मला कां बोलावलें ?'

**कल्याणीः**—हा पुरुषाचा वेष किती दिवस ठेवणार ? या वेषामुळें कधीं तुमची आमची भेट होत नाहीं किंवा बोलतां चालतां येत नाहीं. माझ्या यजमानापुढें तुम्हांला आतां खरें स्वरूप प्रकट केलें पाहिजे.

नवीनानंद सचिंत होऊन उभा राहिला. बराच वेळपर्यंत तो कांहींच बोलला नाहीं. शेवटीं म्हणाला, ' कल्याणी ! त्याला बऱ्याच अडचणी आहेत. '

दोघांमध्यें अशा प्रकारच्या गोष्टी चालल्या होत्या. इकडे ज्या चाकरांनीं नवीनानंदाला आंत जाण्यास मनाई केली होती, त्यांनीं महेंद्राकडे जाऊन त्याला सांगितलें कीं, नवीनानंद मनाई केली असतांहि जबरदस्तीनें अंतःपुरांत घुसला. हें ऐकून महेंद्राला नवल वाटलें, आणि काय प्रकार आहे तें पाहण्यासाठीं तो स्वतः अंतःपुरांत गेला. कल्याणीच्या शयनमंदिरांत जाऊन पाहतो तों नवीनानंद तेथें उभा होता व कल्याणी आपल्या हातानें त्याच्या आंगावरच्या व्याघ्रचर्माची गांठ सोडीत होती. तें पाहून तर त्याला फारच आश्चर्य वाटलें आणि रागहि आला.

नवीनानंद त्याला पाहून हंसून म्हणाला, 'काय गोसावी महाराज ? संतानाविषयीं संतानाच्या मनांत सुद्धां अविश्वास ना ?'

**महेंद्र**—भवानंद ठाकुर कोठें विश्वास ठेवणारे नव्हते ?

**नवीनानंद**—( डोळे फिरवून )—कल्याणीनें भवानंदाच्या अंगाला हात लावून त्याच्या व्याघ्रचर्माची गांठ अशी सोडली असती काय ?

बोलतां बोलतां शांतीनें कल्याणीचा हात घट्ट धरला. तिला गांठ सोडूं दिली नाहीं.

**महेंद्र**—मग ? त्याचें काय ?

**नवीना०**—माझ्याविषयीं अविश्वास धरला तर एक असो; पण कल्याणीविषयीं काय म्हणून ?'

या वेळीं महेंद्र बराच गोंधळून गेला. तो म्हणाला, 'पण मी कोणाविषयीं अविश्वास धरला, तें सांगाल कीं नाहीं ?'

**नवीना०**—नाहींतर माझ्या मागोमाग येथें येण्याचें तुम्हांला काय कारण होतें ?

**महें०**—कल्याणीशीं मला कांहीं बोलायचें होतें म्हणून आलों.

**नवीना०**—तर मग आतां जा. तिच्याशीं मलाहि कांहीं बोलावयाचें आहे. आपण गेलांत म्हणजे मला पुढें बोलतां येईल. आपलेंच घर आहे. आपणाला येथें हवें तेव्हां येतां येईल. मी मोठ्या कष्टानें यावेळीं एकदां आलों आहें.

महेंद्र वेड्यासारखा उभा राहिला. त्याला हा प्रकार काय आहे, तें कांहींच कळेना. अपराध्याच्या तोंडून जशा गोष्टी निघाव्या, तशा या दिसत ना. कल्याणीचें वर्तन पाहावें तर तेंहि विचित्रच ! अविश्वासी स्त्रीसारखी ती पळून गेली नाहीं किंवा भ्याली नाहीं, अथवा शरमिंधीहि पण झाली नाहीं. उलट गालांतल्या गालांत हसत होती. शिवाय ज्या कल्याणीनें मागें झाडाखालीं बसली असतां विष खाल्लें होतें, तिच्या हातून असें शंका घेण्यासारखें कृत्य होईल कसें ? या सगळ्या गोष्टींचा विचार महेंद्राच्या मनांत चालला होता. इतक्यांत त्याची ती केविलवाणी स्थिति पाहून शांतीनें एक चंचल नेत्रकटाक्ष फेकला. एकाएकीं महेंद्राच्या मनांतला अंधकार दूर झाला. हा स्त्रीचा नेत्रकटाक्ष आहे, हें महेंद्राला दिसून आलें. त्यानें हिय्या करून नवीनानंदाच्या दाढीला हात घालून एक हिसका दिला. त्याबरोबर त्याच्या कृत्रिम दाढीमिशा निघून पडल्या. ती संधी

साधून कल्याणीनें व्याघ्रचर्माची गांठ सोडून तें चर्म दूर सारलें. त्याबरोबर शांतीनें लाजून खालीं मान घातली.

मग महेंद्रानें शांतीला विचारलें, 'तुम्ही कोण ?'

**शांति०**—श्रीमान् नवीनानंद स्वामी.

**महें०**—तें झालें कपटवेशांतलें नांव. तुम्ही स्त्रीना ?

**शांति०**—हो. केव्हां केव्हां जरूरी पडेल त्याप्रमाणें.

**महें०**—मग तुम्हांला एक गोष्ट विचारतों. तुम्ही बायको माणूस असून जीवानंदाच्या सहवासांत नेहमीं असतां, हें कसें ?

**शांति०**—तें मी आपणाला सांगणार नाहीं.

**महें०**—तुम्ही स्त्री अहां, हें जीवानंदाला ठाऊक आहे काय ?

**शांति०**—होय.

तें ऐकल्यानें विशुद्ध अंःतकरणाच्या महेंद्राला फार खेद वाटला. हें पाहून कल्याणीच्यानें बोलल्यावांचून राहावलें नाहीं. ती म्हणाली, 'ही जीवानंदस्वामीची धर्मपत्नी शांति देवी.'

हें ऐकून थोडा वेळपर्यंत महेंद्राची मुद्रा प्रफुल्लित झाली; पण पुनः त्या चर्येवर छाया दिसूं लागली. तें ओळखून कल्याणी म्हणाली, 'ही ब्रह्मचारिणी आहे.'

---

## प्रकरण चौथें.

उत्तर बंगालप्रांत मुसलमानांच्या हातांतून गेला होता. पण कोणताहि मुसलमान ही गोष्ट तोंडानें कबूल करीना. दृष्टि मनाला फसवीत होती. ते म्हणत कीं थोड्याशा लुटारूंनीं अत्याचार मांडला आहे आणि आपल्या हातांत अधिकार घेतला आहे, येवढेंच काय तें. पण असें किती काळपर्यंत चालणार आहे, तें सांगतां येत नाहीं. याच वेळीं ईश्वराच्या योजनेनें वॉरन हेस्टिंग्जसाहेब कलकत्त्याच्या गव्हर्नरजनरलच्या जागीं आले. हा साहेब दृष्टिआड सृष्टि करणारा मनुष्य नव्हता. ती विद्या त्याला येती, तर हिंदुस्थानांत ब्रिटिशांचें राज्य कोठें राहिलें असतें ? लवकरच मेजर एडवर्डस् नांवाचा दुसरा एक सेनापति नवीन सैन्य घेऊन संतानांचा बींमोड करण्यासाठीं रवाना करण्यांत आला.

एडवर्डसनें पाहिलें कीं हें युरोपांतलें युद्ध नाहीं. शत्रूजवळ सैन्य नाहीं, शहर नाहीं, राजधानी नाहीं, तोफाहि नाहींत. सगळें कांहीं आपल्याच पक्षाच्या

हातांत आहे. ज्या दिवशीं जेथें ब्रिटिश फौजेचा तळ असेल, त्या दिवसांपुरतें तें ठिकाण ब्रिटिशांच्या ताब्यांत असे. तळ उठला कीं दुसरेच दिवशीं तेथें, 'वंदे मातरम्' चा घोष सुरू होत असे. हें कळेना कीं हे लोक एका रात्रींतून मुंग्यांच्या रांगेप्रमाणें कोठून येतात आणि जो गांव ब्रिटिशांच्या हातीं गेला असेल, तेथें जाऊन कशी जाळपोळ करतात. ब्रिटिशसैन्याचे लोक थोडे आहेत, असें पाहून तत्क्षणीं त्यांचा संतान संहार करतात, हें कसें घडतें? शोध करतां करतां त्याला कळलें कीं पदचिन्ह गांवीं संतानांनीं एक किल्ला बांधिला आहे आणि तेथें त्यांनीं आपल्या शस्त्रांचें कोठार व खजीना ठेविला आहे. म्हणून प्रथम तो किल्ला हस्तगत केला पाहिजे असा त्यानें मनाचा निश्चय केला.

पदचिन्ह येथें संतानांची संख्या किती आहे, याची बातमी त्यानें दूतांकडून आणविली. त्या बातमीवरून त्याला दिसून आलें कीं त्या किल्ल्यावर हल्ला करणें योग्य होणार नाहीं. विचार करतां करतां त्याला एक अपूर्व युक्ति सुचली.

माघी पौर्णिमा जवळ आली होती. त्याच्या छावणीपासून जवळच नदीच्या काठीं मेळा ( जत्रा ) भरावयाचा होता. हा मेळा फार मोठा व्हावयाचा होता. लाखों लोक त्या मेळ्याला येत असत. आतां तर काय वैष्णवांचें राज्य झालेलें. मग मेळ्याचा थाटमाट काय विचारावयाचा आहे? यच्चयावत् सगळे संतान पौर्णिमेच्या दिवशीं मेळ्याला येतील असा संभव होता. मेजर एडवर्डसनें विचार केला कीं पदचिन्ह येथचे पाहारेकरी शिपाईसुद्धां त्या दिवशीं मेळ्याला येतील. त्याच वेळीं आपण किल्ल्यावर हल्ला करून तो काबीज करावा म्हणजे झालें.

असा विचार करून त्यानें बातमी पसरविली कीं, 'आपण मेळ्यावर हल्ला करणार आहों. एकदम सगळ्या वैष्णवांवर छापा घालून त्यांना मारून टाकूं, आणि मेळा भरूं देणार नाहीं.

ही बातमी हां हां म्हणतां गांवोगांव पसरली. तेव्हां जेथें जेथें संतानसंप्रदायांतले जे कोणी होते, ते तत्क्षणीं शस्त्रें घेऊन मेळ्याच्या रक्षणासाठीं धावून गेले. सगळे संतान पौर्णिमेच्या दिवशीं नदीच्या कांठीं जाऊन हजर झाले. मेजरनें जो अंदाज केला होता, त्याबरहुकूम घडून आलें. इंग्रजांच्या सुदैवानें महेंद्रहि त्यांच्या युक्तीनें फसला. त्यानें पदचिन्हाच्या किल्ल्यावर थोडेसे लोक ठेवून बरेंचसें सैन्य मेळ्याच्या रक्षणार्थ नेलें.

ही गोष्ट घडण्याच्या अगोदरच जीवानंद व शांति पदचिन्हाहून निघून गेलीं होतीं. त्या वेळीं लढाईचा कांहीं बोलवा नव्हता, आणि लढाईकडे त्यांचें

मनहि नव्हतें. माघी पार्णिमेसारख्या पुण्यकारक दिवशीं शुभमुहूर्तावर पवित्र तीर्थात देहविसर्जन करून प्रतिज्ञाभंगाच्या महापातकाचें परिमार्जन करावें, हाच त्यांचा उद्देश होता. पण वाटेंत त्यांना कळलें कीं मेळ्यासाठीं गोळा होणाऱ्या संतानांशीं इंग्रजांचें महायुद्ध होणार आहे. तेव्हां तो म्हणाला, ' तर मग आपण युद्धांतच मरूं. चला!'

तीं दोघें त्वरेनें निघालीं. वाटेंत एक लहानशी टेकडी लागली. त्या टेकडीवर चढून त्या दोघांनीं पाहिलें. तों खालीं कांहीं अंतरावर इंग्रजांची छावणी त्यांना दिसली. शांति म्हणाली, " मरण्याची गोष्ट आतां राहूं द्या. ' वंदे मातरम् ' म्हणा. "

---

## प्रकरण पांचवें

तेव्हां दोघांजणांनीं परस्परांच्या कानांशीं लागून कांहीं विचार ठरविला. तो ठरविल्यावर जीवानंद एका रानांत लपून बसला. आणि शांति दुसऱ्या रानांत जाऊन तेथें एका अद्भुत घटनेला प्रवृत्त झाली.

शांति मरण्याला सिद्ध झाली होती; पण मरण्याच्या वेळीं आपला स्त्री वेष असावा, असें तिनें ठरविलें होतें. तिचा पुरुषवेष ही फसवणूक आहे, असें महेंद्र म्हणाला होता. मरतांना तरी हातून कपट घडूं नये. बरोबर त्यांनीं एक पेटारा घेतला होता, त्यांत सगळा वेष तयार होता. नवीनानंद तो पेटारा उघडून नवा वेष घालण्याच्या उद्योगाला लागला होता. शांतीनें खैराच्या काडीनें रक्तचंदनाचा टिळा कपाळीं लावून आणि एका कानावर येईल व आपलें चंद्रासारखें मुख त्यानें थोडेंसें झांकलें जाईल, अशा रीतीनें तिनें डोक्याभोंवतीं साफा गुंडाळला. वेष बरोबर झाल्यावर हातांत एकतारी घेऊन वैष्णवीच्या वेषानें ती इंग्रजांच्या छावणींत गेली. तिला पाहून फौजेंतले तरुण शिपाई वेडावून गेले. कोणीं तिला टप्पा तर कोणीं गजल, कोणीं गोपींचीं गाणीं, तर कोणीं कृष्णाचीं गाणीं म्हणण्यास सांगितलें. तीं तिनें म्हटल्यावर कोणीं तिला तांदुळ दिले, कोणीं डाळ दिली, कोणीं मिठाई दिली, तर कोणीं पैसा, चवली, अधेली, अशीं दिलीं. ती छावणींतली सगळी व्यवस्था डोळ्यांनीं पाहून परत जाऊं लागली; तेव्हां शिपायांनीं विचारलें, ' आतां पुन्हां केव्हां येशील ? ' भिकारणीनें उत्तर केलें, ' तें कांहीं सांगतां येत नाहीं. मी येथून फार दूर राहातें. ' शिपायानें विचारलें. ' किती दूर ? '

**भिकारीणः**—पदचिन्ह गांवीं.

त्याच दिवशीं साहेबानें पदचिन्हाची कांहीं खबर आणिली होती, हें एका शिपायाला ठाऊक होतें. म्हणून तो तिला साहेबाकडे घेऊन गेला. मेजर साहेबांजवळ जाऊन भिकारणीनें मधुर हास्य करून, मर्मभेदी कटाक्ष त्याच्यावर फेंकले; त्यानें साहेबाचें डोकें फिरूं लागलें. नंतर खंजिरीवर थाप मारून तिनें गाण्याचा सूर धरला—' **म्लेच्छनिवहनिधने कलयसि करवालम्** '

साहेबानें विचारलें, " टूमचा घर कुठा हाय, बाई ? "

**भिकारीणः**—मी बाई नाहीं; भिकारीण आहें. माझें घर पदचिन्ह गांवीं आहे.

**साहेबः**—Where is that Adsin Padsin ? ह्या एक गर आहे ?

**भिकारीणः**—एक कां ? पुष्कळ घरें आहेत.

**साहेबः**—गर नाहीं—गर नाहीं—गर—गर—

**शांतिः**—साहेब ! तुमच्या मनांतलें मी समजल्यें. गडाविषयीं तुम्ही विचारतां होय ?

**साहेबः**—Yes. Yes. गर—गर—हाय ?

**शांतिः**—होय, गड आहे. मोठा किल्ला आहे.

**साहेबः**—किटी आदमी ?

**शांतिः**—गडावर किती लोक आहेत हें विचारतां ? असतील वीसपंचवीस हजार.

**साहेबः**—Nonsense एका किल्ल्यांत डो चार हजार राहूं शकणार. हे लोक आटा टेठे हाय की निघून गेला ?

**शांतिः**—जातील कुठें ?

**साहेबः**—मेल्याला. टुमी कवा टेठूण आली ?

**शांतिः**—कालच आलें साहेब.

**साहेबः**—टे लोक आज निघून गेले अशटील ?

शांति मनांत म्हणाली, 'तुझ्या बापाच्या घुगऱ्या मीं खाल्या आहेत ! तुला जर मीं फसविलें नाहीं, तर मग मीं हा वैष्णवीचा वेष कशाला घेतला ! मेल्या तुझें डोकें कोल्हीं कुत्रीं खातील तें मी आज पाहीन ! उघडपणें म्हणाली, 'साहेब, तसेंहि असेल, मला तें कांहीं ठाऊक नाहीं. मीं पडलें भिकारीण, गाणीं गाऊन

भिक्षा मिळेल तिच्यावर पोट भरावें, हा माझा धंदा. आज गाऊन गाऊन माझा घसा कोरडा पडला आहे. एखादा पैसा द्या, म्हणजे मी चालती होईन. एखादें बक्षिस द्याल तर फारच चांगलें. मी परवां तेथील खबर आणीन हवी असली तर.'

साहेबानें चटकन् एक रुपया काढून फेकला, आणि म्हटलें, 'परवां नाहीं बीबी.'

शांति म्हणाली, ' मेल्या बीबी कोणाला म्हणतोस ! मी वैष्णवी आहें.'

**साहेबः**—परवां नाय. आज रात्रीं हामाला खबर मिळाली पायजे.

**शांतिः**—बंदुक उशाशीं घेऊन खूप दारू पी आणि पाठीला तेल लावून निजून रहा. आज मी दहा कोस जाणार, येणार, आणि तुम्हांला खबर देणार ! चोर बेटा !

**साहेबः**—चोर बेटा कुणाला म्हणालीस ?

**शांतिः**— चोर बेटा म्हणजे साहेब मोठा जनरल बहादुर.

**साहेबः**—हा ! मग ठीक. क्लाइव्ह साहेबासारखा मी मोठा जनरल होणार आहें. परंटु आज आमाला खबर मिल्नी पाहिजे. शंबर रुपया बक्षीस देईन.

**शांतिः**—शंभर द्या कीं हजार द्या. वीस कोसांची मजल माझ्यानें होणार नाहीं.

**साहेब**—घोड्यावर जा.

**शांतिः**—मला घोड्यावर बसतां येतें, तर अशी तुमच्या तंबूपाशीं भिक्षा मागायला कां येत्यें ?

**साहेब**—गारीवर बसून जाशील ?

**शांति**—दुसऱ्याच्या मांडीशीं मांडी लावून मीं बसायचें ? भिकारीण झाल्यें म्हणून मीं कांहीं लाजलज्जा सोडली नाहीं !

**साहेब**—काय अडचणींत घालते आहे ! पांचशें रुपये बक्षिस देईन ! मग तर झालें ?

**शांतिः**—कोण जाणार ? तुम्ही स्वतः जाल ?

तेव्हां साहेबानें समोर उभा असलेल्या लिंडले नांवाच्या एका तरुण डफेदाराकडे बोट दाखवून म्हटलें, "लिंडले ! तुम्ही जाल ?' शांतीचें तारुण्य व रूप पाहून लिंडले म्हणाला, ' मोठ्या आनंदानें जाईन.'

मग एक मोठा आरबी घोडा तयार करून आणिला. लिंडलेहि तयार झाला. शांतीला धरून तो घोड्यावर बसवूं लागला. तेव्हां ती म्हणाली, 'इतक्या लोकां-

देखत ? मला कांहीं लाजलज्जा आहे कीं नाहीं ? पुढें व्हा. ही छावणी सोडल्यावर मग पाहूं !'

लिंडले घोड्यावर चढला, आणि हळू हळू घोडा चालवूं लागला. शांति त्याच्या मागून चालली. अशा रीतीनें तीं दोघें छावणीच्या बाहेर पडलीं.

छावणीच्या बाहेर पडतांच मैदानांत कोणी नाहीं, असें पाहून शांति साहेबाच्या पावलावर पाऊल ठेवून उडी मारून घोड्यावर बसली. लिंडले हंसून म्हणाला, "टुमाला गोऱ्यावर चांगलें बसटा येटे !"

शांति म्हणाली, "इतकें चांगलें येतें कीं तुमच्याबरोबर बसण्याची मला लाज वाटते. छिः ! रिकाबीवर पाय ठेवून चढणें हें कसलें घोड्यावर बसणें ?"

लिंडलेनें स्वतःची प्रौढी मिरविण्यासाठीं रिकाबींतून पाय काढला. इतक्यांत शांतीनें त्या मूर्ख इंग्रजाला अर्धचंद्र देऊन घोड्यावरून ढकललें आणि घोड्यावर आपली बैठक मजबूत करून त्याला टाच मारून वायुवेगानें घोडा सोडला. चार वर्षें संतानांच्या फौजेबरोबर राहून अश्वारोहण विद्या ती चांगली शिकली होती. ती विद्या न येती तर जीवानंदाबरोबर तिला कसें राहतां आलें असतें ? लिंडले साहेब पाय मोडून घेऊन तेथेंच पडून राहिला. शांति वाऱ्याच्या वेगानें निघून गेली.

ज्या रानांत जीवानंद लपून बसला होता, तेथें जाऊन तिनें त्याला सारी हकीकत सांगितली. जीवानंद म्हणाला, 'तर मग मी आतांच जाऊन महेंद्राला सावध करतों. तूं मेळ्यांत जाऊन सत्यानंदाला खबर दे. गुरुजीला लवकर खबर कळली पाहिजे, म्हणून तूं घोड्यावर बसून जा.'

अशा रीतीनें दोघेजण दोन दिशांना धावत गेले. शांतीनें त्या वेळीं नवीनानंदाचा वेष धारण केला होता, हें सांगावयाला नकोच.

---

## प्रकरण सहावें.

एडवर्ड साहेब अट्टल इंग्रज होता. नाक्यानाक्यावर त्यानें शिपाई ठेविलेले होते. त्यांनीं साहेबाकडे लागलीच बातमी पोंचविली कीं, वैष्णवी भिकारीण लिंडले साहेबाला घोड्यावरून फेकून देऊन व स्वतः घोड्यावर स्वार होऊन कोठें निघून गेली. तें ऐकतांच एडवर्ड म्हणाला, "An imp of satan ! Strike the tents."

तेव्हां तंबूच्या खुंट्यांवर मोगऱ्यांचे आवाज थडाथड होऊं लागले व गंधर्व नगरीप्रमाणें ती वस्त्रनगरी अंतर्धान पावली. ओझ्याच्या गाड्या भरण्यांत आल्या. कांहीं माणसें घोड्यावर तर कांहीं पायीं चालूं लागलीं. हिंदु, मुसलमान, मद्रासी वगैरे शिपाई खांद्यावर बंदुका टाकून चालूं लागले. तोफेची गाडी धाड धाड करीत चालली.

इकडे महेंद्र संतानांची फौज घेऊन मेळयाला जाण्यासाठीं निघाला होता. त्याच दिवशीं महेंद्रानें विचार केला होता कीं, जाण्याला उशीर झाला, तर कोठें तरी तळ देऊं.

तळ देणेंच बरें वाटलें; पण संतानांच्या जवळ तंबू नव्हते. झाडाखालीं गोणपाट आंथरून त्यावर ते निजत. रात्रीं केवळ देवाचें तीर्थ घेऊन निजावें लागे. पोटांतली भूक स्वप्नांतल्या स्त्रीच्या अधरामृताच्या पानानें तृप्त करावी लागे. तळ देण्याला योग्य अशी जागा जवळच होती. एक मोठी बाग होती. तींत आंबे, चिंच, बाभूळ वगैरे झाडें होतीं. महेंद्रानें हुकूम सोडला, कीं येथेंच तळ द्यावा. जवळ एक टेकडी होती. महेंद्रानें विचार केला कीं, या पहाडावर छावणी केली तर चांगलें; पण तसें करण्यापूर्वी ती जागा आपण एकदां स्वतः पाहून यावी.

म्हणून महेंद्र घोड्यावर बसून धीरेधीरे टेकडीवर चढूं लागला. थोड्या अंतरावर तो गेल्यानंतर एक तरुण वैष्णव सेनेमध्यें येऊन म्हणाला, 'चला. टेंकडीवर चढा.' जवळ जे कोणी होते, त्यांनीं आश्चर्यचकित होऊन विचारलें, "कां बरें?" तो योद्धा एका उंचवट्यावर उभा राहून म्हणाला, "चला, आजच्या चांदण्या रात्रीं या डोंगराच्या माथ्यावर वसंत ऋतूंतल्या नुकत्या उमललेल्या फुलांचा सुगंध घेत घेत आपणाला शत्रूंशीं युद्ध करावें लागणार आहे." संतान पाहूं लागले, तों हें बोलणारा स्वतः सेनापति जीवानंद हा होता. तेव्हां 'हरे मुरारे' असा उच्च शब्द करीत सगळी संतान सेना भाल्यावर अंगाचा भार देऊन उठली, आणि जीवानंदाच्या मागून त्वरेनें टेकडी चढूं लागली. एकानें एक घोडा तयार करून आणून जीवानंदाला दिला. दुरून हा प्रकार पाहून महेंद्राला आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, 'हा काय प्रकार आहे! हुकुमावांचूनच हे लोक इकडे कसे आले?'

महेंद्र घोड्याचें तोंड फिरवून चाबकानें धूळ उडवीत टेकडीवरून उतरूं लागला. सैन्याच्यापुढें चाललेल्या जीवानंदाची भेट झाल्यावर त्यानें विचारलें, "हा काय प्रकार आहे?"

जीवानंदानें हंसून उत्तर केलें, "आज मोठा आनंदाचा दिवस आहे. टेकडीच्या पलीकडे पायथ्याशीं एडवर्ड साहेब आहे. जो अगोदर टेकडीवर चढेल, तो जिंकील." तेव्हां जीवानंद संतान सैन्याला उद्देशून म्हणाला, "तुम्ही मला ओळखलेंत ? मी जीवानंद गोस्वामी. हजारों शत्रूंला मीं आजपर्यंत मारलें आहें."

तेव्हां "आम्हीं ओळखलें. तुम्ही जीवानंद गोस्वामी." अशा भयंकर नादाच्या प्रतिध्वनीनें तो सगळा प्रदेश व्यापून राहिला. जीवानंद म्हणाला, "बोला. 'हरे मुरारे." तेव्हां हजारों कंठांतून निघाणाऱ्या हरे मुरारेच्या घोषानें तें अरण्य भरून गेलें.

**जीवानंदः**—टेकडीच्या पलीकडे शत्रु आहे. आज या टेंकडीच्या माथ्यावर या नीलांबरी रात्रीला साक्ष ठेवून संतान युद्ध करतील. चला लवकर ! जे अगोदर वर जाऊन पोंचतील, तेच जिंकतील. म्हणा, वंदे मातरम् !

तेव्हां त्या अरण्यांतून वंदे मातरमचा प्रतिध्वनि निघाला. हळू हळू संतानांची फौज पर्वत शिखरावर चढूं लागली. पण एकाएकीं ते भयभीत झाले. महेंद्रसिंह अतिशय त्वरेनें टेकडीवरून उतरून रणवाद्य वाजवीत होता. पाहतां पाहतां टेकडीच्या माथ्यावर तोफेसह इंग्रजांचे गोलंदाज दिसूं लागले. तेव्हां संतान सेना पुढील गीत गाऊं लागली.

तुमि विद्या तुमि भक्ति,<br>
तुमि मा बाहुते शक्ति,<br>
त्वं हि प्राणः शरीरे ॥

पण इंग्रजांच्या तोफेच्या गुडुम-गुडुम-गुम शब्दांत तें महागीत कोणाला ऐकूंहि गेलें नाहीं. शेंकडों संतान लोक शस्त्रास्त्रांसह त्या टेकडीवर मरून पडले. तो गुडुम-गुडुम शब्द जणूं काय दधीचीच्या अस्थींचा उपहास करीत आणि समुद्राच्या लाटांनाहि तुच्छ करीत इंग्रजांसाठीं वज्र तयार करीत होता. शेत कापणीच्या वेळीं पिकलेलें धान्य शेतकऱ्याच्या हातांतल्या विळ्यानें जसें चरचर कापलें जातें, त्याप्रमाणें संतानसेना या वेळीं कापली जाऊन रणभूमीवर शयन करीत होती. जीवानंद व महेंद्र यांनीं जोराची खटपट चालविली होती; पण व्यर्थ ! पर्वतावरून मोठाले दगड गडगडत खालीं येतात, त्याप्रमाणें संतान शिपाई टेकडीवरून त्वरेनें खालीं येऊं लागले. कोण कोठें पळून गेला, त्याचा पत्ता नव्हता. सर्वांचा एकदम नाश करावा म्हणून 'हुर्रे, हुर्रे' असा घोष करीत गोऱ्यांची पलटण टेकडी उतरूं लागली. जशी एकादी नदी पर्वतावरून जोरानें

वाहत येऊन खालीं आदळते, त्याप्रमाणें संगिनी उंच करून दुर्दमनीय, असंख्य व अजिंक्य ब्रिटिश सेना पळत असलेल्या संतानांच्या मागें धावूं लागली. एकदांच जीवानंदाची महेंद्राशीं या गडबडींत गांठ पडली होती. तेव्हां जीवानंद म्हणाला, "झालें, संपलें. चला, आपणहि याच ठिकाणीं देह ठेवूं."

महेंद्र म्हणाला, 'मेल्यानें जर रणांत जय मिळता, तर मी मेलों असतों; पण विनाकारण मृत्यु ओढवून घेणें हा वीराचा धर्म नाहीं."

**जीवानंद**:—उगाच मरायचें त्यापेक्षां रणांतच मरेन.

मग जीवानंद परत फिरून मोठ्यानें म्हणाला, 'हरीचें नाम घेतां घेतां मरण यावें अशी कोणा कोणाची इच्छा आहे? ज्याची असेल त्यांनीं माझ्याबरोबर यावें.'

तेव्हां पुष्कळ लोक पुढें झाले. मग जीवानंद म्हणाला, 'असें नाहीं. जिवंत परत फिरणार नाहीं, अशी देवाची शपथ वाहा.'

हें ऐकतांच पुढें झालेले लोक मागें सरले. जीवानंद म्हणाला, 'कोणी येत नाहीं काय? तर मग हा मी एकटाच चाललों.'

जीवानंद घोड्यावर चढून ताठ बसून मागें बऱ्याच दूर अंतरावर असलेल्या महेंद्राला म्हणाला, 'भाई! नवीनानंदाला सांगा कीं मी चाललों. आतां परलोकींच आपली भेट होईल.'

इतकें बोलून तो वीर पुरुष गोळ्यांचा पाऊस पडत असतांहि वेगानें घोडा दामटीत चालला. त्याच्या डाव्या हातांत भाला व उजव्या हातांत बंदूक होती व तोंडानें 'हरे मुरारे! हरे मुरारे!' असा हरिनामाचा गजर चालला होता. युद्ध होण्याचा संभव नव्हता. या साहसाचा कांहीं उपयोग नव्हता. तथापि 'हरे मुरारे! हरे मुरारे!' म्हणत जीवानंदानें शत्रूच्या व्यूहांत प्रवेश केला.

संतानांनीं पळ काढल्यावर महेंद्र त्यांना हांका मारून म्हणाला, 'हें पहा! एकदां मागें वळून जीवानंदाकडे नुसतें पहा तरी! नुसतें पाहण्यानें कांहीं तुम्ही खास मरणार नाहीं.'

कित्येक संतानांनीं मागें वळून जीवानंदाच्या अमानुष पराक्रमाकडे पाहिलें. तो पाहून ते आश्चर्यचकित झाले आणि म्हणाले, 'जीवानंदाला कसें मरावें तें ठाऊक आहे. आम्हांला नाहीं. चला, जीवानंदाबरोबर वैकुंठाला जाऊं.'

हें ऐकून कांहीं संतान परत फिरले. त्यांचें उदाहरण पाहून आणखीहि कांहीं फिरले. बरीच गडबड झाली. जीवानंदानें शत्रुव्यूहांत प्रवेश केला होता. त्यामुळें संतानांपैकीं कोणालाहि यापुढें तो दिसला नाहीं.

इकडे कांहीं संतान परत फिरल्याचें रणक्षेत्राच्या सगळ्या भागांवरून संतानांनीं पाहिलें होतें. त्यावरून त्यांना वाटलें कीं संतानांचा जय झाला. म्हणून 'मारा, ठोका' असा शब्द करीत संतानांचें सैन्य इंग्रज फौजेवर तुटून पडले.

इंग्रजांच्या सैन्यांत त्यामुळें मोठी गर्दी उडाली. शिपाई लढाईला तोंड देण्याचा प्रयत्न न करतां पळ काढूं लागले. गोरे लोक संगीनी चढवून छावणीकडे धावूं लागले. तेव्हां महेंद्र चोहींकडे बारकाईनें पाहूं लागला, त्याला टेंकडीच्या शिखरावर असंख्य संतान सैनिक दिसले. ते वीरत्वाच्या दर्पानें खालीं उतरून इंग्रजांच्या फौजेवर हल्ला करीत होते. हें पाहून तो संतानांना म्हणाला, 'भाई! तो पाहा. टेकडीच्या शिखरावर प्रभु सत्यानंदस्वामीचा ध्वज फडकत आहे. आज कंस-केशी-मधुकैटभांचा नाश करणारा मुरारी स्वतः रणावर अवतरला आहे. लाखों संतान टेकडीवर आहेत. म्हणा, 'हरे मुरारे!' उठा! मुसलमानांना छातीवर व पाठीवर चांगला मार द्या. लक्ष संतान टेकडीवर आहेत.'

तेव्हां 'हरे मुरारे!' ही भयंकर गर्जना झाली. 'मा भैः' ( भिऊं नका ) अशा शब्दांचा आपल्या हातांतल्या शस्त्रास्त्रांच्या खणखणाटाशीं मिलाफ करून संतानांनीं त्या नादानें सर्व जीवांना मोहित करून सोडलें. महेंद्राची फौज आवेशानें टेकडीवर चढूं लागली. खडकावर आपटल्यानें जसा नदीचा प्रवाह जोरानें उलट उसळी मारतो, त्याप्रमाणें उसळून अंगावर धावणाऱ्या संतानांपुढें राजसेना गडबडून गेली व कुंठित होऊन भयभीत झाली. त्याच वेळीं पंचवीस एक लोक घेऊन सत्यानंद ब्रह्मचारी टेकडीच्या माथ्यावरून धबधब्याप्रमाणें खालीं इंग्रज सैन्यावर तुटून पडला. त्यांचें तुंबळ युद्ध झालें.

ज्याप्रमाणें दोन जंगी शिलाखंडाच्या कचाट्यांत सांपडलेल्या माशीच्या अंगाचा चुराडा उडतो, त्याप्रमाणें संतानांच्या दोन सैन्यांचा कैचींत सांपडलेल्या राजसैन्याचा चुराडा झाला.

ही बातमी वॉरन हेंस्टिंग्जकडे घेऊन जाण्याला एकमुद्धां मनुष्य जिवंत राहिला नाहीं.

---

## प्रकरण सातवें.

पौर्णिमेची रात्र होती. ती भयंकर रणभूमि आतां शांत झाली होती. घोड्यांच्या दौडीचा शब्द, बंदुकांचे कड कड कड आवाज, तोफांची गुडुम्-गुडुम् गर्जना

आणि सर्व जागा व्यापून टाकणारा धुर, यांपैकीं आतां कांहीं राहिलें नव्हतें. आतां कोणी 'हुर्रे' म्हणत नव्हतें. जो काय शब्द होत होता तो कोल्हे, कुत्रीं व गिधाडें यांचा होता आणि जखमी होऊन पडलेले आर्तस्वरानें ओरडत होते. कोणाचे हात तुटले होते; कोणाचीं डोकीं फुटलीं होतीं; कोणाचे पाय मोडले होते; कोणाच्या अंगांतून गोळया गेल्या होत्या; कोणी 'बापरे !' असें ओरडत होते; कोणी पाणी मागत होते. आणि कोणी मृत्यु येण्याची वाट पाहत होते. बंगाली, हिंदुस्थानी, इंग्रज, मुसलमान सगळे एकत्र पडले होते. जिवंत असलेले, मेलेले, माणसें, घोडे, सगळे एकाला एक भिडून पडले होते. अशा त्या माघी पौर्णिमेच्या रात्रीं कडाक्याच्या थंडींत, उज्ज्वल चंद्रप्रकाशांत ती रणभूमि फारच भयंकर दिसत होती. त्या ठिकाणीं जाण्यास कोणाची छाती होत नव्हती.

कोणाची छाती होत नव्हती असें म्हटलें खरें; पण अति दुर्गम अशा त्या ठिकाणीं रात्रीचे वेळीं एक स्त्री फिरत होती. हातांत मशाल घेऊन ती प्रेताचा खच पडला होता त्या जागीं कांहीं तरी शोधीत होती. प्रत्येक प्रेताच्या तोंडाजवळ मशाल नेऊन ती त्याच्या तोंडाकडे पाही, आणि दुसऱ्या प्रेताकडे नेई. कोठें एखादें माणसाचें प्रेत एखाद्या घोड्याच्या शवाखालीं पडलें होतें. त्या ठिकाणीं ती स्त्री मशाल खालीं मातींत ठेवून दोन्ही हातांनीं घोड्याचें शव बाजूला करी आणि माणसाचें प्रेत उचलून बाहेर काढी. इतकें केल्यानंतर आपणास पाहिजे तें प्रेत सांपडलें काय म्हणून पाही; पण तें दिसेना. तेव्हां पुनः मशाल हातीं घेऊन पुढें जाई. अशा रीतीनें शोध करीत करीत ती सगळें मैदान हिंडली; पण कोठेंहि तिला पाहिजे होतें त्या प्रेताचा शोध लागला नाहीं. तेव्हां मशाल फेकून देऊन मृत देहांनीं भरून गेलेल्या व रक्तानें भिजलेल्या जमिनीवर तिनें अंग टाकिलें आणि शोक करण्यास सुरुवात केली. ही स्त्री म्हणजे शांति. ती जीवानंदाचें प्रेत शोधीत होती.

शांति जमिनीवर पडून रडत होती, इतक्यांत एक अत्यंत मधुर असा करुण ध्वनि तिच्या कानीं पडला. जणू काय तिला कोणी म्हणत होतें, ' बाई ! ऊठ ! अशी रडूं नकोस." शांतीनें चोहींकडे पाहिलें, तों तिच्या समोर चंद्रप्रकाशांत एक धिप्पाड शरीराचा जटाजूटधारी महापुरुष उभा होता.

त्याला पाहतांच शांति उठून उभी राहिली. तो महापुरुष म्हणाला, ' बाई ! रडूं नकोस. मी जीवानंदाचा मृतदेह शोधून देतों. तूं माझ्याबरोबर ये.'

मग तो महापुरुष तिला रणभूमीच्या मध्यभागीं घेऊन गेला. त्या ठिकाणीं असंख्य प्रेतें एकावर एक पडलीं होतीं. शांतीच्यानें तीं सगळीं उचलवेनात. तीं सगळीं उचलून त्या महाबलवान् पुरुषानें एक प्रेत बाहेर काढलें. हेंच जीवानंदाचें प्रेत असें शांतीनें ओळखलें. त्याच्या सर्वांगावर जखमा होत्या, आणि अंग रक्तानें भरलें होतें. तें पाहून सामान्य स्त्रीप्रमाणें शांति ओक्साबोक्शीं रडूं लागली.

पुनः तो महापुरुष म्हणाला, 'बाई! रडूं नकोस. जीवानंद मेला आहे काय? जरा मन शांत करून नीट पहा. अगोदर त्याची नाडी पहा.'

शांतीनें शवाची नाडी पाहिली; पण ती चालत असल्याचें कांहीं चिन्ह दिसेना. तो महापुरुष म्हणाला, 'छातीवर हात ठेवून पहा.'

तिनें जेथें माणसाचें हृदय असतें, तेथें हात ठेवून पाहिला, पण तेथेंसुद्धां कांहीं हालचाल दिसली नाहीं. सगळें थंडगार होतें.

तो पुरुष पुनः म्हणाला, 'नाकापाशीं हात धरून पहा, कांहीं श्वास चालतो आहे कीं नाहीं तें.'

शांति म्हणाली, 'कांहीं नाहीं.'

तो पुरुष म्हणाला, 'तोंडांत बोट घालून कांहीं उष्णता हाताला लागते कीं नाहीं तें पहा.'

शांतीनें बोट घालून पाहिलें आणि म्हटलें, 'कांहीं कळत नाहीं.' शांति आशामुग्ध होऊन उभी होती.

तेव्हां त्या महापुरुषानें डाव्या हातानें जीवानंदाच्या देहाला स्पर्श केला, आणि म्हटलें, 'तुम्ही भीतीनें हताश झालां आहां. त्यामुळें तुम्हांला कळलें नाहीं. आंगांत अजून थोडीशी ऊब आहे असें वाटतें. पुनः पहा बरें?'

शांतीनें पुनः नाडी पाहिली; तेव्हां तिच्यांत कांहीं हालचाल दिसून आली. विस्मित होऊन हृत्पिंडावर तिनें हात ठेविला. तेव्हां थोडी धुगधुगी वाटूं लागली. शांति आश्चर्यानें म्हणाली, 'प्राण मघां होता कीं आतांच येऊं लागला आहे?'

तो म्हणाला, 'बाई! असें कसें होईल? याला उचलून पुष्करणीपर्यंत तुमच्यानें नेववेल काय? मी वैद्य आहें. कांहीं औषधी इलाज करून पाहीन म्हणतों.'

शांति तो देह सहज उचलून पुष्करणीपाशीं घेऊन गेली. महापुरुष म्हणाला, 'तुम्ही अंगावरचें रक्त धुऊन काढा. तोंवर मी औषध घेऊन येतों.'

शांतीनें त्याप्रमाणें रक्त धुऊन टाकिलें. इतक्यांत महापुरुषहि कांहीं झाड-पाल्याचा रस घेऊन आले. त्यांनीं तो सगळ्या जखमांच्या तोंडांना लाविला, आणि नंतर सगळ्या अंगाला पुनः पुनः चोळला. तेव्हां जीवानंद एक मोठा उसासा टाकून उठून बसला. त्यानें शांतीच्या तोंडाकडे पाहून विचारलें, ' युद्धांत कोणाचा जय झाला ? '

शांति म्हणाली, ' तुमचाच. या महात्म्याला नमस्कार करा. '

तेव्हां दोघे पाहूं लागले; पण कोणी दिसेना. नमस्कार करावयाचा कोणाला ?

जवळच विजयी संतानसेनेचा कोलाहल ऐकूं येत होता. पण जीवानंद किंवा शांति यांपैकीं कोणीहि उठलें नाहीं. दोघेहि चांदण्यांत पुष्करिणीच्या पायऱ्यांवर बसून राहिलीं होतीं. औषधाच्या प्रभावानें जीवानंदाच्या प्रकृतीला लवकरच आराम वाटला. तो म्हणाला, 'शांते ! वैद्यबुवांच्या औषधाचा विलक्षण गुण खराच ! आतां माझ्या शरीराला बिलकुल वेदना होत नाहींत किंवा ग्लानीहि वाटत नाहीं. आतां कोठें जावें ? चल. संतान सैन्याच्या जयोत्सवाची ही गडबड ऐकूं येत आहे. '

शांति म्हणाली, ' आतां तिकडे जाऊं नये. मातेचा कार्यभाग सिद्धीला गेला आहे. हा देश आतां संतानांच्या स्वाधीन झाला आहे. आपल्याला राज्याचा वारा नको आहे. मग जाऊन करायचें काय ? '

**जीवा०**—पण जो घास शत्रूच्या तोंडांतून काढला, त्याचें रक्षण करायला नको काय ?

**शांति**—तें काम करायला महेंद्र आहे. सत्यानंद स्वतः आहेत. आपण प्रायश्चित्त करून संतान धर्मासाठीं प्राणत्याग केला होता. आतां पुनः प्राप्त झालेल्या या देहावर संतानांचा कांहीं हक्क नाहीं. आपण संतानांच्या साठीं मेलों. आतां आपणांला पाहून संतान म्हणतील कीं आपण प्रायश्चित्ताच्या भयानें कोठें तरी लपून बसले होतां, आणि जय झाल्याचें ऐकून राज्याचा वांटा मागण्यापुरते आले आहां.

**जीवानंदः**—हें काय शांते ? लोकांच्या अपवादाला भिऊन आपलें हातचें कार्य सोडायचें ? माझें काम म्हणजे मातृसेवा ! कोणीं कांहीं कां म्हणेनात, मी मातृसेवाच करणार.

**शांतिः**—ती करण्याला आतां आपणाला अधिकार नाहीं. कारण आपला देह मातृसेवेप्रीत्यर्थ खर्ची पडलाच आहे. जर पुन्हा आपणांला मातृसेवा कर-

ण्याला मिळाली, तर मग आपण प्रायश्चित्त काय केलें ? मातृसेवेपासून वंचित होणें हा तर प्रायश्चिताचा मुख्य भाग. नाहींतर, या तुच्छ प्राणाचा परित्याग करण्याला काय मोठीशी किंमत आहे ?

**जीवानंदः**—शांते ! तुला माझ्या बोलण्याचा मतलब कळून चुकला आहे. मी हें प्रायश्चित्त अपुरें ठेवणार नाहीं. मला संतान धर्मातच सुख वाटतें. त्या सुखापासून तूं मला वंचित ठेवीत आहेस. पण आतां जाणार कोठें ! मातृसेवेचा त्याग करून व घरीं जाऊन सुखोपभोग घेणें माझ्या हातून घडणार नाहीं.

**शांतिः**—सुखोपभोग घ्या, असें माझेंतरी कोठें म्हणणें आहे ? आपण दोघेंहि आतां गृहस्थाश्रमी नाहीं. आतां दोघे संन्यासीच राहूं आणि चिरकाळपर्यंत ब्रह्मचर्याचें पालन करूं. चला, येथून आतां आपण देशोदेशीं तीर्थयात्रा करीत फिरूं.

**जीवानंदः**—त्यानंतर ?

**शांतिः**—नंतर हिमालयावर एक आश्रम बांधून त्यांत देवाची आराधना करीत राहूं, आणि ज्याच्या योगानें आपल्या मातृभूमीचें कल्याण होईल असा वर मागूं.

मग तीं दोघें उठलीं, आणि हातांत हात घालून रात्रीच्या चांदण्यांत कोठें अदृश्य झालीं.

हाय ! हिंदमाते ! जीवानंदासारखा पुत्र आणि शांतीसारखी कन्या तुझ्या उदरीं पुनः निर्माण होतील काय ?

---

## प्रकरण आठवें.

सत्यानंद ठाकुर रणभूमीवरून निघाला, तो कोणाशीं कांहीं न बोलतां तडक आनंदमठांत गेला. तेथें त्या गंभीर रात्रीं देवाच्या सभामंडपांत बसून तो ध्यानस्थ झाला. इतक्यांत, मागच्या प्रकरणांत सांगितलेला महापुरुष त्या ठिकाणीं आला. त्याला पाहतांच सत्यानंदानें उठून नमस्कार केला.

**महा०**—सत्यानंद ! आज माघी पौर्णिमा.

**सत्यानंद**—चला. मी तयारच आहें. पण हे महात्मन् ! माझ्या एका शंकेचें निरसन करावें. आम्हीं युद्धांत जय मिळवून संतान धर्माचा मार्ग निष्कंटक केल्याबरोबर आम्हांला मनाई हुकूम कां झाला ?

**महा०**—तुमचें कार्य झालें. मुसलमानांचें राज्य नष्ट झालें. आतां तुमचें कांहीं कार्य राहिलें नाहीं. मग, निष्कारण प्राणहत्या कशाला करावयाची ?

**सत्यानंदः**—मुसलमानांचें राज्य नष्ट झालें खरें, पण अजून हिंदुराज्याची स्थापना झाली नाहीं. सध्यां कलकत्त्यांत इंग्रज प्रबळ आहेत.

**महा०**—हिंदु राज्य यापुढेंहि लवकर स्थापन होणार नाहीं. तुम्ही येथें राहिलांत, तर निरर्थक मनुष्यांची प्राणहानि मात्र होईल. म्हणून, तुम्ही आतां येथून चला कसे.

हें ऐकून सत्यानंदाच्या मनाला तीव्र वेदना होऊं लागल्या. तो म्हणाला, 'हे प्रभो ! जर हिंदुराज्य स्थापन होणार नाहीं, तर मग कोण राजा होईल ? पुन्हां मुसलमान राजे होतील काय ?

**महा०**—नाहीं. यापुढें इंग्रजांचें राज्य होणार आहे.

सत्यानंदाच्या दोन्ही डोळयांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. वरच्या भागीं असलेल्या मातृरूपी जन्मभूमीच्या मूर्तीकडे तोंड करून व हात जोडून सद्ग-दित कंठानें तो म्हणाला, "हाय ! माते ! तुझा उद्धार आमच्या हातून झाला नाहीं ! तूं पुन्हां म्लेच्छांच्या हातांत पडणार ! यांत संतानांना अपराधी समजूं नकोस. हाय माते ! आज मला युद्धांतच मरण कां आलें नाहीं !"

**महा०**—सत्यानंद, असे व्याकुळ होऊं नका. तुमच्या बुद्धीला भ्रंश होऊन तुम्हीं लुटारूचा पेशा पत्करला, आणि त्या पेशांत धन संपादन करून युद्धांत जयहि मिळविला. पापांचें फळ कधीं पवित्र नसतें. म्हणून, तुमच्या हातून देशाचा उद्धार होऊं शकला नाहीं. आतां जें होईल तें चांगलेंच होईल. इंग्रजांचें राज्य झालें नाहीं, तर सनातन धर्माची पुन्हां उन्नति होण्याचा संभवहि राहाणार नाहीं. महापुरुषांनीं जें मला समजावून सांगितलें, तेंच मी तुम्हांला सांगत आहें. नीट लक्ष देऊन ऐका. तेहतीस कोटि देवांची पूजा करणें हा सनातन धर्म नाहीं. हा लौकिक म्हणजे अपकृष्ट धर्म आहे. या हीनप्रतीच्या धर्माच्या प्रभावानें खरा सनातन धर्म—ज्याला म्लेंच्छ लोक हिंदुधर्म म्हणतात तो—लोप पावला आहे. खरा हिंदु धर्म ज्ञानात्मक आहे, कर्मात्मक नाहीं. हें ज्ञान बहिर्विषयक व अंतर्वि-षयक असें दोन प्रकारचें आहे. अंतर्विषयक ज्ञान हाच सनातन धर्माचा-प्रधान भाग आहे; पण बहिर्विषयक ज्ञान प्रथम झाल्याशिवाय अंतर्विषयक ज्ञान होत नाहीं. स्थूल म्हणजे काय तें अगोदर कळल्याशिवाय सूक्ष्म म्हणजे काय तें कळत नसतें. अलीकडे पुष्कळ दिवसांपासून आपल्या देशांत बहिर्विषयक

ज्ञानाचा लोप झालेला आहे. सनातनधर्माचें पुनरुज्जीवन करणें असेल, तर अगोदर बहिर्विषयक ज्ञानाचा प्रचार अवश्य केला पाहिजे. सध्यां देशांत हें बहिर्विषयक ज्ञान राहिलें नाहीं. तें शिकविणारे लोकहि नाहींत. आम्ही लोक लोकशिक्षणाच्या कामीं कुशल नाहीं. म्हणून, हें बहिर्विषयक ज्ञान आपणांस परदेशाहून आणिलें पाहिजे. इंग्रज लोक या बहिर्विषयक ज्ञानांत महापंडित आहेत. लोकशिक्षणाच्या कामीं त्यांचा हातखंडा आहे. म्हणून, इंग्रज राज्यावर येतील व इंग्रजी शिक्षणानें आपले देशी लोक बहिर्विषयक ज्ञान संपादन करतील, तेव्हां ते पुढें अंतर्विषयक ज्ञान प्राप्त करून घेण्यास समर्थ होतील. मग सनातन धर्माच्या प्रचाराच्या कामीं कांहीं विघ्नें येणार नाहींत. खरा हिंदुधर्म आपोआपच पुन्हां वर डोकें काढील. जोंपर्यंत हें होणार नाहीं, जोंपर्यंत हिंदुलोक पुन्हां ज्ञानवान् गुणवान् व बलवान् होणार नाहींत, तोंपर्यंत इंग्रजांचें राज्य सुरक्षित राहील. इंग्रजी राज्यांत प्रजा सुखी होईल व निर्बाधपणें धर्माचरण करील. म्हणून, हे बुद्धिमान् पुरुषा! इंग्रजांशीं युद्ध करण्याचें सोडून माझ्या मागून ये.

**सत्यानंदः**—महात्मन्! जर इंग्रजांना राज्यकर्ते करण्याचा आपला उद्देश होता, जर सध्यांच्या काळीं इंग्रजांचें राज्य देशाला मंगलकारक होतें, तर आम्हांला या युद्धाच्या कामांत कां घातलें?

**महा०**—सध्यां इंग्रज व्यापाराचा व्यवसाय करीत आहेत. त्यांचें लक्ष सध्यां पैसे मिळविण्याकडे आहे. राज्यशासनाची जबाबदारी ते घेऊं इच्छित नाहींत. पण या संतानांच्या बंडामुळें त्यांना आतां ती घ्यावी लागेल. कारण, राज्याधिकारावांचून यापुढें त्यांना धनप्राप्ति व्हावयाची नाहीं. इंग्रजांचें राज्य झालें अशा समजुतीनेंच हें संतानांचें बंड उपस्थित झालें. आतां चला. ज्ञानाचा लाभ करून घ्या, म्हणजे तुमच्या तुम्हांलाच या गोष्टी कळूं लागतील.

**सत्यानंदः**—महात्मन्! आतां मला ज्ञानप्राप्तीची इच्छा नाहीं. ज्ञानाशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. मीं जें हें व्रत एकदां घेतलें, तें घेतलें. तेंच मी आतां पाळणार. माझी मातृभक्ति अढळ राहील, असा आशीर्वाद आपण मला द्यावा.

**महापुरुषः**—व्रताची सफळता झाली. देशमातेचें कल्याण तुम्हीं केलें. इंग्रजांचें राज्य स्थापित झालें. आतां युद्धबिद्ध सोडा. लोक शेतकीच्या धंद्याला लागोत, पृथ्वी धनधान्यांनीं समृद्ध होवो आणि लोकांची संपत्ति वृद्धि पावो.

सत्यानंदाच्या डोळ्यांतून अग्नीच्या ठिणग्या बाहेर पडूं लागल्या. तो म्हणाला, शत्रूच्या रक्तानें भिजवून या धरणीमातेला आम्ही धनधान्यसंपन्न करूं.

**महापुरुषः**—शत्रू कोण ? आतां शत्रु बित्रु नाहीं. इंग्रज मित्र झाले आहेत. आतां त्यांच्याशीं लढून जय मिळवूं, असें सामर्थ्य कोणाच्याहि ठायीं नाहीं.

**सत्यानंदः**—तें नसलें तर याच ठिकाणीं, या मातेच्या मूर्तीपुढें मी प्राण त्याग करीन.

**महापुरुषः**—काय वेडेपणा हा ! चला, ज्ञान मिळवा. हिमालयाच्या शिखरा वर मातेचें मंदिर आहे. त्या ठिकाणीं मातृमूर्ति तुम्हांला दाखवितों.

इतकें बोलून त्या महापुरुषानें सत्यानंदाचा हात धरला. अहाहा ! किती अपूर्व शोभा दिसत होती ! त्या गंभीर विष्णुमंदिरांत, त्या प्रचंड आकाराच्या चतुर्भुज मूर्तीपुढें, मंद प्रकाशांत, त्या महाप्रतिभाशाली हातांत हात घातलेल्या दोन पुरुषमूर्ति किती शोभायमान दिसत होत्या ! ज्ञानानें येऊन भक्तीला धरलें, धर्मानें येऊन कर्माला धरलें, विसर्जनानें येऊन प्रतिष्ठेला, कल्याणीनें येऊन शांतीला धरलें. सत्यानंद हाच शांति, आणि महापुरुष तोच कल्याणी. सत्यानंद प्रतिष्ठा, महापुरुष विसर्जन.

विसर्जन येऊन प्रतिष्ठेला घेऊन गेला.





इकडून कोणाला जातांना तूं पाहिलेंस काय ? (३५९)

# मृणालिनी.



## प्रथम खंड



प्रकरण पहिलें.

### आचार्य.



एके दिवशीं प्रयागतीर्थी, गंगायमुनांच्या संगमाच्या ठिकाणीं वर्षाऋतूंतल्या संध्याकाळची अपूर्व शोभा दिसत होती. पावसाळ्याचे दिवस होते; पण मेघांचें नांव नव्हतें; अथवा जे कांहीं थोडेसे ढग होते, ते सोनेरी रंगाच्या लाटांप्रमाणें शोभायमान दिसत होते. सूर्य अस्ताला गेला होता. पावसाच्या पाण्यानें गंगा व यमुना या दोन्ही नद्यांचीं पात्रें तुडुंब भरलीं होतीं. तारुण्याच्या भरानें मस्त झालेल्या त्या दोघी बहिणींनीं जणू काय खेळण्याच्या मिषानें परस्परांना आलिंगन दिलें होतें ! वायूच्या झपाट्यानें अंगावरचा पदर जसा फडफडतो, त्याप्रमाणें त्यांच्या लाटा तीरावर ताड्ताड् आपटत होत्या.

एका लहान नावेंत दोनच उतारू होते. ती नाव मोठें धाडस करून फोंफों करीत वाहत जाणाऱ्या यमुनेच्या प्रवाहांतून जात जात प्रयागच्या घाटाजवळ लागली. तेव्हां एकजण नावेंत बसून राहिला; व दुसरा तीरावर उतरला. उतरलेला मनुष्य अगदीं तरुण होता. त्याची शरीरयष्टि बळकट होती, आणि त्याचा वेष वीर पुरुषाला शोभणारा होता. डोक्यावर पगडी, अंगांत चिलखत, हातांत धनुष्यबाण, पाठीवर बाणांचा भाता आणि पायांत जोडा होता. हा वीराकृति पुरुष अत्यंत सुंदर होता. घाटावर अनेक पुण्यप्राप्तीच्या खटपटींत असलेल्या बैरागी वगैरे लोकांचे आश्रम होते. त्यांपैकीं एका लहानशा आश्रमांत हा तरुण शिरला.

या आश्रमांत एक ब्राह्मण जप करीत बसला होता. त्याच्या शरीराचा बांधा उंच होता. शरीर शुष्क झालें होतें. मुखावर 'कृतांतकटकामलध्वजजरा' दिसूं लागली होती. कपाळावर व त्यावरील तालुप्रांताच्या विरल केशांत चर्चिलेली विभूति शोभायमान दिसत होती. त्याच्या कांतींत गंभीरता व नेत्रकटाक्षांत कठोरता होती. त्यामुळें त्याला पाहतांच हा निर्दय, अथवा भक्तिभावाला अपात्र, समजला जाण्याचा जरी संभव नव्हता, तरी, तशी शंका येण्यास जागा होती. अतिथीला पाहतांच, त्याची ती कठोरता दूर झाली, आणि चर्येवरील गांभीर्यांत प्रसन्नता दिसूं लागली. हा अतिथि ब्राह्मणाला नमस्कार करून त्याच्यासमोर उभा राहिला. ब्राह्मणानें आशीर्वाद देऊन म्हटलें, "हेमचंद्र ! मी बरेच दिवस तुझी वाट पाहत आहें."

हेमचंद्र नम्रभावानें म्हणाला, "क्षमा करावी. दिल्लींतलें काम सफल झालें नाहीं. उलट यवन माझ्या पाळतीवर राहिल्यामुळें मला सावधगिरीनें यावें लागलें. मला येण्याला उशीर लागला तो यामुळेंच."

ब्राह्मण म्हणाला, 'दिल्लीची सगळी बातमी मला कळली आहे. बख्तियार खिलजीला हत्तीनें मारलें असतें, तर चांगलें झालें असतें. देवांचा शत्रु पशूंच्या हातून नाश पावला असता. तूं त्याचे प्राण कां वांचविलेस ?'

**हेमचंद्रः**—त्याला आपल्या हातानें युद्धांत मारावें येवढयासाठीं. तो माझ्या पित्याचा वैरी, माझ्या पित्याच्या राज्याचा अपहार करणारा, तो माझ्याच हातून मारला गेला पाहिजे.

**ब्राह्मणः**—मग त्यावर रागानें चवताळून गेलेल्या हत्तीला तूं कां मारिलेंस ? बखत्यारला कां नाहीं मारिलेंस ?

**हेमचंद्रः**—मी काय चोरासारखा युद्ध न करतां शत्रूला मारीन ? मगधराज्य जिंकून घेणाऱ्या माणसाचा युद्धांतच पराभव करून पित्याचें राज्य मी परत मिळवीन. तसें न घडल्यास माझ्या 'मगधराजपुत्र' या नांवाला कलंक लागेल.

ब्राह्मणानें किंचित् कठोर स्वरानें म्हटलें, "या गोष्टी तर घडून पुष्कळ दिवस झाले ! यापूर्वीच तूं येथें यायला पाहिजे होतेंस. तुला यायला उशीर कां लागला ? तूं मथुरेला गेला होतास काय ?'

हेमचंद्रानें खालीं मान घातली. ब्राह्मण म्हणाला, " समजलों, मीं मना केलें असतांहि तूं मथुरेस गेलासच. बरें, जिला भेटण्यासाठीं तूं मथुरेस गेला होतास, तिची तरी भेट झाली काय ?"

यावर हेमचंद्रहि जरा रुक्षतेनें म्हणाला, 'नाहीं, भेट झाली नाहीं. ही आपलीच कृपा म्हटली पाहिजे. मृणालिनीला आपण कोठें पाठविली ?'

माधवाचार्य म्हणाले, 'मींच तिला कोठें तरी पाठविली, असा तर्क तूं कशाकरून केलास ?"

**हेमचंद्रः**—आपल्यावांचून ही गोष्ट कोण करणार ? मला मृणालिनीच्या दासीकडून कळलें कीं, माझी आंगठी पाहून मृणालिनी कोठें तरी निघून गेली. तिचा पत्ता नाहीं. आपण माझी ती आंगठी वाटखर्चीसाठीं मागून घेतली होती. तिच्याऐवजीं मी हवें तें रत्न देण्याला तयार होतों, पण आपण तें घेतलें नाहीं. तेव्हांच मला शंका आली होती; पण आपला शब्द माझ्यानें मोडवेना. म्हणून, मुकाट्यानें मीं ती आपणास दिली. आपण माझ्या विश्वासाचा चांगला मोबदला दिला म्हणावयाचा !

**माधवाचार्यः**—जरी तसा कांहीं प्रकार असला, तरी माझ्यावर तूं असा रागावूं नकोस. देवाचें कार्य तूं न केलेंस तर कोण करील ? या यवनांना तूं हाकून न लावलेंस तर कोण लावील ? यवनांचा निःपात हीच एक गोष्ट तूं आपल्या डोळ्यांपुढें ठेविली पाहिजेस. अशा वेळीं मृणालिनीनें तुझ्या मनाचा ताबा घेऊन काय उपयोग ? मागें मृणालिनीच्या आशेनें तूं मथुरेस बसून राहिला होतास, त्यामुळेंच तुझ्या पित्याचें राज्य गेलें. यवन आले तेव्हां हेमचंद्र मथुरेंत न राहतां मगध देशांत असता, तर यवनांची काय बिशाद होती कीं, ते मग मगधाचें राज्य जिंकून घेतील ? आतां पुन्हां त्याच मृणालिनीच्या पाशांत बद्ध होऊन तूं निष्क्रिय होऊन राहाणार काय ? या माधवाचार्यांच्या जिवांत जीव आहे, तोंपर्यंत हें घडणार नाहीं. तुला सांपडणार नाहीं, अशा ठिकाणीं मीं मृणालिनीला नेऊन ठेविलें आहे, तें येवढ्याचसाठीं.

**हेमचंद्रः**—आपल्या देव कार्याचें आपणच पाहून घ्या. माझी मर्यादा इतकीच.

**माधवाचार्यः**—तुला दुर्बुद्धि सुचली आहे. हीच का तुझी देवाविषयींची भक्ति ! बरें तर तसें कां होईना ? देवाला स्वतःचें कार्य साधण्यासाठीं तुझ्यासारख्या माणसाच्या साह्याची अपेक्षा नाहीं. तुझ्या आंगीं तेवढें शौर्य नसल्या-

मुळेंच तूं या लढाईच्या भानगडीपासून अलिप्त राहूं पहात आहेस ! हाच का तुझा पुरुषार्थ ? हेंच का तुझें शिक्षण ? राजकुळांत जन्म घेऊन राज्य परत मिळविण्यापासून तूं विन्मुख होऊं पाहतोस, याला काय म्हणावें ?

**हेमचंद्रः**—माझें राज्य–माझें शिक्षण–माझा पुरुषार्थ या सगळ्यांला जलसमाधि मिळो. मला त्याची पर्वा नाहीं.

**माधवाचार्यः**—नराधमा ! व्यर्थ तुझ्या आईनें नऊ महिने दहा दिवस तुला पोटांत वागवून यातना भोगल्या ! मीहि बारा वर्षें देवाची आराधना सोडून तुझ्यासारख्या पाषंडाला विद्या शिकविण्यांत व्यर्थ घालविलीं म्हणायचीं !

माधवाचार्य बराच वेळ हातावर गाल टेंकून स्तब्ध राहिले. हेमचंद्राचें सुंदर गौरवर्ण मुख मध्याह्नीच्या सूर्यकिरणांनीं कोमेजून टाकिलेल्या स्थलपद्माप्रमाणें आरक्त झालें. पण ज्वालामुखीच्या शिखराप्रमाणें तो शांतपणानें उभा राहिला होता. अखेर माधवाचार्य म्हणाले, " हेमचंद्र ! थोडा धीर धर. मृणालिनी कोठें आहे तें मी सांगेन. तिच्याशीं तुझा विवाहहि करून देईन. पण या वेळीं माझ्या सांगण्याप्रमाणें वाग. आधीं आपलें कार्य सिद्धीला ने. "

**हेमचंद्रः**—मृणालिनी कोठें आहे, तें समजल्याशिवाय यवनांच्या वधासाठीं मी तलवारीला स्पर्श करणार नाहीं.

**माधवाचार्यः**—आणि ती मेली असली तर ?

हे शब्द ऐकून हेमचंद्राचे नेत्र इंगळासारखे लाल झाले. तो म्हणाला, 'तर मग आपणच तिला मारली असली पाहिजे.' माधवाचार्य म्हणाले, 'मी कबूल करतों, मींच देवकार्यासाठीं वाटेंतला कांटा काढून टाकला. '

यावेळीं हेमचंद्राची चर्या वर्षणोन्मुख मेघाप्रमाणें झाली होती. धनुष्याला बाण लावून तो रागानें म्हणाला, "ज्यानें मृणालिनीला मारलें, त्याला मारणें मला उचितच आहे. या एका बाणानें गुरुहत्या आणि ब्रह्महत्या या दोन्ही एकदमच मी करतों पहा !'

माधवाचार्य हसून म्हणाले, "गुरुहत्या व ब्रह्महत्या करण्यास तुला जितका आनंद वाटतो, तितका स्त्रीहत्या करण्यांत मला वाटत नाहीं. या वेळीं निष्कारण पापाचा अधिकारी होऊं नकोस. मृणालिनी जिवंत आहे. शोध केलास, तर तुला तिची भेटहि घेतां येईल. आतां तूं या आश्रमांतून चालता हो. त्याला विटाळूं नकोस. तुझ्यासारख्या कुपात्र माणसाला मला कांहीं साह्य देतां येत नाहीं."

इतकें बोलून माधवाचार्य पूर्ववत् जप करूं लागले. हेमचंद्र आश्रमांतून बाहेर पडला आणि घाटावर येऊन एका लहानशा नावेंत जाऊन बसला. दुसरा एक मनुष्य त्या नावेंत होता. त्याला तो म्हणाला, 'दिग्विजय ! नाव सोड.'

दिग्विजय म्हणाला, "कोठें जावयाचें ?"

हेमचंद्र रागानें म्हणाला, "पाहिजे तेथें—मसणांत."

दिग्विजयाला आपल्या धन्याचा स्वभाव ठाऊक होताच. तो ओंठांतल्या ओंठांत पुटपुटला, "तो तर अगदीं जवळचा रस्ता आहे !" इतकें बोलून त्यानें नाव सोडली आणि ती नदीच्या प्रवाहाच्या उलट दिशेनें जाऊं लागली.

हेमचंद्र बराच वेळ स्तब्ध बसला होता. अखेर तो म्हणाला, 'चल, फिरव नाव मागें.'

दिग्विजयानें नाव फिरवून पुनः प्रयागच्या घाटाला आणून लाविली. हेमचंद्र तीरावर उडी मारून परत माधवाचार्यांच्या आश्रमांत गेला. त्याला पाहून माधवाचार्यांनीं विचारलें, 'कां ? पुनः कां आलास ?'

हेमचंद्र म्हणाला, " आपल्या म्हणण्याप्रमाणें करण्यास मी कबूल आहें. मृणालिनी कोठें आहे, तेवढें कृपा करून सांगावें.'

**माधवाचार्यः**—तूं सत्यवादी आहेस. माझ्या आज्ञेप्रमाणें वागण्याचें कबूल केलेंस यानेंच मला संतोष झाला आहे. गौडनगरांत एका शिष्याच्या घरीं मीं तिला ठेविली आहे. तुलाहि त्याच प्रदेशांत जावें लागेल; पण तुला तिचें दर्शन होणार नाहीं. मीं त्या शिष्याला मुद्दाम बजावून सांगितलें आहे कीं, मृणालिनी त्याच्या घरीं असे तोंपर्यंत अन्य पुरुषाशीं तिची भेट होऊं देऊं नकोस.

**हेमचंद्रः**—तिची भेट होणार नाहीं, असें आपण म्हणालांत, त्यानें मी कृतार्थ झालों. आतां आपली काय आज्ञा आहे, ती सांगावी.

**माधवाचार्यः**—तूं दिल्लीस जाऊन यवनांच्या काय मसलती चालल्या आहेत, त्याची बातमी आणिली असशीलच ?

**हेमचंद्रः**—वंगदेश जिंकण्याची त्यांची खटपट चालली आहे. लवकरच बखत्यार खिलजी सैन्य घेऊन गौड देशावर चालून जाणार आहे.

हें ऐकून माधवाचार्यांची मुद्रा हर्षानें प्रफुल्लित झाली. ते म्हणाले, ' फार दिवसांनीं देवाला या देशाची दया आली म्हणायची !'

हेमचंद्र माधवाचार्यांकडे एकाग्र दृष्टि लावून तो आतां काय म्हणतो इकडे लक्ष लावून उभा होता.

माधवाचार्य म्हणाले, 'आज कित्येक महिने गणित करण्यांत मी गढलों आहें. त्या गणितावरून जें भविष्य मीं वर्तविलें आहे, त्याप्रमाणें घडून येण्यास आतां सुरवात झाली आहे म्हणायची !'

**हेमचंद्रः**—ती कशी ?

**माधवाचार्यः**—माझ्या गणितावरून असें दिसून आलें कीं, यवनसाम्राज्याच्या नाशाचा प्रारंभ वंगराज्यापासून व्हावयाचा आहे.

**हेमचंद्रः**—तें संभवनीय आहे; पण किती काळानें व कोणाच्या हातून होणार ?

**माधवाचार्यः**—तेंहि मीं गणितानें काढलें आहे. जेव्हां पश्चिमेकडचे व्यापारी वंग राज्यांत येऊन हातांत शस्त्र धरतील, तेव्हां यवन राज्याचा उच्छेद होईल.

**हेमचंद्रः**—तर मग मला जयप्राप्ति होण्याचा संभव नाहीं म्हणायचा ? मी कांहीं व्यापारी नाहीं !

**माधवाचार्यः**—तूंहि व्यापारीच आहेस. तूं जेव्हां मृणालिनीच्या प्राप्तीसाठीं दीर्घकाळपर्यंत मथुरेंत राहिला होतास, तेव्हां कसला वेष घेतला होतास सांग पाहूं ?

**हेमचंद्रः**—त्या वेळीं व्यापाऱ्याच्या वेषानें राहिलों होतों खर !

**माधवाचार्यः**—अर्थात् तूंच तो पश्चिमदेशचा व्यापारी. गौड राज्यांत जाऊन तूं हातांत शस्त्र धरलेंस कीं, यवनांचा निःपात होणार. आतां उद्यांच तूं गौड देशास जाण्याला निघशील, असें वचन दे. जोंपर्यंत तूं यवनांशीं युद्ध करणार नाहींस, तोंपर्यंत मृणालिनीची भेट घेऊं नकोस.

हेमचंद्र लांब उसासा सोडून म्हणाला, 'आपण म्हणतां तशी शपथ मी घेतों; पण मीं एकट्यानें लढून काय होणार आहे ?'

**माधवाचार्यः**—गौड देशच्या राजाची फौज आहेच.

**हेमचंद्र**—असेल कदाचित्—त्याची सुद्धां शंकाच आहे; पण असली, तरी ती माझ्या हातीं कशी येईल ?

**माधवाचार्यः**—तूं पुढें जा तर खरा; नवद्वीपांत मी तुला भेटेन. तिकडे गेल्यावर त्याची खटपट करूं. तेथला राजा मला ओळखतो.

"आज्ञा" असें म्हणून हेमचंद्र नमस्कार करून निघाला. त्याची ती वीरमूर्ति जोंपर्यंत दिसत होती, तोंपर्यंत आचार्य त्याच्याकडे डोळ्याचें पाळें न लवूं

देतां सारखे पहात होते. तो दिसेनासा झाला; तेव्हां ते आपल्या मनाशीं म्हणाले, " जा बेटा ! प्रत्येक पावला गणित तुझी फत्ते होईल. जर मी ब्राह्मणाचा बच्चा असेन, तर तुझ्या केसालाहि धक्का लागणार नाहीं. मृणालिनी—ती मृणालिनी-मैना तुझ्या साठींच मीं पिंजऱ्यांत कोंडून ठेविली आहे. न जाणों, तिच्या मधुर कलरवानें मोहित होऊन महत्कार्यांचा तुला विसर पडेल. तो पडूं नये, येवढयासाठींच तुझें परम कल्याण चिंतणारा हा ब्राह्मण थोड्या दिवसांसाठीं तुझ्या मनाला पीडा देत आहे."

---

## प्रकरण दुसरें.

# पिंजऱ्यांतला पक्षी.



लक्ष्मणावती येथें हृषीकेश नांवाचा एक ब्राह्मण राहत होता. त्याची गणना श्रीमंतांत करतां आली नसती, किंवा गरीबांतहि करतां येण्यासारखी नव्हती. त्याचें राहतें घर फारच छानदार होतें. त्या पहा त्याच्या अंतःपुरांत दोघी तरुणी भिंतीवर चित्रपट काढीत आहेत. तेथें आपण जाऊन उभे राहूं. दोघीहि आपल्या कामांत अगदीं गढून गेल्या आहेत. तरी पण परस्परांशीं गोष्टी बोलण्याच्या आड त्यांचें काम येत नाहीं. त्यांचें संभाषण ऐन रंगांत आलें आहे. तें आपण ऐकूं या.

एक तरुणी दुसरीला म्हणाली, 'मृणालिनी ! आतां कां उत्तर देत नाहींस ? खरोखर त्या राजपुत्राची गोष्ट मला ऐकावीशी वाटते.'

'गडे मणिमालिनि ! तुझी आवडती गोष्ट सांग, मी ती आनंदानें ऐकेन.'

**मणि०**—माझी ती सुखदायक कहाणी ऐकून ऐकून मलाच जर पीडा होते, तर तुला ती कशासाठीं सांगायाची ?

**मृणा०**—पण तुला ती कोणीं सांगितली ? तुझ्या यजमानांनीं का ?

**मणि०**—दुसरें कोण सांगणार ? बरें पण, हें मीं काढलेलें कमळ पहाशील तर खरें ?

**मृणा०**—कमळ चांगलें काढलेंस म्हणजे झालें असें नाहीं. तुझें कमळ पाण्याच्या बरेंच वर आहे. सरोवरांत असें नसतें. कमळाचा देंठ पाण्याला लागून

असतो. चित्रांतहि तसाच काढायला हवा. आणखी कमळाजवळ कांहीं पानेंहि काढायला पाहिजेत. त्यावांचून कमळाला शोभा येत नाहीं. आणखी तुला काढतां आलाच तर त्याच्याजवळ एक राजहंसहि काढ.

**मणि०**—तो ग कशाला ?

**मृणा०**—तुझ्या यजमानाप्रमाणें कमळाशीं गुलगुल गोष्टी करायला.

**मणि०**—( हंसून )—दोघांचे कंठ मधुर खरे; पण मीं नाहीं हंसाचें चित्र काढायची ! त्या गुलगुल गोष्टींनीं माझें अंतःकरण जसें कांहीं करपून गेलें आहे.

**मृणा०**—हंस राहिला; चंडोल पक्षी तर काढशील ?

**मणि०**—नाहीं. तो पंख बाहेर काढून उडून जाईल एखादा ! मी कांहीं मृणालिनी नाहीं कीं, लागलीच त्याला प्रेमश्रृंखलेनें बद्ध करून ठेवायला !

**मृणा०**—चंडोल पक्षी जर असा दुष्ट आहे, तर मृणालिनीला ज्याप्रमाणें पिंजऱ्यांतच अडकवून ठेविलें आहे, त्याप्रमाणें त्या पक्षालाहि ठेव अडकवून.

**मणि०**—मी का मृणालिनीला अडकवून ठेविलें आहे ? ती आपण होऊन पिंजऱ्यांत येऊन बसली आहे.

**मृणा०**—तो माधवाचार्यांचा प्रताप !

**मणि०**—गडे ! तूं माधवाचार्यांच्या निष्ठुरपणाची गोष्ट सांगेन सांगेन म्हणून आज कित्ती दिवस म्हणते आहेस. आजच सांगेनास ? तूं माधवचार्यांच्या सांगण्यावरून बापाचें घर सोडून येथें कां आलीस ?

**मृणा०**—माधवाचार्यांच्या सांगण्यावरून आल्यें नाहीं. त्यांची आणि माझी ओळखहि नाहीं. मी कांहीं आपल्या स्वतःच्या इच्छेनेंहि येथें आल्यें नाहीं. एके दिवशीं संध्याकाळानंतर एका दासीनें मला ही अंगठी आणून दिली आणि म्हटलें ज्यांनीं ही दिली आहे, ते फुलबागेंत तुमची वाट पाहत उभे आहेत. हेमचंद्रानेंच भेटीच्या इच्छेनें संकेत म्हणून ती पाठविली असेल, असें मला वाटलें. माझ्या घराच्या मागेंच ती बाग होती. तिकडून यमुनेवरचा थंडगार वारा येत असे. तेथेंच आमच्या गांठी पडत.

**मणि०**—या गोष्टी ऐकून बाई मनाला कसेंसेंच वाटतें ! तूं कुमारी असून परपुरुषांशीं अशा प्रेमाच्या गुप्त गोष्टी कशी करीत होतीस ?

**मृणा०**—कसेंसें वाटण्यासारखें ग त्यांत काय आहे ? ते माझे यजमानच ना ? त्यांच्यावांचून दुसऱ्या कोणाच्याहि गळ्यांत माझ्या हातून माळ पडायची नाहीं.

**मणि०**--तें पुढचें पुढें; पण आज तर ते कांहीं तुझे यजमान नाहींत ? गडे ! रागावूं नकोस. मी तुला बहीण समजून बोलत्यें आहें.

मृणालिनी खालीं मान घालून बसली. थोड्या वेळानें तिनें डोळ्यांचें पाणी पुसलें आणि म्हटलें, ' मणिमालिनी ! या परदेशांत माझें जिव्हाळ्याचें, माझ्याशीं गोड शब्द बोलेल असें माणूस कोणी नाहीं. बरें, जे माझ्यावर प्रेम करणारे आहेत, त्यांचें दर्शन मला पुनः घडेलच असा भरंवसा नाहीं. तूंच एक माझी सखी आहेस. तूं जर माझ्यावर प्रेम न केलेंस, तर कोण करील ?

**मणि०**—मी तुझ्यावर प्रेम करत्येंच आहें आणि पुढेंहि करीन; पण तुझी आतां सांगितलेली गोष्ट ऐकून—

मृणालिनी न बोलतां पुनः मुकाट्यानें रडूं लागली. ती म्हणाली, ' तुझे हे शब्द माझ्याच्यानें ऐकवत नाहींत. मी जें कांहीं तुला सांगेन तें कोणाजवळहि न बोलण्याची शपथ वाहशील, तर मी सगळी हकीकत उघड करून तुला सांगेन. ती ऐकली म्हणजे मोकळ्या मनानें तूं माझ्यावर प्रेम करशील. '

**मणि०**—मी शपथ वाहत्यें; मग तर झालें ?

**मृणा०**—तुझ्या डोक्यांतल्या फुलावर देवाची मूर्ति आहे. त्या फुलाला हात लावून शपथ वाहा.

मणिमालिनीनें त्याप्रमाणें शपथ वाहिली.

यावर मृणालिनीनें तिला जें सांगितलें, त्यासंबंधानें येथें विस्तारानें लिहिण्याचें कारण नाहीं. ती हकीकत ऐकून मणिमालिनी संतुष्ट झाली, आणि गुप्त गोष्टीचा शेवट झाला.

मणिमालिनी म्हणाली, ' त्यावर माधवाचार्यांबरोबर तूं इकडे कशी आलीस ? ती हकीकत सांगत असलीस तर सांग. '

मृणालिनी म्हणाली, ' मी हेमचंद्रांची आंगठी पाहून त्यांची भेट होईल असा भरंवसा धरून बागेंत गेल्यें. तेव्हां ते नावेंत आहेत व नांव नदीच्या तीराला लागली आहे, असें दासीनें सांगितलें. फार दिवसांत राजपुत्राची भेट झाली नव्हती, म्हणून मी भेटीसाठीं फार आतुर झाल्यें होतें. त्यामुळेंच अविचारानें मी नदीच्या कांठीं गेल्यें, आणि पाहिलें तर खरोखरीच एक नांव तीरापाशीं होती.

बाहेर एक पुरुष उभा होता. हाच तो राजपुत्र असावा, असें माझ्या मनाला वाटलें. मी नावेच्या जवळ गेल्यें. नावेंत जो माणूस उभा होता, त्यानें माझा हात धरून जबरदस्तीनें मला नावेवर घेतलें आणि नाव चालू केली. त्याच्या हाताचा स्पर्श होतांच हा हेमचंद्र नाहीं, हें मीं ओळखलें.

**माणि०**—मग तूं मोठ्यानें ओरडली असशील ?

**मृणा०**—नाहीं. ओरडावेंसें एकदां मनांत आलें होतें; पण ओरडल्यें नाहीं.

**माणि०**—मी तुझ्या जागीं असत्यें तर नदींत उडीच टाकिली असती.

**मृणा०**—पण हेमचंद्राची भेट झाल्याशिवाय माझे प्राण कसे जातील ?

**माणि०**—बरें, मग पुढें काय झालें ?

**मृणा०**—प्रथमच तो पुरुष मला उद्देशून 'मातुश्री' असें म्हणाला आणि पुढें बोलला, 'मी तुम्हांला मातुश्री म्हणतों. मी तुमचें लेकरूं आहें. कांहीं शंका मनांत आणू नका. माझें नांव माधवाचार्य. मी हेमचंद्राचा गुरु आहें. इतकेंच नाहीं तर हिंदुस्थानच्या राजांमध्यें अनेकांशीं माझा संबंध आहे. मी सध्यां एका महत्कार्यांत गुंतलों आहें. त्यांत हेमचंद्र हा माझा मोठा साह्यकर्ता आहे; पण त्यांत तुम्ही एक मोठें विघ्न आहां.

मीं म्हटलें, 'मी विघ्न ?'

**माधवाचार्य**—होय. तूंच विघ्न आहेस. यवनांना जिंकून हिंदुराज्याचें पुनरुज्जीवन करणें हें काम कांहीं सोपें नाहीं. हेमचंद्रावांचून दुसऱ्या कोणालाहि तें करतां येण्यासारखें नाहीं. हेमचंद्रानें दुसऱ्या गोष्टींत मन घातलें, तर त्यालासुद्धां तें करतां येणार नाहीं. जोंपर्यंत तुझी भेट त्याला सहज घेतां येईल. तोंपर्यंत हेमचंद्राला तुझ्यावांचून दुसरें कांहीं सुचावयाचें नाहीं. मग यवनांना कोण मारील ?'

मीं म्हटलें, 'समजल्यें. मला अगोदर मारल्याशिवाय यवनांना मारतां येणार नाहीं. आपल्या शिष्यानें आपल्या हातीं अंगठी पाठवून मला मारण्याची आज्ञा केली आहे वाटतें ?'

**माणि०**—त्या म्हाताऱ्याला तूं असें कसें बोललीस ?

**मृणा०**—बोलूं नाहीं तर काय करूं ? मला त्याचा भारी राग आला होता. माझ्या अंगाची लाही लाही होत होती. आणि संकटाच्या वेळीं लज्जा कसली धरायची ? माधवाचार्य मला मनांत फटकळ म्हणाला असेल. तो थोडासा

हसला आणि म्हणाला, 'मी तुला अशा रीतीनें आपल्या हातांत आणून ठेवीन अशी हेमचंद्राला कल्पना झाली नाहीं.'

मीं मनांत म्हटलें, 'तर मग ज्याच्यासाठीं मी जिवंत राहिल्यें, त्याच्या परवानगीवांचून आपण प्राणत्याग करूं नये.' माधवाचार्य म्हणूं लागले, 'तूं प्राणत्याग करण्याचें कारण नाहीं. कांहीं थोडा वेळ त्याचा विरह तुला सोसावा लागेल. त्यांत त्याचें परम कल्याण आहे. ज्याच्या योगानें त्याला राज्याची मालकी मिळून तुलाहि राणीपद प्राप्त होईल तें करणें हें तुझें कर्तव्य नाहीं काय? तुझ्या प्रेममंत्रानें त्याला अगदीं भारून टाकिलें आहे. त्याला शुद्धीवर आणणें तुला उचित नाहीं काय?' मीं म्हटलें, 'माझी नुसती भेट घेणेंसुद्धां जर त्यांना अनुचित वाटत असेल, तर त्यांची माझी कधींच भेट होऊं नये.' माधवाचार्य म्हणाले, 'पोरासोरांना वाटतें कीं आपण आणि वृद्ध माणसें यांच्या ठायीं विचारशक्ति सारखीच असते. पण खरोखर तसें नाहीं. हेमचंद्रापेक्षां माझी दृष्टि परिणामाकडे विशेष आहे, याविषयीं मनांत शंका बाळगूं नकोस. आणखी तुझी संमति मिळो वा न मिळो, मीं जो संकल्प केला आहे, तो मी पार पाडणारच. मी तुला परदेशाला नेणार आहें. गौड देशांतल्या एका शांत स्वभावाच्या ब्राह्मणाच्या येथें तुला ठेवून मी परत येईन. तो तुला स्वतःच्या मुलीप्रमाणें वागवील. एका वर्षानें मी तुला तुझ्या वडिलांकडे नेऊन पोंचवीन, आणि त्या वेळीं हेमचंद्र कशाहि स्थितींत असला तरी त्याच्याशीं तुझा विवाह होईल. मी बोलेन तसें खास करून दाखवीन.' या शेवटच्या गोष्टीमुळें म्हण कीं कसेंहि म्हण, पण मी गप बसल्यें. नंतर मी येथें आल्यें. पण गडे! हा मधुर स्वर कोठून आला?'

---

प्रकरण तिसरें.

# भिकारीण.



त्या दोघी सख्यांचें याप्रमाणें संभाषण चाललें होतें, इतक्यांत एक कोमल कंठांतून निघालेला मधुर संगीत ध्वनि त्यांच्या कानीं आला.

चाल—'घनःश्याम सुंदरा॰'

**मथुरावासिनी! मधुर हासिनि!**
**श्यामविलासिनि! परी--'**

**मृणा०**—गडे मणिमालिनी ! हा गाण्याचा शब्द कोठून ग येत आहे ?

**मणि०**—बाहेर कोणी तरी गात आहे झालें.

गाणारीण पुनः गाऊं लागली—

**' सांग मानिनी ! गृहासि त्यजुनी**
**कां अशी परदारीं ?'**

**मृणा०**—गडे मणिमालिनी ! कोण ग गात आहे ?

**मणि०**—असेल एखादी भिकारीण गात.

पुनः गाणें ऐकूं येऊं लागलें—

**' वृंदावनघन ! गोपीमोहन !**
**झिडकारिसि कां असा?**
**देशोदेशीं फिरे तुझ्यास्तव**
**श्यामल सुंदर पिसा !'**

मृणालिनी उत्कंठेनें म्हणाली, 'गडे ! तिला आंत बोलावून आणीनास ?'

मणिमालिनी तिला बोलवायला गेली. त्या वेळीं भिकारीण पुढील पद म्हणत होती—

**' विकसितनलिनीं यमुनापुलिनीं**
**तृषित फार मी पहा !**
**चंद्रशालिनी रम्य यामिनी**
**मधुमासांतिल अहा !**
**अतृप्त राही आशा सगळी—**
**भेट देई लौकरी—'**

इतक्यांत मणिमालिनीनें तिला हाक मारून आंत नेलें. तेव्हां भिकारीण आंत जाऊन गाऊं लागली—

**' अतृप्त राही आशा सगळी—**
**भेट देई लौकरी—**
**मोहन—मुरली ऐकूं येई—**
**कोठें असशी हरी ?**

मृणालिनी भिकारणीला, म्हणाली ' तुझा गळा फारच छान आहे. तूं पुनः मघाचें गाणें म्हण.'

गाणारणीचें वय सोळा वर्षांचें होतें. शरीराचा बांधा ठेंगणा होता आणि वर्ण काळा होता. इतका काळा कीं तिच्या अंगावर जर भ्रमर बसला असता, तर तो दिसला नसता. तिच्या अंगाला काळी शाई फासली असती, तर पाणीच लागलें आहे असें वाटलें असतें; आणि पाणी लाविलें असतें तर काळी शाई फासली आहे कीं काय असा भास झाला असता. आपल्या घरच्या माणसाचा कृष्णवर्ण असला म्हणजे आपण त्याला गौरवानें श्यामवर्ण म्हणतों; पण तेंच माणूस परक्या घरचें असलें म्हणजे निंदेनें त्याला धुतलेल्या विस्तवाची उपमा देतों, तितका तिचा कृष्णवर्ण होता. पण वर्ण कसाहि असला, तरी येवढी गोष्ट खरी कीं भिकारीण कांहीं कुरूप नव्हती. तिचें आंग स्वच्छ, धुतलेलें व तुकतुकीत होतें. तिची मुद्रा प्रफुल्लित होती. नेत्र चंचल होते आणि त्यांत हास्य चमकत होतें. डोळ्यांतलें बुबुळ काळेंभोर होतें. डोळ्यापाशीं एक तिळ होता. ओंठ लहान पण लाल होते. दांत कुंदाच्या कळ्यांसारखे बारीक असून पांढरे शुभ्र होते. केस बारीक व सडक होते. मानेवर पडलेली तिची वेणी मनाला मोहून टाकणारी होती आणि त्या वेणींत ताजीं टवटवीत जाईजुईचीं फुलें गुंफिलीं होतीं. अगोदरच शरीराची ठेवण चांगली आणि त्यांत तारुण्याचा भर, मग बांध्याचा घट्टपणा काय विचारावयाचा ? जणूं काय काळ्या संगमरवरी पाषाणाची पुतळी घडविल्यासारखी दिसत होती. तिच्या आंगावरचें वस्त्र अगदीं हलक्या प्रतीचें पण स्वच्छ होतें. शेणमातीनें लडबडलेलें नव्हतें. ती अगदींच लंकेची पार्वती नव्हती. आंगावर एखाद दुसरा दागिना होता, पण तो तिच्या गरिबीला शोभण्यासारखा होता. हातांत पितळेच्या बांगड्या होत्या. गळ्यांत तुळशीची माळ होती. दोन्ही भिवयांच्या मधून खालीं नाकाच्या मध्यभागापर्यंत कुंकुवाचा उभा पट्टा ओढलेला होता आणि वर कपाळीं गोपीचंदनाचा टिळा लाविलेला होता. मृणालिनीच्या आज्ञेवरून भिकारीण पुनः मघाचें गाणें गाऊं लागली—

‘ मथुरावासिनि ! मधुरहासिनि !
श्याम विलासिनि परी—
सांग सुंदरि ! गृहासि त्यजुनी
कां अशी परदारीं ?
वृंदावनधन ! गोपीमोहन !
झिडकारिसि कां असा ?

देशोदेशीं फिरे तुझ्यास्तव
श्यामल सुंदर पिसा !
विकसितनलिनीं यमुना पुलिनीं
तृषित फार मी पहा !
चंद्रशालिनी रम्ययामिनी
मधुमासांतिल अहा !
अतृप्त राही आशा सगळी
भेट देइं लौकरी
मोहन-मुरली ऐकूं येई
कोठें असशी हरी ?'

गाणें समाप्त झाल्यावर मृणालिनी म्हणाली, 'तूं फार गोड गात्येस ! गडे मणिमालिनी ! हिला कांहीं दे ग !'

मणिमालिनी तिला देण्यासाठीं कांहीं इनाम आणण्याकरितां घरांत गेली. तेवढया संधींत मृणालिनीनें भिकारणीला जवळ बोलावून तिला विचारलें, 'तुझें नांव काय ?'

**भिका०**—माझें नांव गिरिजाया.

**मृणा०**—तुझें घरदार कोठें आहे ?

**भिका०**—येथेंच.

**मृणा०**—तूं काय अशीं गाणीं म्हणूनच पोट भरत्येस ?

**गिरि०**—मला दुसरें कांहीं येत नाहीं.

**मृणा०**—तुला हीं गाणीं कोणी शिकविलीं ?

**गिरि०**—जेथें जें ऐकण्यांत आलें तें तेथें मीं शिकून घेतलें.

**मृणा०**—आतांचें हें गाणें कोठें शिकलीस ?

**गिरि०**—एका शेटजीजवळ.

**मृणा०**—ते कोठें असतात !

**गिरि०**—याच शहरांत.

मृणालिनीची मुद्रा हें ऐकून हर्षानें प्रफुल्लित झाली. जणूं काय प्रातःकाळच्या सूर्यकिरणांच्या स्पर्शानें कमळ उमललें !

**मृणा०**—शेटजी व्यापार धंदा करीत असतीलच ? ते कशाचा व्यापार करतात ?

**गिरि०**—सर्व लोक ज्याचा करतात त्याचा

**मृणा०**—म्हणजे काय ?

**गिरि०**—गोष्टी सांगण्याचा.

**मृणा०**—हा बाई नवीनच व्यापार ऐकत्यें ! त्यांत नफातोटा कोणता होतो ?

**गिरि०**—या व्यापारांत होणारा नफा म्हणजे प्रेमाचा लाभ आणि तोटा म्हणजे रडत बसण्याचा.

**मृणा०**—तुझाहि तोच व्यापारधंदा दिसतो ? त्यांचा सावकार कोण ?

**गिरि०**—तेच स्वतः

**मृणा०**—तूं त्यांची कोण ?

**गिरि०**—मजुरीचा पैसा रोख घेऊन काम करणारी.

**मृणा०**—ठीक. तुझ्या जवळचा माल दाखीव पाहूं !

**गिरि०**—माझ्या जवळचा माल पाहण्याचा नाहीं, ऐकण्याचा आहे.

**मृणा०**—बरें तर. ऐकूं दे.

गिरिजाया गाऊं लागली—

( चाल—' मी कुमार, तीहि कुमारी ' )

**'हें निधान गवसे मजला, यमुनेच्या सुविमल सलिलीं**
**मारुनी बुडी काढी, तों—बहुमोल रत्न करकमलीं !**
**निद्रेनें जों तनुहि विकला;**
**तस्कर मम गृहिं कीं हो शिरला ;**
**मम कंठींचा हार तोडिला;**
**नेलें त्या हरुनी रत्ना ! '**

हें गाणें ऐकून मृणालिनीच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले आणि तिचा कंठ सद्गदित झाला. हसत हसत तिनें विचारलें, 'ही कोणत्या चोराची गोष्ट आहे ? '

**गिरि०**—शेटजी म्हणाले कीं, चोरीचा माल घेणें हाच आपला व्यापार धंदा आहे.

**मृणा०**—त्यांना म्हणावें कीं असल्या चोरीच्या धंद्यांत चांगल्या माणसांचे प्राण वांचायचे नाहींत.

**गिरी०**—व्यापाऱ्याचीहि तीच दशा होईल असें दिसतें.

मृणा०—कां बरें ? त्याला काय होईल ?

गिरिजाया गाऊं लागली

( चाल–हाय मी ! परदार कन्हैया )

'शोधुं कुठें मी प्रियकर माझा ?
तो मनमोहन, जीवन राजा ! ॥ ध्रु० ॥
यमुनातीरीं, मार्गी–चहुंकडे
शोधुनि दमल्यें प्राणविसांवा ॥ १ ॥
हृदय तळमळे कमल धराया
हाय ! दिसेना तो सुमराज ॥ २ ॥
कमल कुठें रे ! म्हणाल तरि तें
शमविल माझ्या दाह जिवाचा ॥ ३ ॥

मृणालिनीनें प्रेमळ कोमल स्वरानें विचारलें 'मृणाल कोठें आहे ? मी सांगत्यें याचा पत्ता. तो तूं ध्यानांत ठेवशील ? '

गिरि०—सांगावा. ठेवीन मी ध्यानांत.

मृणालिनी म्हणाली.

( चाल–'नदंनवन देवीनें' )

कंटकयुत करि नीच विधाता, त्या मम प्रिय कमला
म्हणुनी निर्घृण सलिलीं बुडवी दुःखभरें मीं त्याला ॥ १ ॥
नयनमनोहर राजहंस मीं देखियला सरसीं
चरणसरोजीं मिठी मारुनी धरिलें करपाशीं ॥ २ ॥
"हंसराज ! मम हृदयकमल हें अर्पिन तुज प्रीतीं
जाऊं नको रे !" विनवि म्हणुनि करि हृत्कमलीं वसती ॥ ३ ॥
रोमांचितवपु; कंपित सुतनु मृणालिनी होई
नभोदरीं ये कृष्णमेघ तों, हंस उडुनि जाई ॥ ४ ॥
मानससरसीं विहार करण्या मृतगति तो गेला
निष्ठुर मेला हृत्कमलाचा ध्वंसक हो झाला ॥ ५ ॥
शोकभरानें विव्हळ होउनि मूर्च्छित झणिं पडली
मृणालिनी कीं प्रणयरागिणी जलीं बुडुनि मेली ॥ ६ ॥

गिरिजाये ! तूं हें गाणें शिकशील ?

**गिरि०**—हो. शिकेन. पण डोळ्यांना पाणी येण्यापर्यंत आणि अगदीं शुद्ध रीतीनें कसें शिकतां येईल ?

**मृणा०**—तितकें न आलें तरी चालेल. आजच्या आपल्या व्यवहारांत मला येवढाच फायदा झाला म्हणायचा !

मृणालिनीनें गिरिजायेकडून हें गाणें पुष्कळ वेळां म्हणवून घेतलें. इतक्यांत मणिमालिनीचीं पावलें वाजलेलीं ऐकूं आलीं. मणिमालिनी तिची प्रेमळ मैत्रीण होती, हें सर्वांना ठाऊक होतें. तरी ती आपल्या पित्याची आज्ञा मोडण्याच्या कामांत मदत करील, असें कोणाला वाटलें नव्हतें. म्हणून मृणालिनी ही गोष्ट तिच्यापासून लपवून ठेवण्याचा यत्न करीत होती. मृणालिनी गिरिजायेला म्हणाली, ' आज इतकेंच पुरे. तुझ्या शेटजीची भेट घे. तूं आपला माल पुनः उद्यां घेऊन ये. घेण्यासारखा कांहीं माल आढळला तर घेऊं. '

गिरिजाया निघून गेली. तिला कांहीं इनाम देण्याची गोष्ट आपण काढली होती, ही गोष्ट मृणालिनी विसरून गेली.

गिरिजाया थोडींशीं पावलें दूर गेली असेल, इतक्यांत मणिमालिनी तिला देण्यासाठीं तांदूळ, एक केळें, एक जुनें लुगडें व दोन चार आण्यांचे रोख पैसे घेऊन आली. तिनें गिरिजायेला परत बोलावून तें सगळें तिला दिलें. तिला देण्यासाठीं एक लुगडें आणायला मृणालिनीहि उठून गेली. तें देतां देतां मृणालिनीनें तिच्या कानांत सांगितलें, ' माझ्यानें धीर धरवत नाहीं. उद्यांपर्यंत माझ्यानें थांबवणार नाहीं. आजच प्रहर रात्रीं तूं ये आणि या घराच्या उत्तरेला भिंतीच्या खालीं उभी राहा. तेथें मी तुला भेटेन. तुझे शेटजी आले तर त्यांनाहि घेऊन ये.'

**गिरि०**—समजल्यें. मी खास येईन.

मृणालिनी मणिमालिनीकडे परत गेल्यावर मणिमालिनीनें विचारलें, ' गडे मृणालिनी ! भिकारणीच्या कानांत तूं कायग सांगितलेंस ? '

**मृणा०**—काय सांगूं सखे !—

( चाल—अजि शेवटचा लाभ० )

**' तुज काय सखे, सांगूं गे, फिरफिरुनी**
**दुःखद ये स्मृति ती म्हणुनी !**
**" वद काय तिनें सांगितलें गुज कानीं "**
**म्हणसी मज काय गे अजुनी ?**
**ती तीच कथा कथिली मजलागून**

जी मनांतली निज खूण
तो राजहंस प्रिय माझा।
जो प्यार जिवाचा कलिजा।
मन मोहन जीवन राजा।
तो येईल का? सखये! आतां फिरुनी
मद्भवना स्मृति ठेवोनी'

---

## प्रकरण चौथें.

## दूती.

—०—

लक्ष्मणावती नगरीच्या एका भागांत सर्वधन नांवाच्या एका व्यापाऱ्याच्या वाड्यांत हेमचंद्र राहत होता. त्या वाड्याच्या दारापाशीं एक अशोक वृक्ष होता. तिसरे प्रहरीं त्या झाडाखालीं बसून तो हातांतल्या सुरीनें त्या वृक्षाची फुललेली एक डाहळी उगीचच्या उगीच तोडून तिचे तुकडे तुकडे करीत होता आणि मधून मधून रस्त्याकडे पाहत होता जणू काय तो कोणाची मार्ग प्रतीक्षा करीत बसला होता. ज्या माणसाच्या येण्याकडे त्याचे डोळे लागले होते, तें आलें नाहीं. त्याचा चाकर दिग्विजय आला. हेमचंद्र दिग्विजयाला म्हणाला, 'दिग्विजय! ती भिकारीण आज अद्याप आली नाहीं! मला तिची फार उत्कंठा लागली आहे. तूं एकदां तिच्या शोधासाठीं जा पाहूं?'

'जो हुकूम' म्हणून दिग्विजय गिरिजायेच्या शोधाला निघाला. जातां जातां वाटेंतच ती त्याला भेटली.

गिरि—कोण? दिग्विजय?'

दिग्विजय रागानें म्हणाला, 'माझें नांव दिग्विजय आहे.'

गिरि०—बरें दिग्विजय! आज कोणत्या दिशेला जय मिळविण्याला स्वारी निघाली आहे?

दि०—तुझ्याचकडे येण्याला निघालों होतों.

गि०—मी काय दिशा आहें? तुला अजून दिशासुद्धां का कळत नाहींत?

दि०—कोठून कळणार? कारण, तूं म्हणजे काळोखा इतकी गोरी! बरें, तें असो; पण अगोदर चल. धनीसाहेबांनीं तुला बोलाविलें आहे.

**गिरि०**—तें कां ?

**दि०**—माझ्याशीं तुझें लग्न करून द्यायचा त्यांचा बेत दिसतो.

**गिरि०**—कां बरें ? तुझ्या तोंडाला आग लावायला दुसरें कोणीं माणूस मिळालें नाहीं वाटतें ?

**दि०**—नाहीं. तें कार्य तुलाच करावें लागेल. चल लवकर.

**गिरि०**—दुसऱ्यांच्या साठींच मी मरत असत्यें. बरें, चल.

इतकें बोलून गिरिजाया दिग्विजयाबरोबर जाऊं लागली. दिग्विजय अशोक वृक्षाखालीं बसलेल्या हेमचंद्राकडे बोट दाखवून आपण दुसरीकडे निघून गेला. हेमचंद्र हलक्या स्वरानें गात होता—

**'विकासित नलिनीं यमुना पुलिनीं**
**तृषित फार मी पहा !'**

इतक्यांत गिरीजाया हळूच त्याच्या पाठीमागें उभी राहून गाऊं लागली—

**'चंद्रशालिनी रम्य यामिनी**
**मधुमासांतिल अहा !'**

गिरिजायेला पाहतांच हेमचंद्राची चर्या प्रफुल्लित झाली. तो म्हणाला, 'कोण ? गिरिजाया ? इच्छा तृप्त झाली ?'

**गिरि०**—कोणाची इच्छा ? आपली कीं माझी ?

**हेम०**—माझी. ती तृप्त झाली कीं तुझीहि तृप्त होईलच.

**गिरि०**—आपली इच्छा कशी तृप्त होणार ? लोक म्हणतात कीं राजेरजवाडे यांच्यासारख्या बड्या लोकांची इच्छा कशानेंहि तृप्त होत नसते.

**हेम०**—माझी इच्छा अगदीं सामान्य प्रतीची आहे.

**गिरि०**—आपली मृणालिनीशीं यदाकदाचित भेट झाली, तर तेव्हां आपण त्यांच्याजवळ असें बोलून दाखवा, म्हणजे पाहीन.

हें ऐकून हेमचंद्र खिन्न झाला, आणि म्हणाला, 'एकूण आजसुद्धां तिचा शोध लागला नाहीं वाटतें ? आज कोणत्या पेठेंत गाणीं म्हणत गेली होतीस ?'

**गिरि०**--एकच काय ? पुष्कळ पेठांतून हिंडल्यें. रोजरोज तेंच तें आपणाला काय सांगायचें ? दुसरी एखादी गोष्ट आपण काढावी.

हेमचंद्रानें उसासा टाकून म्हटलें, 'समजलों. दैवच फिरलें आहे ! ठीक आहे. पुनः उद्यां तिच्या शोधासाठीं जा.'

तेव्हां गिरिजाया मुद्दामच निरोप घेण्याचें मिष करूं लागली. ती जाऊं लागली तसें हेमचंद्र म्हणाला, ' गिरिजाये ! तुझ्या चर्येवर हास्याचें चिन्ह दिसलें नाहीं, तरी तुझ्या डोळ्यांत तें मला दिसतें आहे. आज तुझें गाणें ऐकून तुझ्याशीं कोणी कांहीं बोललें कीं नाहीं ? '

**गिरि०**—कोण काय बोलणार ? नाहीं म्हणायला एक तरुण स्त्री मात्र घाईनें मला मारायला धावली आणि म्हणाली, ' मथुरावासिनीमुळेंच तर श्यामसुंदराच्या जिवाला व्यर्थ त्रास होत आहे. '

हेमचंद्र लांब उसासा टाकून ओठांतल्या ओठांत जणूं काय तो आपल्या मनाशींच बोलत आहे अशा रीतीनें म्हणाला, ' इतकी खटपट करूनहि शोध लागला नाहीं, तेव्हां आतां आशा करणें व्यर्थ आहे म्हटलें पाहिजे. आतां या शोधांत निष्कारण काळ घालवून आपल्या कामाकडे दुर्लक्ष करण्यांत काय अर्थ आहे ? गिरिजाये ! उद्यां तुला या शहराला रामराम ठोकावा लागेल. समजलीस ?'

'तथास्तु' असें म्हणून गिरिजाया मृदु स्वरानें गाऊं लागली—

**' मोहन मुरली ऐकूं येई—कोठें अससी हरी ?'**

हेमचंद्र म्हणाला, ' पुरे झालें हें गाणें. दुसरें एखादें गाणें म्हण.

गिरिजाया गाऊं लागली—

**' गृहीं सखये ! तरुवरीं पुष्प फुललें,**
**स्वयें खुडुनी पळवुनी कां न नेलें ?'**

**हेम०**—वाऱ्यानें उडून गेलेल्या फुलासाठीं येवढें दुःख कशाला करायला पाहिजे ? बरें. गाणें पुढें म्हण पाहूं ?

गिरिजाया पुढें गाऊं लागली—

**' कंटकयुत करि नीच विधाता**
**त्या मम प्रिय कमला**
**म्हणुनी निर्घृण सलिलीं बुडवी**
**दुःखभरें त्याला ! '**

**हेम०**—काय ? काय ? कमलाविषयींचें काय आतां गाइलेंस ?

**गिरि०**—

**कंटकयुत करि नीच विधाता**
**त्या मम प्रिय कमला**

म्हणुनी निर्घृण सलिलीं बुडवी
दुःखभरें त्याला ॥ १ ॥
नयनमनोहर राजहंस मीं
देखियला सरसीं
चरणसरोजीं मिठी मारुनी
धरिलें करपाशीं ॥ २ ॥

छेः ! दुसरें गाणें म्हणत्यें.

**हेम०**—नाहीं नाहीं. हेंच गाणें म्हण—हेंच—हेंच. तूं मोठी दुष्ट आहेस !

**गिरि०**—

'हंसराज ! मम हृदयकमल हें
अर्पिन तुज प्रीतीं,
जाउं नकोरे'—विनवी म्हणुनी
करि हृत्कमलीं वसती ॥
रोमांचित-वपु कंपित सुतनू
मृणालिनी होई'

**हेम०**—गिरिजाये ! हें गाणें तुला कोणीं शिकविलें ?

**गिरि०**—( हंसून )—

'नभोदरीं ये कृष्णमेघ तों
हंस उडुनि जाई ॥ ३ ॥
मानस-सरसीं विहार करण्या
द्रुतगति तो गेला
निष्ठुर मेला ! हृत्कमलाचा ध्वंसक हो झाला ! ॥ ४ ॥
शोकभरानें विद्ध होऊनि
मूर्च्छित झणिं पडली
मृणालिनी कीं प्रणयरागिणी
जलीं बुडुनि मेली ॥ ५ ॥'

हेमचंद्र डोळ्यांत अश्रु आणून सद्गदित कंठानें गिरिजायेला म्हणाला, 'ही माझीच मृणालिनी ! तूं तिला कोठें पाहिलेंस ?'

**गिरि०**—

**' मृणालावरि कंपित सरसिं पाही**
**अनिलवेगें ती मृणालिनी होई ॥'**

**हेम०**—तुझें हें अलंकारिक भाषण आतां टाकून दे आणि माझ्या प्रश्नाचें सरळ उत्तर दे. मृणालिनी कोठें आहे ?

**गिरि०**—याच नगरांत.

हेमचंद्र रागावून म्हणाला, ' तें तर मला पुष्कळ दिवसांपासून ठाऊक आहे. या नगरांत खरें, पण कोणत्या ठिकाणीं ?'

**गिरि०**—हृषीकेशशर्मा ब्राह्मणाच्या घरीं.

**हेम०**—किती ग द्वाड आहेस तूं. ही गोष्ट तर मींच तुला सांगितली होती ! इतके दिवस तूं तिच्या शोधांत आहेस. कांहीं लागला का शोध ?

**गिरि०**—हो लागला.

हेमचंद्राच्या डोळ्यांतून दोन अश्रुबिंदु टपकन् गळून पडले. त्यानें विचारलें, ' ती जेथें आहे, तें ठिकाण येथून किती दूर आहे ?'

**गिरि०**—बरेंच दूर.

**हेम०**—येथून जायचें झालें तर कोणत्या दिशेनें जावें लागेल ?

**गिरि०**—अगोदर दक्षिण दिशेनें जाऊन नंतर पूर्वेकडे वळायचें, आणि मग उत्तरेकडे जाऊन पुढें पश्चिमेला—

ही सगळी चेष्टा चाललेली पाहून हेमचंद्र रागानें मूठ आवळून म्हणाला, ' ही चेष्टा पुरे झाली. नीट सांग, नाहीं तर पहा तुझें डोकें फोडीन.'

**गिरि०**—जरा शांत व्हा. नुसता तोंडानें रस्ता सांगितल्यानें आपणास तो थोडाच सांपडणार आहे ! जर नाहीं, तर तो विचारण्यांत काय अर्थ ? आपली आज्ञा होईल तर मीं स्वतःच आपल्याबरोबर येईन.

हें ऐकतांच हेमचंद्राची मुद्रा मेघाचें आवरण दूर होतांच सूर्यबिंब जसें प्रकाशित दिसतें तशी प्रफुल्लित दिसूं लागली. तो म्हणाला, 'तुझ्या सगळ्या इच्छा पूर्ण होवोत. मृणालिनी कांहीं बोलली काय ?'

**गिरि०**—तेंच तर मी सागत्यें आहे—

**'मृणालिनी कीं प्रणयरागिणी**
**जलीं बुडुनि मेली !'**

**हेम०**—मृणालिनी कुशल आहे ना ?

**गिरि०**—त्यांची शरीरप्रकृति ठीक दिसली.

**हेम०**--ती सुखांत आहे कीं कष्ट सोशीत आहे? तुला काय दिसलें?

**गिरि०**--अंगावर छानदार कपडे आणि छानदार दाग दागिने होते. हृषीकेश ब्राह्मणाच्या मुलीची मैत्रीण--त्यांना काय कमी आहे?

**हेम०**--द्वाड कुठली! तुला तें का मी विचारतों आहें? तिच्या मनाची स्थिति कशी काय दिसली?

**गिरि०**--वर्षाऋतूंतल्या कमलासारखें त्यांचें मुख पाण्यावर तरंगतें आहे.

**हेम०**--दुसऱ्याच्या घरीं ती कशी काय राहते?

**गिरि०**--अशोक पुष्पांचा गुच्छाप्रमाणें--स्वतःच्या मोठेपणानें स्वतः नम्रता धारण करून.

**हेम०**--गिरजाये! तूं वयानें मात्र लहान आहेस--पण तुझ्यासारखी मुलगी मीं कोठेंहि पाहिली नाहीं.

**गिरि०**--डोकें फोडण्याला इतकी योग्य मुलगी आपल्या पाहाण्यांत खरोखरीच आली नसेल.

**हेम०**--मीं ते शब्द तुला बोललों ही माझी चूक झाली. ते तूं मनावर घेऊं नकोस. मृणालिनी आणखी काय म्हणाली?

**गिरि०**--'जे दिनीं जानकी--'

**हेम०**--पुढें?

**गिरि०**--रघुविर नीरखी--'

हेमचंद्रानें रागानें गिरिजायेचे केस धरले, तेव्हां ती म्हणाली, 'सोडा! सोडा! सांगत्यें.'

'सांग तर' असें म्हणून हेमचंद्रानें तिचे केस सोडले.

मग गिरिजायेनें मृणालिनीशीं तिचें जें संभाषण झालें होतें, तें साद्यंत सांगितलें. नंतर ती म्हणाली, 'महाराज! मृणालिनीला भेटण्याची आपणाला इच्छा असली तर एक प्रहरभर रात्रपर्यंत माझ्यावरोबर आपण हिंडलें पाहिजे.'

गिरिजायेचें बोलणें संपल्यावर बराच वेळ हेमचंद्र अगदीं स्तब्ध राहिला, आणि त्या अशोकवृक्षाखालीं इकडून तिकडे फिरूं लागला. बऱ्याच वेळानें कांहीं एक न बोलतां तो वाड्यांत गेला, आणि आंतून एक पत्र आणून व तें गिरिजायेच्या हातांत देऊन तो म्हणाला, 'मृणालिनीची भेट या वेळीं मला घेतां येत नाहीं. तूंच रात्रीं तिला जाऊन भेट आणि हें येवढें पत्र तिला दे. तिला म्हणावें, देव कृपा

करील तर एका वर्षांतच आपल्या भेटी पुनः होतील. ती काय म्हणत्ये तें तूं मला रात्रीं येऊन सांग.'

गिरिजाया निरोप घेऊन निघाली. ती गेल्यावर हेमचंद्र बराच वेळपर्यंत सचिंत होऊन अशोकवृक्षाखालीं गवतावरच निजून राहिला. बाहूवर मस्तक टेकून आणि जमिनीकडे तोंड करून तो पालथा निजला होता. कांहीं वेळानें एकाएकीं त्याच्या पाठीला कोणाच्या तरी कठोर हाताचा स्पर्श झाला. तेव्हां हेमचंद्रानें तोंड फिरवून पाहिलें तों माधवाचार्य समोर उभे !

आचार्य म्हणाले, 'वत्सा ! ऊठ ! तुझा मला रागहि आला आहे—आणि तुझ्यावर मी प्रसन्न आहें. तूं असा माझ्याकडे आश्चर्यचकित टक लावून कां पाहत आहेस ?

हेमचंद्र म्हणाला, 'आपण येथें कोठून आलांत ? '

माधवाचार्यांनीं या प्रश्नाचें कांहीं एक उत्तर न देतां म्हटलें, ' तूं अजून नवद्वीपाला न जातां वाटेंत असा रेंगाळत आहेस यामुळें तुझा मला राग आला आहे. पण त्याबरोबर तूं आपल्या प्रतिज्ञेचें स्मरण ठेवून तिच्या परिपालनासाठीं, मृणालिनीचा शोध लागला असतांहि तिच्या भेटीचा सुयोग आला असतांहि त्याच्याकडे दुर्लक्ष केलेंस हें पाहून माझ्या मनाला फार समाधान वाटलें. मी तुला कोणत्याहि प्रकारें दोष देत नाहीं. पण आतां तूं येथें फारसा वेळ घालवूं नकोस. मृणालिनीच्या उत्तराची सुद्धां वाट तूं पाहूं नकोस. मनुष्याची वृत्ति चंचल असते. तिचा विश्वास धरतां येत नाहीं. मी आज नवद्वीपाला जात आहें. तुलाहि माझ्याबरोबर यावें लागेल. नाव तयार आहे. तुला बरोबर जीं काय शस्त्रें वगैरे घ्यावयाचीं असतील तीं घरांतून घेऊन ये, आणि माझ्याबरोबर चल.'

हेमचंद्रानें लांब उसासा टाकून म्हटलें, ' माझ्याकडून कोणतीहि हरकत नाहीं. मी आतां सगळ्या गोष्टींची आशा, आकांक्षा, वगैरे सोडली आहे. चलावें. पण आपण इच्छाशक्तीनें हवें तिकडे जाणारे आहां कीं अंतर्ज्ञानी आहां, तें कांहीं कळत नाहीं.'

इतकें बोलून हेमचंद्र पुनः घरांत गेला, आणि घराच्या मालकाचा—व्यापाऱ्याचा— निरोप घेऊन आणि आपली चीजवस्त बांधलेलें गांठोडें एका गड्याच्या डोक्यावर देऊन आचार्यांच्या मागून जाऊं लागला.

---

# प्रकरण पांचवें.

## लुब्ध

—०—

मृणालिनी व गिरिजाया या दोहोंपैकीं कोणीहि आपल्या वचनाला विसरली नाहीं. दोघीहि प्रहरभर रात्र होतांच हृषिकेशाच्या घराच्या जवळ एकेजागीं आल्या. मृणालिनी गिरिजायेला पाहतांच म्हणाली, 'हें काय ! हेमचंद्र कुठें आहेत ?'

ती म्हणाली 'ते आले नाहींत.'

'आले नाहींत' हे शब्द मृणालिनीच्या अंतःकरणाच्या अगदीं तळाशीं ध्वनित झाले. क्षणभर दोघीहि तटस्थ उभ्या राहिल्या. नंतर मृणालिनीनें विचारलें, 'कां आले नाहींत ?'

**गिरि०**—तें मला ठाऊक नाहीं. त्यांनीं हें पत्र दिलें आहे.

इतकें बोलून तिनें पत्र हातांत दिलें. मृणालिनी म्हणाली, 'पण आतां हें वाचायचें कसें ? घरांत जाऊन दिव्यापाशीं वाचीन म्हटलें, तर मणिमालिनी उठायची !'

**गिरि०**—अशा अधीर होऊं नका. मीं दिवा, तेल, चकमक, झिलप्या, सगळें कांहीं आणिलें आहे. आतां दिवा लावून देत्यें पहा.

गिरिजायेनें त्याप्रमाणें लवकरच दिवा लाविला; पण चकमक झाडल्याचा ब्द घरांतल्या एका माणसानें ऐकला. दिव्याचा उजेड मात्र त्याला दिसला नाहीं.

गिरिजायेनें दिवा लाविल्यावर मृणालिनीनें पुढील पत्र मनांतल्या मनांत वाचलें.

'मृणालिनी ! कोणत्या तोंडानें मी तुला पत्र लिहूं ? तूं माझ्यासाठीं हा देश सोडून दुसऱ्याच्या घरीं कष्टांत दिवस काढीत आहेस. जरी दैवानें कृपा केली आणि तुझा शोध लागला, तरी तुझी माझी प्रत्यक्ष भेट झाली नाहीं. यावरून तुझ्यावर माझें प्रेम नाहीं, असें समजशील—तुझ्या जागीं दुसरी कोणी असती तर ती असें समजलीच असती; पण तें मनांतसुद्धां आणूं नकोस. मी कांहीं महत्कार्यांत गुंतलों आहें. मी त्या कार्याकडे दुर्लक्ष केलें, तर कुलांगार ठरेन. तें कार्य करण्याची मीं गुरुजीजवळ प्रतिज्ञा केली आहे. म्हणून तुझी या ठिकाणीं

मला भेट घेतां येत नाहीं. मला हें पक्कें ठाऊक आहे कीं, मीं प्रतिज्ञेचा भंग करावा अशी तुझीहि पण इच्छा नाहीं. तेव्हां कसेंहि करून एक वर्ष काढ. नंतर ईश्वराच्या आशिर्वादानें तुला राणी करून पूर्ण सुखांत ठेवीन. या अल्पवयी पण पोक्त बुद्धीच्या मुलीच्या हातीं उत्तर पाठीव.'

मृणालिनी हें पत्र वाचून गिरिजायेला म्हणाली, 'माझ्याजवळ तर कागद, लेखणी वगैरे कांहींच सामान नाहीं. उत्तर कसें लिहूं ? तूं तोंडींच निरोप जाऊन सांग. तूं विश्वासुक आहेस. बक्षीस म्हणून तुला माझ्या अंगावरला हा दागिना देत्यें.'

**गिरि०**—निरोप कोणाकडे घेऊन जाऊं ? त्यांनीं मला हें पत्र देऊन निरोप देतांना सांगितलें कीं, आजच रात्रीं मला याचा जबाब आणून दे. मीहि तें काम पतकरलें. यायच्या वेळीं माझ्या लक्षांत आलें कीं तुमच्याजवळ लिहिण्याचें सामान नसेल. म्हणून त्याची जुळवाजुळव करण्यासाठीं मी त्यांच्याकडे गेल्यें; पण ते भेटले नाहींत. मीं ऐकलें कीं ते संध्याकाळीं नवद्वीपाला निघून गेले !

**मृणा०**—नवद्वीपाला ?

**गिरि०**—हो.

**मृणा०**—संध्याकाळींच ?

**गिरि०**—हो. संध्याकाळींच. ऐकलें कीं त्यांचे गुरु येऊन त्यांना बरोबर घेऊन गेले.

**मृणा०**—कोण ? माधवाचार्य ? तोच मेला माझा मोठा काळ आहे !

नंतर थोडा वेळ विचार करून मृणालिनी म्हणाली, 'गिरिजाये ! तूं आतां जा. मला घराबाहेर फार वेळ राहतां येत नाहीं. '

गिरिजाया म्हणाली, ' ही चालल्यें. ' इतकें बोलून तिनें निरोप घेतला. तिचा मधुर गीतध्वनि ऐकत ऐकत मृणालिनी घरांत गेली.

मृणालिनी घरांत शिरून दार लावण्याच्या उद्योगांत होती, इतक्यांत मागून कोणी येऊन तिचा हात धरला. मृणालिनी तेव्हां दचकली. हात धरणारानें म्हटलें ' अहो पतिव्रताबाई साहेब ! आतां तावडींत सांपडलांत ! कोणावर तुमची येवढी कृपादृष्टि झाली आहे, त्याचें नांव सांगाल का ?'

मृणालिनी तेव्हां रागानें कांपूं लागली. ती म्हणाली, ' व्योमकेश ! ब्राम्हण-कुलकलंका ! हात सोड ! '

व्योमकेश हा हृषीकेशाचा मुलगा--अतिशय मूर्ख व दुराचरणी होता. मृणालिनीवर तो विशेष अनुरक्त झाला होता. आपली इच्छा तृप्त होण्याचा कांहीं संभव दिसेना हें पाहून तिच्यावर जबरदस्ती करण्याचा त्याचा संकल्प ठरला होता; पण मृणालिनी मणिमालिनीला सोडून केव्हांहि एकटी राहत नसे, यामुळें त्याला पाहिजे होती तशी संधी आतांपर्यंत मिळाली नव्हती.

मृणालिनीनें अशी त्याची निर्भर्त्सना केली, तेव्हां तो म्हणाला, 'हात कां सोडीन ? हात सोडल्यावर मग काय करतां येणार आहे ? हें पहा. मी माझ्या मनांतलें दुःख तुला सांगतों. मी काय माणूस नाहीं ? तूं एकाचे मनोरथ पुरविल्लेस तसे दुसऱ्याचेहि नाहीं का तुला पुरवितां येणार ?'

**मृणा०**--कुलांगारा ! तूं हात न सोडशील तर मी ओरडून घरांतल्या मंडळीला उठवून गोळा करीन.

**व्योम०**--उठीव जा. मी सांगेन कीं ही आपल्या प्रियाला भेटायला गेली होती.

**मृणा०**—मेल्या ! नरकाला जाशील !

इतकें बोलून मृणालिनीनें हात सोडविण्यासाठीं थोडीशी दांडगाई केली; पण तिला आपला हात सोडवून घेतां आला नाहीं. व्योमकेश म्हणाला, 'अशी अधीर होऊं नकोस. माझे मनोरथ पूर्ण केल्यावर मी तुला सोडून देईन. आतां तुझी ती बहीण मणिमालिनी कोठें आहे ?

**मृणा०**--मीच तुझी बहीण.

**व्योम०**—तूं माझ्या नात्यांतल्या माणसाची बहीण असशील. पण माझी तर प्राणप्रिया राधिका—सर्वार्थसाधिका—आहेस.

इतकें बोलून व्योमकेश तिचा हात ओढीत तिला घेऊन चालूं लागला. मागें जेव्हां माधवाचार्यानें तिला जबरदस्तीनें ओढून नेलें होतें; तेव्हां स्त्रीस्वभावाला अनुसरून म्हटलें म्हणजे ती ओरडावयाची; पण ओरडली नव्हती आणि आतांहि तसेंच तिनें केलें.

पण मृणालिनीच्यानें आतां राहावेना. तिनें मनांत लक्षब्राह्मणांना नमस्कार करून व्योमकेशाला लाथ मारली. व्योमकेश लाथ खाऊन म्हणाला, 'अहाहा ! धन्य माझी ! या चरणस्पर्शानें मला मोक्षाची प्राप्ति होणार ! हे सुंदरी ! तूं माझी द्रौपदी—आणि मी तुझा जयद्रथ !'

इतक्यांत मागून कोणीसें म्हणालें, 'आणि मी तुझा अर्जुन !'

त्याबरोबर व्योमकेशानें भयानें मोठी किंकाळी फोडली. तो म्हणाला; 'राक्षसी ! तुझ्या दांतांत काय विष भरलें आहे ?' असें बोलून मृणालिनीचा हात त्यानें सोडला, आणि हातानें पाठ चोळूं लागला. पाठीतून रक्त निघाल्याचें हस्तस्पर्शानें त्याला कळून आलें.

मृणालिनीचे हात आतां मोकळे झाले होते; तरी ती पळून गेली नाहीं. तीहि व्योमकेशाप्रमाणें आश्चर्यानें कुंठित झाली होती. कारण, ती कांहीं व्योमकेशाला चावली नव्हती. असें अस्वलाला शोभणारें कृत्य करणारी ती मुलगी नव्हती. त्या वेळीं चांदण्याच्या अंधुक प्रकाशानें एक ठेंगणीशी मुलीची आकृति समोरून जातांना तिला दिसली. गिरिजायेनें मृणालिनीचा पदर ओढून 'पळून या' असें तिला सांगितलें आणि ती स्वतःहि पळून गेली.

पळण्याची गोष्ट मृणालिनीच्या स्वभावाला ठाऊक नव्हती. ती पळून गेली नाहीं. व्योमकेश अंगणांत उभा राहून आक्रोश करीत होता आणि काकुळतीनें ओरडत होता. हें पाहून ती गजेंद्राच्या गतीनें आपल्या निजण्याच्या खोलीकडे गेली; पण इतक्यांत व्योमकेशाच्या आरडाओरडीनें घरांतली मंडळी जागी होऊन धावली. हृषीकेशहि धावून आला. त्यानें व्योमची घाबरलेली मुद्रा पाहून विचारलें, 'अरे ! तुला झालें काय असें बैलासारखें ओरडायला ?'

व्योमकेश म्हणाला, 'मृणालिनी आपल्या याराला भेटण्यासाठीं गेली होती. मीं तिला धरलें; तेव्हां ती माझ्या पाठीला चावली.'

आपल्या मुलाचे गुण हृषीकेशाला मुळींच ठाऊक नव्हते. मृणालिनीला त्यानें जातांना पाहिलें होतें, म्हणून त्याला व्योमचें म्हणणें खरें वाटलें. त्या वेळीं तो तिला कांहीं बोलला नाहीं. मुकाट्यानें तो तिच्या मागून तिच्या खोलींत गेला.

---

## प्रकरण सहावें.

# हृषीकेश.



मृणालिनीच्या मागून तिच्या खोलींत जाऊन हृषीकेश म्हणाला, "मृणालिनी ! काय हें तुझें वर्तन !"

**मृणालिनीः**—मीं काय केलें ?

**हृषीकेशः**—तूं कोणाची मुलगी ? आणि वागतेस कशी ? कांहींच का तुला कळूं नये ? गुरुजीच्या आज्ञेनें मीं तुला आपल्या घरीं ठेविलें. तूं मणिमालिनीच्या जवळ तिच्याच अंथरुणावर निजत जा—असली वाईट चाल कामाची नाहीं.

**मृणालिनीः**—मी वाईट चालीची आहें, असें म्हणणारे लबाड आहेत.

रागानें हृषीकेशाचा ओठ कंपायमान झाला. तो म्हणाला, "चांडाळणी, माझें अन्न खाऊन उलटें मलाच शिव्या देतेस! तूं माझ्या घरांतून निघून जा कशी ? माधवाचार्य माझ्यावर रागावले तरी पत्करलें; पण हा कृष्णसर्प घरांत नको."

**मृणालिनीः**—ठीक आहे. उद्यां सकाळीं मी येथें आपणास दिसणार नाहीं.

हृषीकेशाला वाटलें होतें कीं, तिला आपण घरांतून हाकून लावल्यावर ती निराश्रित होईल. अर्थातच तिच्या तोंडून असें उत्तर निघेल, अशी अपेक्षा त्यानें केली नव्हती; पण, आपण निराश्रय होऊं, ही भीति तिच्या मनाला शिवली सुद्धां नाहीं. तेव्हां त्याला वाटलें कीं, तिच्याशीं जारकर्म करणाऱ्या माणसाच्या भरंवशावर तिनें असें उद्दामपणाचें उत्तर दिलें असावें. त्यामुळें तर त्याच्या अंगाची आग अधिकच भडकली. तो म्हणाला, "उद्यां पहाटेस काय म्हणून ? आतांच निघ."

**मृणालिनीः**—ठीक आहे. माझी मैत्रीण मणिमालिनी हिचा निरोप घेऊन मी आतांच चालती होत्यें.

इतकें बोलून मृणालिनी उठली.

हृषीकेश म्हणाला, "तुझ्यासारख्या दुराचरणी स्त्रीनें माझ्या मुलीशीं बोलायचें ?"

हें ऐकून मृणालिनीच्या डोळ्यांला पाणी आलें. ती म्हणाली, "बरें आहे! आपली इच्छा नसेल, तर नाहीं तिचा निरोप घेत. मीं बरोबर कांहीं आणिलें नव्हतें आणि कांहीं घेऊनहि जात नाहीं. एका लुगड्यानिशीं आल्यें तशीच एका लुगड्यानिशीं चालल्यें. माझा नमस्कार घ्यावा."

दुसरें वाक्य न बोलतां मृणालिनी खोलींतून बाहेर पडली. जशी घरांतली दुसरी मंडळी व्योमकेशाची आरोळी ऐकून झोंपेंतून उठली होती, तशी मणिमालिनीहि उठली होती. मृणालिनीच्याबरोबर आपला पिता खोलीपर्यंत आलेला पाहून तिनें आपल्या भावाशीं बोलण्याला हीच संधी साधली आणि भावाच्या दुर्वर्तनाबद्दल त्याची कानउघडणी करूं लागली. जेव्हां कानउघडणी करून ती

परत आली, तेव्हां अंगणांतच मृणालिनीशीं तिची गांठ पडली. " इतक्या रात्रीं कोठें चाललीस ? " असें तिनें मृणालिनीला विचारलें.

**मृणालिनीः**—गडे मणिमालिनी ! देव तुला उदंड आयुष्य देवो ! माझ्याशीं अगदीं बोलूं नकोस. तसें करण्यास तुझ्या वडिलांची मनाई आहे.

**मणिमा०**—हें काय मृणालिनी ! गडे ! तूं कां रडतेस ? हाय ! हाय ! कोण जाणे बाबा काय बोलले ? गडे, मागें फिर. अशी रागावूं नकोस.

पण मृणालिनी परत फिरली नाहीं. पर्वतशिखराला धारण करणाऱ्या शिलाखंडाप्रमाणें मोठ्या ताठ्यानें ती–अभिमानिनी–निष्कलंक मुलगी चालती झाली. तेव्हां मणिमालिनीला कांहीं सुचेनासें झालें. ती आपल्या पित्याकडे गेली; पण त्या आधींच मृणालिनी घराच्या बाहेर पडली.

बाहेर आल्यावर तिनें पाहिलें, तेव्हां गिरिजाया पूर्वींच्या संकेतस्थानीं उभी असलेली तिला दिसली. तिला पाहून मृणालिनी म्हणाली, ' तूं अजून येथेंच उभी कशी ?'

**गिरि०**—मी तुम्हांला पळून जाण्यास सांगण्यासाठीं आल्यें. तुम्ही येतां कीं नाहीं, हें पहाण्यासाठीं उभी आहें.

**मृणा०**—तूं ब्राह्मणाला का चावलीस ?

**गिरि०**—त्याला काय झालें ? ब्राह्मण म्हणजे कांहीं पशु नव्हे !

**मृणा०**—पण तूं तर गात गात चालली होतीस, हें मीं ऐकिलें ?

**गिरि०**—हो. पण तुमच्या संभाषणांतले कांहीं शब्द ऐकून मी परत फिरल्यें. माझ्या मनांत आलें कीं, मेल्यानें काळी मुंगी म्हणून माझी एकदां थट्टा केली होती. त्याचा सूड उगविण्याला ही चांगली संधी आहे, असें पाहून मीं सूड उगवला. बरें, तुम्ही आतां कोठें जाणार ?

**मृणा०**—तुला घरदार आहे ?

**गिरि०**—आहे एक झोंपडी.

**मृणा०** – तुझ्या घरीं आणखी कोण कोण आहे ?

**गिरि०**—एक म्हातारी. तिला मी आई म्हणत्यें.

**मृणा०**—चल तर मग. मी तुझ्याच घरीं येत्यें.

**गिरि०**—चला. मी तेंच म्हणत होतें.

इतकें बोलून दोघीजणी निघाल्या. वाटेनें गिरिजाया म्हणाली, " झोंपडींत किती दिवस तुम्हांला राहतां येईल ? "

**मृणा०**—आजची रात्र. उद्यां मी दुसरीकडे जाणार आहें.

**गिरि०**—कोठें ? मथुरेला ?

**मृणा०**—मथुरेला तर जातां येत नाहीं.

**गिरि०**—मग कुठें ?

**मृणा०**—यम लोकाला !

यावर कांहीं वेळपर्यंत दोघीहि स्तब्ध राहिल्या. नंतर मृणालिनीनें विचारलें, "माझें बोलणें तुला खरें वाटतें ना ?"

**गिरि०**—कां नाहीं खरें वाटणार ! पण मी म्हणतें कीं, त्या ठिकाणीं हवें तेव्हां माणसाला जातां येईल. आणखी एका ठिकाणीं आतां कां जात नाहीं ?

**मृणा०**—कोठें ?

**गिरि०**—नवद्वीपाला.

**मृणालिनीः**—गिरिजाये ! तूं भिकारणीचा वेष घेतलेली खरोखर कोणी मायाविनी आहेस. तुझ्यापासून मी कांहीं लपवून ठेवणार नाहीं. कारण, तूं विशेषतः माझें हित चिंतणारी आहेस. नवद्वीपालाच जाण्याचें मीं ठरविलें आहें.

**गिरि०**—एकट्या जाणार !?

**मृणा०**—सोबतीला कोणाला घेऊं ?

**गिरि०**—मी येत्यें तुमच्याबरोबर.

**मृणा०**—खरेंच कीं काय ?

**गिरि०**—खरोखरीच येत्यें.

**मृणा०**—तुला कसें येतां येईल ?

**गिरि०**—मला काय ? सगळीं ठिकाणें सारखींच. उलट राजधानींतच भिक्षा रगड मिळते.

—— xxx ——

# खंड दुसरा.



## प्रकरण पहिलें.

## गौडेश्वर.



अति विस्तीर्ण सभामंडपांत नवद्वीपाचे उद्धारकर्ते राजाधिराज गौडेश्वर महाराज विराजमान झाले होते. शुभ्रवर्णांच्या संगमरवरी दगडाच्या वेदीवर रत्नखचित सिंहासनावर हिऱ्यामोत्यांच्या झालरी लाविलेल्या छत्राखालीं वृद्ध राजा बसला होता. डोक्यावर सोन्याचीं घुंगरें लाविलेला चित्रविचित्र नक्षी-काम केलेला, शुभ्र चांदवा होता. एका बाजूस पृथक् पृथक् आसनावर अंगीं भस्म चर्चिलेले ब्राह्मण पंडित सभेंत बसले होते. ज्या आसनावर पूर्वींच्या काळीं बळराम बसत असे, त्याच आसनावर आतां एक अदूरदृष्टि, खुशामत्या बसला होता. दुसऱ्या बाजूला महामात्य धर्माधिकाऱ्याला पुढें करून मुख्य मुख्य राज्याधिकारी बसले होते. महासामंत, महाकुमारामात्य, प्रमाता, औपरिक, दासापराधिक, चौरोद्धरणिक, शौल्किक, गोल्मिक, क्षत्रप, प्रांतपाल, कोष्टपाल, कांडरिक्य, विनियुक्तक प्रभृति सर्व अधिकारी मंडळी बसली होती. महाप्रतिहार शस्त्रास्त्रांनीं सज्जित होऊन सभेच्या बंदोबस्तासाठीं उभा होता. भाट व चारण दोन्ही बाजूंला रांगेनें उभे राहून राजाचे स्तुतिपाठ गात होते. सर्वांपासून अलग अशा कुशासनावर पंडिताग्रणी माधवाचार्य विराजमान झाले होते.

दरबारचें नेमलेलें काम आटोपल्यावर तो बरखास्त होण्याचें चिन्ह दिसूं लागलें; तेव्हां माधवाचार्य राजाला उद्देशून म्हणाला, " महाराज ! ब्राह्मणाला बडबड करण्याबद्दल माफी असावी. आपण राजनीतिविशारद आहां; सध्यांच्या भूमंडलावरील सर्व राजांपेक्षां आपण अधिक विचारी आहां; प्रजेचे पालनकर्ते आहां; आपण आजन्म राज्य केलें आहे; शत्रूचें दमन करणें हें राजाचें प्रधान कर्तव्य आहे, ही गोष्ट आपणास विदितच आहे. प्रबल शत्रूच्या दमनार्थ आपण कोणते उपाय केले आहेत ? "

राजा म्हणाला, ' आपली काय आज्ञा आहे ? '

वृद्धापकाळामुळें आचार्यांचे सगळे शब्द राजाला नीट ऐकूं गेले नव्हते.

माधवाचार्यांच्या प्रत्युत्तराची वाट न पाहतां धर्माधिकारी पशुपति म्हणाला, 'महाराजाधिराज ! माधवाचार्य आपणास असें विचारतात कीं, शत्रूच्या बंदोबस्तासाठीं आपण काय उपाय केले आहेत ? वंगेश्वराच्या कोणत्या शत्रूचा आतांपर्यंत बंदोबस्त करण्यांत आला नाहीं, तें आचार्यांनीं स्पष्ट करून सांगितलें नाहीं. तें त्यांनीं सांगावें, अशी त्यांना माझी विनंति आहे.'

माधवचार्यांनीं किंचित् हसून उच्च स्वरानें म्हटलें, 'महाराज ! तुर्कांनीं बहुतेक आर्यावर्तदेश काबीज केला आहे. आतां, ते प्रथम मगध देश जिंकून नंतर गौडराज्यावर चाल करून जाण्याच्या उद्योगांत आहेत.'

या खेपेस राजाला आचार्यांचें बोलणें ऐकूं गेलें. तो म्हणाला, 'तुर्कांविषयीं तुम्ही बोलतां काय ? तुर्क लोक आले आहेत कीं काय ?'

माधवाचार्य म्हणाले, ' ईश्वर आपला रक्षणकर्ता आहे. अजून ते आले नाहींत; पण आलेच, तर आपण त्यांचें निवारण कसें करणार ?'

राजा म्हणाला, ' कसें करणार ? कसें करणार म्हणून काय विचारतां ? मी वृद्ध झालों, म्हणून आतां माझ्यानें युद्ध करवणार नाहीं. आतां परमेश्वर माझे डोळे मिटील तर बरें. तुर्क लोक आले तर येऊं देत. '

राजाचें हें वाक्य ऐकून सगळी सभा तटस्थ झाली. फक्त, महासामंताच्या म्यानांतली तरवार निष्कारण झणत्कार करूं लागली. बहुतेक श्रोतृवर्गाच्या चर्येवर कोणताच भाव प्रकट झालेला दिसला नाहीं. तेव्हां, आचार्यांच्या डोळ्यांतून एक अश्रुबिंदु टपकन् गळून पडला.

सभापंडित दामोदर प्रथम म्हणाला, " आचार्य ! आपण कां जिवाला व्यर्थ त्रास करून घेतां ? महाराजांनीं आतां जें सांगितलें, तें शास्त्रसंगत आहे. तुर्क लोक या देशावर अंमल करतील, असें ऋषींचें भाकितच आहे. शास्त्रवचन कधीं खोटें होणार नाहीं. भवितव्य चुकविण्याला कोण समर्थ आहे ? असें आहे तर मग युद्धाची तयारी करण्याचें कारण काय ? "

**माधवाचार्यः**—ठीक. सभापंडित महाराज ! मी आपणांस एक गोष्ट विचारतों. आपण आतां सांगितलेलें वचन कोणत्या शास्त्रांत आहे ?

**दामोदरः**—तें ना ?—तें ना ?—विष्णुपुराणांत--आहे. तेथें म्हटलेंच आहे--

**माधवाचार्यः**—तें म्हणून दाखविण्याचें राहूं द्या. विष्णुपुराणाची पोथी आणवून तें वचन तेवढें मला काढून दाखवा.

**दामोदरः**—मला कशी भ्रांति पडली ! आतां स्मरण झालें. विष्णुपुराणांत नाहीं, मनुस्मृतींत तें वचन आहे.

**माधवाचार्यः**—गौडेश्वराच्या सभापंडितांची मानवधर्म शास्त्रांत पारंगतता मोठी विलक्षण दिसते !

**दामोदरः**—अबबब ! काय हें आपलें तेज ! मी तर आपल्यापुढें लटपटून गेलों आहें. मी तर काय ? पण प्रत्यक्ष सरस्वतीसुद्धां आपल्यापुढें हार खाईल. ग्रंथाचें नांव मला आतां स्मरत नाहीं; पण तें वचन ऐका—

**माधवाचार्यः**—गौडेश्वराचे सभापंडित अनुष्टुप छंदांत एकादा श्लोक रचूं शकतील, हें कांहीं असंभवनीय नाहीं; पण मी साफ साफ सांगतों कीं, तुर्क लोक गौड राज्यावर विजय मिळवितील, असें वचन कोणत्याहि शास्त्रांत नाहीं.

**पशुपतिः**—आपण सर्वशास्त्रपारंगत आहां वाटतें ?

**माधवाचार्यः**—आपलें सामर्थ्य असेल, तर मी अशास्त्रज्ञ आहें, असें बेलाशक सिद्ध करून दाखवावें.

सभापंडितांपैकीं एकजण म्हणाला, 'मी सिद्ध करून दाखवितों. आत्मश्लाघा शास्त्रांत निषिद्ध मानिली आहे. आत्मश्लाघा करणारा जर पंडित म्हणावयाचा, तर मग मूर्ख कोण ?'

**माधवाचार्यः**—तिघेजण मूर्ख असतात. एक–आत्मरक्षणाविषयीं यत्न न करणारा. दुसरा–यत्न करूं नकोस म्हणून भर देणारा, आणि तिसरा—आपल्या बुद्धिसामर्थ्याच्या पलीकडच्या विषयांत तोंड घालून बोलणारा. तुम्ही तर त्रिविधमूर्ख आहां !

सभापंडित खालीं तोंड घालून बसले.

**पशुपतिः**—यवन आले, तर आम्ही त्यांच्याशीं लढूं.

**माधवाचार्यः**—ठीक ! ठीक ! आपली जशी कीर्ति तसेंच आपण बोललांत. परमेश्वर आपणास सुखी राखो. मला येवढेंच विचारावयाचें आहे कीं, जर शत्रूशीं युद्ध करण्याचा आपला विचार आहे, तर युद्धाची तयारी काय चालविली आहे ?

**पशुपतिः**—अशा गोष्टी गुप्तपणानेंच कराव्या लागतात. येथील मंडळीला कदाचित् ठाऊक नसेल, पण घोडेस्वार, पायदळ व आरमारी सेना यांची तयारी ठेविली आहे. थोडे दिवस या नगरांत हिंडल्या फिरल्यानें हें कळण्यासारखें आहे.

**माधवाचार्यः**—मलाहि थोडेंसें ठाऊक आहे.

**पशुपतिः**—तर मग ही गोष्ट काढण्याचें कारण काय ?

**माधवाचार्यः**—कारण हें कीं, एक वीर पुरुष या वेळीं येथें आला आहे, मगधदेशचा युवराज हेमचंद्र याच्या शौर्याची ख्याति आपल्या कानीं आलीच असेल ?

**पशुपतिः**—हो, पुष्कळ आली आहे. तो आपला शिष्य आहे, ही गोष्टसुद्धां आम्हांला कळली आहे. पण मी असें विचारतों कीं, अशा वीरपुरुषाच्या बाहूंकडून मगधराज्याचें रक्षण न होऊं शकतां, तें राज्य शत्रूंच्या हातांत कसें गेलें ? येवढें आपण सांगावें.

**माधवाचार्यः**—यवनांच्या स्वारीच्या वेळीं युवराज प्रवासांत होता, हेंच त्याचें कारण.

**पशुपतिः**—आतां काय तो नवद्वीपाला आला आहे ?

**माधवाचार्यः**—होय. राज्यापहार करणारे यवन या देशाला आल्याचें ऐकून, येथें त्यांच्यांशीं लढून तो त्या चोरांचें पारिपत्य करणार आहे. महाराजांनीं त्याच्याशीं सख्य करून दोघांचाहि शत्रु जो तुर्क त्याचा नाश करण्याचा प्रयत्न केला, तर त्यांत दोघांचेंहि कल्याणच आहे.

**पशुपतिः**—राजसेवक त्याच्या सेवेला आतांच दिले जातील; त्याला राहण्यासाठीं एक वाडा देण्यांत येईल आणि त्याच्याशीं सख्य करण्याचा विचार योग्यसमयीं करण्यांत येईल.

यानंतर राजाज्ञेवरून दरबारचें काम आटोपलें.

---

## प्रकरण दुसरें.

# कुसुमनिर्मिता.



शहराजवळ उपनगरांत गंगेच्या कांठीं हेमचंद्राला राहण्यासाठीं एक मोठा वाडा सरकारी अधिकाऱ्यांनीं दाखवून दिला. हेमचंद्र माधवाचार्यांच्या सल्ल्यानें त्या वाड्यांत जाऊन राहिला.

नवद्वीपांत जनार्दन नांवाचा एक वृद्ध ब्राह्मण राहत होता. वार्धक्यामुळें त्याला ऐकूं येत नव्हतें व इतरहि सर्व प्रकारें त्याला दुर्बळता आली होती.

त्याला कोणाचाहि आधार राहिला नव्हता. त्याची पत्नीहि वृद्ध व दुबळ होती. थोड्याच दिवसांपूर्वी नदीला महापूर येऊन त्याच्या झोंपडीचा नाश झाला होता. तेव्हांपासून हें जोडपें निराश्रित झाल्यामुळें सरकारी अधिकाऱ्यांच्या परवानगीनें वाड्याच्या एका भागांत राहत होतें. वाड्यांत कोणी राजपुत्र राहण्यास येणार आहे, असें ऐकल्यापासून तीं दुसरें एखादें घर शोधण्याच्या उद्योगांत होतीं.

हें हेमचंद्राला कळलें, तेव्हां त्याला वाईट वाटलें. त्यानें विचार केला कीं येवढ्या मोठ्या वाड्यांत दोघांनाहि राहतां येईल. मग निष्कारण ब्राह्मणाला निराश्रित कां करा ? म्हणून त्यानें दिग्विजयाला आज्ञा केली कीं 'वाडा सोडून जाऊं नका. असें ब्राह्मणाला जाऊन सांग.' चाकरानें किंचित हसून उत्तर केलें, 'हें काम माझ्यासारख्या चाकराकडून होणार नाहीं. तो म्हातारा माझें ऐकणार नाहीं.'

वस्तुतः ब्राह्मण कोणाचेंच ऐकत नसे. कारण, त्याला ऐकूंच येत नसे. राजपुत्राला वाटलें कीं, ब्राह्मण मोठा मानी आहे. तो नोकरांचें ऐकणार नाहीं. तेव्हां आपण स्वतःच त्याला सांगावें, म्हणून तो त्याच्याकडे गेला. गेल्याबरोबर त्यानें ब्राह्मणाला नमस्कार केला.

ब्राह्मणानें आशीर्वाद देऊन त्याला विचारलें, 'आपण कोण ?'

**हेम०**—मी आपला सेवक आहें.

**जना०**—काय म्हटलें ? आपलें नांव रामकृष्ण ?

हेमचंद्रानें तर्क केला कीं ब्राह्मणाला चांगलेंसें ऐकूं येत नसावें. म्हणून तो मोठ्यानें म्हणाला, 'माझें नांव हेमचंद्र. मी आपला दास आहें.'

**जना०**—ठीक ठीक. अगोदर मला नीट ऐकूं आलें नव्हतें. आपलें नांव हनुमानदास ?

हेमचंद्र मनांत म्हणाला, 'नांवाची गोष्ट तर दूर राहूं दे. आपलें काम झालें म्हणजे झालें.' तो मोठ्यानें म्हणाला, 'नवद्वीपच्या राजाचा हा वाडा मला राहण्यासाठीं दिला आहे. आपण दुसरीकडे राहण्यास जाणार म्हणून ऐकतों ?'

**जना०**—नाहीं. अजून मी गंगेवर स्नानाला गेलों नाहीं. आतां जाण्याच्या तयारींत आहें.

**हेम०**—( फार मोठ्यानें ओरडून ) स्नान मागाहून होईल. आपण वाडा सोडून जाऊं नका, येवढें सांगण्यासाठीं आतां मी आलों आहें.

**जना०**—घरीं जेवूं नका म्हणतां ? आज आपल्या घरीं काय आहे? श्राद्ध बिद्ध आहे वाटतें ?

**हेम०**—ठीक. भोजनाची इच्छा दिसते. त्याची तजवीज करण्यांत येईल. तूर्त तुम्ही या वाड्यांत राहत आहां तसेच राहा.

**जना०**—उत्तम आहे. ब्राह्मण भोजन आहे तेव्हां दक्षिणाहि पण मिळेलच. तें सांगायला नकोच. आपण कोठें राहतां ?

हेमचंद्र निराश होऊन परतला. इतक्यांत पाठीमागून त्याच्या शेल्याचा पदर कोणीं धरून ओढिला. हेमचंद्रानें मागें वळून पाहिलें. प्रथम त्याला वाटलें कीं आपल्यासमोर कुसुमनिर्मित देवीची मूर्तीच उभी आहे. मग त्याला दिसून आलें कीं ती सजीव मूर्ति आहे. तिसऱ्या क्षणीं दिसलें कीं ती मूर्ति नसून ब्रह्मदेवानें आपल्या कौशल्यानें निर्माण केलेली सीमारूपिणी बालिका अथवा पूर्ण यौवना स्त्री आहे.

बालिका कीं तरुणी ? हें तिला पाहून हेमचंद्राच्यानें निश्चित करवलें नाहीं.

वीणेच्या स्वराहूनहि मधुर अशा स्वरानें ती सुंदरी म्हणाली, 'आपण आजोबांना काय सांगत होतां ? आपले शब्द त्यांना कसे ऐकूं जातील ? '

**हेम०**—ते ऐकूं गेले नाहींत हें दिसलेंच. पण तुम्ही कोण ?

**बालिका०**—माझें नांव मनोरमा.

**हेम०**—हे तुमचे आजोबा काय ?

**मनो०**—होय आपण त्यांना काय सांगत होतां ?

**हेम०**—मीं ऐकलें कीं ते हा वाडा सोडून जाण्याच्या विचारांत आहेत. तसें करूं नका हें सांगण्यासाठीं मी आलों होतों.

**मनो०**—या वाड्यांत एक राजपुत्र राहायला येणार आहे. तो आम्हांला कसा राहूं देईल ?

**हेम०**—मीच तो राजपुत्र. मी तुम्हांला येथेंच राहण्याविषयीं आग्रहानें सांगत आहें.

**मनो०**—कां बरें ?

या 'कां बरें ?' चें उत्तर मिळालें नाहीं. हेमचंद्राला दुसरें कांहीं उत्तर न सुचल्यामुळें तो म्हणाला, 'कां बरें म्हणून काय विचारतां ? कल्पना करा, तुमचा भाऊ येथें येऊन राहिला असता, तर त्यानें तुम्हांला हाकून दिलें असतें काय ?'

**मनो०**—आपण माझे भाऊ आहां काय ?

**हेम०**—आजपासून झालों आहें. आतां समजलें ?

**मनो०**—समजल्यें. पण बहीण म्हणून माझा केव्हांहि तिरस्कार तर नाहीं ना करणार ?

मनोरमेच्या बोलण्याचा हा प्रकार हेमचंद्राला मोठा चमत्कारिक वाटला. तो मनाशीं म्हणाला, 'ही किती विलक्षण सरळ मनाची मुलगी आहे ! अथवा वेडी तर नसेल ?' तो उघडपणें म्हणाला, 'तिरस्कार काय म्हणून करीन ?'

**मनो०**—माझ्या हातून एकादी चूक घडली तर ?

**हेम०**—चूक घडली म्हणून काय तिरस्कार करायचा ?

मनोरमा कुंठित होऊन उभी राहिली. थोड्या वेळानें म्हणाली, 'मीं भावाला कधीं पाहिलेलें नाहीं. भावाशीं मर्यादा ठेवून वागावें लागतें ना ?'

**हेम०**—नाहीं.

**मनो०**—तर मी तुमच्यापाशीं ती ठेवणार नाहीं. तुम्ही माझ्याशीं ती ठेवाल ?

हेमचंद्र हसून म्हणाला, 'माझें म्हणणें तुमच्या आजोबांला मला कळवितां आलें नाहीं. तें कळविण्याला काय उपाय करावा ?'

**मनो०**—मी त्यांना सांगत्यें.

इतकें बोलून मनोरमेनें मृदुस्वरानें आजोबाजवळ हेमचंद्राचें सांगणें निवेदन केलें.

मनोरमेनें हलक्या स्वरानें सांगितलेलें ब्राह्मणाला कळलें, हें पाहून हेमचंद्राला मोठें आश्चर्य वाटलें.

ब्राम्हणानें आनंदित होऊन राजपुत्राला आशीर्वाद दिला आणि मनोरमेला म्हटलें, 'मनोरमे ! घरांत जाऊन सांग कीं आपणास राजपुत्रासारखा नातू मिळाला आहे.' इतकें बोलून तो स्वतःच 'अग ! अग !' बायकोला हाका मारूं लागला. ब्राम्हणस्त्री तेव्हां घरांत नव्हती. कांहीं गृहकृत्यांत दुसरीकडे गुंतली होती. त्यामुळें तिला हाका ऐकूं गेल्या नाहींत. त्यामुळें ब्राम्हण त्रासून म्हणाला, 'हिच्यांत हेंच मोठें व्यंग आहे कीं हिला कानांनीं कमी ऐकायला येतें.'

---

## प्रकरण तिसरें.

# नौकेंत

—०—

हेमचंद्र तर वाड्यांत येऊन राहिला; पण मृणालिनी ? हाकलून लाविलेली, दुसऱ्याकडून गांजलेली, निराश्रित झालेली मृणालिनी कोठें आहे ?

संध्याकाळीं रक्त वर्णाची मेघमाला कांचनवर्णाचा त्याग करून हळूहळू कृष्णवर्ण परिधान करूं लागली होती. रात्रींच्या अंधकारानें गंगेचें विशाल हृदय झांकून टाकिलें होतें. सभामंडपांतल्या नोकरांच्या हातांतल्या जळत्या दीपमालेप्रमाणें किंवा उद्यानांतल्या कुसुमसमूहाप्रमाणें आकाशांत नक्षत्रें उदय पावलीं होतीं. रात्रींच्या अंधेरांत गंगेच्या प्रवाहावरून वायु अंमळ जोरानें वाहूं लागला होता. नायकाच्या अंगस्पर्शानें नायिकेचें हृदय जसें कंपायमान होतें, त्याप्रमाणें नदीच्या जलावरच्या फेसांत पुष्पमाला गुंफिली जाऊं लागली होती. माणसांच्या गर्दीत जसा कल्लोळ उठतो त्याप्रमाणें लाटांचा कल्लोळ होत होता. नावाड्यांनीं सगळ्या नौका रात्रीं तीराला आणून लाविल्या होत्या, आणि ते विश्रांति घेण्याच्या तयारींत होते. इतक्यांत एक लहानशी नौका इतर नौकांपासून दूर असलेल्या एका खाडीच्या मुखाला येऊन लागली. नावाडी खाण्यापिण्याच्या तजविजीला लागले.

त्या लहान नौकेंत दोनच उतारू होते. दोघीहि स्त्रियाच. या स्त्रिया म्हणजे मृणालिनी व गिरिजाया होत, हें वाचकांस सांगावयास नकोच.

गिरिजाया मृणालिनीला उद्देशून म्हणाली, 'आजचा दिवस तर गेला.' मृणालिनीनें कांहींच उत्तर केलें नाहीं.

गिरिजाया पुनः म्हणाली, 'उद्यांचाहि जाईल; परवांचाहि जाईल—कां नाहीं जाणार ?'

तरीहि मृणालिनी कांहीं बोलली नाहीं; तिनें लांब उसासा मात्र टाकिला.

**गिरि०**—हें हो काय असें बाईसाहेब ? रात्रंदिवस अशी काळजी करून काय होणार आहे ? जर येथें येऊन आपलें काम होत नसेल, तर आपण आतांच परत जाऊं.

**मृणा०**—कोठें जाणार ?

**गिरि०**—चला, हृषीकेशाच्या घरीं जाऊं.

**मृणा०**—त्यापेक्षां गंगेंत बुडून मेलेलें काय वाईट आहे ?

**गिरि०**—बरें तर. मथुरेला चलतां ?

**मृणा०**—मी अगोदरच सांगितलें कीं तेथें जातां येत नाहीं. जी कुलटे-प्रमाणें रात्रीच्या वेळीं बापाचें घर सोडून निघाली, तिनें बापाच्या घरीं काय म्हणून पुनः तोंड दाखवायला जावें ?

**गिरि०**—पण तुम्ही कांहीं स्वतःच्या इच्छेनें आलां नाहींत ? वाईट विचा-रानें तेथून निघालां नाहीं; मग तुम्हांला परत जायला कोणती हरकत आहे ?

**मृणा०**—पण या गोष्टी कोणाला खऱ्या वाटणार आहेत? जिचा बापाच्या घरीं मोठा आदर होता तिचाच आतां तेथें पदोपदीं अपमान झाल्यावर तेथें राहणें कोणाला गोड वाटणार आहे ?

हें बोलत असतां मृणालिनीच्या नेत्रांतून अश्रूंवर अश्रु गळून पडत होते. पण अंधेरामुळें ते गिरिजायेच्या दृष्टोत्पत्तीस आले नाहींत. ती म्हणाली, ‘ तर मग कोठें जाणार ?’

**मृणा०**—जेथें जात आहों तेथेंच.

**गिरि०**—तें तर सुखाचें जाणें आहे. मग आपल्या मनाला वाईट कां वाटतें ? ज्याच्या भेटीला जाण्यांत सुख वाटतें त्याच्याचकडे आपण जात आहों. यापेक्षां आणखी सुख तें काय असतें ?

**मृणा०**—पण तेथें हेमचंद्राची भेट होणार नाहीं.

**गिरि०**—कां बरें ? ते तेथें नाहींत कीं काय ?

**मृणा०**—आहेत तेथेंच, पण तुला ठाऊक नाहीं. माझी भेट एक वर्षपर्यंत न घेण्याची त्यांनीं शपथ वाहिली आहे.

गिरिजाया हें ऐकून कुंठित झाली. मृणालिनी पुढें म्हणाली, ‘ आणखी कोणत्या निमित्तानें त्यांच्याकडे जावयाचें ? हृषीकेशावर रागावून आल्यें आहें, असें मी त्यांना म्हणूं ? का हृषीकेशानें मला कुलटा समजून घरांतून हाकून लाविलें म्हणून सांगूं ?’

गिरिजाया थोडा वेळ स्तब्ध राहून म्हणाली, ‘ एकूण येथें तुमची हेमचं-द्राशीं गांठ पडणार नाहीं तर ?’

**मृणा०**—नाहीं.

**गिरि०**—मग कशाला जायचें ?

**मृणा०**—त्यांना माझी भेट घेतां येणार नाहीं; पण मला त्यांचें दर्शन घ्यायला काय हरकत आहे ?

गिरिजायेच्यानें हसूं आवरून धरवेना. ती म्हणाली, 'तर मग मी आतां एक गाणें म्हणत्यें—

**'श्याम ! तुझ्या चरणकमलीं अर्पिन मी देह हा ॥ ध्रु० ॥**
**मम प्राणांचें रत्न अमोलिक—स्वर्गिय यौवन—**
**देऊं मी कैशी ?—पहा ॥ १ ॥**
**निशिदिनिं दर्शन देशि मुरारी, घेइं सकल तरि—**
**मज तव मूर्तीची स्पृहा ॥ २ ॥**

' बाईसाहेब ! आपलें ठीक आहे. आपण एक त्यांचें दर्शन करून जीवन धारण कराल; पण मी आपली दासी आहें. माझें तर त्यानें पोट भरणार नाहीं ! मग मी कशावर स्वतःचा निर्वाह चालवावा ?

**मृणा०**—मला थोडेंसें कशिद्याचें काम येतें, हार गुंफतां येतात, चित्रें काढतां येतात, कापडावर कशिदा काढतां येतो. मी काम तयार करून देत जाईन आणि तूं तें बाजारांत नेऊन विकीत जा म्हणजे झालें.

**गिरि०**—आणि मी दारोदार गाणीं म्हणत हिंडेन. एक गाणें म्हणूं का ?

मृणालिनीनें अर्धवट हंसत अर्धवट रागानें, तिच्याकडे नेत्रकटाक्ष टाकिले.

**गिरि०**—अशाच पाहत राहाल तर गाणें म्हणेन.

इतके बोलून ती गाऊं लागली—

**'कर्णधार तो प्रियकर माझा, हाय ! दिसेना बली,**
**जयास्तव नौका ही सज्जिली ॥ '**

**मृणा०**—जर तूं इतकी भितेस तर एकटी आलीस कशाला ?

**गिरि०**—मला काय हें अगोदर ठाऊक होतें ?

ती पुनः गाऊं लागली—

**प्रभात कालीं नौका दिसली विहरत मजला जलीं**
**खरोखर जल-क्रीडा वाटली ॥**
**मंदमंदसा पवन वाहतो—क्रीडा सुखवी मना**
**नभीं तों मेघांची गर्जना ! ॥**
**क्षणांत सुटला घोर प्रभंजन सृष्टि क्षुब्ध जाहली**
**भयानक भीषणता पसरली ॥**
**सोडुनि दिधलें नदी-तीर कां ? दैव उलटलें खरें**
**म्हणोनी मृत्युमुखीं मी शिरें ॥**

**मृणा०**--परत कां जात नाहींस ?

गिरिजाया गातच होती--

**निराश झाल्यें, परि मनिं आलें जाऊं या परतुनी**
**पातली नौका तीरा झणीं ॥**
**भीमभुजंगम वेष्टित दिसले कंटकमय वनतरू**
**जीविता आशा कैशी धरूं ॥'**

**मृणा०**—तर मग पाण्यांत बुडून कां मरत नाहींस ?

**गिरि०**—मरायला हरकत नाहीं; पण—

इतकें बोलून ती पुनः गाऊं लागली—

**' कर्णधार तो प्रियकर माझा, हाय ! दिसेना वली**
**जयास्तव नौका ही सज्जिली ॥'**

**मृणा०**--गिरिजाये ! कोणत्या अरसिकाचें हें गाणें आहे ?

**गिरि०**—कां बरें ?

**मृणा०**—मी असत्यें तर त्याची नावच बुडविली असती.

**गिरि०**—हें अगदीं मनापासून बोलतां आहांना ?

**मृणा०**—हो अगदीं मनापासून.

**गिरि०**—तर मग पाण्यांत तुम्हांला रत्न दिसलें असलें पाहिजे.

---

प्रकरण चौथें.

## खिडकींत.



हेमचंद्र कांहीं दिवस त्या वाड्यांत राहिला. तेथें जनार्दनाची व त्याची रोज गांठ पडे. त्याच्याशीं त्याच्या बहिरेपणामुळें खुणांच्या द्वारेंच त्याचें संभाषण चालत असे. मनोरमेशींहि त्याची सदोदित गांठ पडे. मनोरमा केव्हां त्याच्याशीं बोले, केव्हां न बोलतां तशीच चालती होई. मनोरमेचा स्वभाव त्याला खरोखर अधिकच विस्मयकारक वाटूं लागला होता. पहिली गोष्ट ही कीं, तिचें वय किती असेल याचा अंदाज त्याला करतां येईना. ती वयानें लहान मुलगी आहे, असें त्याला साहजिकच वाटे; पण केव्हां केव्हां तिची वृत्ति अतिशय गंभीर दिसून

येई. मनोरमा अद्याप कुमारी असेल काय ? हेमचंद्रानें एकदां सहज बोलण्याच्या ओघांत तिला विचारलें, ' मनोरमे ! तुझें सासर कोठें आहे ?' तेव्हां तिनें उत्तर केलें, ' कांहीं सांगतां येत नाहीं. ' आणखी एके दिवशीं त्यानें प्रश्न केला कीं ' मनोरमे ! तुला कितवें वर्ष आहे ? ' तेव्हांहि तिनें उत्तर केलें, ' कांहीं सांगतां येत नाहीं. '

माधवाचार्य हेमचंद्राला त्या वाड्यांत ठेवून देशपर्यटनाला गेले. हेतु हा कीं गौड देशांतल्या मांडलिक राजांनीं सैन्यासह जाऊन गौडेश्वराला मदत करावी म्हणून त्यांचें मन वळवावें. हेमचंद्र नवद्वीप येथें त्याची मार्गप्रतीक्षा करीत होता. रिकामें बसून काळ कंठण्याला तो कंटाळला होता. एकादे वेळीं असेंहि त्याच्या मनांत येई कीं दिग्विजयाला घर संभाळण्यासाठीं ठेवून आपण घोड्यावर स्वार होऊन गौडाला जावें. पण तेथें मृणालिनीची गांठ घेतली तर, प्रतिज्ञेचा भंग घडेल. बरें, न घेतली, तर गौडाला जाण्यापासून फायदा काय ? या सगळ्या गोष्टींचा विचार केल्यावर त्याचें मन बदलत असे. तथापि रोज मृणालिनीचें चिंतनांत त्याचें मन गुंतलेलें असे. एकदां प्रदोषकाळीं तो आपल्या शय्यागृहांत पलंगावर पडून मृणालिनीविषयींचा विचार करीत होता. नुसत्या तिच्याबद्दलच्या चिंतनानेंच त्याच्या मनाला सुख वाटे. उघड्या खिडकींतून तो सृष्टीची शोभा पाहात होता. शरत्कालाला नुकताच प्रारंभ झाला होता. चांदणीरात्र होती, आकाश निरभ्र होतें. त्या विस्तृत आकाशांत चांदण्या चमकत होत्या. क्वचित् एकादा पातळसा शुभ्र ढग दिसता होता. खिडकींतून जवळच असलेलें भागीरथी नदीचें पात्र दिसत होतें. चंद्राच्या किरणांनीं तिच्या लाटा प्रकाशमान झालेल्या होत्या. दूरच्या प्रांतांत तिचा प्रवाह धूममय दिसत होता. नदीला पूर आलेला होता. त्या पुरामुळें होणारा मोठा कल्लोळ हेमचंद्राच्या कानीं पडत होता. खिडकींतून भागीरथीच्या तरंगस्पर्शामुळें शीतल झालेला वाऱ्याचा स्रोत वन्य-पुष्पांच्या संसर्गानें सुगंधित होऊन येऊन हेमचंद्राच्या मनाला विशेष सुख देत होता.

एकाएकीं अंधेर झाला. चंद्रकिरणाच्या गतीला प्रतिबंध झाला. खिडकीच्या जवळ माणसाचें मुंडकें हेमचंद्रानें पाहिलें. खिडकी जमिनीपेक्षां थोडी उंच होती. त्यामुळें माणसाचे हातपाय दिसले नाहींत. नुसतें डोकेंच दिसलें. तोंड फार मोठें होतें. त्यावर दाढीमिशा होत्या. डोक्याला पगडी होती. तें पाहतांच

हेमचंद्र ताटकन् उठला. त्यानें हातांत आपली तलवार घेतली. मग तो खिडकी-वाटे पाहूं लागला, पण कोणी गाणूस दिसलें नाहीं.

हेमचंद्र हातांत तलवार घेतलेला तसाच दार उघडून बाहेर पडला व खिड-कीच्या खालीं आला; पण तेथेंहि त्याला कोणीं दिसलें नाहीं.

घराच्या आजूबाजूला चोहींकडे त्यानें पाहिलें. बगीच्यांत शोधून पाहिलें. पण कोणीं आढळलें नाहीं.

तेव्हां तो घरांत परत गेला. पित्यानें दिलेला योद्धयाचा पोषाख त्यानें अंगावर नखशिखांत चढविला. अकालीं आकाशांत मेघ दिसूं लागले म्हणजे गगनमंडळ ज्याप्रमाणें कृष्णवर्ण दिसतें, त्याप्रमाणें आतां त्याची सुंदर मुखकांति अंधकारमय दिसूं लागली. तो एकटा ह्या काळोख्या रात्रीं हत्यारबंद होऊन कोठें निघून गेला. खिडकींत माणसाचें तोंड पाहून त्यानें ताडलें कीं तुर्क लोक बंगालप्रांतांत येऊन पोंचले असावे.

---

प्रकरण पांचवें.

## तळ्याच्या कांठीं.



अकालमेघदर्शनाप्रमाणें भयंकर अशी ती तुर्कांची मूर्ति पाहून त्या माण-साच्या शोधार्थ हेमचंद्र बाहेर पडला होता. वाघ जसा हरिणाची शिकार पाह-तांच वेगानें धावत जातो, त्याप्रमाणें तुर्काला पाहतांच हेमचंद्र त्वरेनें निघाला होता. पण तो कोठें सांपडेल याचा त्यानें मनाशीं कांहींच विचार केला नव्हता.

हेमचंद्राच्या दृष्टीला एकच तुर्क पडला होता. पण त्यानें यावरून असा तर्क केला कीं, तुर्कांची फौजची फौज येऊन शहरापाशीं कोठें तरी लपून बसली असावी. किंवा हा मनुष्य तुर्कांचा नुसता एक हेर पुढें आलेला असावा. जर तुर्कसेना आली असली, तर तिच्याशीं आपण एकटे कसे लढणार? पण तें कांहींहि असो, काय प्रकार वस्तुतः आहे तें तर पाहावें? असा त्यानें मनाशीं विचार केला होता. त्या गोष्टीचा शोध लाविल्यावांचून त्याला चैनच पडेना. यवनांचा वध करण्यांत त्याला विशेष आनंद वाटत होता. तुर्कांचें तोंड पाहि-ल्यापासून त्यांच्या वधाची इच्छा त्याच्या मनांत फार प्रबळ झाली होती. ती त्याला स्वस्थ कशी बसूं देईल? तो तडकाफडकीं राजमार्गाकडे निघाला.

तो राहत होता त्या वाड्याभोंवतालच्या बगीच्यापासून राजमार्ग थोडासा दूर होता. त्या बगीच्यापासून राजमार्गापर्यंत जाणाऱ्या रस्त्यावर रहदारीहि फारशी नव्हती. हेमचंद्र त्याच वाटेनें जाण्यास निघाला. त्या रस्त्याच्या बाजूला विस्तृत व रम्य असें एक तळें होतें. त्याला पायऱ्या होत्या. तळ्याभोंवतीं बकुळी, शाल, अशोक, पिंपळ, चांफा, कदंब प्रभृति अनेक वृक्ष होते. ते रांगेनें लाविलेले होते असें नाहीं. पुष्कळ वृक्षांच्या फांद्या परस्परांत गुंतून तेथें इतका अंधार झाला होता कीं, दिवसासुद्धां तेथें उजेड पडण्याची मारामार होती ! तेथें पिशाचें अहोरात्र वावरतात असा लोकप्रवाद होता, म्हणून तेथें कोणी जात नसत. निदान एकटें दुकटें तरी कोणी जात नसे.

जुन्या पुराण्याकाळीं धार्मिक वगैरे भावनांची छाप लोकांच्या मनावर विशेष असल्यामुळें भूतपिशाचांच्या अस्तित्वावर हेमचंद्राचाहि विश्वास होता, यांत मोठेंसें नवल नाहीं; तथापि जरी असा विश्वास त्याच्याठायीं असला, तरी त्या रस्त्यानें न जाण्याइतका तो भित्रा नव्हता. म्हणून मनांत यत्किंचित् भय न धरतां तो चालला होता. त्याच्या मनाला भय वाटलें नाहीं खरें; पण भुतें कशीं असतात तीं पाहण्याविषयींची उत्सुकता त्याच्या ठायीं नव्हती असें नाहीं. तळ्याजवळून जातांना त्याची दृष्टि बारकाईनें सर्वत्र पाहत होती. जातां जातां तो पायऱ्यांच्या जवळ गेला. इतक्यांत एकाएकीं तो दचकला. लोकप्रवादावरची त्याची पूर्ण श्रद्धा दृढ झाली. त्यानें पाहिलें तर चांदण्याच्या प्रकाशांत सगळ्यांत खालच्या पायरीवर पाण्यांत पाय ठेवून पांढरें शुभ्र वस्त्र परिधान केलेलें कोणी बसलें आहे, असें त्याला दिसलें. ती स्त्रीची आकृति होती. तिचे केस मोकळे सुटलेले होते. त्यांनीं तिचे खांदे, पाठ, बाहु, मुख, व ऊर हीं झांकून गेलीं होतीं. पिशाच असेल अशा समजुतीनें हेमचंद्र मुकाट्यानें चालला होता. पण पुनः त्याला शंका आली कीं कोणी मनुष्य तर नसेल ? पण रात्रीं येथें मनुष्य कशाला येईल ? मघाशीं पाहिलेला तुर्क तर तो नसेल ? अशी शंका त्याच्या मनाला येतांच तो परत फिरला, आणि निर्भय चित्तानें पायऱ्या उतरूं लागला. ती हडळ त्याला पाहतांच तेथून पळून न जातां तशीच बसून राहिली. हेमचंद्र तिच्याजवळ गेला, तेव्हां ती उठून उभी राहिली व हेमचंद्राकडे वळली. तिनें आपल्या हातानें तोंडावरले केस सावरले. तेव्हां हेमचंद्राला तिचें तोंड दिसलें. ती हडळ नव्हती. हडळ असती तर त्याला येवढें आश्चर्य वाटलें नसतें. त्यानें विचारलें, ' मनोरमे ! तूं येथें कशी ?'

मनो०—मी तर येथें नेहमीं येत्यें. पण तुम्ही आज कसे आलां ?

हेम०—कांहीं कामासाठीं आलों आहें.

मनो०—अशा रात्रीं कसचें काम ?

हेम०—तें मी मग सांगेन. पण तूं रात्रींची येथें कां आलीस ?

मनो०—तुमचा असा पोषाख कां? हातांत भाला व कमरेला तरवार, या वेळीं कशासाठीं ? तरवारीच्या मुठीपाशीं काय चमकतें आहें ? हिरा आहे होय ? डोक्यावर काय झळकतें आहे ? तोहि हिराच का? तो तुम्ही कोठून आणला ?

हेम०—माझ्या जवळ होता.

मनो०—रात्रीं असे हिरे अंगावर घालून कोठें निघालांत ? चोर ते काढून घेतील ना ?

हेम०—माझ्याजवळून त्यांना ते काढून घेतां येणार नाहींत.

मनो०—पण इतक्या रात्रीं असे हिऱ्याचे अलंकार घालून जाण्याचें काय कारण ? तुम्ही काय लग्नाला निघालांत ?

हेम०—तुला कसें वाटतें, मनोरमे ?

मनो०—माणसाला मारण्याचीं हत्यारें घेऊन कोणी लग्नाला जात नाहींत. तुम्ही युद्धाला निघालां असाल ?

हेम०—पण कोणाशीं युद्ध करावयाचें ? तूं पण येथें काय करत्येस ?

मनो०—मीं स्नान केलें. स्नान करून वाऱ्यावर केस वाळवीत बसल्यें होत्यें. हे पहा माझे केस अजून ओलेच आहेत.

इतकें बोलून तिनें आपले ओले केस हेमचंद्राच्या हातावरून फिरविले.

हेम०—रात्रीं स्नान ? तें कां ?

मनो०—माझ्या अंगाची आग होत होती.

हेम—मग गंगेवर स्नानाला जायचें सोडून येथें कां आलीस ?

मनो०—येथचें पाणी अधिक थंड आहे.

हेम०—तूं येथेंच नेहमीं येत्येस ?

मनो०—हो.

हेम०—मी तुझें लग्न करून देणार. लग्न झाल्यावर तूं येथें कशी येशील ?

मनो०—अगोदर लग्न तर होऊं द्या !

हेमचंद्र हसून म्हणाला, 'तुला कांहींच भीडमर्यादा कशी नाहीं ?'

**मनो०**—माझा असा तिरस्कार काय म्हणून करतां ? 'मी तुझा तिरस्कार करणार नाहीं' असें तुम्हीच मागें म्हणालां होतां ना ?

**हेम०**—चूक घडली. ती मनावर घेऊं नकोस. पण इकडून कोणाला जातांना तूं पाहिलेंस काय ?

**मनो०**—हो. पाहिलें.

**हेम०**—त्याचा पोषाख कसा होता ?

**मनो०**—तुर्कासारखा.

हें ऐकून हेमचंद्र अत्यंत चकित झाला. तो म्हणाला, 'तो कोण होता ? तो तुर्कच असें तूं कशावरून ओळखलेंस ?

**मनो०**—मीं पूर्वी तुर्काला पाहिलें आहे.

**हेम०**—तें कसें ? कोठें पाहिलें होतें ?

**मनो०**—कोठें का पाहिलें असेना ? तुम्ही काय त्याच्यामागें जाणार आहां ?

**हेम०**—हो. तो कोणत्या वाटेनें गेला ?

**मनो०**—कां बरें ?

**हेम०**—त्याला मारावयाचें आहे.

**मनो०**—कशासाठीं ?

**हेम०**—तुर्क लोक माझे कट्टे शत्रु आहेत.

**मनो०**—मग त्याला एकट्याला मारून तुमची तृप्ति होईल ?

**हेम०**—जितके तुर्क दिसतील तितक्यांना मी मारणार आहें.

**मनो०**—इतकी शक्ति तुमच्या अंगांत आहे ?

**हेम०**—हो, आहे.

**मनो०**—तर मग माझ्याबरोबर सावधगिरीनें या.

हेमचंद्र कांकूं करूं लागला. यवनाशीं युद्ध करायला निघालेल्या माणसाला अशा मुलीनें वाट दाखवायची !

मनोरमेनें त्याच्या मनांतला भाव ओळखला. तिनें विचारलें, 'मी मुलगी म्हणून माझ्यावर तुमचा भरंवसा बसत नाहीं. असेंच ना ? '

हेमचंद्रानें मनोरमेकडे न्याहाळून पाहिलें. तेव्हां त्याला फार आश्चर्य वाटलें. तो मनांत म्हणाला, 'ही मनोरमा मनुष्य कीं अन्य कोणीं—? '

---

## प्रकरण सहावें.

# पशुपति.



गौडेश्वराचे धर्माधिकारी पशुपति ही एक असाधारण व्यक्ति होती. तो म्हणजे गौडदेशाचा दुसरा राजाच होता. खरा राजा वृद्ध असल्यामुळें परावलंबी होता. तो राज्याच्या कारभाराचें काम स्वतः पाहत नसे. तें काम त्याचा मुख्य अमात्य व धर्माधिकारी याच्याकडेस सोंपविण्यांत आलें होतें. त्यामुळें संपत्ति व ऐश्वर्य या दोन बाबतींत पशुपति राजाच्या तोलाचा होऊन बसला होता.

पशुपतीचें वय सुमारें पस्तीस वर्षांचें असेल. दिसायला तो फार देखणा होता. शरीराची काठी उंच, छाती विशाल, व सर्व अंगांत अस्थि व मांस यांची यथायोग्य ठेवण असल्यामुळें तो सुंदर दिसत असे. तप्तकांचनासारखा त्याचा वर्ण होता. भालप्रदेश अतिशय विस्तृत होता. जणूं काय मानसिक शक्तीचें मंदिरच ! नाक लांब व वर आलेलें होतें. डोळे बारीक, पण अतिशय पाणीदार व तेजस्वी होते. मुखकांति ज्ञानगांभीर्यव्यंजक होती; रात्रंदिवस आपल्या ध्येयाच्या विचारामुळें त्याच्या चर्येवर एक प्रकारची कठोरभावाची छटा आलेली दिसत होती. ती असली म्हणून काय झालें ? राजसभेंत त्याच्यासारखा सर्वांगसुंदर पुरुष दुसरा एकहि नव्हता. लोक म्हणत कीं त्याच्यासारखा पंडित व हुशार मनुष्य साऱ्या गौड देशांत कोणीं आढळत नाहीं.

पशुपति जातीनें ब्राह्मण होता. त्याची जन्मभूमि कोणती तें कोणाला फारसें ठाऊक नव्हतें. त्याचा बाप एक चांगला शास्त्रसंपन्न पण दरिद्री ब्राह्मण होता, असें लोक सांगत.

पशुपति केवळ आपल्या बुद्धीच्या व विद्येच्या प्रभावानें गौड राज्याच्या मुख्य प्रधानाच्या पदाला चढलेला होता.

पशुपति बालपणीं काशी येथें आपल्या पित्याजवळ शास्त्राध्ययन करीत होता. तेथें केशव नांवाचा एक बंगाली ब्राह्मण जवळ राहत असे. त्याला हेमवती नांवाची एक आठ वर्षांची मुलगी होती. तिच्याशीं त्याचा विवाह झाला होता. पण अदृष्टवशात् विवाहाच्या रात्रींच केशव आपल्या मुलीला घेऊन कोठें निघून गेला, त्याचा कोठेंहि शोध लागला नाहीं; त्यामुळें तेव्हांपासून आतांपर्यंत पशुपतीला

पत्नीसहवासाचें सुख मिळालें नव्हतें. कांहीं कारणामुळें त्यानें पुनः लग्न केलें नाहीं. तो एका भव्य वाड्यांत राजासारखा राहत होता. पण स्त्रीच्या नेत्रकटाक्षांतून बाहेर पडणाऱ्या प्रकाशाच्या अभावीं त्या भव्य वाड्यांत आज सारा अंधार होता.

त्या वाड्यांत एका गुप्त भागांत पशुपति दिव्याच्या प्रकाशांत बसला होता. या महालाच्या मागें एक आंबराई होती. त्या आंबराईंत जाण्याला एक चोरदार होतें. त्या दाराशीं येऊन रात्रीं कोणीं दारावर हळूहळू थापा मारीत होतें. त्या ऐकून पशुपतीनें तें दार उघडलें. तेव्हां एक माणूस आंत आलें. हा मनुष्य मुसलमान होता. हेमचंद्रानें ज्याला खिडकींत पाहिलें होतें, तोच हा मनुष्य. पशुपतीनें त्याला बसायला निराळें आसन देऊन ओळखीसाठीं खुणेची वस्तु मागितली. त्यानेंहि ती चटकन काढून दाखविली.

त्याला पशुपति संस्कृत भाषेंत म्हणाला, 'समजलों. आपण तुर्काधिपतीच्या विश्वासांतले पुरुष तेव्हां आमच्याहि विश्वासास पात्र आहां. आपलें नांव महमद-अल्ली ना ? आतां आपल्या सेनापतीचे विचार सांगा पाहूं ?' यवनानेंहि संस्कृतांतच उत्तर दिलें. पण त्याच्या संस्कृतांतील तीन चतुर्थांश भाग फारशी होता आणि बाकीचा चवथा हिस्सा अशा प्रकारच्या संस्कृतांत होता कीं तशी संस्कृत भाषा भारतवर्षांत कोठेंहि व्यवहारांत आढळत नसे. ती संस्कृत भाषा स्वतः महमदअल्लीनेंच निर्माण केलेली होती. पशुपति मोठ्या कष्टानें त्याच्या बोलण्याचा अर्थ लावून समजून घेत होता. वाचकांना तसे कष्ट भोगण्यास लावावयाचें आम्हांला कांहीं कारण दिसत नाहीं. त्यांना तो मजकूर सुबोध व्हावा म्हणून आम्ही त्याचें भाषांतरच येथें देतों.

यवन म्हणाला, 'खिलजी साहेबांचा अभिप्राय आपणास अवगत आहेच. युद्ध केल्यावांचूनच गौड देश जिंकावा अशी त्यांची इच्छा आहे. काय केलें म्हणजे आपण हें राज्य त्यांच्या स्वाधीन कराल ?'

**पशुपति**—हें राज्य त्यांच्या हातांत द्यावें कीं नाहीं, याविषयीं आमचा निश्चय अद्याप ठरलेला नाहीं. स्वदेशाशीं वैर करणें हें महापातक आहे. आम्हीं तें कां करावें ?

**यवन**—उत्तम ! तसें असेल तर मी हा चाललों. पण मग आपण खिलजीसाहेबाकडे मुद्दाम दूत पाठविला होता तो कशासाठीं ?

**पशु०**—युद्ध करण्याविषयींची त्यांची इच्छा कितीशी आहे, तें कळण्यासाठीं.

**यवन**—तर मग मी जाण्यापूर्वी आपणास हें कळवितों कीं, युद्ध करण्यांतच त्यांना आनंद वाटत आहे.

**पशु०**—( संस्कृतांत ) मनुष्य युद्धे, पशुयुद्धेच ? हस्तियुद्धांत त्यांना कां आनंद वाटावा ?

महमदअली रागानें म्हणाला, 'गौड देशाला युद्धाच्या हेतूनें येणें म्हणजे पशुयुद्धासाठींच येण्यासारखें आहे. असा उपहास करण्यासाठींच आपण सेनापतीकडे निरोप पाठवून मला बोलाविलें वाटतें ? आम्हांला युद्धाच्या गोष्टी कळतात. थट्टाबिट्टा आम्ही ओळखींत नाहीं. जें आम्ही जाणतों तेंच करून दाखवूं. समजलांत ?'

इतकें बोलून महमदअली रागानें उठून जाऊं लागला. तेव्हां पशुपति म्हणाला, 'जरा थांबा. माझें म्हणणें थोडें ऐकून घ्या. यवनांच्या हातीं हें राज्य देण्यास आम्ही नाकबूल नाहीं; असमर्थहि नाहीं. मीच वस्तुतः येथचा राजा आहें. सेनराजा केवळ नामधारी आहे; पण योग्य मोबदला मिळाल्याशिवाय आम्ही आपलें राज्य तुम्हांला कसें द्यावें ?'

महमदअलीनें विचारलें, 'तुम्हांला कोणता मोबदला पाहिजे ? बोला.'

**पशु०**—खिलजी काय देईल ?

**मह०**—आज तुम्हाला जें जें कांहीं मिळत आहे तें सगळें जीवन, ऐश्वर्य, प्रधानपद सगळें–कायम राहील. येवढेंच. यापेक्षां जास्त नाहीं.

**पशु०**—मग मला यांत कोणता लाभ घडणार ? कोणत्या मोठ्या लाभाच्या लालचीनें मीं हें महापापकृत्य करावयाचें ?

**मह०**—तुम्ही आम्हांला अनुकूळ न झालांत तर त्यांतलें कांहींहि राहणार नाहीं. युद्ध केल्यास तुमचें ऐश्वर्य, प्रधानपद, फार काय; पण, प्राणसुद्धां राहणार नाहींत, हें पक्कें ध्यानांत ठेवा.

**पशु०**—युद्ध होऊन जाईपर्यंत तें कोणालाच कांहीं सांगतां यावयाचें नाहीं. आम्ही लढाईला मागे येणारे आहों असें समजूं नका. विशेष गोष्ट ही कीं याच वेळीं मगधदेशांत बंड उद्भवलें आहे, हें तुम्हांला ठाऊक असेलच. तें मोडण्याच्या उद्योगांत या वेळीं खिलजी गुंतलेला असणार. तेव्हां गौडराज्य जिंकण्याची त्याची खटपट कांहीं दिवस तरी त्याला बाजूला सारून ठेविलीच

पाहिजे, हेंहि आम्हास ठाऊक आहे. आम्हांला योग्य मोबदला द्यावयाचा नसेल तर नका देऊं. पण युद्ध करावयाचेंच ठरलें, तर आम्हांला तें करायाला हीच संधी फार उत्तम आहे. जेव्हां बिहार प्रांतांत बंडवाल्यांची फौज तयार होईल, तेव्हां गौडराजाची सेनाहि सज्ज राहील. समजलांत ?

**मह०**—मग काय बिघडलें ? मुंगी चावल्यानंतर त्याच जागीं पुनः माशी चावली म्हणून हत्ती कांहीं मरत नाहीं. पण आपणाला किती बक्षीस पाहिजे तें एकदां ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**पशु०**—ऐका तर. मी या वेळीं वस्तुतः गौडदेशाचा राजा आहें. लोक मला त्या नांवानें म्हणत नाहींत इतकेंच काय तें. मला स्वतःच्या नांवानें राज्य करण्याची इच्छा आहे. तेव्हां सेन वंशाचा लोप होऊन हा पशुपति गौडांचा राजा व्हावा ही इच्छा.

**मह०**—पण तसें करण्यापासून आम्हांला कोणता लाभ होणार ? तुम्ही आम्हांला काय देणार ?

**पशु०**—फक्त खंडणी. मी मुसलमानांना खंडणी देणारा मांडलिक राजा होईन.

**मह०**—बरें, तुम्ही जर हल्लींच राजासारखे आहां, आणि राजा तुमच्या अगदीं मुठींत आहे, तर मग आमच्याशीं बोलणें लावण्याचें तुम्हांला कारण काय होतें ? आम्हांला तुम्हीं खंडणी काय म्हणून द्यावी ?

**पशु०**—तें आतां स्पष्ट करून सांगतों. यांत कांहीं कपट समजूं नका. पहिली गोष्ट ही कीं, सेनराज आमचे मालक आहेत. ते वयानें वृद्ध आहेत आणि माझ्यावर त्यांचा फार लोभ आहे, तेव्हां मीं जर शिरजोर होऊन त्यांना राज्यभ्रष्ट केलें, तर लोकांच्या निंदेला पात्र होईन. तुम्ही थोडीशी युद्धाची चुणूक दाखविली, आणि माझ्या अनुकूलतेनें लढाईवांचूनच राजधानींत शिरून राजाला सिंहासनावरून दूर केलें व माझी त्या जागीं स्थापना केली, तर लोक मला नांवें ठेवणार नाहींत. एक ही गोष्ट झाली. दुसरी गोष्ट—राज्य एखाद्या अनधिकारी माणसाच्या हातांत जातें, तेव्हां बंड उद्भवण्याचा संभव असतो; पण तुमच्या साह्यानें मला तें बंड सहज मोडतां येईल. तिसरी गोष्ट—मी राजा झालों म्हणजे सेनराजाशीं जो तुमचा संबंध आहे, तोच पुढें माझ्याशीं कायम राहील. तुमच्या मनांत युद्धच करण्याचें असलें तर त्यालाहि आमची तयारी आहे. पण युद्ध म्हटलें म्हणजे त्यांत जय व पराजय दोन्ही संभवतात. जय झाला तर

मला नवीन कांहीं लाभ व्हावयाचा नाहीं. पराजय झाला, तर मात्र सर्वस्वाची हानि होणार; पण तुमच्या सारख्यांशीं तह करून राज्याचा स्वीकार केला म्हणजे तीहि शंका बाळगण्याला नको. विशेषतः मनाला नेहमीं युद्धाचें व्यवधान लागून राहिलें असलें म्हणजे राज्याचा कारभार नीट चालवितां येत नाहीं.

**मह०**—तुम्ही राजनीतिविशारद पंडिताप्रमाणें आतां विवेचन केलें. तुमचें म्हणणें मला पूर्णपणें पटतें. मीहि आतां खिलजी साहेबांचा अभिप्राय तुम्हांला असाच स्पष्टपणें सांगतों. त्यांच्या मागें सध्या बऱ्याच काळज्या लागल्या आहेत; ही गोष्ट खरी आहे; पण हिंदुस्थानांत यवनबादशाचीच एकट्याची सत्ता राहील. दुसऱ्या राजाचें नांवसुद्धां आम्ही राहूं देणार नाहीं. तुम्हांला गौड देशाचें राज्य देण्यांत येईल; पण ज्याप्रमाणें दिल्लींत महमद घोरीचा प्रतिनिधि कुतुबुद्दीन किंवा पूर्वेकडील देशांत कुतुबुद्दिनाचा प्रतिनिधि बख्तियार खिलजी आहे; त्याप्रमाणें तुम्ही गौड देशांत बख्तियारचे प्रतिनिधि म्हणून राहाल. हें आपणांस मान्य आहे ना ?

**पशु०**—हो आहे.

**मह०**—ठीक. आणखी एक गोष्ट तुम्हांला विचारावयाची आहे. तुम्ही जी गोष्ट करण्याचें पतकरलें आहे, ती पार पाडण्यास तुमच्यापाशीं कितीसें सामर्थ्य आहे ?

**पशु०**—माझ्या हुकुमावांचून येथें पायदळांतला एकहि शिपाई लढाई करणार नाहीं. राज्याचा खजिना माझ्याच एका नोकराच्या हातांत आहे. माझ्या हुकुमावांचून युद्धाप्रीत्यर्थ एक कपर्दिक सुद्धां खर्च केली जाणार नाहीं. पांच माणसें बरोबर घेऊन राजधानींत प्रवेश करण्याला खिलजीला खुशाल सांगा. ‘ तुम्ही कोण ? ’ असें त्यांना नुसतें कोणी विचारणार सुद्धां नाहीं.

**मह०**—आणखी एक गोष्ट विचारायची राहिली. या देशांत यवनांचा कट्टा दुष्मन् हेमचंद्र हा राहत आहे. आजच रात्रीं त्याचें डोकें कापून तुम्ही आमच्या छावणीकडे पाठविलें पाहिजे.

**पशु०**—तें आल्याबरोबर तुम्हांला करतां येईल. शरणागताला मारण्याचें पाप आम्हीं कसें करावें ?

**मह०**—आमच्याकडून तें होण्यासारखें नाहीं. यवन लोक जवळ आले आहेत हें कळतांच तो कोठें तरी पळून जाईल एखादा. आज तो गैरसावध आहे. आजच मारेकरी घालून त्याला ठार करा म्हणजे झालें.

**पशु०**—बरें बुवा ! हेंहि कबूल करतों.

**मह०**—फार खुषीची गोष्ट आहे. आतां तुमचें उत्तर घेऊन मी जातों.

**पशु०**—एक गोष्ट विचारावयाची राहिली.

**मह०**—ती कोणती ? आज्ञा व्हावी.

**पशु०**—आम्ही तुमच्या हातीं राज्य देऊं; पण मग तें दिल्यावर तुम्ही आम्हांला काढून लावणार नाहीं ना ?

**मह०**—तुमच्या शब्दांवर भरंवसा ठेवून आम्ही अगदीं थोडी फौज घेऊन दूत म्हणून राजधानींत शिरूं. त्या वेळीं कबूल केल्याप्रमाणें आम्ही न वागलों तर आम्हांला हाकून लावणें तुम्हांला कांहीं जड जाणार नाहीं !

**पशु०**—पण तुम्ही बरीज फौज घेऊन आलां तर ?

**मह०**—तर मग बेशक युद्ध करा.

इतकें बोलून महमदअलीनें निरोप घेतला.

---

प्रकरण सातवें.

# चोराला पकडणारा.



महमदअली बाहेर निघून दृष्टीच्या टप्याच्या पलीकडे गेल्यावर दुसरा एक माणूस चोरदाराजवळ जाऊन म्हणाला, ' मी आंत येऊं का ? '

पशुपति म्हणाला, 'ये.'

तेव्हां एक शिपाई आंत शिरला. रीतीप्रमाणें त्यानें सलामी दिल्यावर पशुपतीनें त्याला विचारलें 'कसें काय शांतशील ? आनंदाची बातमी आणिली आहेस ना ?'

**शिपाई**—आपण प्रश्न विचारावे म्हणजे एकेका गोष्टीबद्दल सांगतों.

**पशु०**—यवनांचे ठिकाणीं गेला होतास ?

**शिपाई**—तेथें कोणालाच जातां येत नाहीं.

**पशु०**—कां बरें ?

**शि०**—तें अतिशय निबिड अरण्य आहे.

**पशु०**—मग हातांत कुऱ्हाड घेऊन झाडांच्या फांद्या तोडीत कां नाहीं गेलास ?

शि०—तेथें वाघ लांडग्यांचें भय आहे.

पशु०—हत्यार घेऊन जावयाचें होतें.

शांतशील—जे लाकूडतोडये कुऱ्हाडी घेऊन गेले होते, ते सगळे यवनांच्या हातून मारले गेले. एकजणसुद्धां परत आला नाहीं.

पशु०—तूंहि आला नसतास तर काय बिघडलें असतें ?

शांत०—मग आपणाला बातमी कोणीं येऊन दिली असती ?

पशुपति हसून म्हणाला, 'तूंच आला असतास तो सांगायला.

शांतशील—मी तर आलोंच आहें.

पशु०—बरें, मग तूं तेथें कसा गेलास ?

शांत०—प्रथम तुर्की तऱ्हेची पगडी, शस्त्रें आणि पोषाख मिळवून त्यांचें गांठोडें पाठीला बांधिलें आणि लाकूडतोड्यांच्या बरोबर रानांत शिरलों. जेव्हां पाहिलें कीं यवनांनीं लाकूडतोड्यांना पकडून मारलें; तेव्हां मी पळून एका झाडाच्या आड जाऊन तुर्की वेष चढविला, आणि यवनांच्या छावणींत शिरलों.

पशु०—वाः ! छान कामगिरी केलीस ! यवनांची फौज कितीशी आहे ?

शांत०—फार मोठी. सगळें अरण्य तिनें व्यापून टाकिलें आहे. पंचवीस हजार असेल.

तें ऐकून व भिवया संकुचित करून पशुपति कांहीं वेळ स्तब्ध बसला. मग म्हणाला, 'बरें, त्यांच्या तोंडून कांहीं गोष्टी तुला कळल्या काय ?'

शांत०—पुष्कळ कळल्या. पण त्या आपल्याला मला सांगतां येत नाहींत.

पशु०—कां बरें ?

शांत०—मला त्यांची भाषा येत नाहीं.

पशुपति हसला. तें पाहून शांतशील म्हणाला, 'महमदअली इकडे आला होता, त्यावरून कांहीं संकट येणार अशी शंका येते.'

पशुपतीनें दचकून विचारलें कां बरें ?'

शांत०—तो आल्याचें कोणीं तरी पाहिलें आहे.

पशु०—हें काशावरून ?

शांत०—मी श्रीच्या चरणाच्या दर्शनाला आलों, त्या वेळीं एक मनुष्य एका झाडाखालीं लपून बसलेला पाहिला. त्याच्या अंगावर लढाईचा पोषाख होता. त्याच्याशीं झालेल्या संभाषणावरून मी समजलों कीं महमदअली या नगरांत

प्रवेश करतांना पाहिल्यापासून तो त्याची वाट पाहत असावा. तो कोण होता तें अंधेरामुळें मला ओळखतां आलें नाहीं.

**पशु०**—बरें पुढें.

**शांत०**—मग मीं त्याला पकडलें आणि चित्रगृहांत कैदेंत ठेवून तसाच इकडे आलों.

पशुपति त्याला धन्यवाद देऊं लागला व म्हणाला, 'उद्यां सकाळीं उठून अगोदर त्या माणसाची चौकशी केली पाहिजे. आजच्या रात्रीं त्याला कैदेंतच राहूं दे. आतां तुझ्याकडे दुसरें एक काम मला द्यावयाचें आहे. यवनसेनापतीची अशी इच्छा आहे कीं, आज रात्रीं मगधराजपुत्राचें मुंडकें कापून आणिलेलें पहावें. हें काम आतांच व्हावयाला पाहिजे.

**शांत०**—हें काम कांहीं सोपें नाहीं. राजपुत्र म्हणजे कांहीं कीडमुंगी नाहीं!

**पशु०**—आम्ही तुला कांहीं मोठ्या युद्धाला जायला सांगत नाहीं. थोडेसे लोक बरोबर घेऊन त्याच्या वाड्यावर हल्ला कर म्हणजे झालें.

**शांत०**—पण लोक काय म्हणतील?

**पशु०**—लोक म्हणतील कीं दरोडेखोरांच्या हातून तो मारला गेला. दुसरें काय म्हणणार?

**शांत०**—जशी आपली आज्ञा, हा निघालों पहा.

पशुपतीनें शांतशीलाला चांगलें इनाम देऊन निरोप दिला. नंतर आपल्या वाड्यांतल्या बारीक नक्षीकामानें सुशोभित केलेल्या मंदिरांत अष्टभुजा देवीची मूर्ति स्थापन केली होती, तिच्या पुढें साष्टांग नमस्कार घालून व हात जोडून त्यानें भक्तियुक्त अंतःकरणानें देवीचें स्तोत्र म्हटलें, व प्रार्थना केली कीं 'हे जननि! विश्वपालिनि! मीं अथांग महासागरांत उडी टाकिली आहे. मातुश्री! तूंच माझें रक्षण कर. जननीस्वरूपी जन्मभूमीला देवांचा द्वेष करणाऱ्या यवनांना मी कदापि विकणार नाहीं. माझ्या वर्तनांत पाप किंवा कपट असलें तर येवढेंच कीं, दुर्बळ वृद्धराजाला सिंहासनावरून काढून मी स्वतः त्या जागीं बसूं पाहत आहें. जसा कांट्यानें कांटा काढल्यावर दोन्ही कांटे फेकून देतात, त्याप्रमाणें यवनांच्या साह्यानें राज्य मिळविल्यावर मी यवनांचाहि निःपात करीन. यांत कोणतें पाप आहे? यांत जर पाप असेल, तर यावन्मरण प्रजेला सुख देऊन

मी त्या पापाची निष्कृति करीन. हे जगन्माते ! प्रसन्न होऊन माझी येवढी मनकामना पूर्ण कर. '

इतकें बोलून पशुपतीनें देवीपुढें पुनः साष्टांग नमस्कार घातला. नंतर तो उठून शय्यागृहाकडे जाण्यासाठीं वळला, तों एक अपूर्व गोष्ट त्याच्या दृष्टीस पडली. समोरच दारांत एक तरुणी उभी असलेली त्यानें पाहिली.

तिला पाहून पशुपति प्रथम चकित झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. पण लवकरच भरती येण्याच्या वेळच्या समुद्राच्या पाण्याप्रमाणें त्याचें मन आनंदानें उसळूं लागलें.

तरुणी वीणेच्या नादाहून मधुरस्वरानें म्हणाली, ' पशुपति ! '

पशुपतीनें पाहिलें तों मनोरमा !

## प्रकरण आठवें.

# कोमलतेची मूर्ति !



रत्नाचे दीप जेथें जळत होते अशा त्या देवीच्या मंदिराच्या तोंडाशीं चंद्रप्रकाश ज्यावर पडला होता अशा दारांत, मनोरमा उभी असलेली पाहून पशुपतीचें हृदय भरती आलेल्या समुद्राप्रमाणें उसळूं लागलें. मनोरमेची आकृति अगदींच ठेंगणी नव्हती. तरी ती अजून बालिका आहे, असें वाटत असे. याचें कारण हें कीं तिची मुखकांति अतिशयच कोमल, मधुर व बालिकेप्रमाणें औदार्यपूर्ण दिसत होती. अर्थात्च हेमचंद्र तिला पंधरा सोळा वर्षांची समजत होता त्यांत त्याची कांहीं चूक नव्हती. तिचें खरें वय पंधरा सोळा वर्षांचें होतें का कांहीं कमजास्त होतें याचा इतिहासांत कोठें उल्लेख नसल्यामुळें वाचकांनींच तें आपल्या मनानें ठरवावें हें बरें.

मनोरमेचें वय किती का असेना? येवढें खरें कीं तिचें लावण्य अप्रतिम होतें. तिचें रूप नेत्रांत मावत नव्हतें. बाळपणांत, किशोरावस्थेंत, तारुण्यांत, कोणत्याहि अवस्थेंत असें रूप तुम्हांला दुसरीकडे कोठें आढळावयाचें नाहीं. अगोदर तिचा वर्ण सोनचाफ्यासारखा होता. त्यांत पुनः सापाच्या पिलाप्रमाणें तिच्या कुरळ केशांनीं तिच्या मानेला वेढा घातला होता. नुकतेंच तळ्यांत स्नान केल्यामुळें भिजून तिचे केस सरळ झाले होते. तिचें कपाळ अर्धचंद्राकार व शुभ्र

होतें. भ्रमरांनीं वेष्टित नीलकमलाप्रमाणें तिचे नेत्र कृष्णवर्ण व चंचल होते. तिचे ओठ तर जणूं काय बालरवीच्या किरणांनीं आरक्त झालेली रक्त पुष्पावलीच होती. तिचे कपोल चंद्रकिरणाप्रमाणें तेजस्वी, आणि गंगेच्या पात्राप्रमाणें विस्तृत होते. आपल्या पिलाचा कोणी नाश केला अशी शंका येऊन हंसी जशी वाकडी मान करून मागें वळून पाहते, त्याप्रमाणें तिची मान वक्र होती. त्या मानेवर वेणींत न बांधले गेलेले कुरळ केस जणूं काय क्रीडा करीत होते. हस्तिदंतांच्या ठायीं जर कोमलता असती, किंवा चाफेकळयांच्या ठायीं काठिन्य असतें, अथवा चंद्रकिरण जर शरीरधारी असते, तर त्यांच्या साहित्यानें तिचे बाहु ब्रह्मदेवानें घडविले होते असें म्हटलें असतें. तिचें हृदय तर केवळ त्याच हृदयांत घडविणें शक्य होतें. इतक्या सगळ्या गोष्टी इतर सुंदरींच्याहि ठायीं असूं शकतात, नाहीं असें नाहीं. पण मनोरमेसारखें अनुपम सौंदर्य केवळ तिच्या सर्वांगाच्या सुकुमारतेमुळें होतें. तिचें वदन सुकुमार; अधर, भ्रकुटि, ललाट सुकुमार; कपोल सुकुमार; केशहि सुकुमार होते. तिचे केश ज्या सर्पाच्या शिशुसारखे वेष्टून होते तेहि सुकुमारच ! तिच्या मानेच्या ठायीं सुकुमारपणा होता, मानेच्या वक्रतेंतहि तो तसाच होता; तिच्या बाहूच्या ठायीं सुकुमारता होती, तशी बाहूच्या हालचालींतहि होती. तिच्या हृदयांत सौकुमार्य होतें. तिचे चरण सुकुमार होते, तशी तिची पाऊल ठेवण्यांतहि सुकुमारता होती. तिची गति सुकुमारवसंतवायूच्या संचालनानें मंद आंदोलन पावणाऱ्या कुसुमितलतेप्रमाणें सुकुमार होती. तिचें बोलणें संध्याकाळीं जलराशी ओलांडून येणाऱ्या थकल्या भागलेल्या पक्ष्यांच्या मंजुळ ध्वनीप्रमाणें सुकुमार होतें. तिचे कटाक्षमेघाच्या आडून येणाऱ्या चंद्रकिरणासारखे सुकुमार होते. अशी ती कोमलतेची प्रत्यक्ष मूर्ति—मनोरमा—देवीच्या मंदिराच्या दारांत उभी होती. पशुपतीच्या मुखाकडे पाहण्यासाठीं तिनें मान वर केली होती. तिचे नेत्र वर त्याच्या चर्येकडे लागले होते. पाण्यानें आर्द्र झालेले कांहीं मोकळे केस तिनें हातांत धरले होते. एक पाऊल किंचित् पुढें टाकिलेलें होतें. ज्या ऐटीनें ती आतां उभी होती तिच्यांतहि सुकुमारता होती. अशा त्या माधुर्यमय मनोरमेच्या शरीरांवर रत्नदीपांचा प्रकाश पडला होता. पशुपति ती शोभा बराच वेळ पाहत राहिला; पण त्याची तृप्ति झाली नाहीं.

---

## प्रकरण नववें.

# मोहिता.



पशुपति किती वेळ तरी मनोरमेकडे पाहत राहिला; पण त्याची तृप्ति होईना. पाहतां पाहतां मनोरमेच्या सौंदर्यसागरांत एक अपूर्व महिमा त्याच्या दृष्टीस पडला. ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रखर किरणांमुळें हास्याचे फवारे सोडीत असलेला समुद्र आकाशांत मेघ संचार होतांच क्रमाक्रमानें गंभीर कृष्णकांति धारण करतो, त्याप्रमाणें पशुपतिची दृष्टि मनोरमेच्या मुखाकडे लागलेली असतां तिच्या सुकुमार मुखावर हळूहळू त्याला गंभीरता दिसूं लागली. पूर्वीं त्या बालिकेच्या मुखावर तिच्या नैसर्गिक उदार मनोवृत्तीचें प्रतिबिंब उमटलेलें दिसत होतें; पण आतां तें तेथें दिसेना. तिचें मुख अधिक तेजस्वी दिसत होतें; पण त्याबरोबर पोक्त वयाच्या माणसाच्या ठायींहि न दिसणारा गंभीरपणाहि तिच्या चर्येवर विराजमान झाला होता. तिची सरलता प्रतिभेनें झांकून टाकिली होती. पशुपतीनें विचारलें, 'मनोरमे ! इतक्या रात्रीं कां आलीस? आज तुझी मुद्रा अशी कां?'

**मनो०**—माझ्या मुद्रेंत कोणता फरक तुम्हांस दिसतो आहे?

**पशु०**—तुझ्या दोन मूर्ति आहेत. एक मूर्ति म्हणजे आनंदमयी व सरळ वृत्तीची बालिका. आज ती तुझी मूर्ति धारण करून कां आली नाहींस? तुझें तें रूप माझ्या मनाला संतोष देतें. दुसरी तुझी मूर्ति म्हणजे गंभीर, तेजस्वी, प्रतिभाशाली, प्रखर बुद्धियुक्त. ही मूर्ति पाहून भय वाटतें. मला असें वाटतें कीं तूं कांहीं तरी दृढ प्रतिज्ञा केलेली आहेस. मला भेवडावण्यासाठीं का तूं आज ही मूर्ति धारण केली आहेस?

**मनो०**—तुम्ही आज इतकी रात्र होईपर्यंत जागून काय करीत आहां?

**पशु०**—सरकारी कामांत गुंतलों होतों—पण तूं—

**मनो०**—सरकारी कामांत कीं स्वतःच्या कामांत?

**पशु०**—स्वतःच्या कां म्हणेनास! सरकारी कामांत म्हण कीं स्वतःच्या म्हण. पण मी कामांत गुंतलेलों नसतों कधीं? पण तूं आज असे प्रश्न कां विचारत्येस?

**मनो०**—मला सगळें कळलें आहे.

**पशु०**—काय कळलें आहे तुला?

**मनो०**—यवनाशीं व शांतशीलाशीं झालेल्या सगळया तुमच्या मसलती मीं दाराच्या आडून ऐकल्या.

पशुपतीचें तोंड लागलींच काळें ठिक्कर पडलें. तो बराच वेळ चिंतेंत निमग्न होता. नंतर तो म्हणाला, ' चांगलें झालें. मी सगळ्या गोष्टी तुला सांगणारच होतों. मी सांगण्याच्या अगोदर त्या तुला कळल्या हें ठीकच झालें. बरें, तुला कोणती गोष्ट कळली नाहीं सांग ?

**मनो०**—तुम्हीं मला कां सोडलें ?

**पशु०**—मनोरमे ! कां ? तुझ्यासाठींच तर ही मसलत मीं केली. मी आतां सरकारी नोकर आहें. इच्छेस येईल तें मला करतां येत नाहीं. मी विध-वाविवाह करीन तर लोक बहिष्कार घालतील. पण मी स्वतःच राजा झालों म्हणजे मग माझ्यावर बहिष्कार घालण्याची कोणाची छाती होणार आहे ? जशी बल्लाळसेन राजानें कुलीन पद्धति प्रचारांत आणिली, तशी मी विधवाविवाहाची नवी पद्धति प्रचारांत आणणार आहें.

मनोरमेनें लांब उसासा टाकून उत्तर केलें, ' पशुपति ! मला तर हें सारें स्वप्नवत् दिसतें. तुम्ही राजे झालां म्हणजे तें माझें स्वप्न भंग पावेल आणि मी केव्हांहि तुमची राणी होणार नाहीं.'

**पशु०**—मनोरमे ! असें कां म्हणत्येस ?

**मनो०**—कां ? तुम्ही राजे झाल्यावर तुमचें माझ्यावर थोडेंच प्रेम राहणार आहे ? राज्य हीच मग तुमच्या प्रेमाची वस्तु होऊन राहील. मग माझ्याविषयीं अनादर होणारच. जर तुमचें प्रेम नसलें तर मी तरी तुमच्या पत्नीत्वाच्या शृंखलेंत उगीचच्या उगीच स्वतःला कां म्हणून अडकवून घ्यावें ?

**पशु०**—पण अशी गोष्ट तूं मनांत आणत्येसच कां मुळीं ? मला अगोदर तूं आणि मग राज्य, असेंच नेहमीं वाटत राहील.

**मनो०**—राजे होऊन जर तुम्ही असें वागणार असलां—राज्यापेक्षां राणी-वरच अधिक प्रेम ठेवणार असलां तर तुम्हांला राज्य करतांच येणार नाहीं. तुम्ही पदच्युत व्हाल. स्त्रैण राजा राज्यपदावर कसा राहूं शकेल ?

पशुपति तिची प्रशंसा करणाच्या दृष्टीनें मनोरमेकडे पाहत राहिला. तो म्हणाला, ' ज्याच्या वामभागीं तुझ्यासारखी सरस्वती असेल, त्याला असली भीति बाळगायला नको. इतक्या उपर मी पदच्युत झालोंच, तर तुझ्यासाठीं राज्याचा सुद्धां त्याग करण्यास तयार होईन. '

**मनो०**—मग राज्याचें ग्रहण कशाला ? पुढें सोडण्यासाठीं अगोदर तें घ्याव-याचें यांत काय अर्थ आहे ? त्याचा काय उपयोग ?

**पशु०**—त्याचें फळ म्हणजे तुझें पाणिग्रहण.

**मनो०**—ती आशा सोडून द्या. तुम्हांला राज्य मिळालें तर मी मुळींच तुमची राणी होणार नाहीं.

**पशु०**—असें कां ? मनोरमे ! मीं तुझा असा कोणता अपराध केला आहे ?

**मनो०**—तुम्ही विश्वासघातकी आहां.—विश्वासघातकी माणसावर मी कशी प्रेम करीन ?

**पशु०**—मीं कोणाशीं विश्वासघात केला ?

**मनो०**—तुम्ही प्रत्यक्ष आपल्या मालकाला पदच्युत करण्याचा विचार चाल-विला आहे. शरणागत राजपुत्रालाहि मारविण्याचा तुमचा विचार आहे. हें विश्वास-घाताचें कृत्य नाहीं काय ? जो आपल्या प्रभूशीं विश्वासघात करणारा, त्याच्यावर कोणती स्त्री विश्वास ठेवील ?

हें ऐकून पशुपति गप बसला. मनोरमा पुढें म्हणाली, 'पशुपति ! माझी तुम्हांला विनंति आहे कीं ही दुर्बुद्धि सोडून द्या.'

पशुपति पूर्ववत् खालीं तोंड घालून बसला. त्याची राज्यप्राप्तीविषयींची आकांक्षा आणि मनोरमेच्या प्राप्तीची आकांक्षा या दोन्ही समसमान होत्या. दोन्ही त्याच्यानें सोडवेनात. या दोन संकटांत सांपडल्यामुळें त्याचें चित्त चंचल झालें होतें; त्याच्या मनाची स्थिरता ढळली होती. मनोरमेसारखी स्त्री प्राप्त झाल्यावर भिक्षेंतसुद्धां सुख लागेल; मग राज्य घेऊन काय करावयाचें ? असें त्याच्या मनाला पुनः पुनः वाटूं लागलें. पण तसें केलें तर लोकनिंदा पतकरावी लागेल. लोकांच्या दृष्टीनें आपणास कलंक लागेल; आपण जातिभ्रष्ट होऊं; सगळे लोक आपला तिरस्कार करतील, हें सगळें कसें सहन करावें ? हा विचारहि त्याच्याच बरोबर त्याच्या मनांत येई. म्हणून तो स्तब्ध बसला होता. त्याच्यानें उत्तर देववलें नाहीं.

त्याच्याकडून उत्तर येत नाहीं असें पाहून मनोरमा म्हणाली, 'हें पहा पशु-पति ! तुम्हीं माझ्या बोलण्यावर उत्तर दिलें नाहीं; पण मी अशी प्रतिज्ञा करत्यें कीं विश्वासघातकी माणसाचें तोंड मी या जन्मीं कधीं पाहणार नाहीं.'

इतकें बोलून मनोरमेनें पशुपतीचा हात धरला. तो तिच्या तोंडाकडेस पाहत राहिला. तिची तेजस्वी, अभिमानयुक्त, दृढनिश्चयव्यंजक सरस्वतीसारखी मुद्रा पालटलेली त्याला दिसली. ती प्रतिभादेवी अंतर्धान पावली होती. कुसुमाप्रमाणें ती सुकुमार बालिका त्याचा हात धरून त्याच्या बरोबर रडूं लागली.

मनोरमेनें विचारलें, 'तुम्ही कां रडतां ?'

पशुपतीनें डोळे पुशीत उत्तर केलें, 'तुझ्या अशा बोलण्यामुळें.'

**मनो०**—मी असें काय बोललें ?

**पशु०**—तूं माझा त्याग करून जाऊं लागली होतीस ना ?

**मनो०**—मी आतां असें करणार नाहीं.

**पशु०**—मग माझी राणी होशील ?

**मनो०**—हो. होईन.

हें ऐकतांच पशुपतीच्या आनंदसागरांत लाटा उसळूं लागल्या. दोघेहि अश्रुपूर्ण नेत्रांनीं परस्परांकडे पाहूं लागलीं. इतक्यांत एकाएकीं मनोरमा उठून चालती झाली.

---

प्रकरण दहावें.

## फासांत अडकला !



पूर्वी सांगितलेंच आहे कीं तळ्याच्या कांठावरून हेमचंद्र मनोरमेच्या मागोमाग यवनाच्या शोधार्थ जाण्यास निघाला होता. पशुपति धर्माधिकाऱ्याचें घर थोड्या अंतरावर राहिलें होतें, इतक्यांत मनोरमा हेमचंद्राला म्हणाली, 'ही समोर हवेली दिसते आहे ना ? हिच्यांत यवन शिरला आहे.'

हेमचंद्रानें विचारलें, 'कां बरें ?'

त्याच्या प्रश्नाचें उत्तर न देतां मनोरमा म्हणाली, 'तुम्ही येथें झाडाखालीं उभे रहा. तो यवन याच वाटेनें जाईल.'

**हेम०**—आणि तूं कोठें जाणार ?

**मनो०**—मी याच हवेलींत आंत जाईन.

हेमचंद्रानें बरें आहे म्हटलें. मनोरमेचें वर्तन पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तिच्या सांगण्याप्रमाणें तो झाडाच्या आड लपून बसला. मनोरमा डोळा चुकवून चोरदारानें आंत शिरली.

याच वेळीं शांतशील पशुपतीच्या घरीं गेला होता. एक माणूस झाडाच्या आड लपून बसला आहे, असें त्याला दिसलें. त्यावरून शंका आल्यामुळें तो त्या झाडाकडे गेला. हेमचंद्राला पाहून हा कोणी चोर असावा, असें त्याला वाटलें. म्हणून त्यानें विचारलें, 'कोण रे ? येथें काय करतोस ?' पण इतक्यांत हेमचंद्राच्या अंगावर बहुमोल लष्करी पोषाख व अलंकार पाहून तो जीभ चावून म्हणाला, 'आपण कोण ?'

**हेम०**—कोणी कां असेना !

**शांत०**—येथें काय करीत आहां ?

**हेम०**—यवनाच्या शोधांत आहें.

शांतशीलानें चकित होऊन विचारलें, 'यवन ? येथें कोठून यवन आला ?'

**हेम०**—तें मला ठाऊक नाहीं.

**शांत०**—हें कोणाचें घर आहे ?

**हेम०**—तेंहि ठाऊक नाहीं.

**शांत०**—मग या घरांत यवन शिरला आहे हें आपणास कसें कळलें ?

**हेम०**—तें ऐकून तुम्हांला काय कर्तव्य आहे ?

**शांत०**—हें माझेंच घर आहे. जर या घरांत यवन शिरला असेल, तर तो कांहीं तरी दुष्ट हेतूनें शिरला असला पाहिजे यांत शंका नाहीं. आपण योद्धे व यवनद्वेष्टे दिसतां. इच्छा असली तर माझ्याबरोबर चला—आपण दोघे मिळून त्या चोराला धरूं.

तें कबूल करून हेमचंद्र शांतशीलाबरोबर गेला. शांतशील मुख्य द्वारानें हेमचंद्राला पशुपतीच्या वाड्यांत घेऊन गेला आणि एका दालनांत नेऊन त्याला म्हणाला, 'या दालनांत माझें जडजवाहिर वगैरे आहे. आपण येथें पाहारा करीत राहा. मी तोंपर्यंत यवन कोठें लपून बसला आहे त्याचा शोध करून येतों.'

याप्रमाणें बोलून शांतशील त्या दालनांतून बाहेर पडला, आणि हेमचंद्राच्या उत्तराची वाट न पाहतां त्यानें बाहेरून दार लावून घेतलें. हेमचंद्र आंत अडकून पडला.

---

## प्रकरण अकरावें.

# सुटका.

—०—

मनोरमा पशुपतीचा निरोप घेऊन त्वरेनें दालनाकडे गेली. पशुपतीशीं शांतशीलाचें जें संभाषण झालें होतें त्यावरून हेमचंद्र वाड्यांत अडकून पडला आहे, येवढी गोष्ट तिला कळली होती. म्हणून आंत येतांच अगोदर तिनें दालनाचें दार उघडलें, आणि हेमचंद्राला म्हटलें, ' आतांच्या आतां बाहेर पडा. '

हेमचंद्र बाहेर पडला. मनोरमाहि त्याच्याबरोबर गेली. तेव्हां हेमचंद्रानें तिला विचारलें, ' मी कां अडकून पडलों होतों ? '

**मनो०**—तें मी मग सांगेन.

**हेम०**—मला ज्यानें अडकवून टेविलें होतें तो कोण ?

**मनो०**—त्याचें गांव शांतशील.

**हेम०**—हा कोण ?

**मनो०**—नगररक्षक.

**हेम०**—हा त्याचाच वाडा काय ?

**मनो०**—तें मग सांगेन.

**हेम०**—यवन कोठें गेला ?

**मनो०**—आपल्या छावणीला.

**हेम०**—छावणी ? किती यवन आले आहेत ?

**मनो०**—पंचवीस हजार.

**हेम०**—त्यांची छावणी कोठें आहे ?

**मनो०**—रानांत.

**हेम०**—तें कोठेंसें आहे ?

**मनो०**—शहराच्या उत्तरेला थोडेंसें दूर.

हेमचंद्र कपाळावर हात देऊन विचारमग्न झाला.

**मनो०**—कसला विचार चालला आहे ? तुम्ही काय त्यांच्याशीं लढाई करणार आहां ?

**हेम०**—पंचवीस हजार लोकांशीं मी एकटा कसा लढणार ?

**मनो०**—मग काय करणार ? घरीं परत जाणार ?

**हेम०**—घरींहि जाणार नाहीं.

**मनो०**—मग कोठें जाणार ?

**हेम०**—रानांत.

**मनो०**—लढायचें तर नाहीं मग कशाला रानांत जायचें ?

**हेम०**—यवनांना पाहण्यासाठीं.

**मनो०**—लढायचें नाहीं, मग नुसतें पाहायचें तरी कशाला ?

**हेम०**—त्यांना पाहिल्यानें कोणत्या रीतीनें त्यांना मारतां येईल, याचा कांहीं उपाय सुचेल म्हणून.

मनोरमा दचकली. ती म्हणाली, 'तुम्ही वीसहजार माणसें मारणार ? अरेरे! कोण हा घात ! छिः छिः छिः !'

**हेम०**—मनोरमे ! तुला ही सगळी बातमी कशी कळली ?

**मनो०**—एवढीनेंच काय झालें आहे ? आणखीहि आहे. आज रात्रीं तुम्हांला मारण्यासाठीं तुमच्या घरीं मारेकरी यायचे आहेत. आज घरीं जाऊं नका बरें का ?

इतकें बोलून मनोरमा बेदम धावत सुटली.

---

प्रकरण बारावें

## अतिथि-सत्कार.



हेमचंद्रानें घरीं परत येऊन एक सुंदर घोडा सज्ज केला आणि त्यावर स्वार होऊन घोड्याला दामटीत रानाकडे तो चालता झाला. शहरांतून पार निघून गेल्यावर एक मैदान लागलें. त्या मैदानाचा कांहीं भाग तो ओलांडून गेला. इतक्यांत त्याच्या खांद्यांत वेदना होऊं लागल्या. पाहतों तों एक बाण लागला होता. मागून घोड्याच्याहि टापा ऐकूं येऊं लागल्या. म्हणून त्यानें मागें वळून पाहिलें; तों तीन घोडेस्वार त्याच्या मागून येत असलेले त्याला दिसले.

हेमचंद्रानें घोड्याचें तोंड फिरविलें आणि त्यांची मार्गप्रतीक्षा करीत तो उभा राहिला. तोंड फिरविल्यावर त्याला दिसून आलें कीं, प्रत्येक घोडेस्वार एकेक बाण आपल्याकडे नेम धरून फेकीत आहे. हेमचंद्राला उत्तम प्रतीचें शिक्षण

मिळालें असल्या कारणाचें त्यानें हातांतला भाला अशा रीतीनें चपलतेनें फिरविला कीं त्यानें तिन्ही बाणांचें खंडन झालें.

मागच्या घोडेस्वारांनीं पुनः बाण फेकले. हेमचंद्रानें पुनः त्यांचें खंडन केलें न केलें, तों पुनः बाण आले.

याप्रमाणें बिलकुल खळ न पडूं देतां हेमचंद्राच्या अंगावर ते बाणांचा वर्षाव करूं लागले; तेव्हां हेमचंद्रानें रत्नजडीत ढाल हातांत घेऊन तिनें तो बाणांचें निवारण करूं लागला. क्वचित् एक दोन बाण त्याच्या घोड्याला लागले. त्याला स्वतःला मात्र एकहि बाण लागला नाहीं.

हें त्याचें कौशल्य पाहून घोडेस्वार विस्मित झाले, आणि बाण मारण्याचें सोडून आतां पुढें काय करायचें याविषयीं ते आपसांत कुजबुजूं लागले. ही संधी साधून हेमचंद्रानें त्यांच्यापैकीं एकाचे अंगांवर बाण टाकिला. हेमचंद्राचें शरसंधान बिनचूक होतें. त्याचा बाण एका घोडेस्वाराच्या कपाळाला लागून तो घोड्यावरून धाडकन् खालीं पडला.

तत्क्षणीं बाकीचे दोघे घोडेस्वार घोड्याला चाबकाचे तडाखे लगावून हातां-तले भाले सरसावून हेमचंद्राकडे घोडे दौडवीत गेले आणि भाला फेकतां येईल इतक्या अंतरावर पोंचतांच त्यांपैकीं एकानें हेमचंद्राकडे भाला फेकिला. जरी त्यानें बिनचूक नेम धरला असता, तरीसुद्धां हेमचंद्रानें तो चुकविला असता. त्याचें युद्ध कौशल्यच तसें होतें; पण हल्ला करणारांनीं हेमचंद्राच्या घोड्यावर नेम धरून भाला फेकला. खालीं दूरपर्यंत हात पोंचविण्यास हेमचंद्राला थोडा विलंब लागल्यामुळें एकाच्या प्रहाराचें निवारण झालें खरें; पण दुसऱ्याचें निवा-रण त्याला करतां आलें नाहीं आणि हेमचंद्राच्या सुंदर घोड्याला भाला लागून तो मरणोन्मुख होऊन खालीं पडला.

लागलीच हेमचंद्रानें घोड्यावरून खालीं उडी मारली आणि डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच आपल्या हातांतला भाला वर धरून म्हटलें, 'माझ्या पित्यानें दिलेला हा भाला शत्रूचें रक्तपान केल्याशिवाय कधीं राहणार नाहीं.' त्याचें हें वाक्य संपतें न संपतें तोंच समोरच्या घोडेस्वारांपैकीं एक त्या भाल्यानें जखमी होऊन जमिनीवर पडला.

हें पाहून तिसरा घोडेस्वार घोड्याचें तोंड फिरवून त्वरेनें पळून गेला. हाच

आतां हेमचंद्राला थोडीशी उसंत मिळाली. त्यानें आपल्या खांद्यांतून तीर उपटून काढिला. तो मांसांत बराच खोलपर्यंत रुतला होता. त्यामुळें तो उपटून काढ-तांच त्याच्या अंगांतून रक्ताची चिळकांडी वाहूं लागली. हेमचंद्रानें आपल्या वस्त्रानें ती थांबविण्याचा प्रयत्न केला; पण तो निष्फळ झाला. बरेंच रक्त वाहिल्यामुळें हेमचंद्राला क्षीणता आली. तेव्हां त्याला दिसून आलें कीं, आतां यवनांच्या छावणीपर्यंत आपण जाऊं शकणार नाहीं. घोडा मारला गेला होता. स्वतःलाहि क्षीणता आलेली होती. म्हणून अप्रसन्न चित्तानें तो हळूहळू शहराकडे परत जाण्यास निघाला.

हेमचंद्र मैदान ओलांडून तर आला; पण तेथवर येईपर्यंत त्याचा जीव अगदीं गळून गेला होता. रक्तानें सर्व अंग भरलें होतें. चालण्याची शक्ति अंगांत मुळींच राहिली नव्हती. त्यानें मोठ्या कष्टानें शहरांत प्रवेश केला; पण पुढें त्याच्यानें चालवेना म्हणून एका घरापाशीं वडाच्या झाडाखालीं तो बसला. तेव्हां रात्र संपून प्रभातकाळचा समय झाला होता. रात्रींचें जागरण झालें होतें; परिश्रमहि झाले होते; रक्तस्रावामुळें क्षीणता आली होती. यामुळें त्याच्या डोळ्यांपुढें चक्कर येऊं लागली होती. पृथ्वी फिरूं लागली होती. तो झाडाला पाठ टेकून बसला होता; डोळे मिटले होते; लवकरच त्याला झोंप लागली. झोंपेंत त्याला स्वप्न दिसलें. जणूं काय कोणी गाण्याच्या रूपानें त्याला सांगत होतें कीं—

कंटकयुत निर्मि कमल,
अधम विधि गमे ।

---

# तृतीय खंड.



## प्रकरण पहिलें.

## ‘ तो तुझा कोण ? ’



ज्या घराजवळच्या वडाच्या झाडाखालीं बसून हेमचंद्र विश्रांति घेत होता, त्याच घरांत एक नावाडी राहत होता. घरांत तीन खोल्या होत्या. एक स्वयंपा-काची; दुसरींत त्याची बायको आपल्या मुलांना घेऊन निजत असे; आणि

तिसरींत त्या नावाड्याची तरुण कन्या रत्नमयी व आणखी दोन स्त्रिया निजत असत. या दोघी स्त्रियांशीं वाचकांचा परिचय झालेलाच आहे. मृणालिनी आणि गिरिजाया या दोघी नवद्वीपांत दुसरीकडे कोठें आश्रय न मिळाल्यामुळें या ठिकाणीं राहत होत्या.

एकीमागून एक तिघीजणी जाग्या झाल्या. प्रथम रत्नमयी उठली आणि गिरिजायेला म्हणाली, 'ताई !'

**गिरि०**—काय ?

**रत्न०**—तूं कोठें आहेस ताई ?

**गिरि०**—अंथरुणावर ताई !

**रत्न०**—उठली नाहींस ताई ?

**गिरि०**—नाहीं, ताई.

**रत्न०**—अंगावर पाणी शिंपडूं ताई ?

**गिरि०**—वा ताई ! शिंपड बाई !

**रत्न०**—नाहीं तरी सोडणार नाहीं.

**गिरि०**—नको सोडूं बाई, तूं तर आमची जिवलग ताई ! तुझ्यासारखें माणूस मिळायचें नाहीं. तुझ्यामुळें तर परतीर पाहीं !

**रत्न०**—बोलण्याच्या कामांत तुझ्यापुढें हात टेकावे. मी तर तुझ्यापुढें अगदीं कुंठित होत्यें. पुनः भेट होईल ना पण ?

**गिरि०**—पुनः भेटायची इच्छा आहे का ?

**रत्न०**—तुझ्या तोंडाला हात लावावा कोणी ? मी चालल्यें कामाला.

इतकें बोलून रत्नमयी गृहकृत्याला गेली. मृणालिनी आतांपर्यंत कांहीं बोलली नव्हती, म्हणून गिरिजायेनें तिला विचारलें, 'बाईसाहेब ! जाग्या झाल्यात का?'

**मृणा०**—मी जागीच आहें; रात्रभर जागीच आहें.

**गिरि०**—कसला विचार चालाला होता येवढा वेळ ?

**मृणा०**—उगाच कांहीं तरी विचार डोक्यांत येतात झालें !

गिरिजाया तेव्हां गंभीरपणानें म्हणाली, ' काय करणार ? आपली काय चूक आहे ? मीं ऐकलें आहे कीं ते येथें शहरांत आहेत. पण अजून त्यांचा शोध लागला नाहीं. आपणाला येऊन सारे दोनतीनच दिवस झाले आहेत. लागेल लवकरच शोध. '

मृणालिनीनें उरींत तोंड लपविलें. गिरिजायेच्याहि नेत्रांतून अश्रु वाहूं लागले.

इतक्यांत रत्नमयी घाबऱ्या घाबऱ्या घरांत येऊन म्हणाली, 'ताई, ताई, लवकर ये, आमच्या वडाच्या झाडाखालीं कोणी निजला आहे! किती अपूर्व पुरुष! गिरिजाया दारांतून पाहूं लागली. मृणालिनीनेंहि दारापर्यंत जाऊन पाहिलें. दोघीनींहि पाहतांच त्याला ओळखलें.

समुद्राचें पाणी पुनः उसळूं लागलें. मृणालिनीनें गिरिजायेला मिठी मारली. गिरिजाया गाऊं लागली—**कंटकयुत निर्मिकमल, अधम विधि गमे।**

तो तिचा ध्वनि स्वप्नाप्रमाणें हेमचंद्राच्या कानीं गेला. गिरिजायेची गाण्याची हौस पाहून मृणालिनी म्हणाली, 'गप्प बैस चांडाळणी! आपण तिकडे नजरेस पडतां कामा नये. ते काय करतात तें तूं जाळींतून पहा. ते जाऊं लागले तर त्यांना न दिसेल अशा रीतीनें तूं त्यांच्या मागोमाग जा. अग! पण हें काय? त्यांचें अंग रक्तानें भरलेलें दिसतें आहे! चल तर मग मीहि तुझ्याबरोबर येत्यें.'

हेमचंद्राची ग्लानि दूर झाली होती. पहाट झालेली पाहून हातांतल्या भाल्यावर भार टाकून तो उठला आणि हळू हळू घराकडे जाऊं लागला.

तो थोडासा दूर गेल्यावर मृणालिनी व गिरिजाया त्याच्या मागोमाग जाण्यासाठीं घराच्या बाहेर पडल्या. तेव्हां रत्नमयीनें विचारलें, 'बाईसाहेब! तो तुमचा कोण?'

मृणालिनी म्हणाली, 'देवाला ठाऊक!'

---

## प्रकरण दुसरें.

# प्रतिज्ञा—पर्वतो वन्हिमान्



विश्रांति घेतल्यामुळें हेमचंद्राला थोडी हुशारी वाटत होती. रक्तस्रावहि कमी झाला होता. भाला टेकीत टेकीत तो घरीं जाऊन पोंचला. घरीं येऊन पाहतो तों मनोरमा दारांतच उभी होती.

मृणालिनी व गिरजाया यांनीं तिला दुरूनच पाहिलें.

मनोरमा चित्रांतल्या पुतळीसारखी उभी होती. तिला पाहून मृणालिनी आपल्या मनाशीं म्हणूं लागली कीं, माझे प्रभु जर रूपाला भाळणारे असले, तर माझी सुखरात्र संपून पहाट झाली म्हणावयाची ! गिरिजायेच्याहि मनाला वाटलें कीं राजपुत्र जर मनोरमेच्या रूपाला भाळला, तर बाईसाहेबांचें कपाळ फुटलेंच समजावें.

हेमचंद्र मनोरमेपाशीं जाऊन म्हणाला, 'मनोरमे ! तूं अशी कां उभी ?'

मनोरमा कांहीं बोलली नाहीं. त्यानें पुनः हाक मारली, 'मनोरमे !'

तरी उत्तर नाहीं. त्यानें पाहिलें कीं हिची दृष्टि आकाशाकडे सारखी लागलेली आहे.

त्यानें पुनः म्हटलें, 'मनोरमे ! तुला काय झालें आहे ?'

तेव्हां तिनें हळू हळू आकाशाकडून दृष्टि फिरवून हेमचंद्राच्या तोंडाकडे पाहिलें आणि थोडा वेळपर्यंत ती त्याच्याकडे एकसारखी टक लावून पाहत राहिली. मग तिची दृष्टि रक्तानें भरलेल्या त्याच्या पोशाखाकडे गेली. तेव्हां चकित होऊन मनोरमेनें विचारलें, 'हें काय हेमचंद्र ! रक्त कसलें? तुमचें तोंडहि सुकलेलें दिसत आहे ! जखम बिखम झाली आहे कीं काय ?'

हेमचंद्रानें खांद्यावरच्या जखमेकडे बोट केलें.

तेव्हां मनोरमेनें त्याचा हात धरून त्याला घरांत पलंगावर नेऊन बसविलें. सुवर्णपात्र पाण्यानें भरून आणून व हेमचंद्राच्या अंगांतला एकेक कपडा काढून अंगाला लागलेलें सगळें रक्त धुऊन टाकिलें. नंतर गुरांना आवडीनें खावीशी वाटणारी कोवळी हिरवळ उपटून आणून व ती दांतांनीं चावून त्याच्या जखमेवर लाविली आणि वरून वस्त्राचा पट्टा बांधिला. इतकें केल्यावर ती हेमचंद्राला म्हणाली, 'आतां काय करणार ? तुम्हांला रात्रीचें जागरण झालें आहे; तेव्हां अंग टाकावें.'

हेमचंद्र म्हणाला, 'झोंप नाहीं म्हणून जीव घाबरा होत आहे.'

मनोरमेनें केलेल्या साऱ्या गोष्टी पाहून मृणालिनीनें गिरिजायेला विचारलें "ही ग कोण ?'

**गिरि०**—ऐकतें कीं हिचें नांव मनोरमा आहे.

**मृणा०**—हीच का ती हेमचंद्राची मनोरमा ?

**गिरि०**—तुला काय वाटलें ?

**मृणा०**—मलाहि वाटलें कीं हीच ती भाग्यवान् मनोरमा असेल. माझ्या हातून हेमचंद्राची सेवा घडली नाहीं; पण हिनें ती केली. ज्या कार्यासाठीं माझ्या अंतःकरणाला पीळ पडत आहे, तें कार्य हिनें साधूनहि घेतलें! देव हिला उदंड आयुष्य देवो. गिरिजाये! मी आतां घरीं जात्यें. मी अधिक वेळ थांबणें बरें नाहीं. तूं येथेंच जवळपास रहा आणि हेमचंद्राचें कसें काय आहे, त्याची खबर आण. मनोरमा कोणी कां असेना, हेमचंद्र तर माझेच आहेत.'

---

## प्रकरण तिसरें.

## हेतु-धूमात्.



मनोरमा व हेमचंद्र घरांत गेल्यावर गिरिजायेनें मृणालिनीला निरोप दिला आणि ती स्वतः हेमचंद्र राहत होता, त्या वाड्याच्या भोंवतीं घिरट्या घालूं लागली. जेथें जेथें म्हणून तिला खिडकी उघडी दिसली, तेथें तेथें पायाच्या चवड्यावर उभी राहून आणि मान उंच करून ती आंतलें पाहण्याचा यत्न करूं लागली. एका खोलींत हेमचंद्राला निजलेलें तिनें पाहिलें. त्याच्या अंथरुणापाशीं मनोरमाहि बसलेली तिला दिसली. त्याच खिडकीखालीं गिरिजायाहि लपून बसली. याच खिडकींतून आदले रात्रीं हेमचंद्राच्या नजरेला यवन पडला होता.

खिडकीखालीं बसण्यांत गिरिजायेचा उद्देश हा होता कीं, हेमचंद्र व मनोरमा यांच्या काय गोष्टी चालतात त्या आडून ऐकायला मिळाव्या. पण हेमचंद्राला झोंप लागली असल्यामुळें त्यांच्या गोष्टी मुळींच झाल्या नाहींत. खिडकीखालीं बाहेर एकटी बसल्यामुळें गिरिजायेला फार कष्ट झाले. बोलतां येईना, हसतां येईना, शिंकसुद्धां देतां येईना; असे फार कष्ट होऊं लागले. बोलण्याची इच्छा होऊं लागली. ती मनांत म्हणूं लागली, तो पापी चांडाळ दिग्विजय कोठें आहे? तो भेटला तर त्याच्याशीं दोन शब्द बोलतां तरी येतील. पण दिग्विजय घरांत मालकाच्या कामांत गुंतलेला होता, तो कसा भेटणार? जेव्हां कोणीच बोलायला मिळालें नाहीं, तेव्हां ती आपल्याच मनाशीं पुटपुटूं लागली. ती काय बोलत होती, हें जाणण्याची वाचकांची उत्कंठा तृप्त करण्यासाठीं तिचें बोलणें प्रश्नोत्तररूपानें देतों. प्रश्न विचारणारीहि गिरिजायाच आणि उत्तरें देणारीहि पण तीच होती.

**प्रश्न**—ओहो! कोण ग तूं येथें बसली आहेस?

**उत्तर**— गिरिजाया.

**प्रश्न**—येथें कां बसलीस ?

**उत्तर**—मृणालिनीसाठीं.

**प्रश्न**—ती तुझी कोण ?

**उत्तर**—कोणी नाहीं.

**प्रश्न**—मग तिच्यासाठीं तूं येवढे जिवाला कष्ट कां करून घेत्येस ?

**उत्तर**—मला दुसरें काय काम आहे ? भटकत राहून काय करायचें ?

**प्रश्न**—मृणालिनीसाठीं येथें काय म्हणून बसलीस ?

**उत्तर**—येथें तिचा एक पक्षी पिंजऱ्यांतून पळून आला आहे.

**प्रश्न**—मग त्याला पकडून घेऊन कां जात नाहींस ?

**उत्तर**—पळालेला पक्षी काय हातीं लागणार आहे ? अन् धरूं तरी कसा ?

**प्रश्न**—मग असें बसून काय होणार आहे ?

**उत्तर**—त्या पक्ष्यासाठीं मृणालिनी रोज किती तरी रडत असते ! आज तर कांहीं विचारायलाच नको ! जर कांहीं चांगली बातमी नेली तर बरें होईल.

**प्रश्न**—नाहीं हातीं लागला तर ?

**उत्तर**—तर काय ? जाऊन मृणालिनीला सांगेन कीं हातांतून पक्षी निसटून उडून गेला. राधाकृष्ण राधाकृष्ण म्हणून तो पळून गेलेला पक्षी धरून आण. पढविलेला पक्षी परत येण्याची आशा असते. पिंजरा रिकामा राहूं देऊं नकोस.

**प्रश्न**—अहाग ! भिकारडी कुठली ! तूं आपली मनाचीच कांहीं तरी गोष्ट सांगत्येस. मृणालिनीनें पिंजराच मोडून तोडून टाकिला, तर मग कसें ?

**उत्तर**—तूं म्हणत्येस तेंहि खरेंच. तसेंहि होण्याचा संभव आहे. नाहीं कोणीं म्हणावें ?

**प्रश्न**—मग येथें उगाच उन्हांत बसून व्यर्थ जिवाला त्रास कां करून घेत्येस ?

**उत्तर**—डोकें फार दुखतें आहे म्हणून बसल्यें आहे. ही जी मुलगी समोर बसली आहे ती मुकी आहे. नाहीं तर इतक्या वेळांत नसती का कांहीं बोलली ? बायको माणूस असून तोंड इतकें बंद कसें ?

थोड्या वेळानें गिरिजायेची इच्छा तृप्त झाली. हेमचंद्र झोपेंतून जागा झाला. तेव्हां मनोरमेनें विचारलें, 'कां ? झाली का झोप ?'

**हेम०**—हो झाली.

**मनो०**—मग आतां सांगा तुम्हांला जखम कशी लागली तें ?

तेव्हां हेमचंद्रानें रात्रींची हकीकत संक्षेपरूपानें सांगितली. ती ऐकून मनोरमा काळजी करूं लागली.

हेमचंद्र म्हणाला, 'तुझें विचारणें संपलें ना ? आतां माझ्या प्रश्नाचें उत्तर दे. कालरात्रीं तूं माझ्यापासून निघाल्यानंतर जें जें कांहीं घडलें, तें तें सगळें सांग पाहूं ?'

मनोरमा हळूहळू ओठांतल्या ओठांत काय बोलली, तें गिरिजायेला ऐकूं गेलें नाहीं. कांहींतरी गुपचिप तिनें त्याला सांगितलें येवढें ती समजली.

कांहीं ऐकूं येईना, तेव्हां ती उठली. नंतर पुनः प्रश्नोत्तरावलि तिच्या मनांत तयार होऊं लागली.

**प्रश्न**—काय समजलें ?

**उत्तर**—कांहीं लक्षणें मात्र.

**प्रश्न**—कोणकोणतीं लक्षणें ?

गिरिजाया बोटें घालून मोजूं लागली. पहिलें लक्षण–मुलगी फार सुंदर आहे. विस्तवापाशीं ठेवल्यावर तूप कोठें घट्ट राहणार आहे ? दुसरें लक्षण—मनोरमेचें हेमचंद्रावर प्रेम आहे. नाहींतर ती त्याच्यासाठीं इतकी कां झटती ? तिसरें—तीं दोघें एकत्र बसतात उठतात. चौथें—दोघें मिळून रात्रीचे फिरायला जातात. पांचवें—गुलगुल गोष्टी करतात.

**प्रश्न**—मनोरमेचें प्रेम असेल; पण हेमचंद्राचें ?

**उत्तर**—वारा पडल्यावर जलाशयांत लाटा उसळत नसतात. आमच्यावर कोणीं प्रेम केलें तर आपणहि त्याच्यावर उलट प्रेम करणारच. यांत शंका कशाला पाहिजे ?

**प्रश्न**—पण मृणालिनीचें हेमचंद्रावर प्रेम आहे ना ? मग हेमचंद्राचेंहि तिच्यावर असलेंच पाहिजे.

**उत्तर**—तें खरें; पण मृणालिनी येथें नसून मनोरमा आहे.

याप्रमाणें मनांत विचार करीत करीत गिरिजाया हळू हळू पावलें टाकीत वाड्याच्या दारापाशीं जाऊन पोंचली. 'भिक्षा घालग बाई !' असें म्हणून नंतर तिनें एक गाणें म्हणायला सुरुवात केली—

---

प्रकरण चौथें

# सिद्धांत-वन्हिव्यापो धूमवान्.

गिरिजाया गाऊं लागली—

'हें जिवन नीरस झालें, मजसी मरण कां न आलें ॥
यमुनातीरीं गात मुरारी नाचत मुरलीसंगें
बघतां बघतां मोहन बाधा ! तन्मय जीवनरंगें ॥'

तिचा तो संगीत ध्वनि हेमचंद्राच्या कानीं गेला. स्वप्नांत ऐकलेल्या शब्दाप्रमाणें त्यानें तो ऐकला.

गिरिजाया पुढें गाऊं लागली

'ब्रिजलाल सखे ! सांग कुठें गेला ॥ ध्रु० ॥
शोकभरानें व्रजनारींचे त्यजिति असु तनुला ॥'

हेमचंद्र कान टवकारून गाणें ऐकूं लागला. गिरिजाया पुढें गातच होती—

'अवचित भेटे यौवनबाला
तिजशीं तो रमला ॥'

हेमचंद्र म्हणाला, 'हें काय मनोरमे ? हा गिरिजायेचा स्वर दिसतो ! मी चाललों.' इतकें बोलून त्वरेनें तो अंथरुणावरून उठला आणि पलंगावरून उतरूं लागला.

गिरिजाया गातच होती—

'रूपहीन मी, विसरुनि गेला
माधव कां मजला ? ॥

हेमचंद्र गिरिजायेच्या समोर जाऊन उभा राहिला आणि घाबऱ्या स्वरानें म्हणाला, 'कोण ? गिरिजाया ! तूं येथें कशी ? केव्हां आलीस ?

**गिरि०**—मला येथें येऊन बरेच दिवस झाले.

इतकें बोलून ती गाऊं लागली—

'रूपसुंदरी रसिक प्रेमला ॥
होती कां बाला ? ॥'

हेमचंद्रानें विचारलें, 'तूं या देशीं कां आलीस ?

**गिरि०**—भिक्षेवरच माझा चरितार्थ आहे. राजधानींत जास्त भिक्षा मिळेल म्हणून आल्यें—

हेमचंद्रानें गाण्याकडे लक्ष न देतां विचारलें, 'मृणालिनी खुशाल आहे ना? येण्याचे वेळीं तूं तिला भेटली होतीस ना ?'

गिरिजाया गाऊं लागली—

**नच वार्ता कळली कांहीं, मन बुडे निराशा-डोहीं, तत्क्षणीं ॥**
**ते प्रेमबोल ! क्रीडा ती ! आठवे स्मृती मग होई, ही झणीं ॥'**

हेमचंद्र म्हणाला, 'राहूं दे तुझें गाणें. माझ्या प्रश्नाचा जाब दे अगोदर. मृणालिनी खुशाल आहे ना ? तूं तिला भेटली होतीस ना ?'

**गिरि०**—नाहीं. मी तिला भेटून आल्यें नाहीं. हें गाणें आपणास पसंत नसलें तर दुसरें एखादें म्हणत्यें—

**'निशिदिनिं झुरुनी करि आशा मनिं हरि भेटे मज ही**
**हाय ! निराशा ! त्यजिलें प्राणा कां नच यमुनाडोहीं ॥**
**घरा परतल्यें; हृदय भरुनि ये, अश्रु-पूर वाही**
**दुर्दैवा कां व्यर्थ रडविसी ? प्राण हरुनी नेई ॥'**

**हेम०**—गिरिजाये ! तुला विनंति करतों कीं तूर्त तुझें गाणें राहूं दे, आणि मृणालिनीविषयींची खबर सांग.

**गिरि०**—काय सांगूं ?

**हेम०**—तूं तिला भेटून कां आली नाहींस ?

**गिरि०**—ती गौड नगराला नाहीं.

**हेम०**—मग ? कोठें गेली आहे ?

**गिरि०**—मथुरेला.

**हेम०**—मथुरेला ? कोणाबरोबर तेथें गेली ? कशी गेली ? कां गेली ?

**गिरि०**—तिच्या वडिलाला तिचा कसा शोध लागला कोण जाणे ! पण त्यानें माणूस पाठवून तिला नेलें. मला वाटतें तिचें लग्न ठरलें असेल, आणि तेवढ्याच साठीं तिला नेलें असेल.

**हेम०**—काय म्हणत्येस ? कशासाठीं नेलें ?

**गिरि०**—मृणालिनीचें लग्न करून देण्यासाठीं तिच्या वडिलांनीं नेलें असेल.

हेमचंद्रानें तोंड फिरविलें. त्यामुळें गिरिजायेला तें पाहतां आलें नाहीं. शिवाय हेमचंद्राच्या खांद्यावरच्या जखमेची रक्तानें भरलेली पट्टीहि तिला दिसली नाहीं. ती पूर्वीच्या सारखी गाऊं लागली—

**‘ जरि भेटे प्रियकर माझा, त्या प्रणाम मम सांगावा,**
**सर्वदां कां श्याम, धरुनि हें नाम, करूं जप ध्यान,**
**देह झिजवोनी, जाऊं या जन्मीं सुटुनी, सांग कां?’**

हेमचंद्रानें तोंड फिरविलें. तो म्हणाला, ‘गिरिजाये! तूं शुभ वार्ता सांगितलीस! उत्तम झालें!’

इतकें बोलून हेमचंद्र पुनः घरांत गेला. गिरिजायेच्या डोक्यावर आकाश कोसळलें. तिचा विचार होता कीं, आपण मृणालिनीच्या विवाहाविषयींची खोटीच गोष्ट हेमचंद्रापाशीं बोलून त्याची परिक्षा पहावी. तिला वाटलें होतें कीं, मृणालिनीच्या विवाहाची गोष्ट ऐकून तो दुःखित होईल, आणि संतापेल; पण तसें तर कांहींच घडून आलें नाहीं, असें तिला आढळलें. तेव्हां ती कपाळावर हात मारून मनांत म्हणाली, ‘हाय! काय हें मीं केलें! उगाच अनर्थाला कारण करून ठेविलें! हेमचंद्राला तर सांगितलेली बातमी ऐकून आनंद झाल्यासारखें दिसलें. शुभवार्ता सांगितलीस असें तो म्हणाला; पण आतां बाईसाहेबांची काय दशा होईल?’

हेमचंद्रानें ‘शुभवार्ता सांगितलीस’ असें जें म्हटलें होतें, तें कोणत्या अर्थानें तें त्या भिकारड्या गिरिजायेला कसें समजावें? ज्या क्रोधाच्या आवेशांत या मृणालिनीसाठीं राजपुत्र प्रत्यक्ष गुरुजीला मारण्यास उठला होता, तोच क्रोध या वेळींहि त्याच्या मनांत संचारला होता. अभिमानाच्या आणि अनिवार क्रोधाच्या भरांत ‘शुभ वार्ता सांगितलीस’ हे शब्द त्यानें उच्चारले होते.

गिरिजायेला हें कळलें नाहीं. ती मनांत म्हणाली, ‘हें सहावें लक्षण!’ तिला कोणी भिक्षा घालीना. तिनेंहि भिक्षेची अपेक्षा केली नाहीं. ‘पक्षी उडाला’ असा मनाचा पक्का ग्रह करून घेऊन ती आपल्या घराकडे चालती झाली.

- - - - - - - -

## प्रकरण पांचवें.

# आणखी एक बातमी.



त्याच दिवशीं माधवाचार्यांचें पर्यटन संपलें, आणि ते नवद्वीपास जाऊन हजर झाले. तेथें प्रिय शिष्य हेमचंद्र याला दर्शन देऊन त्यांनीं कृतार्थ केलें, आणि आशिर्वाद, आलिंगन, कुशल प्रश्न वगैरे झाल्यावर एकांतांत बसून दोघांचेंहि जें उद्दिष्ट कार्य तें कसें साधतां येईल याविषयीं त्यांच्यामध्यें बोलणें झालें.

आपल्या प्रवासाची सविस्तर हकीकत सांगून माधवाचार्य म्हणाले, 'इतका खटाटोप केल्यावर श्रमाचें थोडें फार चीज झालें. एतद्देशीय मांडलिक राजापैकीं पुष्कळांनीं सैन्यासह येऊन सेन राजाला साह्य करण्याचें कबूल केलें आहे. लवकरच सगळे येऊन येथें गोळा होतील.'

हेम०—ते आजच येथें आले तर कांहीं उपयोग होणार आहे. नाहींतर सारें व्यर्थ होईल. यवनांची फौज येऊन पोंचली आहे. रानांत त्यांची छावणी पडली आहे. आजउद्यांकडे ते शहरावर चालून येतील.

हें ऐकून माधवाचार्य चकित झाले. ते म्हणाले, 'गौडेश्वराकडून कशी काय तयारी आहे ?'

हेम०—कांहींसुद्धां नाहीं. मला तर वाटतें कीं, राजेसाहेबांच्या कानांपर्यंत ही बातमीसुद्धां अद्याप गेली नसेल ! मला तरी सुदैवानें कालरात्रीं अचानकच ही बातमी कळली.

माधवा०—मग तुम्ही कां नाहीं जाऊन राजाची भेट घेतली ? आणि त्यांना योग्य सल्ला दिली ?

हेम०—मला बातमी लागल्यावर लागलीच वाटेंत मारेकऱ्यांनीं मला गांठून जखमी केलें. मी रस्त्यांतच पडलों होतों. आतांच या वाड्यांत येऊन जरा विश्रांति घेतली. अशा दुबळ्या स्थितींत राजाच्या भेटीला कसें जायचें ? आतां मी जातों.

माध०—तूं आतां थोडी विश्रांति घे. मीच राजाकडे जातों. जें काय तेथें होईल तें मी तुला मागाहून सांगेनच.

इतकें बोलून माधवाचार्य जाण्यासाठीं उठले.

हेमचंद्र म्हणाला, 'गुरुजी ! आपण गौड देशापर्यंत गेलां होतां म्हणून कळलें ?—'

माधवाचार्य या प्रश्नाचा झोक समजले, आणि म्हणाले, 'हो. गेलों होतों. तूं मृणालिनीविषयींची खबर कळावी या उद्देशानें विचारीत आहेस, खरें ना ? पण मृणालिनी तेथें नाहीं.'

हेम०—कोठें गेली आहे ?

माध०—तें मला ठाऊक नाहीं. कोणालाहि तिची खबर सांगतां आली नाहीं.

**हेम०**—पण ती कां गेली ?

**माध०**—वत्स ? तें सगळें मी तुला युद्ध संपल्यावर सांगेन.

हेमचंद्र भिवया चढवून म्हणाला, 'खरी गोष्ट मला कळली, तर माझ्या मनाला मर्मव्यथा होईल अशी शंका आपण मनांत आणूं नका. मलाहि थोडीशी गुण-गुण कळली आहे. जें कांहीं टाऊक असेल, तें यत्किंचित्हि संकोच न धरतां मला उघड सांगावें.'

माधवाचार्य गौडनगराला गेल्यावर हृषीकेशानें आपल्या समजुतीप्रमाणें मृणा-लिनीविषयीं सारी हकीकत सांगितली होती. तीच हकीकत खरी असावी, असें माधवाचार्यांला वाटलें. माधवाचार्यांच्या ठायीं विशेषतः स्त्रीजातीविषयीं आदर-भाव केव्हांहि नव्हता. स्त्रीचरित्र त्यांना कळलेंच नव्हतें. आतां हेमचंद्राच्या बोलण्यावरून त्यांना असें वाटलें कीं, हेमचंद्रालाहि थोडीशी हकीकत कळली आहे व म्हणून त्यानेंहि तिचा नाद सोडला आहे. तेव्हां आपल्या सांगण्यानें त्याच्या मनाला अधिक दुःख होण्याचा फारसा संभव नाहीं, असें दिसल्यावरून आचार्यांनीं खालीं बसून हृषीकेशानें सांगितलेली सारी गोष्ट त्याला सांगितली.

हेमचंद्र खालीं मान घालून हातावर कपाळ ठेवून मुकाट्यानें ती हकीकत ऐकून घेत होता. माधवाचार्यांचें बोलणें संपल्यावरहि तो कांहीं एक बोलला नाहीं; तसाच बसून राहिला. तेव्हां माधवाचार्यांनीं त्याला म्हटलें, 'हेमचंद्र !' पण त्यांना उत्तर मिळालें नाहीं. पुनः त्यांनीं हाक मारली तरी तसेंच.

तेव्हां आचार्यांनीं उठून हेमचंद्राचा हात धरला, आणि अतिशय कोमल व प्रेमळ शब्दांनीं म्हटलें, 'बाळ ! वर मान कर. माझ्याशीं दोन शब्द बोल.'

हेमचद्रानें वर मान केली. त्याची चर्या पाहून आचार्य भयभीत झाले.

**माधवा०**—माझ्याशीं बोल. राग येणें साहजिक आहे; पण तो सोडून दे.

**हेम०**—आतां कोणाच्या बोलण्याचा विश्वास ठेवावा ? हृषीकेश सांगतात एक प्रकारचें. भिकारिणीनें सांगितलें तें निराळेंच.

**माध०**—कोण ती भिकारीण ! तिनें काय सांगितलें ?

हेमचंद्रानें अगदीं मोजक्या शब्दांनीं या प्रश्नाचें उत्तर दिलें.

माधवाचार्य संकुचित स्वरानें म्हणाले, 'हृषीकेशाचेंच सांगणें चुकीचें दिसतें.'

**हेम०**—पण त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेली गोष्ट सांगितली ना ?

हेमचंद्र उठून उभा राहिला, हातांत भाला घेतला, आणि थर थर कांपत पावलांचा शब्द न करतां खोलींतल्या खोलींत तो फिरूं लागला.

आचार्यांनीं विचारलें, ' कसला विचार चालला आहे ?'

हेमचंद्र हातांतला भाला दाखवून म्हणाला, ' या भाल्यानें मृणालिनीच्या चिंधड्या चिंधड्या करीन !'

त्याची क्रुद्ध मुद्रा पाहून आचार्यांना भीति वाटली, आणि ते निघून गेले.

सकाळींच मृणालिनी म्हणाली होती कीं, ' हेमचंद्र तर माझेच आहेत.'

## प्रकरण सहावें.

## ' काय मी वेडी !'



तिसरे प्रहरीं माधवाचार्य परत आले. त्यांनीं बातमी आणिली ती अशी—धर्माधिकारी पशुपति यानें सांगितलें कीं, यवनांची फौज आली आहे, ही गोष्ट खरी आहे; पण यवन इकडे युद्धांत गुंतल्यास दुसरीकडे त्यांनीं पूर्वीं जीं राज्यें जिंकलीं आहेत, त्यांतून बंडें होण्याचा संभव असल्यामुळें त्यांचा सेनापति तह करण्यास उत्सुक आहे. उद्यां त्यांचेकडून दूत येणार आहेत. त्यांच्या येण्याची वाट पाहावी व तोंपर्यंत लढाईला प्रारंभ करूं नये. ही बातमी सांगून माधवाचार्य म्हणाले, ' हाच कुलांगार पशुपति राजाच्या बुद्धीचा सगळा नाश करणारा आहे.'

हें बोलणें हेमचंद्रानें कानांनीं ऐकलें कीं नाहीं याची शंकाच आहे. त्याचें चित्त ठिकाणावर नाहीं, असें पाहून माधवाचार्य चालते झाले.

संध्याकाळच्या अगोदर मनोरमा हेमचंद्राच्या वाड्यांत गेली व त्याला पाहून म्हणाली, ' भाई ! तुम्ही आज असे कां ?'

**हेम०**—असे म्हणजे कसे ?

**मनो०**—तुमची मुद्रा श्रावणमासांतल्या आभाळाप्रमाणें काळी व भाद्रपदांतल्या गंगेप्रमाणें रागीट दिसते आहे; भिवया चढविलेल्या आहेत; डोळे वटारलेले आणि अश्रूंनीं भरलेले आहेत; तुम्ही असे रडतां कां ?

हेमचंद्रानें मनोरमेच्या तोंडाकडे पाहिलें. नंतर दृष्टि खालीं वळविली. पुनः वर खिडकीकडे पाहिलें; पुनः मनोरमेच्या मुद्रेकडे पाहिलें. मनोरमा समजली कीं याच्या दृष्टीमध्यें चंचलता आहे. बोलण्यासाठीं शब्द अगदीं कंठापर्यंत यावे,

पण बोलतां येऊं नये, अशा वेळीं दृष्टि अशी होत असते. ती म्हणाली, ‘ हेमचंद्र ! तुम्ही असे भितां कां ? काय झालें आहे ? ’

हेम०—कांहीं नाहीं.

मनोरमा अगोदर कांहीं बोलली नाहीं; पण मागून आपण होऊनच हलके हलके बोलूं लागली. ती म्हणाली, ‘कांहीं नाहीं, कांहीं नाहीं, असें म्हणूं नका. छिः छिः ! अंतःकरणांत असें विंचवाला बिऱ्हाड देणार ? ’ बोलतां बोलतां मनोरमेच्या डोळ्यांतून एक अश्रुबिंदु गळून पडला. नंतर एकाएकीं हेमचंद्राच्या तोंडाकडे पाहून ती म्हणाली, ‘ माझ्याशीं कां बोलत नाहीं ? मी तुमची बहीण ना ?’

मनोरमेच्या चर्येवर दृष्टि स्थिर व शांत ठेवण्यासाठीं चाललेला प्रयत्न, मृदुता, व सहृदयता यांचीं इतकीं चिन्हें स्पष्टपणें उमटलेलीं दिसत होतीं कीं, तीं पाहून हेमचंद्राचें अंतःकरण द्रवलें. तो म्हणाला, ‘ माझ्या मनाला ज्या वेदना होत आहेत, त्या बहिणीजवळ सांगण्यासारख्या नाहींत.’

मनो०—तर मग मी बहीण नाहीं एकूण ?

हेमचंद्रानें कांहींच उत्तर केलें नाहीं. तरी आशेनें उत्कंठित होऊन ती हेमचंद्राच्या तोंडाकडे पाहूं लागली. तिनें विचारलें, ‘ मी तुमची कोणी नाहीं ना ?’

हेम०—माझें दुःख बहिणीनें–कोणीहि–ऐकण्यासारखें नाहीं.

हेमचंद्राचा स्वर आतां करुणायुक्त झाला होता. त्याच्या मनाला होणाऱ्या वेदना त्यांत स्पष्ट दिसत होत्या. तो त्याचा शब्द मनोरमेच्या प्राणाच्या आंत जाऊन भिडला. तेथें त्याचें परिवर्तन होऊन नेत्रांतल्या अग्नीच्या ठिणग्या बाहेर निघूं लागल्या. ओठ चावून हेमचंद्र म्हणाला, ‘ मला कोणतें दुःख आहे ? कांहीं नाहीं. रत्नाच्या भ्रमानें कृष्णसर्प मीं कंठांत धारण केला होता; पण तो आतां फेकून दिला आहे. ’

मनोरमा पुनः पूर्वीसारखी हेमचंद्राच्या तोंडाकडे टक लावून पाहत राहिली. क्रमाक्रमानें तिच्या तोंडावर अतिशय मधुर व अतिशय करुणायुक्त हास्य प्रकट झालें. बालिकेला पोक्तपणा प्राप्त झाला. सूर्यकिरणांपेक्षांहि उज्ज्वल असा किरीट धारण केलेली ती प्रतिमादेवी दिसूं लागली. मनोरमा म्हणाली, ‘समजल्यें. न कळत तुमचें कोणावर तरी प्रेम बसलें त्याचा हा परिणाम आहे.’

हेम०—प्रेम बसलें होतें.

हेमचंद्रानें वर्तमान काळाबद्दल भूत काळ घातला. आतां त्याच्या डोळ्यांतून निःस्तब्ध अश्रुधारा वाहूं लागल्या.

मनोरमेला वाईट वाटलें. ती म्हणाली, 'छिः छिः ! अशी फसवणूक ! दुसऱ्याला फसविणारें माणूस लबाड म्हटलें पाहिजे. स्वतःशींच प्रतारणा करणाराचा तर सर्वस्वी घात होत असतो.'

**हेम०**—मीं काय प्रतारणा केली ?

**मनो०**—माझें प्रेम बसलें होतें असें कां म्हणालांत ? अजून तुम्ही प्रेम करीत आहां. नाहीं तर रडण्याचें कारण काय ? तुमच्या प्रेमाला पात्र असलेलें माणूस आज अपराधी गणिलें गेलें म्हणून काय तुमचें प्रेम नष्ट झालें ? कोणीं तुम्हांला हें शहाणपण शिकविलें ?'

बोलतां बोलतां मनोरमेच्या मुखावरची पोक्तपणाची कांति एकाएकीं विकसित कमळाप्रमाणें अधिक भावव्यंजक झाली. तिचे नेत्र अधिक तेजस्वी झाले. ती पुढें म्हणाली, 'हा निव्वळ दांभिक वीरत्वाचा पुरुषांचा अहंपणा आहे. अशा अहंकारानें कोठें आग विझत असते काय ? वाळूचा बांध घालून दूथडीं भरून वाहत असलेल्या नदीप्रवाहाच्या वेगाला तुम्हांला रोखतां येईल; पण प्रणयिनीला दुराचरणी समजून तिच्या प्रणयाच्या प्रवाहाला तुम्हांला केव्हांहि प्रतिबंध करतां येणार नाहीं. हाय ! देवा ! सगळेच पुरुष असे प्रतारणा करणारे कसे ?'

हेमचंद्र चकित होऊन मनांत म्हणूं लागला, 'मी हिला बालिका समजत होतों !'

मनोरमा म्हणूं लागली, 'तुम्हीं पुराण ऐकलेंच असेल ? मीं एका पंडिताकडून त्यांतलें रहस्य समजून घेतलें आहे. पुराणांत लिहिलें आहे कीं, भगीरथानें स्वर्गलोकांतून गंगा आणिली. तेव्हां एक गर्विष्ठ उन्मत्त हत्ती तिच्या प्रवाहाचा वेग आवरण्याचा प्रयत्न करूं लागला; पण तो स्वतः त्या प्रवाहाबरोबर वाहून गेला ! याचा अर्थ काय ? गंगा ही प्रेमप्रवाह; ही भगवंताच्या चरणकमळापासून उगम पावली; ही जगांत अतिशय पवित्र आहे. जो हिच्यांत बुडी मारतो तो पुण्यवान होतो. ही मृत्युंजयाच्या जटेंत संचार करणारी आहे.जो मृत्यूवर विजय मिळवूं शकतो तो मृत्युंजय. तोच प्रणयाला मस्तकावर धारण करतो. मीं जसें ऐकलें तसेंच बरोबर सांगत आहें. उन्मत्त हत्ती म्हणजे अहंकाराचाच अवतार. तो प्रणयाच्या प्रवाहाबरोबर वाहत जातो. प्रणय प्रथम एकाच मार्गानें जाऊन योग्य समयीं शतमुखी होतो.

प्रणय प्रथम स्वभावसिद्ध असला, तर शेंकडों पात्रांतून तो वाहत राहतो, अखेर सागराला जाऊन मिळतो व जगांतल्या सर्व जीवांच्या ठायीं तो लीन होतो.,

**हेम०**—पण प्रणयांत पात्रापात्रतेचा विचार नाहीं, असें का तुला उपदेश करणारानें सांगितलें आहे ? पापासक्त माणसांवरसुद्धां कां प्रेम करायचें ?

**मनो०**—होय. त्याच्यावरहि प्रेम केलें पाहिजे. प्रणयांत पात्रापात्रतेचा विचार नाहीं. सर्वांवरच प्रेम केलें पाहिजे. प्रणय उत्पन्न झाला कीं त्याला यत्नपूर्वक स्थान दिलें पाहिजे. कारण कीं तो अमूल्य आहे. भाई, जें चांगलें असेल, त्यावर कोण प्रेम करणार नाहीं ? पण जें वाईट आहे, तें आपलें म्हणून त्यावरहि जे प्रेम करतात तेच थोर म्हणावयाचे ! असे लोक मला आवडतात. पण मी काय वेडी !'

हेमचंद्र चकित होऊन म्हणाला, 'मनोरमे ! हें सगळें तुला कोणीं शिकविलें ? तुझा गुरु खरोखर मोठा अलौकिक असला पाहिजे.'

मनोरमा खालीं मान घालून म्हणाली, 'तो सर्वज्ञानी आहे. पण—

**हेम०**—पण काय ?

**मनो०**—तो अग्नीसारखा आहे. प्रकाश देतो; पण त्याबरोबर जाळतोहि.

मनोरमा क्षणमात्र खालीं मान घालून स्तब्ध बसली.

**हेम०**—मनोरमे ! तुझें मुख पाहून आणि भाषण ऐकून मला वाटतें कीं तूंहि प्रेम केलें आहेस. मला असें वाटतें कीं ज्याची तूं अग्नीशीं तुलना केलीस तोच तुझ्या प्रेमाचा हक्कदार असावा.

मनोरमा पूर्ववत् स्तब्ध राहिली. हेमचंद्र पुनः बोलूं लागला. तो म्हणाला, ' हें जर खरें असेल तर माझी एक गोष्ट एकून घे. स्त्रियांना पतिव्रता धर्माहून श्रेष्ठ धर्म दुसरा नाहीं. ज्या स्त्रीच्या ठायीं पातिव्रत्य नाहीं, ती डुकरीपेक्षांहि अधम प्राणी म्हटली पाहिजे. पातिव्रत्याची हानि प्रत्यक्ष कार्यानेंच घडते, असें नाहीं. परपुरुषाविषयीं नुसतें चिंतन सुद्धां पातिव्रत्याला बाधक होतें. तूं विधवा आहेस. जर पतीवांचून अन्य पुरुषाला तूं आपलें मन अर्पण केलेंस, तर तुझी इहलोकीं व परलोकींहि अधम स्त्रियांत गणना केली जाईल. म्हणून सावध राहा. जर कोणावर तुझें मन गेलें असेल तर त्याला विसरून जा. '

मनोरमा खोखो हसली. नंतर तिनें तोंडावर पदर घेतला, तरी तिचें हसणें थांबेना. या गोष्टीचें हेमचंद्राला थोडेंसें वाईट वाटलें आणि तो म्हणाला, ' हसत्येस कां ? '

मनो०—भाऊ ! तुम्ही आपले गंगेच्या तीरावर जाऊन उभे राहा, आणि मोठ्यानें ओरडून तिला म्हणा कीं ' परत फिर. '

हेम०—कां बरें ?

मनो०—स्मृति काय आपल्या इच्छेच्या अधीन आहे ? राजपुत्रा ! कृष्ण-सर्पाचा विचार मनांत आणून कोठें सुख लागणार आहे ? तरी पण तुम्ही त्याला विसरत नाहीं. तें कां तें सांगा पाहूं ?

हेम०—त्याच्या दंशामुळें आग आग झाली आहे म्हणून.

मनो०—त्यानें तुम्हांला दंश केला नसता, तर मग तुम्ही त्याला विसरलां असतां काय ?

यावर हेमचंद्रानें उत्तर दिलें नाहीं. तेव्हां मनोरमा म्हणाली, ' तुमच्या कंठांतला पुष्पहार कृष्ण सर्प झालेला आहे. म्हणूनच तुम्ही त्याला विसरूं शकत नाहीं. मी–मी तर काय वेडी आहें ! मी आपला पुष्पहार कसा तोडीन ? '

हेम०—एके प्रकारें तूं म्हणतेस ती गोष्ट न्यायाचीच आहे. विस्मरण करणें ही मनुष्याच्या इच्छाधीन क्रिया नाहीं. मनुष्य आत्मप्रौढीनें अंध होऊन दुसऱ्याला जो उपदेश करीत असतो त्यांत ' विसरून जा ' यापेक्षां अधिक हास्यास्पद उपदेशपर वाक्य आढळावयाचें नाहीं. तूं पैशाचा लोभ सोड, कीर्तीची हाव सोड, ज्ञानाचें चिंतन करूं नकोस, क्षुधा तृष्णा निवारणाची इच्छा टाकून दे, किंवा निद्रेची इच्छा सोड, असें कोणी कोणाला सांगत नाहीं. मग प्रेम करण्याचें सोड, असा उपदेश मात्र ते कसा करतात ? प्रेम काय या इतर गोष्टींपेक्षां हलक्या प्रतीचें आहे ? या सर्वांपेक्षां प्रणय हा खास कमी नाहीं.–पण धर्मापेक्षां मात्र कमी प्रतीचा आहे खरा. धर्माच्यासाठीं मात्र प्रणयाचा संहार केला पाहिजे. स्त्रीचा अत्यंत श्रेष्ठ धर्म म्हणजे सती धर्म. म्हणून म्हणतों कीं जर शक्य असेल तर प्रेमाचा संहार कर. '

मनो०—मी काय बोलून चालून अबला ! ज्ञानहीन व व्याकुळ झालेली ! धर्म कशाला म्हणतात आणि अधर्म काय असतो याचें ज्ञान मला कोठून असणार ? पण मला येवढें कळतें कीं धर्मावांचून प्रेम उत्पन्न होत नाहीं.

हेम०—मनोरमे ! सावध राहा. वासनेपासून प्रथम भ्रांतीची आणि त्या भ्रांतीपासून अधर्माची उत्पत्ति होते. तुझी मजल भ्रांतीपर्यंत गेलेली आहे. तूं विचार करून पाहशील तर तुला दिसून येईल कीं तूं जर धर्मानें एकाची पत्नी आहेस, तर मनानें अन्याची पत्नी झाल्यास तूं व्यभिचारिणी होशील कीं नाहीं ?

घरांत हेमचंद्राची ढाल तरवार टांगलेली होती, ती हातीं घेऊन मनोरमा म्हणाली, ' भाऊ ! ही ढाल कसल्या चामड्याची केलेली आहे ? '

हेमचंद्र हसला, आणि मनोरमेच्या तोंडाकडे पाहून म्हणाला, ' तूं अजून पोर आहेस. '

प्रकरण सातवें.

## गिरिजायेची बातमी.



गिरिजाया जेव्हां घरीं परत जाण्यास निघाली, तेव्हां तिनें मनाचा पक्का निश्चय केला कीं, हेमचंद्राचें प्रेम अन्य स्त्रीवर बसलें आहे, ही गोष्ट प्राण गेल्यानें मृणालिनीच्या देखत बोलावयाची नाहीं. मृणालिनी पिंजऱ्यांतल्या पक्ष्याप्रमाणें चंचल होऊन तिच्या येण्याची वाट पाहत होती. तिला आलेली पाहतांच मृणालिनीनें उत्सुकतेनें विचारलें, ' गिरिजाये ! काय काय दृष्टीस पडलें, सांग ! हेमचंद्राची तब्यत कशी आहे ? '

**गिरि०**—चांगली आहे.

**मृणा०**—कां ? असे मोजके शब्द कां ? तुझ्या बोलण्यांत उत्साह दिसत नाहीं ? बोलतांना अशी कष्टी कां दिसतेस ?

**गिरि०**—ती कशी ?

**मृणा०**—गिरिजाये ! माझ्याशीं प्रतारणा करूं नकोस. हेमचंद्र अजून बरे नाहींत का झाले ? तसें असलें तर तसें स्पष्ट सांग. संशयांत ठेवण्यापेक्षां स्पष्ट सांगितलेलें बरें.

गिरिजाया हसून म्हणाली, 'तुम्ही उगाच जिवाला त्रास करून घेतां. मी खात्रीपूर्वक सांगत्यें कीं त्यांच्या शरीराला बिलकुल क्लेश होत नाहींत. ते चांगले हिंडूं फिरूं लागले आहेत.'

मृणालिनीनें क्षणमात्र विचार करून विचारलें, ' मनोरमेशीं त्यांचें काय काय बोलणें झालें तें तुला ऐकायला मिळालें काय ? '

**गिरि०**—मिळालें.

**मृणा०**—मग काय ऐकलेंस ?

मग गिरिजायेनें हेमचंद्र जें काय बोलला होता, तें सारें सांगितलें. मनोरमा रात्रीं हेमचंद्राबरोबर फिरायला गेली होती, हें व तिच्या कानाशीं लागून तो कांहीं

बोलला होता तें, येवढया दोन गोष्टी मात्र तिनें सांगितल्या नाहींत. मृणालिनीनें विचारलें, 'तूं हेमचंद्राची भेट घेतली होतीस काय ?'

गिरिजायेनें थोडें इकडे तिकडे करून उत्तर केलें, 'हो. घेतली होती.'

**मृणा०**—तेव्हां त्यांनीं काय विचारलें ?

**गिरि०**—तुमच्याविषयीं चौकशी केली होती.

**मृणा०**—मग तूं काय म्हणालीस ?

**गिरि०**—मीं सांगितलें कीं तुम्ही खुशाल आहां.

**मृणा०**—मी येथें आहें, हें तूं सांगितलेंस ?

**गिरि०**—नाहीं.

**मृणा०**—गिरिजाये! चुकारपणा करून बोलतेस. तुझी चर्याहि सुकलेली आहे. माझ्याकडे वर मान करून तुझ्याच्यानें पाहवत नाहीं. यावरून मला खात्रीनें वाटतें कीं कांहीं तरी अमंगल बातमी तूं माझेपासून लपवीत आहेस. माझा तुझ्या बोलण्यावर विश्वास बसत नाहीं. माझ्या नशिबीं जें असेल तें असो; मी आतां स्वतःच हेमचंद्राला भेटायला जात्यें. तूं येत असलीस तर माझ्याबरोबर ये. नाहीं तर मी एकटीच जाईन.

इतकें बोलून मृणालिनी तोंडावर बुरखा घेऊन वेगानें निघाली. गिरिजायाहि तिच्या मागोमाग धावत गेली, आणि थोड्या अंतरावर तिला गांठून व तिचा हात धरून म्हणाली, 'बाईसाहेब! परत फिरा. मीं जें कांहीं चोरून ठेविलें होतें तें सारें सांगतें.'

मृणालिनी गिरिजायेबरोबर परत फिरली. घरीं आल्यावर गिरिजायेनें लपवून ठेविलेल्या गोष्टी तिला सविस्तर सांगितल्या.

गिरिजायेनें हेमचंद्राला ठकविलें होतें; पण मृणालिनीला ती ठकवूं शकली नाहीं.

---

## प्रकरण आठवें.

# मृणालिनीचें पत्र.



मृणालिनी म्हणाली, "गिरिजाये! त्यांनीं 'उत्तम आहे' असें रागानें म्हटलें असेल, नाहीं ? ही गोष्ट ऐकून कां बरें त्यांना राग येणार नाहीं ?"

गिरिजायेच्या मनांत तेव्हां शंका आली. ती म्हणाली, 'हो. ही गोष्ट संभवनीय आहे.'

**मृणा०**—तूं ही गोष्ट बोललीस हें चांगलें केलें नाहींस. आतां असें कर. तूं जेवणखाण उरकून घे. तोंपर्यंत मी एक पत्र लिहून तयार करत्यें. जेवण झाल्यावर तूं तें पत्र घेऊन त्यांच्याकडे जा.'

गिरिजाया तें कबूल करून जेवणाखाण्यास गेली. मृणालिनीनें एक लहानसेंच पत्र लिहिलें. तें असें—

'गिरिजायेनें आपणांस खोटें सांगितलें. ज्या कारणासाठीं तिनें माझ्याविषयीं खोटें सांगितलें, तें कारण आपण विचारल्यास ती स्वतःच सविस्तर सांगेल. मी मथुरेस गेल्यें नव्हत्यें. ज्या रात्रीं आपली अंगठी पाहून यमुनेच्या तीरीं आल्यें, त्या रात्रीपासून मथुरेचा व माझा संबंध सुटला आहे. मी मथुरेला न जातां आपल्या दर्शनासाठीं नवद्वीपाला आल्यें. येथें येऊनहि मी आपलें दर्शन घेतलें नाहीं, याचें कारण हेंच कीं, माझी भेट झाल्यास आपल्या हातून प्रतिज्ञाभंग होईल. आपलें दर्शन घडावें ही माझी इच्छा होती. तो सिद्धीला गेल्यावर आपणांला भेट देण्याची काय आवश्यकता होती?'

गिरिजाया हें पत्र घेऊन पुनः हेमचंद्राच्या वाड्याकडे गेली. संध्याकाळीं मनोरमेपाशीं गोष्टी बोलणें आटोपल्यावर हेमचंद्र गंगेच्या दर्शनासाठीं जात होता. वाटेंतच गिरिजायेनें त्याला गांठलें, आणि त्याच्या हातांत मृणालिनीचें पत्र दिलें.

हेमचंद्रानें विचारलें, 'पुनः कां आलीस?'

**गिरि०**—हें पत्र आणिलें आहे.

**हेम०**—कोणाकडून?

**गिरि०**—मृणालिनीबाईसाहेबांकडून.

हें ऐकून हेमचंद्र विस्मित झाला. त्यानें विचारलें, 'हें पत्र तुझ्या हातीं कसें आलें?'

**गिरि०**—बाईसाहेब येथें आल्या आहेत. त्या मथुरेला गेल्याविषयींचें मीं सांगितलें तें खोटें होतें.

**हेम०**—हें पत्र मृणालिनीचें आहे?

**गिरि०**—हो. त्यांनीं खुद्द आपल्या हातांनीं लिहिलें आहे.

हेमचंद्रानें तें न वाचतांच फाडून त्याच्या चिंध्या केल्या, आणि त्या रानोमाळ पसरून फेकल्यावर म्हटलें, 'तूं खोटें बोलणारी आहेस, हें मला यापूर्वींच कळलें होतें.

ज्या दुष्टेचें पत्र तूं आणिलेंस, ती लग्नासाठीं गेली नसून हृषीकशानें तिला मार देऊन घरांतून घालवून लाविलें हें मला पूर्वीच कळलें होतें. अशा कुलटेचें पत्र मी वाचीत नसतों. तूंहि माझ्या समोरून दूर हो.'

गिरिजाया कांहीं उत्तर न करतां हेमचंद्राच्या तोंडाकडे पाहत उभी राहिली.

हेमचंद्रानें रस्त्याच्या बाजूच्या वृक्षाची एक फांदी तोडून हातांत घेतली आणि म्हटलें, 'दूर हो; नाहीं तर पहा मार खाशील.'

गिरिजायेच्यानें आता विटंबना सहन करवेना. ती धीरे धीरे म्हणाली, 'वीर पुरुष खरेच आहां ! असें वीरत्व दाखविण्यासाठींच वाटतें आपण येथें आलां आहां ! तेवढयासाठीं येथें येण्याचें कारण नव्हतें. तें आपणाला मगधांत बसूनहि दाखवितां आलें असतें. मुसलमानांचे जोडे खायचे आणि गरीब बिचारी दुःखी पोर पाहिली कीं तिला मारायला उठायचें ! समजलें तुमचें हें वीरत्व ! '

हें ऐकून हेमचंद्रानें अप्रतिभ होऊन हातांतली काठी फेकून दिली; पण गिरिजायेचा राग गेला नाहीं. ती म्हणाली, 'मोठे निघालांत मृणालिनी बाईसाहेबांशीं विवाह करायला ! तिच्याशीं तर राहोच; पण माझ्याशीं सुद्धां विवाह करण्याची तुमची योग्यता नाहीं.'

इतकें बोलून गिरिजाया गर्वानें गजेंद्राच्या ऐटीनें चालूं लागली. त्या भिकारणीच्या अंगचा हा गुण पाहून हेमचंद्र चकित झाला.

गिरिजायेनें परत जाऊन हेमचंद्रानें केलेलें वर्तन मृणालिनीजवळ इत्थंभूत सांगितलें. या खेपेला तिनें कांहीं एक गोष्ट लपविली नाहीं. मृणालिनीनें त्यावर कांहीं उत्तर केलें नाहीं. रडलीहि पण नाहीं. ऐकतांना तिची जी स्थिति होती, तीच तिनें कायम ठेविली. हें पाहून गिरिजायेच्या मनांत शंका आली; पण मृणालिनीशीं अधिक कांहीं बोलण्याची ही वेळ नाहीं, असें समजून ती तेथून चालती झाली.

तिच्या घरापासून जवळच एक तळें होतें. त्यांत उतरण्याला पायऱ्या होत्या. गिरिजाया त्या तळ्याच्या पायरीवर जाऊन बसली. शरदृतूंतल्या सारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें, व निळ्या आकाशाचें प्रतिबिंब पाण्यांत पडल्यामुळें तें पाणीहि उज्ज्वल निळें दिसत होतें. त्या पाण्यांत कांठावरच्या झाडाच्या फुलांचींहि स्थिर प्रतिबिंबें पडलेलीं होतीं. तळ्याच्या चारी बाजूंनीं उंच उंच वृक्ष वाढले होते, आणि त्यांनीं परस्परांना जणूं काय मिठी मारून वरच्या आकाशाला मर्यादित करून टाकिल्यासारखें दिसत होतें. मध्येंच एखाद्या वृक्षाची

एखादी फांदी उंच वाढलेली होती, आणि ती आकाशपटावर काढलेल्या चित्रासारखी दिसत होती. खालीं पडलेल्या अंधेरांतून नुकत्याच फुललेल्या पुष्पांचा सुगंध येत होता. गिरिजाया अशा त्या ठिकाणीं पायरीवर बसली होती.

गिरिजाया प्रथम हळू हळू मधुर गीत गाऊं लागली. नुकतेंच गाण्यास शिकलेल्या पक्षिणीप्रमाणें तिचा शब्द अस्पष्ट येत होता. पण क्रमाक्रमानें तो जास्त जास्त स्पष्ट होऊं लागला. अखेर तिचें गायन तान व लय यांनीं युक्त होऊन तें तळें, तें उपवन व आकाश यांना व्यापून तें मृणालिनीच्या कानापर्यंत जाऊन पोंचलें. तें गाणें असें

‘ यमुनेंत, प्राण जावोत, धरुनि हा हेत, ।
जला तनु देऊं, कां सखये ! विष तरी खाऊं, सांग गे ! ॥
कां अरण्यांत जाऊनी वेलींचा पाश बघावा, एकदां ।
टांगुनी वृक्षस्कंधाला, गळफास सुखें लावावा, एकदां ।
असुहरण करुनि तो मजला, सोडवील मम दुर्दैवा दुःखदा ।

गिरिजायेनें गात असतांना पुढें पाहिलें तेव्हां चांदण्यांत मनुष्याची छाया पडलेली तिला आढळली. म्हणून तिनें मागें वळून पाहिलें तों मृणालिनी उभी असलेली तिला दिसली. ती रडत होती.

तें पाहून गिरिजायेला हर्ष झाला. ती समजली कीं ज्या अर्थी मृणालिनीच्या डोळ्यांत अश्रु आले आहेत त्या अर्थीं तिचे क्लेश थोडेसे कमी झाले असले पाहिजेत. ही गोष्ट सगळ्या लोकांना कळते असें नाहीं. लोक बहुधा असें म्हणतात, ‘ हिच्या डोळ्यांना पाणी आलें नाहींना ? तेव्हां अर्थात् हिला दुःखच झालें नसलें पाहिजे !’ पण गिरिजायेला जी गोष्ट ठाऊक होती, ती जर सर्वांना कळती, तर संतारांतल्या किती तरी दुःखाचा भार हलका झाला असता !

कांहीं काळपर्यंत दोघीजणीहि स्तब्ध राहिल्या होत्या. मृणालिनीच्यानें कांहींच बोलवत नव्हतें. गिरिजायेच्यानेंहि कांहीं तिला विचारवेना. तेव्हां मृणालिनी म्हणाली, ‘ गिरिजाये ! तुला आणखी एक वेळ गेलें पाहिजे. ’

**गिरि०**—त्या चांडाळाकडे पुनः कोण जायला बसलें आहे ?

**मृणा०**—नकोग असें त्यांना बोलूं ! त्यांची कांहीं तरी गैरसमजूत झाली असेल. या संसारांत कोणाच्या हातून चुका होत नाहींत ? पण हेमचंद्र दुष्ट स्वभावाचे नाहींत हें खास सांगत्यें. तूं माझेवर सगळ्या बहिणींपेक्षांहि अधिक प्रेम करत्येस. मग तूं माझ्यासाठीं येवढें नाहीं का करणार ? तूं माझ्या मनाला

निष्कारण दुःख देणार नाहींस, माझ्याजवळ कधीं खोटें सांगणार नाहींस, ही माझी खात्री आहे. असें आहे तरी हेमचंद्रांनीं माझ्यासारख्या निरपराधी स्त्रीचा निष्कारण त्याग केला, हें त्यांच्याच तोंडून ऐकेपर्यंत माझ्या अंतःकरणाला शांतता कशी प्राप्त होईल? जर मी कुलटा म्हणून त्यांनीं माझा त्याग केला, असें त्यांच्या तोंडून मला कळेल, तर मला प्राणत्याग तरी करतां येईल.'

गिरि०—प्राणत्याग? बाईसाहेब! प्राणत्याग काय म्हणून करणार?

मृणालिनीनें कांहींच उत्तर केलें नाहीं. गिरिजायेचेंहि रडणें चालू होतें.

---

प्रकरण नववें.

# अमृतांत गरल-गरलामृत.



हेमचंद्रानें आचार्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून व मृणालिनीला दुराचरणी ठरवून तिनें पाठविलेल्या पत्राच्या चिंध्या करून फेंकून दिल्या होत्या व तिच्या कडून आलेल्या दासीला काठीनें मारण्यासहि तो तयार झाला होता. पण इतकें होऊनसुद्धां मृणालिनीवर त्याचें प्रेम नव्हतें असें नाहीं. मृणालिनीसाठीं राज्याचा त्याग करून तो मथुरेला गेला होता. याच मृणालिनीसाठीं प्रत्यक्ष गुरूवरहि बाण टाकण्यास तो उद्युक्त झाला होता. मृणालिनीसाठींच गौडदेशांत स्वतःच्या प्रतिज्ञेला विसरून जाऊन भिकारणीशीं आनंदाच्या गोष्टी त्यानें केल्या होत्या; आणि आतां तोच हेमचंद्र माधवाचार्यांना हातांतला भाला दाखवून "या भाल्यानें मृणालिनीच्या शरीराला भोंसकीन" असें त्यानें म्हटलें होतें; पण म्हटलें म्हणून काय झालें? त्याच्या मनांतलें तिच्याविषयींचें प्रेम एकदम नष्ट झालें कीं काय? प्रेम काय कोठें एका दिवसांत नष्ट होत असतें? पर्वतावर पडलेलें पर्जन्याचें पाणी झिरपत झिरपत पृथ्वीच्या पोटांत आपला मार्ग काढीत जातें. सूर्याच्या उष्णतेनें तें कधीं एका दिवसांत सुकून गेलें आहे काय? पाणी झिरपलेलें असतें, तें तसेंच खालीं जात असतें. त्याच्या गतीला प्रतिबंध झाला, तर पर्वतावरची माती वाहून जाईल. हेमचंद्र त्याच रात्रीं आपल्या खोलींत अंथरुणावर खिडकीजवळ डोकें टेकून खिडकीकडे दृष्टि लावून पडला होता. तो रात्रीची शोभा पाहत होता काय? त्याला त्यावेळीं जर कोणीं विचारलें असतें कीं, रात्र चांदण्याची आहे कीं अंधाराची आहे, तर त्याला चटकन् उत्तर देतां आलें नसतें. त्याच्या हृदयांत ज्या

रात्रीचा उदय झाला होता, तीच तेवढी त्याला दिसत होती. आणि ती तर चांदणी रात्र होती. तसें नसतें, तर त्याची उशी ओली कां झाली असती ? आकाशांत थोडेसे ढग मात्र आले होते. ज्या हृदयाकाशांत अंधकाराचें वास्तव्य असतें, तें रडत नाहीं.

जो केव्हांहि रडत नाहीं, तो अधम प्रकृतीचा मनुष्य होय. त्याच्यावर केव्हांहि विश्वास ठेवतां येत नाहीं. त्यानें जगांतलें सुख स्वतः कधीं अनुभविलें नाहीं, आणि दुसऱ्याचेंहि सुख त्याच्यानें पहावत नाहीं, असें खास समजावें. पण, त्यानें जरी क्वचित् एखादे दिवशीं एखादा अश्रुबिंदु डोळ्यांतून गाळून पृथ्वीला भिजविलें नाहीं, तरी तो चित्ताचें संयमन करणारा महात्मा होऊं शकतो, हें खरें. तथापि, मला विचाराल तर, मी एखाद्या चोराशीं प्रेमालाप करीन; पण अशा माणसाशीं नाहीं.

हेमचंद्र रडत होता—जिला तो मनांत स्थान देण्यास अपात्र आणि पापिणी समजला होता, तरी तिच्यासाठींच तो रडत होता. मृणालिनीच्या दोषाचा विचार तो करीत होता काय ? करीत असेल; पण तेवढेंच केवळ नाहीं. त्याच्याबरोबर मृणालिनीचें प्रेमपूर्ण मुखमंडळ, प्रेमपरिपूर्ण भाषण, आणि प्रेमपरिपूर्ण आचरण, या सगळ्या गोष्टींचा विचार त्याच्या मनांत चालला होता. तीच मृणालिनी आतां त्याच्या अविश्वासाला कशी पात्र झाली ? मथुरेंत असतांना मृणालिनीला एक पत्र पाठविण्यासाठीं हेमचंद्र किती व्यग्र झाला होता ! तें घेऊन जाणारा कोणी मिळेना. मृणालिनीनें गवाक्षांतून हें पाहिलें. तेव्हां हेमचंद्रानें एका आम्रफलावर अवश्यक तेवढा मजकूर लिहून खिडकींतून तो आंबा तिच्याकडे फेंकला. तो धरण्यासाठीं मृणालिनी किंचित् पुढें झाल्यामुळें तो तिच्या हातांत न पडतां तिच्या कानाला लागला, आणि त्याच्या आघातानें तिचें रत्नखचित कर्णभूषण मोडून खालीं पडलें, इतकेंच नाहीं, तर त्या आघातानें कानांतून रक्त वाहूं लागलें. तरी मृणालिनीनें यत्किंचित् सुद्धां वाकडी नजर केली नाहीं, किंवा कानावर हातहि ठेविला नाहीं. उलट, हसत हसत तिनें तो आंबा उचलून घेतला, आणि त्यावरचा मजकूर वाचून त्याच्यावरच उत्तर लिहून तो परत हेमचंद्राकडे फेंकला. हेमचंद्र दृष्टिआड होईपर्यंत ती खिडकींतून हसत मुखानें सारखी त्याच्याकडे पहात होती. या गोष्टीचें आतां हेमचंद्राला स्मरण झालें, आणि तो मनाशीं म्हणूं लागला कीं, अशी मृणालिनी बेइमानी होईल, हें संभ-

वनीय तरी आहे काय ? दुसरी एक गोष्ट आतां त्याला आठवली. एके दिवशीं मृणालिनीला विंचू चावला होता. त्याच्या वेदनेनें ती विव्हळत पडली होती. जें औषध लाविलें असतां एकदम दुःख थांबून थंडगार वाटेल, असें एक औषध तिच्या एका दासीला माहीत होतें, आणि तें आणण्यासाठीं ती गेली होती. इतक्यांत हेमचंद्राकडून निरोप आला कीं, 'मी बगीच्यांत तुझी वाट पहात आहें.' एका घटकेंत औषध येणार होतें; पण तिनें त्या औषधाची वाट पाहिली नाहीं. मरणाधिक होत असलेल्या वेदना विसरून जाऊन ती उठून त्याच्या भेटीला गेली. औषध लावण्याचें तसेंच राहून गेलें. याहि गोष्टीचें हेमचंद्राला त्या वेळीं स्मरण झालें. तीच मृणालिनी ब्राह्मणकुळाला कलंक लावणाऱ्या व्योमकेशासाठीं हेमचंद्राशीं बेइमानी होईल काय ? छेः ! अगदीं अशक्य गोष्ट ! आणखी एक गोष्ट. एके दिवशीं हेमचंद्र गुरुजीच्या भेटीसाठीं मथुरेहून जाण्यास निघाला होता. एक प्रहर वाट चालल्यानंतर हेमचंद्र एकाएकीं आजारी पडला, आणि एका धर्मशाळेंत पडून राहिला. कशी कोण जाणे; पण मृणालिनीला अंतःपुरांत ही बातमी लागतांच ती एका दाईला घेऊन रात्रीच्या वेळीं चार कोस पायानें चालत गेली. जेव्हां ती धर्मशाळेंत जाऊन पोहोंचली, तेव्हां वाटेच्या श्रमानें ती इतकी थकली होती कीं, प्रायः गतप्राण झाली होती. पायांत काटे बोंचून रक्त निघालें होतें. तिनें हेमचंद्राची भेट घेतली आणि पित्याच्या धाकामुळें त्याच रात्रीं घरीं परत गेली. घरीं गेल्यावर तिला स्वतःला दुखणें आलें, तरी तिच्या मनानें हेमचंद्राचा सारखा ध्यास घेतला होता. तीच मृणालिनी व्योमकेशासारख्या नराधमासाठीं हेमचंद्राचा त्याग करील काय ? त्याच्याशीं बेइमानपणा करील काय ? करील असें ज्यास वाटत असेल, तोच महामूर्ख नराधम म्हटला पाहिजे. हेमचंद्र शेकडों वेळां आपल्या मनाशीं म्हणाला, " मीं मृणालिनीचें पत्र वाचिलेंसुद्धां नाहीं, किंवा ती येथें कां आली आहे, याची पूसतपास सुद्धां केली नाहीं, हा माझा केवढा मूर्खपणा ! पत्राच्या चिंध्या करून टाकून दिल्या होत्या त्या गोळा करतां येतील, आणि त्या जुळवून जेवढा मजकूर लागेल तेवढ्यावरून तिच्या मनांतला आशय कांहीं तरी कळेल, अशा आशेनें तो एकदां त्या ठिकाणीं गेला सुद्धां होता; पण, अंधेरांत त्याच्या हातीं कांहीं लागलें नाहीं. वाऱ्यानें त्या चिंध्या उडून गेल्या होत्या. जर आपला उजवा हात कापून दिल्यानें हेमचंद्राला पत्राच्या चिंध्या मिळण्यासारख्या असत्या, तर त्यानें आपला हातसुद्धां कापून दिला असता.

उलट, त्याच्या मनांत असेंहि येई कीं, 'आचार्य काय खोटें सांगतील ? ते सत्यवादी आहेत. कधीं खोटें बोलावयाचे नाहींत. तशांत त्यांचें माझ्यावर पुत्राधिक प्रेम आहे. त्यांनीं सांगितलेल्या गोष्टीनें माझ्या मनाला मरणाहून अधिक तीव्र यातना होतील, हें त्यांना ठाऊक असतां ते अशी खोटी गोष्ट सांगून माझ्या मनाला उगाच पीडा कसे देतील ? पुनः त्यांनीं ती गोष्ट सांगितली ती आपण होऊन सांगितली नाहीं. मीं जेव्हां मला सगळ्या गोष्टी ठाऊक आहेत; असें त्यांना ताव्यानें सांगितलें, तेव्हांच ते ती गोष्ट बोलले. खोटें सांगण्याचा त्यांचा उद्देश असता, तर त्यांनीं तें अगोदरच सांगितलें असतें. मग काय, हृषीकेशानें त्यांना खोटें सांगितलें म्हणावें ? पण तो तरी गुरुजीजवळ निष्कारण खोटें कां सांगेल ? आणि मृणालिनी तरी त्याचें घर सोडून येथें नवद्वीपाला कशाला येईल ?'

असा विचार मनांत आला म्हणजे हेमचंद्राचें तोंड काळेंठिक्कर पडे. तो अंथरुणावर उठून बसे; दांत ओठ चावी; त्याचे नेत्र आरक्त व वटारलेले होत. भाला घेण्यासाठीं त्याची मूठ वळे. पुनः सगळा रंग पालटे. मृणालिनीचा प्रेमपूर्ण मुखचंद्रमा त्याच्या हृदयाकाशांत प्रकाशित होई. त्याबरोबर मुळांसकट उपटलेल्या वृक्षाप्रमाणें तो धाडकन् अंथरुणावर अंग टाकी, आणि उशींत तोंड खुपसून लहान पोरासारखा रडत राही. अशा रीतीनें तो रडत असतां त्याच्या शय्यागृहाचें द्वार एकाएकीं उघडलें, आणि गिरिजायेनें आंत प्रवेश केला.

हेमचंद्राच्या मनाला प्रथम वाटलें कीं, मनोरमाच आली; पण पाहतो तों पुष्पाप्रमाणें सुकुमार अशी तिची मूर्ति दिसली नाहीं मग त्यानें गिरिजायेला ओळखलें. तिला पाहून पहिल्यानें त्याला आश्चर्य वाटलें, नंतर आनंद झाला, आणि शेवटीं कुतूहल उत्पन्न होऊन त्यानें विचारलें, 'पुनः कां आलीस ?'

गिरिजाया म्हणाली, 'मी मृणालिनीबाईसाहेबांची दासी आहें. आपण बाईसाहेबांचा त्याग केला; पण, त्यांच्यानें आपला त्याग करवत नाहीं. त्यामुळें मला पुनः यावें लागलें. आपल्या मनांत मला मारायचें असलें, तर खुशाल मारावें. बाईसाहेबासाठीं तो मार सहन करण्याचा पक्का निश्चय करूनच मी आल्यें आहें.'

हे शब्द ऐकून हेमचंद्र अगदीं कुंठित झाला आणि म्हणाला, "भिऊं नकोस. बायकांच्या अंगावर मी हात टाकीत नसतों. तूं कां आलीस ? मृणालिनी कोठें

आहे? काल संध्याकाळीं तूं म्हणाली होतीस कीं, ती येथें आली आहे. येथें येण्याचें कारण काय? मीं काल तिचें पत्र वाचलें नाहीं, ही मोठीच चूक केली."

गिरिजाया म्हणाली. "बाईसाहेब आपल्याच भेटीसाठीं येथें आल्या आहेत."

आतां हेमचंद्राच्या अंगावर रोमांच उभे राहिले. तो मनांत म्हणाला, 'अरेरे! अशा मृणालिनीला दुराचरणी समजून मीं तिची अवहेलना केली ना!'

त्यानें पुनः गिरिजायेला विचारलें, "ती कोठें आहे?"

**गिरिजायाः**—त्या आपला अखेरचा निरोप घेण्यासाठीं येथें आल्या आहेत. तळ्याच्या कांठीं उभ्या आहेत. चलावें महाराज तिकडे.'

इतकें बोलून गिरिजाया निघाली. हेमचंद्रहि तिच्यामागून त्वरेनें गेला.

तळ्याच्या कांठीं जेथें मृणालिनी पायरीवर बसली होती, तेथें गिरिजाया गेली. हेमचंद्रहि तेथें जाऊन पोहोंचला. गिरिजाया म्हणाली, "बाईसाहेब! उठा. राजपुत्रांची स्वारी आली आहे."

मृणालिनी उठून उभी राहिली. दोघेंहि परस्परांच्या मुखांकडे पाहूं लागलीं. मृणालिनीचे डोळे अश्रूंनीं भरून आल्यामुळें तिला कांहीं दिसेनासें झालें. झाडाची फांदी मोडली असतां ज्याप्रमाणें तिच्या आश्रयानें वाढलेली लता तुटून खालीं जमिनीवर पडते, त्याप्रमाणें मृणालिनीनें राजपुत्राच्या चरणापाशीं एकदम अंग टाकलें. गिरिजाया हळू हळू दूर गेली.

---

## प्रकरण दहावें.

# इतक्या दिवसांनंतर!



हेमचंद्रानें मृणालिनीचा हात धरून तिला उठविलें. नतर तीं दोघ समोरासमोर बसलीं.

इतक्या दिवसांनंतर त्या दोघांची ही भेट झाली होती. ज्या दिवशीं प्रदोषकाळीं यमुनेच्या तीरावर उष्णकाळच्या वाऱ्यानें हलणाऱ्या बकुल वृक्षाखालीं उभी राहून यमुनेच्या कृष्णवर्णप्रवाहाच्या चंचल लाटांवर नक्षत्रांचीं पडलेलीं प्रतिबिंबें पाहत पाहत त्या दोघांनीं डोळ्यांत पाणी आणून परस्परांचा निरोप घेतला होता, त्यानंतर इतक्या दिवसांनीं आज पुनः त्यांची गांठ पडली होती. उन्हाळयामागून पावसाळा जातो; पावसाळयामागून हिंवाळा जातो; हा सृष्टिक्र-

मच आहे. पण जे कित्येक दिवस गेले, त्यांची मोजदाद त्यांच्या हृदयाला ऋतु-गणनेनें कशी करतां येईल ?

त्या रात्रीं त्या स्वच्छ जलाशयाच्या कांठीं दोघेजण समोरासमोर उभीं होतीं. चोहोंबाजूस निबिड अरण्य होतें. लतावेष्टित, विशाल, उंच वृक्ष दृष्टिमार्गाला प्रतिबंध करीत उभे होते. नीलवर्ण, मेघखंडाप्रमाणें विशाल आणि शैवाल, कुमुद, कल्हार प्रभृति वनस्पतींनीं शोभायमान दिसणारा जलाशयाचा विस्तार समोर होता. डोक्यावर चंद्र, नक्षत्रें आणि मेघमंडळ यांनीं आकाश प्रफुल्लित झालेलें दिसत होतें. चंद्रप्रकाशांत, आकाशांत, वृक्षशिरांवर, लतापल्लवांत, नीलवर्ण मेघांत, सर्वत्र हास्य स्फुरत होतें. सृष्टिदेवी मोठी धीरशाली आणि निश्चल होती. त्या सृष्टिदेवतेच्या मंदिरांत मृणालिनी व हेमचंद्र हीं दोघें समोरासमोर उभीं होतीं.

भाषेंत काय शब्द नव्हते ? का बोलण्यासारखें त्यांच्या मनांत कांहीं नव्हतें ? जर होतें, तर तीं कां बोललीं नाहींत ? याचें उत्तर उघड आहे. परस्परांकडे पाहण्यांतच तीं दोघें इतकीं गढून गेलीं होतीं कीं, बोलणार कोणच्या रीतीनें ! ही वेळच अशी होती कीं, प्रेमपात्रांना परस्परांच्या सन्निध राहण्यांत जें सुख वाटत होतें, त्यापुढें अन्य सुखाला त्यांच्या हृदयांत स्थानच मिळेना. त्या स्थितींत जें सुख तीं अनुभवीत होतीं, त्यापुढें संभाषणाचें सुख प्राप्त करून घेण्याची इच्छाच त्यांना झाली नाहीं.

त्या वेळीं बोलण्यासारख्या इतक्या गोष्टी होत्या कीं, कोणती गोष्ट अगोदर बोलावी व कोणती मागून, तें ठरविणें मोठें कठिणच होतें.

मनुष्याच्या भाषेंत असे कोणते शब्द आहेत कीं, ते अशा वेळीं योजितां आले असते ?

तीं परस्परांच्या मुखांकडे पाहत उभीं होतीं. हेमचंद्रानें मृणालिनीच्या प्रेमपूर्ण मुखचंद्राकडे एकदां पाहिलें मात्र, लागलींच हृषिकेशाच्या शब्दावरचा त्याचा विश्वास उडूं लागला. त्या मुखरूपी ग्रंथाच्या प्रत्येक पृष्ठावर पवित्रता मूर्तिमंत लिहिलेली होती. हेमचंद्राची दृष्टि तिच्या नेत्रांकडे लागली. तेच तिचे अपूर्व, दीर्घ, कमलसदृश व अंतःकरणांतील वृत्ति ज्यांत प्रतिबिंबित झाल्या आहेत, असे जणूं काय दर्पणच—अशा तिच्या त्या नेत्रांतून प्रेमाश्रु वाहत होते, असे जिचे नेत्र होते, ती बेइमानी कशी असेल ?

हेमचंद्रानें प्रथम बोलण्यास सुरवात केली. तो म्हणाला 'मृणालिनी! तुझें कसें आहे?'

मृणालिनी कांहीं उत्तर देऊं शकली नाहीं. अजून तिची चित्तवृत्ति शांत झाली नव्हती. ती बोलण्यास सुरुवात करणार, इतक्यांत तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले आणि कंठ सद्गदित झाला. कंठांतून शब्द फुटेना. हेमचंद्रानें पुनः तोच प्रश्न केला. तरी तिच्यानें उत्तर देववेना. शेवटीं, हेमचंद्रानें आपल्या हातांत तिचा हात घेऊन पायरीवर बसविलें व आपणहि जवळ बसला. तिच्या चित्ताला जी कांहीं स्थिरता इतक्या वेळांत प्राप्त झाली होती, तीहि आतां नाहींशी झाली. हळूहळू तिचें मस्तक हेमचंद्राच्या खांद्यावर जाऊन टेकलें. ती गोष्ट स्वतः मृणालिनीच्याहि ध्यानांत आली नाहीं. ती पुनः रडूं लागली. तिच्या अश्रूंनीं हेमचंद्राचा खांदा आणि छाती हीं भिजून गेलीं. जगांत मृणालिनीनें जें कांहीं सुख अनुभविलें होतें, तें या रडण्याच्या सुखाची बरोबरी करणारें नव्हतें.

हेमचंद्र पुनः म्हणाला, 'मृणालिनी! मी तुझा मोठा अपराध केला आहे. त्याची तूं क्षमा कर. तुझ्या नांवाला कलंक लावणाऱ्या गोष्टी ऐकून मीं त्यावर विश्वास ठेविला. माझा विश्वास बसण्यास कांहीं कारणेंहि झालीं. त्यांचें निराकरण तूं आतां करशीलच. मी आतां विचारतों त्या प्रश्नांचीं सरळ उत्तरें दे.'

मृणालिनीनें हेमचंद्राच्या खांद्यावरून मस्तक न उचलतां म्हटलें, "काय विचारावयाचें आहे?"

हेमचंद्र म्हणाला, 'तूं हृषिकेशाचें घर कां सोडलेंस?"

हृषिकेशाचें नांव ऐकतांच नागिणीसारखी फणफणत डोकें उचलून मृणालिनी म्हणाली, 'मीं घर सोडलें का त्यानेंच मला घरांतून काढून लाविलें?'

हें ऐकून हेमचंद्राचें मन व्यथित—किंचित् शंकितहि झालें. तो विचारांत पडला. येवढया अवकाशांत मृणालिनीनें पुनः त्याच्या खांद्यावर डोकें टेकलें. तसें करण्यांत तिला इतकें सुख वाटत होतें कीं, त्या सुखापासून वंचित व्हावेंसें तिला वाटेना.

हेमचंद्रानें विचारलें, "बरें पण, त्यानें तरी तुला घराबाहेर कां काढिलें?"

मृणालिनीनें त्याच्या छातीवर आपलें मुख टेंकून तें लपविलें, आणि अतिशय मृदु स्वरानें म्हटलें, "काय सांगूं आपणाला माझें कपाळ? त्यानें मला कुलटा समजून घराबाहेर काढलें!"

हें ऐकतांच एखाद्या तीराप्रमाणें हेमचंद्र तडकाफडकीं उठला. त्यामुळें त्याच्या छातीवर टेकलेलें मृणालिनीचें मस्तक खालीं पायरीवर पडलें.

" पापी ! चांडाळणी ! तुझ्याच तोंडून कबुली बाहेर आली !'

हे शब्द उच्चारून हेमचंद्र वेगानें तेथून निघून गेला. वाटेंत त्यानें गिरिजायेला पाहिलें. त्याची भयप्रद मुद्रा पाहून गिरिजाया दचकली. आम्हांला लिहिण्याला सुद्धां लज्जा वाटते; परंतु लिहिल्यावांचून गत्यंतर नाहीं कीं, हेमचंद्रानें पादप्रहारानें गिरिजायेला मार्गांतून दूर करून म्हटलें, " तुझ्या यजमानिणीला पादप्रहार केल्यानें माझे पाय कलंकित झाले असते !" इतकें बोलून तो चालता झाला.

ज्यांच्या ठायीं धैर्य नसतें, ते क्रोध येतांच त्यानें अंध होतात आणि जगांतल्या सर्व सुखांना मुकतात. कवीनें म्हटलें आहे कीं, केवळ धैर्याचा अभाव या एका दोषामुळें वीरांत श्रेष्ठ अशा द्रोणाचार्यांचा निःपात झाला. 'अश्वत्थामा हतः' हे दोन शब्द ऐकतांच त्यानें शस्त्रत्याग केला. विचारपूस करून खरी गोष्ट काय आहे, ती समजून घेतली नाहीं. हेमचंद्राच्याठायीं हाच एक दोष होता असें नाहीं; त्याच्या जोडीला अभिमान आणि क्रोध हेहि होते.

उषःकाल झाला. आकाशांत लाल फुटलें. थंड वारा वाहूं लागला. तरी मृणालिनी तळ्याच्या कांठीं पायरीवर बसलीच होती. गिरिजायेनें विचारलें, "बाईसाहेब ! आपलें डोकें जोरानें आपटलेलें दिसतें. मृणालिनीनें विचारलें, " आपटलें ! काय आपटलें ? "

गिरिजाया म्हणाली, 'डोकें.'

मृणालिनी म्हणाली, " डोकें ? मला तर कांहीं कळलें नाहीं ! "

---

# चतुर्थ खंड.



## प्रकरण पहिलें.

## कस्तुरी-मृग.



जोंपर्यंत मृणालिनीच्या दुःखाचा तारा अस्तंग होता, तोंपर्यंत गौडदेशाचा सौभाग्यशशीसुद्धां त्याच मार्गानें जात होता. ज्या पुरुषानें मनांत आणिलें असतें, तर त्याच्या हातून गौडराज्याचें रक्षण झालें असतें, तो कस्तुरि-मृगाप्रमाणें एकांत जागीं बसून अभागी जन्मभूमीला बद्ध करण्यासाठीं जाळें टाकीत होता. रात्रीच्या वेळीं एकांत स्थानीं बसून धर्माधिकारी पशुपति त्याचा जणूं काय उजवा हातच, अशा शांतशीलाची निर्भत्सना करीत म्हणाला, "शांतशील ! सकाळीं जी तूं बातमी आणिलीस, तीच तुझ्या दक्षतेच्या अभावाचा पुरावा देणारी आहे. तुझ्यावर आतां कोणतेंहि जबाबदारीचें काम सोंपविण्याची माझी इच्छा नाहीं.'

**शांतशील**—जें असाध्य होतें, तें मला करतां आलें नाहीं, ही गोष्ट खरी; पण दुसऱ्या कामांत माझी परीक्षा पाहावी.

**पशुपतिः**—सैन्याला काय हुकूम दिला आहे ?

**शांतशीलः**—हाच कीं, माझ्या आज्ञेवांचून कोणीं लढाईची तयारी करूं नये.

**पशुपतिः**—प्रांतपाल व कोष्टपाल यांना तुम्हीं काय सांगून ठेविलें आहे ?

**शांत०**—दुसरें काय ? हेंच कीं, लवकरच यवनबादशाहाकडून खंडणी घेऊन कांहीं यवनदूत येतील, त्यांना अटकाव करूं नका.

**पशुपतिः**—दामोदरशर्म्यानें या आज्ञेप्रमाणें कार्य केलें आहे कीं नाहीं ?

**शांत०**—त्यानें मोठ्या चातुर्यानें काम केलें आहे.

**पशु०**—तें कसें ?

**शांत०**—त्यानें एका जुन्या ग्रंथांतलें एक जुनें पान काढून त्यांत स्वतः रचलेला एक श्लोक घुसडून दिला आहे, आणि तो आज सकाळीं राजाला वाचून दाखविला. त्यांत माधवाचार्यांची खूप निंदा केली होती.

**पशु०**—त्या श्लोकांत भविष्य काळच्या गौडविजेत्यांचें सविस्तर रूप वर्णन केलें होतें, तें ऐकून महाराजांनीं कांहीं विचारपूस केली कीं काय ?

**शांत०**—केली. मदनसेन नुकताच काशीहून आला आहे, हें महाराजांना माहित होतें. त्यांनीं त्याला बोलावूं पाठविलें, आणि तो आल्यावर त्याला विचारलें, 'काय हो, तुम्ही मगधदेशांत यवनराजाच्या प्रतिनिधीला पाहिलें असेलच ?' त्यानें उत्तर केलें. ' होय महाराज. ' मग महाराजांनीं त्याचें रूप कशा प्रकारचें आहे, त्याचें वर्णन करण्यास त्यास आज्ञा केली. त्यावर मदनसेनानें बख्त्यार खिलजीच्या रूपाचें यथार्थ वर्णन केलें. तें वर्णन व श्लोकांतलें वर्णन हीं बरोबर जुळलीं. तेव्हां गौडराज्याचा आतां नाश होणार, अशाविषयीं महाराजांची खात्री होऊन चुकली.

**पशुपतिः**—बरें, पुढें ?

**शांत०**—महाराज मग रडूं लागले. ते म्हणाले, ' मीं आतां वृद्धपणीं काय करावें ? माझा परिवारासह यवनांच्या हातून घात होणार, हें मला स्पष्ट दिसतें आहे. तेव्हां दामोदर शर्म्यानें त्याला पढवून ठेविल्याप्रमाणें उत्तर केलें, ' महाराज ! याला उत्तम उपाय हाच कीं, आपण संधी साधून सहपरिवार तीर्थयात्रेला निघून जावें आणि राज्याच्या व्यवस्थेचा भार धर्माधिकाऱ्यावर टाकावा. असें केल्यानें आपले प्राण तरी वांचतील. पुढें शास्त्रवचन खोटें ठरून आपणांस पुनः राज्यप्राप्ति होईल. महाराजांना हा विचार पसंत पडून त्यांनीं नौका सज्ज ठेवण्याविषयीं आज्ञा केली. लवकरच ते तीर्थयात्रेला निघतील, असा रंग दिसत आहे.

**पशु०**—ब्राह्मणानें उत्कृष्ट कामगिरी बजाविली. तुम्हांलाहि शाबासकी दिली पाहिजे. आतां माझ्या मनांतली इच्छा पूर्ण होण्याचा संभव दिसूं लागला आहे. मी स्वतंत्र राजा न झालों, तरी निदान यवनराजाचा प्रतिनिधि तरी खास होईन. येवढें माझें कार्य झालें, म्हणजे तुम्हांला यथेच्छ इनाम देईन. त्यांत कमतरता होणार नाहीं, ही पक्की खात्री असूं द्या. बरें आहे. आतां निरोप घ्या. उद्यां प्रातःकाळींच तीर्थयात्रेला जाण्याकरितां महाराजासाठीं नौका तयार ठेवा.

शांतशीलानें निरोप घेतला.

---

## प्रकरण दुसरें
# बिनसुताचा हार.



पशुपति मोठ्या भव्य वाड्यांत नोकरचाकरांसह मोठ्या थाटामाटानें राहत होता खरा; पण त्याच्या त्या वाड्यांत निबिड अरण्याहूनहि गाढ अंधकार होता. खरे गृहदीप म्हणजे स्त्रीपुत्रादिपरिवार. त्यांचा तर त्याच्या घरांत पूर्ण अभाव होता.

आज शांतशीलाशीं वरील संभाषण झाल्यानंतर पशुपतींच्या मनांत हाच विचार आला. तो मनांत म्हणूं लागला, 'इतक्या दिवसानंतर पुनः आपल्या घरांत प्रकाश होणार असें दिसतें. जगदंबा कृपा करील, तर लवकरच मनोरमा या घरांतला अंधकार दूर करील.'

असा विचार करीत करीत पशुपति निजायला जाण्यापूर्वी अष्टभूजा देवीला आपल्या रोजच्या क्रमाप्रमाणें वंदन करण्यासाठीं देवीच्या मंदिरांत गेला. पाहतो तों मनोरमा तेथें बसलेली !

पशुपतीनें विचारलें, 'मनोरमे ! केव्हां आलीस ?'

मनोरमा पूजा केल्यावर उरलेलीं फुलें घेऊन सुतावांचून त्यांचा हार गुंफित होती. तिनें त्याच्या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. तेव्हां पशुपति म्हणाला," माझ्याशीं बोल ग ! तूं जवळ असलीस, म्हणजे मला माझ्या दुःखाचा विसर पडतो."

मनोरमेनें वर तोंड करून पाहिलें. पशुपतीच्या तोंडाकडे थोडा वेळ पाहिल्यावर ती म्हणाली, "मी तुम्हांला कांहीं सांगण्याकरितां आलें होत्यें; पण आतां तें विसरून गेल्यें."

पशुपति म्हणाला, 'नीट स्मरण कर. मला ऐकूं दे.'

पशुपति तेथेंच बसून राहिला, आणि मनोरमा हार गुंफूं लागली. बराच वेळानें पशुपति म्हणाला, 'मला तुला कांहीं सांगावयाचें आहे, नीट लक्ष देऊन ऐक. मीं इतके दिवस विद्या संपादन केली. द्रव्य संग्रहहि केला; पण गृहस्थाश्रमांतला जो धर्म तो माझ्या हातून घडला नाहीं. ज्या गोष्टीची मला आवड होती, त्या गोष्टी केल्या. लग्न करण्याविषयीं आतांपर्यंत इच्छा नसल्यामुळें तें केलें नाहीं; पण तूं दृष्टीस पडल्यापासून या क्षणापर्यंत तुझा लाभ कसा घडेल; याशिवाय अन्य विचार माझ्या मनांत आला नाहीं. तुझ्या लाभासाठींच मीं हें

खडतर व्रत स्वीकारलें आहे. जगदंबेच्या कृपेनें दोन चार दिवसांतच मला राज्य प्राप्ति घडेल. मग तुझ्याशीं मला विवाह करतां येईल. तूं विधवा आहेस, ही माझ्या मार्गांत थोडीशी अडचण आहे खरी; पण शास्त्रांतलीं प्रमाणें देऊन मी या आक्षेपांचें खंडन करीन. दुसरी अडचण ही आहे कीं, तुझा पिता कुलीन ब्राह्मण—अर्थात् तूं कुलीन कन्या आहेस आणि मी श्रोत्रिय आहें.'

मनोरमेनें या सगळ्या गोष्टी नुसत्या ऐकून तरी घेतल्या कीं नाहीं, याची सुद्धां शंका आहे. तिचें मन ठिकाणावर नाहीं, हें पशुपतीच्या ध्यानांत आलें. सरळ प्रकृतीच्या बालिकामूर्ति मनोरमेवर पशुपतीचें प्रेम होतें. पोक्त, कुशाग्र-बुद्धीच्या मनोरमेचें मात्र त्याला भय वाटत होतें. तथापि पुनः उद्योग करून पहावा, म्हणून पशुपति म्हणाला, 'कुलीनाची मुलगी कुलीनाच्याच घरांत देण्याला शास्त्रांत तर कांहीं आधार नाहीं. ती रीत मोडल्यानें धर्महानि होत नाहीं व जातिभ्रष्टताहि येत नाहीं. शास्त्राज्ञेप्रमाणें तुझ्याशीं विवाह केला म्हणजे झालें. या गोष्टीला तुझी संमति मिळाली म्हणजे काम होईल. एकदां विवाह झाल्यावर तुझ्या आजोबाला ही गोष्ट कळली, तरी झालेला विवाह कांहीं फिरणार नाहीं.'

मनोरमेनें कांहींच उत्तर केलें नाहीं. तिनें त्याचें बोलणें ऐकलें तरी होतें कीं नाहीं, याची सुद्धां शंकाच आहे. एक काळें मांजर तिच्या जवळ बसलें होतें. त्याच्या गळ्यांत तिनें तो बिनसुताचा हार घातला. घालतांच मांजरानें धडपड केल्यामुळें तो विस्कळित झाला. तेव्हां मनोरमेनें आपल्या डोक्यांतलेच एक दोन केस काढून त्या केसांत तीं पुनः फुलें गुंफूं लागली.

पशुपतीला उत्तर मिळालें नाहीं, तेव्हां तो फुलांचा हार गुंफण्यांत निमग्न झालेल्या मनोरमेच्या बोटांकडे मुग्ध दृष्टीनें व स्तब्धतेनें पहात बसला.

---

## प्रकरण तिसरें.

# पिंजऱ्यांतला पक्षी.



पशुपतीनें मनोरमेचा बुद्धिप्रदीप प्रदीप्त करण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केला; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं तो म्हणाला, 'मनोरमे! बरीच रात्र झाली आहे. मी आतां निजावयाला जातों.'

मनोरमेनें चर्या बिलकुल म्लान न करतां उत्तर केलें, 'बरें आहे. जावें.'

पशुपति गेला नाहीं. हार गुंफण्याकडे पाहात बसला. कदाचित् थोडीशी धमकावणी दाखविल्यानें काम झालें तर पहावें, दुसरा उपाय नाहीं, असा विचार करून मनोरमेला भय दाखविण्यासाठीं तो तिला म्हणाला, 'मनोरमे! जर इतक्यांत यवन आले तर तूं कोठें जाशील ?

मनोरमेनें वर न पाहतां उत्तर केलें, 'कोठेंहि जाणार नाहीं. घरींच राहीन.'

**पशुपतिः**—घरीं तुझें रक्षण कोण करील ?

मनोरमेनें प्रश्नाकडे विशेषसें लक्ष न देतां म्हटलें, 'तें नाहीं मला ठाऊक.'

**पशुपतिः**—तूं मला काय सांगण्यासाठीं आली होतीस ?

**मनोरमाः**—देवाच्या दर्शनाला आल्यें होत्यें.

हें ऐकून पशुपति खिन्न झाला; आणि म्हणाला, 'मनोरमे ! तुला हात जोडतों. आतां तरी माझ्या म्हणण्याकडे लक्ष दे. माझ्याशीं तूं लग्न करणार ना ? याचें उत्तर आजच मला पाहिजे.'

हार गुंफण्याचें मनोरमेचें काम संपलें होतें. तिनें तो हार काळ्या मांजराच्या गळ्यांत घातला. पशुपतीचें बोलणें तिच्या गांवींहि नव्हतें. मांजराला गळ्यांत हार घालून घेण्याची इच्छा नव्हती. मनोरमेनें तो त्याच्या गळ्यांत घालावा आणि त्यानें त्यांतून आपली मान काढून घ्यावी, असें बराच वेळ चाललें होतें. मनोरमा हसत हसत पुनः तो त्याच्या गळ्यांत घालूं लागली. या गोष्टीनें पशुपतीला अधिकच चीड आली आणि त्यानें मांजराला एक लाथ मारली. त्याबरोबर शेंपटी उभारून मांजर दूर पळून गेलें. मनोरमेनें पूर्वीप्रमाणेंच हसत हसत मांजराच्या ऐवजीं पशुपतीच्या गळ्यांत तो हार घातला.

राजाच्या प्रसादाचा उपभोग घेणारा धर्माधिकारी मांजराचा प्रसादरूपी हार गळ्यांत पडलेला पाहून चकित झाला. त्याला थोडासा रागाचाहि झटका आला. पण समोर उभी असलेल्या मनोरमेची हसतमुद्रा पाहून तो झटका नाहींसा होऊन उलट त्याला कृतकृत्यता वाटली. तो मनोरमेला आलिंगन देण्यासाठीं हात पसरूं लागला. इतक्यांत, मनोरमा झट्दिशीं पलिकडे सरली, आणि दूर जाऊन उभी राहिली. रस्त्यानें जाणारा मनुष्य वाटेंत एकाएकीं कृष्णसर्पाला पाहून जसा घाबरून पलीकडे सरतो, तशी मनोरमा या वेळीं दूर झाली.

पशुपति क्षणमात्र हतबुद्ध झाला. मनोरमेच्या तोंडाकडे पाहण्याचीसुद्धां त्याची कांहीं वेळ छाती झाली नाहीं. थोड्या वेळानें तो म्हणाला, 'मनोरमे! मी काय वाईट करीत होतों? तूं माझी पत्नी होणार ना?

मनोरमेनें त्याच्याकडे एक तीव्र कटाक्ष टाकून म्हटलें, 'पशुपति! केशवाची मुलगी कोठें आहे?'

**पशुपतिः**—ती कोठें आहे तें मला ठाऊक नाहीं व कळण्याची इच्छाहि नाहीं. तूंच एक माझी पत्नी.

**मनोरमाः**—मला ठाऊक आहे ती कोठें आहे तें सांगूं?

पशुपति आश्चर्यचकित होऊन मनोरमेच्या तोंडाकडे पाहत राहिला. मनोरमा म्हणाली, 'एका ज्योतिष्यानें गणित करून सांगितलें होतें कीं, केशवाची मुलगी अल्पवयांतच विधवा होऊन पतीच्या मागून लवकरच मरेल. मुलीचा लवकरच आपणास वियोग होणार म्हणून केशव भयभीत व दुःखित झाला; पण, मुलीला लग्नावांचून ठेवतां येत नाहीं, म्हणून त्यानें योग्य वर पाहून त्याच्याशीं लग्न लावून दिलें. ब्रह्मदेवाचा लेख खोटा ठरवितां येईल, अशा भरंवशावर राहून तो लग्नाच्या दिवशींच रात्रीं मुलीला घेऊन प्रयागला पळून गेला. उद्देश हा कीं, तिच्या पतीच्या मृत्यूची बातमीसुद्धां मुलीच्या कानीं जाऊं नये; पण दैव कुणाला चुकलें आहे? थोड्याच दिवसांत प्रयाग येथें केशव मरण पावला. मुलीची आई अगोदरच मेली होती. मरणकाळ समीप आला तसा केशवानें मुलीला—हैमवतीला—आचार्यांच्या स्वाधीन केलें आणि त्यांना येवढेंच सांगितलें कीं, या अनाथ मुलीला आपल्या घरांत ठेवून तिचा प्रतिपाळ करा. हिचा पति पशुपति हा आहे; पण जोशीबुवांनीं असें भाकित केलें आहे कीं, हिचा पति तरुणवयांतच मृत्यु पावेल आणि त्याच्या मागून हीहि पण लवकरच मरेल. यासाठीं, पशुपति हिचा पति आहे, ही गोष्ट हिच्या कानांवर जाणार नाहीं, अशी खबरदारी घ्या आणि त्याचप्रमाणें, ही पशुपतीची स्त्री आहे, हें त्यालाहि कळवूं नका.'

'आचार्यांनें तें कबूल केलें आणि मुलीला आपल्या घरीं नेऊन व तिचा प्रतिपाळ करून, तुमच्याशीं तिचा विवाह झाला होता या गोष्टीची गंधवार्ताहि तिला लागूं दिली नाहीं.'

**पशुपतिः**—मग सध्यां ती मुलगी कोठें आहे?

**मनोरमाः**—मीच ती मुलगी आणि जनार्दन शर्मा माझा प्रतिपाळ करणारे आचार्य.

पशुपतीचें देहभान नाहींसें झालें. त्याचें डोकें भ्रमण करूं लागलें. त्याच्या तोंडून शब्द निघेना. त्यानें देवीच्या मूर्तीपुढें साष्टांग नमस्कार घातला आणि उठून मनोरमेला कवटाळण्यासाठीं तो तिच्याकडे धावत जाऊं लागला. ती पूर्वीप्रमाणें दूर सरली आणि म्हणाली, 'हं हं ! थांबा. आणखी कांहीं सांगावयाचें आहे.'

**पशुपतिः**—अग चांडाळणी ! इतके दिवस कां मला अज्ञानांत ठेविलेंस ?

**मनोरमाः**—पण माझ्या बोलण्यावर तुमचा विश्वास कोठें होता ?

**पशुपतिः**—मनोरमे, तुझ्या बोलण्यावर मीं केव्हां विश्वास ठेवला नाहीं तें सांग? मला जर कांहीं शंका आली असती, तर मीं जनार्दन शर्मा आचार्यांना विचारलें असतें.

**मनोरमाः**—ते काय उघड सांगते आणि दिलेलें वचन खोटें करते ?

**पशुपतिः**—मग त्यांनीं तुला कसें सांगितलें ?

**मनोरमाः**—त्यांनीं मला सांगितलें नाहीं. ते ही गोष्ट एके दिवशीं आपल्या बायकोजवळ बोलत असतां, माझ्या कानीं ती सहजगत्या आली. आणखी दुसरी गोष्ट—मी विधवा आहें, असेंच सगळे लोक समजतात. मीं तुम्हांला ही गोष्ट सांगितली असती, आणि तुमचाहि विश्वास तिच्यावर बसला असता, तरी काय उपयोग होता ? लोकांना माझें सांगणें थोडेंच पटलें असतें ? लोकांकडून निंदा न होतां माझें पाणिग्रहण तुम्हांला असें करतां आलें असतें ?

**पशुपतिः**—मीं लोकांची सभा बोलावून त्यांच्यापुढें ही सारी हकीकत सांगितली असती.

**मनोरमाः**—बरें, तेंहि असो; पण जोशीबुवांच्या भाकिताची वाट काय ?

**पशुपतिः**—त्याला काय ? ग्रहांची शांति केली असती म्हणजे झालें असतें ! बरें, झालें तें झालें. तूं माझ्या गळ्यांत माळ घातलीच आहेस. ती मी आतां गळ्यांतून काढीत नाहीं आणि तुलाहि या घरांतून जाऊं देणार नाहीं.

**मनोरमाः**—मला येथून तर गेलेंच पाहिजे. मी जें सांगण्यासाठीं आलें होत्यें, तें तर सांगण्याचें राहून गेलें ! पण, आतां ऐका. हें घर सोडा; दुष्ट राज्य-लोभ सोडा; प्रभूचें अहित करण्याची दुर्बुद्धि टाकून द्या; या देशाचा सुद्धां त्याग करा; चला, आपण काशीवास करूं. तेथें मी आपल्या चरणांची सेवा करून आयुष्याचें सार्थक करीन. आयुष्याची दोरी संपली म्हणजे आपण बरोबरच

परलोकाला गमन करूं. ही गोष्ट तुम्हांला कबूल असेल, तर तुमच्या ठायीं माझी भक्ति अढळ राहील. नाहींतर—

**पशुपतिः**—नाहींतर काय

मनोरमा वर मान करून डोळ्यांत अश्रु आणून व हात जोडून देवीच्या समोर उभी राहिली, आणि सद्गदित कंठानें म्हणाली, 'नाहींतर या जगदंबेच्या समक्ष मी प्रतिज्ञा करत्यें कीं, तुमची व माझी हीच अखेरची भेट होईल. पुनः या जन्मांत आपली भेट होणार नाहीं.'

पशुपतीहि हात जोडून देवीपुढें उभा होता. तो म्हणाला, 'मनोरमे ! मीहि देवी समक्ष प्रतिज्ञा करतों कीं, माझ्या देहांत प्राण आहे, तोंपर्यंत तुला माझें घर सोडून जातां येणार नाहीं. मनोरमे ! ज्या मार्गांत मीं पाऊल टाकलें आहे, त्या मार्गांपासून परत फिरणें शक्य असतें, तर मी फिरलों असतों आणि सर्वसंगपरित्याग करून तुला घेऊन काशी क्षेत्राला गेलों असतों. पण आतां तें शक्य नाहीं. त्या मार्गांत मी फार पुढें गेलों आहें. आतां परत फिरण्याची सोय नाहीं. मीं जी गांठ बांधिली आहे, ती माझी मलाच सोडतां येणार नाहीं. जें व्हावयाचें, तें होऊन चुकलें. कांहीं झालें तरी माझ्या परमसुखापासून मी स्वतःला वंचित करून घेऊं काय? तूं माझी स्त्री आहेस. माझ्या दैवांत कांहीं का असेना ? मी तुला गृहिणी करणारच. तूं जरा येथें उभी रहा. मी आलोंच.'

इतकें बोलून पशुपति मंदिरांतून बाहेर पडला. तेव्हां मनोरमेच्या मनांत थोडी शंका आली. ती साचिंत होऊन तेथेंच उभी राहिली. पशुपतीचा निरोप घेतल्याशिवाय तिला जातां येईना.

थोड्याच वेळानें पशुपति परत आला आणि म्हणाला, "प्राणाधिके ! तुला आज मला सोडून जातां येत नाहीं. मी सगळीं दारें बंद करून आलों आहें."

पिंजऱ्यांत अडकलेल्या पक्ष्याप्रमाणें मनोरमेची त्या वेळीं स्थिति झाली.

---

## प्रकरण चौथें.

# यवनदूत कीं यमदूत ?



एक प्रहर दिवस आला होता. अशा वेळीं सुमारें सोळा सतरा अपरिचित जातीचे घोडेस्वार राजमार्गानें राजवाड्याकडे जात असलेले पाहून नागरिक

चकित झाले. त्या घोडेस्वारांचें शरीर धिप्पाड व पुष्ट होतें; बांधा उंच होता, वर्ण तप्तकांचनासारखा होता; त्यांची मुद्रा भव्य आणि चेहेऱ्यावर दाट काळ्या दाढीमिशा होत्या. डोळे मोठाले व पाणीदार होते. पोषाक झकपक होता. पोषाखावरून ते लढाऊ शिपाई दिसत होते. त्यांच्या सर्व शरीरावर नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें बांधलेलीं होतीं. डोळ्यांत दृढनिश्चयाची चमक होती. त्यांचे घोडे सिंधुनदाच्या पलीकडच्या प्रांतांतले व मजबूत बांध्याचे असून देखणे होते. त्यांचे आकार पर्वतशिलाप्रखंडाप्रमाणें विशाल होते. मान किंचित् वक्र होती, लगामाच्या बंधनाविषयीं त्यांच्या ठायीं असहिष्णुता दिसत होती. ते ऐटींत व ताठ्यानें चालत होते. त्यांच्यावरचे स्वार अश्वारोहण विद्येंत कुशल होते. वायूसारख्या चंचल तेजस्वी घोड्यांना त्यांनीं सहजगत्या आवरून धरलें होतें. हा सगळा प्रकार पाहून गौड देशाचे लोक त्यांची प्रशंसा करीत होते.

याप्रमाणें हे सतरा घोडेस्वार दांतांनीं ओंठ दाबून धरून आपला दृढ निश्चय प्रकट करीत मुकाट्यानें राजवाड्याकडे चालले होते. त्यांच्या बरोबर एक दुभाष्या होता. नागरिकांनीं उत्सुकतेनें विचारल्यावरून 'हे यवनराजाचे दूत आहेत,' असें त्यानें सांगितलें. प्रांतपाळ व कोष्ठपाल या दोघां रक्षणाधिकाऱ्यांनाहि तशाच रीतीनें सांगून पशुपतीच्या हुकुमाप्रमाणें त्यांनीं निर्विघ्नपणें शहरांत प्रवेश केला होता.

ते घोडेस्वार राजवाड्यापाशीं जाऊन पोहोंचले. वृद्ध राजाच्या हलगर्जीमुळें आणि पशुपतीच्या कपटामुळें त्या दिवशीं राजवाड्यांत फार थोडे पहारेकरी पहारे करीत होते. दरबारचें काम आटोपलें होतें. सरदार मंडळी निघून गेली होती. वाड्यांत फारच थोडे लोक राहिले होते. द्वारपाळांची संख्या अत्यल्प होती. अशा वेळीं या परकीयांना पाहून एका द्वारपाळानें विचारलें, "तुम्ही कोण ? आणि येथें कशासाठीं आलां आहां ? "

यवन म्हणाले, 'आम्ही यवनराजाचे दूत आहों. आम्हांला गौड राजाला भेटावयाचें आहे."

द्वारपाळानें उत्तर केलें, "महाराजाधिराज गौडेश्वर या वेळीं अंतःपुरांत गेले आहेत. आतां भेट व्हायची नाहीं."

पण त्याच्या मनाईला कोण विचारतो ? दूत आंत जाऊं लागले. एक ठेंगणासा लांब हाताचा, कुरूप यवन होता, तो सर्वांच्या पुढें झाला. दुर्भाग्यानें त्याल

अडविण्यासाठीं तो द्वारपाळ हातांत भाला घेऊन त्याच्यापुढें उभा राहिला आणि म्हणाला, फिर मागें ! नाहीं तर आतांच ठार करतों बघ ! '

' तूंच मर ' असें बोलून त्या ठेंगूनें द्वारपाळाला हातांतल्या तलवारीनें ठार मारलें. नंतर तो ठेंगू आपल्या बरोबरच्या लोकांकडे तोंड फिरवून म्हणाला, 'आतां आपण आपलें कार्य करूं या.'

हा इषारा मिळतांच त्या बाकीच्या सोळा घोडेस्वारांच्या तोंडून एकदम जयध्वनि निघाला. यांच्या कमरेच्या म्यानांतून सोळा तलवारी एकदम बाहेर पडल्या. राजवाड्यांत पहारेवाल्यांवर ते सगळे तुटून पडले. ते पहारेवाले गैरसावध होते. एकाएकीं हल्ला आलेला पाहातांच ते घाबरून गेले. स्वतःचा जीव वांचविण्याठींसुद्धां त्यांनीं हालचाल केली नाहीं. एका क्षणांत ते सारे मारले गेले. ठेंगू यवन म्हणाला, "ज्या ठिकाणीं जो सांपडेल त्या ठिकाणीं त्याला ठार करा. सोडूं नका. बुड्ढ्या राजालाहि मारून टाका." हा हुकूम होतांच यवन बिजलीप्रमाणें तत्काळ शहरांत शिरून म्हातारे, तरुण, स्त्रिया, व मुलें, जीं कोणी हातीं लागलीं त्यांस मारूं लागले. कित्येकांचीं मस्तकें त्यांनीं तरवारीनें छाटलीं, आणि कित्येकांना भाल्यांनीं भोंसकून ठार केलें.

हा अनर्थ पाहतांच वाड्यांत एकच आकांत झाला. तो आकांत अंतःपुरांत वृद्धराजा भोजनास बसला होता, त्याच्या कानीं गेला, तेव्हां त्याचें तोंड खाडकन् उतरलें. त्यानें विचारलें, 'झालें काय ? यवन आले कीं काय ?'

पळत सुटलेले पौरजन सांगूं लागले कीं, "महाराज ! वाड्यांत मोठा अनर्थ चालला आहे. यवन लोक सर्वांनां ठार करून आपणास मारण्यासाठीं येत आहेत."

हें ऐकतांच राजाच्या तोंडांतला घांस गळून खालीं पडला. नदीच्या प्रवाहाच्या लाटा आदळून कांठावर उगवलेले वेत त्यामुळें जसे कंपायमान होतात, तसें त्याचें शुष्क शरीर त्या वेळीं कांपूं लागलें. राणीसाहेब जवळ होत्या. राजा आतां पानावरच पडतो कीं काय, असें पाहून राणीनें त्याला उठविलें. कळसूत्री बाहुल्याप्रमाणें राजा उभा राहिला.

राणी म्हणाली, "कांहीं फिकिर नाहीं. सगळें द्रव्य नौकेंत घालून अगोदर पुढें रवाना केलें आहे. चलावें. आपण या चोरदारानें निघून सुवर्णग्रामाला जाऊं."

इतकें बोलून तिनें राजाला त्याचे हात न धुतां तसेंच चोरदारानें बाहेर काढलें व ती त्याला घेऊन सुवर्णग्रामाला गेली. त्या राजकुलाला कलंकभूत दुर्बळ मनाच्या राजाच्याबरोबर गौडराज्याची राजलक्ष्मीहि निघून गेली.

निवडक सोळा माणसें घेऊन माकडासारखा दिसणारा बख्त्यार खिलजी, यानें गौडेश्वराची राजधानी याप्रमाणें हस्तगत केली.

साठ वर्षांनंतर झालेल्या मिन-हाज-उद्दीन नांवाच्या यवन इतिहासकारानें गौडविजयाची अशी हकीकत लिहून ठेविली आहे. त्यांत सत्यांश किती आणि मिथ्यांश किती आहे, तें कोणीं सांगावें ? चित्र काढणारा मनुष्य सिंहाला पराजित करून त्याच्या मानेवर मनुष्य बसला आहे, असें चित्र काढतो. सिंहाला जर चित्र काढतां येतें, तर त्यानें कसें काढलें असतें ? त्यानें मनुष्याला उंदरासारखें क्षुद्र प्राण्याचें स्वरूप दिलें असतें, यांत शंका नाहीं. दुर्दैवी वंगभूमि अगोदर स्वभावतःच दुर्बळ ! आणि त्यांत चित्रकार पडले तिचे शत्रु ! मग काय विचारावयाचें आहे ?

---

## प्रकरण पांचवें.

# जाळें तोडलें.



राजधानी हस्तगत होतांच बख्त्यार खिलजीनें धर्माधिकाऱ्याकडे दूत पाठवून त्याला भेटीस बोलाविलें. त्याच्याशीं यवनांचा अगोदरच करार झालेला होता. त्याच्या फलनिष्पत्तीचा हा काळ आला होता.

पशुपतीनें कुलदेवतेला नमस्कार केला. रागावलेल्या मनोरमेकडे जाऊन तिचाहि निरोप घेतला. त्यावेळीं त्याची चित्तवृत्ति थोडीशी उल्लसित व थोडीशी शंकित दिसत होती. तो तसाच खिलजीकडे गेला. खिलजीनें खडी ताजीम देऊन त्याचा सत्कार केला आणि कांहीं कुशल प्रश्न विचारले. पशुपतीला राजवाड्यांत ठार झालेल्या माणसांच्या रक्ताच्या प्रवाहांतून पाय भिजवीत जावें लागलें होतें. या गोष्टीचा त्याच्या मनावर इतका परिणाम झाला होता कीं, यवनाच्या प्रश्नास त्याच्यानें कांहीं उत्तर देववेना. खिलजीनें त्याच्या मनांतला भाव ओळखून म्हटलें, " पंडितजी ! राजसिंहासनाच्या मार्गांवर फुलें पसरलेलीं

नसतात. त्या मार्गानें जाणाराला आपल्या बंधुवर्गाच्या शरीरांना लाथेनें तुडवीत नेहमीं जावें लागतें.

**पशुपतिः**—तें खरें; पण जे विरोध करणारे असतील त्यांचा वध करावा. हे बिचारे निरपराधी प्राणी! यांनीं काय केलें होतें?

**खिलजीः**—हा रक्ताचा प्रवाह पाहून तुम्हीं केलेला करार विसरलांत वाटतें?

**पशु०**—कराराप्रमाणें मी वागण्यास तयार आहें, आणि आपणहि वागाल याविषयीं मला शंका नाहीं.

**खिलजीः**—काडीमात्र शंका नाहीं; पण, मला एकच गोष्ट सांगावयाची आहे.

**पशु०**—आज्ञा व्हावी.

**खिलजीः**—कुतुबुद्दिन बादशाहानें या गौड देशाच्या राज्याचा कारभार तुमच्यावर सोंपविला आहे. आजपासून तुम्ही या वंग देशांत यवन बादशाहाचे प्रतिनिधि झाले आहां; पण बादशाहाची इच्छा अशी आहे कीं, राज्यांतले सर्व बडे अंमलदार एकजात मुसलमानधर्मी असावे. इतरांच्या हातांत कोणताहि अधिकार देऊं नये. तेव्हां आतां तुम्हांला इस्लाम धर्म स्वीकारला पाहिजे.

हें ऐकतांच पशुपतीचें तोंड उतरलें. तो म्हणाला, "करार करण्याच्या वेळीं ही गोष्ट निघाली नव्हती."

**खिलजीः**—नसेल! चुकीनें राहून गेली असेल. निघाली नसली, तरी तुमच्यासारख्या बुद्धिमान् माणसाला तर्कानें तिचें अनुमान करतां येण्यासारखें होतें! कारण, मुसलमान बादशाहानें हा बंगाल प्रांत जिंकून तो पुनः हिंदुराजाच्या हातीं देणें संभवतें तरी कसें?

**पशुपतिः**—पण मी बुद्धिवान् आहें, असें मी कधीं तुमच्यापाशीं म्हटलें होतें?

**खिलजीः**—नसेल म्हटलें! पण आतां तर समजलें ना? हं आटपा. इस्लाम धर्म घेण्याचा विचार ठरवा.

**पशुपतिः**—( गर्वानें ) माझा तर विचार ठरला आहे कीं बादशहानें बंगालप्रांतच काय, पण आपलें सारें राज्य देऊं केलें, तरी मी आपला सनातनधर्म सोडून नरकाची वाट धरणार नाहीं.

**खिलजी**:—ही तुमची चूक आहे. ज्याला तुम्ही सनातन धर्म म्हणतां, तो केवळ पिशाचांची पूजा आहे. कुराणधर्म हाच सत्यधर्म. महंमद पैगंबर याच्यावर विश्वास ठेवून परलोकींचें कल्याण साधून घ्या.

आतां पशुपतीचे डोळे उघडले. आपलें कार्य सिद्धीला गेल्यावर केलेले करार खुशाल मोडावे ही यवनांची लबाडीची युक्ति आतां त्याच्या लक्षांत आली. कपटानें कार्यभाग साधला नाहीं, तर बलात्कारानें तो साधावा, ही त्यांची राजनीति आतां त्याच्या लक्षांत आली. अशा शठाशीं शाठ्यच करावयास पाहिजे होतें. तें आपण केलें नाहीं, याबद्दल त्याचें मन आतां त्याला खाऊं लागलें. क्षणमात्र विचार केल्यावर तो म्हणाला, 'ठीक आहे. जशी हुजूरची आज्ञा.'

खिलजीनें त्याच्या मनांतला भाव ओळखला. बख्त्यार पशुपतीपेक्षां अधिक चतुर नसता, तर त्याला गौडांचें राज्य जिंकतां आलेंच नसतें! वंगभूमीच्या कपाळीं विधीनेंच लिहून टेविलें आहे कीं, युद्धांत तिचा पराभव होणार नाहीं; ती कपटानेंच जिंकिली जाईल. क्लाईव्ह साहेबानें कपटानेंच ती जिंकिली, हें या विधानाचें दुसरें प्रमाण होय.

बख्त्यार म्हणाला, 'ठीक! उत्तम! आज आम्हां मुसलमानांचा शुभदिवस आहे. यासाठीं असलें पवित्र कार्य लांबणीवर टाकतां कामा नये. आमचे मुल्लाजी हजर आहेतच. आतांच ते तुम्हांला इस्लाम धर्माची दीक्षा देतील.'

पशुपतीनें पाहिलें कीं, सर्वस्वी घात होण्याची वेळ आली आहे. तो म्हणाला, 'मला थोडा अवकाश द्या. तेवढयांत मी घरीं जाऊन कुटुंबांतल्या मंडळीला घेऊन येतों. आम्ही सर्वचजण एकदम दीक्षा घेऊं.'

बख्त्यार म्हणाला, 'मी माणसें पाठवून त्यांना आणवितों. तोंपर्यंत तुम्ही या शिपायांच्या पाहाऱ्यांत बसून विश्रांति घ्या.'

शिपायानें येऊन पशुपतीला धरलें. तें पाहून पशुपति चवताळून म्हणाला, 'अरे! हा काय प्रकार आहे? मी काय तुमचा बंदिवान आहें?'

बख्त्यार म्हणाला, 'घटकाभर तसेंच समजा झालें!'

पशुपति राजवाड्यांतच बंदिवान होऊन राहिला. कोळ्यानें आपलें जाळें तोडलें. त्यानें तें स्वतःच आपल्याभोंवतीं निर्माण केलें होतें.

पशुपति बुद्धिवान् होता, असें आम्हीं वर त्याचें वर्णन केलें आहे. तें वाचून वाचक म्हणतील, 'हें हो कसें? ज्यानें शत्रूवर इतका विश्वास टाकला, आणि स्वतः कोणाला बरोबर न घेतां त्यांनीं जिंकलेल्या राजवाड्यांत त्यांच्या भेटीला

गेला, त्याचें शहाणपण कोठें राहिलें ! ' यावर आमचें उत्तर हें कीं, शत्रूंवर विश्वास न ठेवून तो काय करणार होता ? तसें त्यानें केलें नसतें, तर युद्धाला उभें राहावें लागलें असतें. कोळी जाळें रचित असतो; युद्ध करण्याच्या भानगडींत तो पडत नाहीं.

त्याच रात्रीं रानांतल्या छावणींतून वीस हजार फौज येऊन तिनें सारा नवद्वीप प्रांत व्यापून टाकला; त्या प्रांतावर आतां यवनांचा अंमल झाला. ज्या हिंदुसत्तारूपी सूर्याचा त्या दिवशीं अस्त झाला, त्याचा पुनः उदय झाला नाहीं. पण पुढें होणार नाहीं कशावरून ? उदय आणि अस्त हे दोन्ही सृष्टीचे स्वाभाविक नियम आहेत.

---

## प्रकरण सहावें.

# ' पिंजरा मोडला. '



जोंपर्यंत पशुपति घरीं होता, तोंपर्यंत त्यानें मनोरमेला केव्हांहि दृष्टिआड होऊं दिलें नव्हतें. तो यवनाच्या भेटीला निघाला, तेव्हां त्यानें वाड्याचीं सगळीं दारें बंद करून घराचें रक्षण करण्याचें काम शांतशीलाकडे सोंपविलें होतें.

पशुपति घरांतून बाहेर पडतांच मनोरमेनें तेथून पळून जाण्याची खटपट चालविली होती. वाड्याच्या प्रत्येक खोलींत जाऊन तिनें बारकाईनें निरीक्षण केलें; पण पळून जाण्यासारखी वाट तिला कोठेंहि दिसली नाहीं. फार उंच जागीं गवाक्षें होतीं; पण तेथें तिला चढून जातां आलें नसतें. शिवाय तीं इतकीं लहान होतीं कीं, त्यांतून मनुष्याचें शरीर जाऊं शकलें नसतें. तिसरी अडचण ही होती कीं, तेथून खालीं उडी मारण्याची सोय नव्हती. उडी मारल्यास हातपाय मोडण्याची भीति ! पण, मनोरमेचें धाडस अचाट होतें. तिनें एका गवाक्षांतून बाहेर पडण्याचा विचार केला !

पशुपति घरांतून बाहेर पडल्यावर लागलीच मनोरमा त्याच्या शय्यागृहांत गेली. आणि त्याच्या पलंगावर चढली, पलंगावरून गवाक्ष फारसें उंच नव्हतें. तिनें धडपड करून तें एकदांचें गांठलें, आणि त्यांतून प्रथम दोन्ही हात, नंतर डोकें, आणि मागून छातीपर्यंतचा शरीराचा भाग बाहेर काढला. तिच्या सुदैवानें

अंब्याच्या झाडाची एक फांदी त्या गवाक्षाजवळच आलेली होती, तिचा आधार धरून तिनें आपल्या शरीराचा बाकीचा भागहि तसाच बाहेर काढला, आणि फांदीला धरून ती खालीं लोंबकळली. तिच्या भारानें ती फांदीहि खालीं वाकली त्याबरोबर मनोरमेनें पटकन् उडी मारून इकडे तिकडे न पाहतां जनार्दनाच्या घराचा रस्ता सुधारला.

---

## प्रकरण सातवें.

# यवनांचें बंड.



त्या रात्रीं नवद्वीप नगरांत विजयोन्मत्त झालेल्या यवनसेनेनें विलक्षण धुमाकुळ घातला होता. घोडेस्वार, पायदळ खड्गधारी, तिरंदाज, बरकंदाज वगैरे लोकांनीं शहरांतले सगळे राजमार्ग व्यापून टाकिले होते. बिचारे नागरिक भयभीत होऊन घरांचीं दारें लावून आंत देवाच्या नांवांची जपमाळ घेऊन बसले होते.

यवनांनीं प्रथम जे हतभागी व निराश्रित लोक रस्त्यांत आढळले त्यांना ठार केलें आणि नंतर बंद असलेल्या घरांदारांवर ते हल्ला करूं लागले. कोठें त्यांनीं दारें फोडलीं; कोठें भोंवतालच्या भिंतीवरून उड्या मारून ते आंत गेले; आणि कोठें तर घरांतल्या माणसांना 'आम्ही तुमच्या केसाला धक्का लावणार नाहीं.' अशीं लबाडीचीं आश्वासनें देऊन त्यांनीं घरांत प्रवेश केला. घरांत घुसतांच, प्रथम असेल नसेल तें द्रव्य लुटावें, नंतर स्त्रीपुरुष म्हातारेकोतारे, व पोरेंबाळें, या सर्वांचा शिरच्छेद करावा, अशा पद्धतशीर रीतीनें त्यांनीं आपलें राक्षसी कृत्य चालविलें होतें. तरुण स्त्रियांच्या संबंधानें मात्र निराळा नियम होता.

कुटुंबवत्सल माणसांचीं घरें रक्तपातानें लाल दिसूं लागलीं. राजमार्गांत रक्ताचा सडा पडला. रक्तानें यवन सैनिकांचे कपडे चित्रित झाले. लुटीच्या द्रव्याच्या भारानें घोड्यांच्या आणि माणसांच्या कंबरा दुखूं लागल्या. भाल्यांनीं छिन्नविछिन्न केलेलीं माणसांचीं मुंडकीं भयंकर दिसूं लागलीं. ब्राह्मणांच्या गळ्यांतील यज्ञोपवीतें घोड्यांचे गळे अलंकृत करूं लागलीं. राजाच्या सिंहासनावर शालिग्रामाच्या शिळा यवनांच्या पदघातामुळें खिळखिळया झाल्या.

सैन्यांतल्या लोकांच्या आरोळ्यांनीं घोड्यांच्या खिंखाळण्यानें, हत्तींच्या ओरडण्यानें, यवनांच्या जयजयकारानें आणि दुःखितांच्या आर्त नादानें, सगळें आकाश भरून गेलें. आर्यांचा शोक, पुत्रांचें रोदन, वृद्धांचा करुणास्पद विलाप, तरुणींचा हृदयाला विदीर्ण करणारा आकांत; असा मनाला अतिशय उद्विग्नता आणणारा एकंदर देखावा त्या ठिकाणीं होता.

ज्या वीर पुरुषांना माधवाचार्यांनीं येवढी खटपट करून यवनांशीं लढण्यासाठीं आणिलें होते, ते या वेळीं कोठें होते? यवनांनीं जो हा भयंकर प्रळय मांडला होता, त्या प्रळयाच्या वेळीं हेमचंद्र कोठें कसा दिसला नाहीं? बाकी तो एकटा लढण्याला सिद्ध होऊन काय उपयोग होणार होता!

हेमचंद्र या वेळीं आपल्या शय्यागृहांत पलंगावर निजला होता. शहरचा कोलाहल त्याला ऐकूं गेला; तेव्हां त्यानें दिग्विजयाला विचारलें, 'दिग्विजय! कसलीरे गडबड आहे?'

दिग्विजय म्हणाला, 'यवनांची फौज शहरावर चाल करून आली आहे.'

ही बातमी ऐकतांच हेमचंद्र दचकला. यवनांनीं राजवाड्यावर हल्ला करून तो हस्तगत केल्याचें व राजा पळून गेल्याचें वर्तमान त्याला अद्याप कळलें नव्हतें. दिग्विजयानें तें त्याला सांगितलें, तेव्हां हेमचंद्र म्हणाला, 'शहरचे लोक काय करीत आहेत?'

**दिग्विजयः**—ज्यांना शक्य होतें, ते पळून गेले व अजूनहि पळत आहेत. ज्यांना पळतां येत नाहीं, ते बिचारे प्राणांस मुकत आहेत.

**हेमचंद्रः**—आणि राजाची फौज काय करीत आहे?

**दिग्विजयः**—तिनें कोणासाठीं लढावयाचें? राजा तर पळून गेला! फौजेंतले लोकहि सोयीसोयीनें आपला रस्ता सुधारत आहेत.

**हेमचंद्रः**—माझा घोडा लवकर तयार कर पाहूं!

दिग्विजयानें विचारलें, "कोठें जाणार?"

**हेमचंद्रः**—शहरांत.

**दिग्वि०ः**—एकटेच!

हेमचंद्रानें भिंवया चढविल्या. तें पाहून दिग्विजय भ्याला आणि घोडा तयार करण्यासाठीं निघून गेला.

नतर, लढाईसाठीं तयार केलेल्या सुंदर अश्वावर आरोहण करून व हातांत भाला घेऊन त्या अफाट यवनसेनारूपी समुद्रांत नदीप्रवाहाच्या एका जलबिंदूप्रमाणें हेमचंद्र जाऊन पडला.

हेमचंद्राला लवकरच दिसून आलें कीं, यवनलोक युद्ध करीत नसून निवळ लूटमार करीत आहेत. त्यांच्यांशीं युद्ध करण्यास कोणी समोर उभेच राहीनात. अर्थात, यवनहि युद्धाविषयीं मोठेसे उत्सुक नव्हते. त्या लूटमारीच्या गर्दीत कित्येक यवनहि यवनांकडून मारले गेले ! अशा गर्दीत हेमचंद्र आला आहे, त्याला ठार करावें, इकडे यवनांचें लक्ष न गेल्यास काय नवल ? एखाद दुसऱ्या यवनाच्या लक्ष्यांत ही गोष्ट आलीच, व त्यानें हेमचंद्रावर हात टाकलाच, तर हेमचंद्रहि त्याला तेथल्या तेथें ठार करून मोकळा होई.

हा प्रकार पाहून हेमचंद्र खिन्न झाला. लढण्याच्या इच्छेनें तो आला होता; पण तो येण्यापूर्वीच यवन विजयी झाले होते; आणि आतां ते लूट मिळविण्यांत दंग होते. त्याच्याशीं रीतसर लढण्यास कोणी पुढें होईना. तेव्हां तो आपल्या मनाशीं म्हणूं लागला, ' झाडाचें एकएक पान वेगळें वेगळें काढून संबंध अरण्य कधीं तरी नष्ट करतां येईल काय ? एकएकट्या यवनाला मारून काय लाभ होणार आहे ? ते जर युद्ध करीत नाहींत, तर त्यांना मारण्यांत तरी काय पुरुषार्थ आहे ? त्यापेक्षां नागरिकांचें रक्षण करण्यांत साह्य करावें, हें बरें. '

हेमचंद्र तसें करूं लागला. पण त्यांतहि त्याला विशेषसें यश मिळालें नाहीं. कारण, हेमचंद्र एकदोघां यवनांशीं मारामारी करीत असतां तिकडे दुसऱ्या दहापांच यवनांनीं येऊन घर लुटावें; हें तो उघड्या डोळ्यानें पाहूं लागला. अशा रीतीनें हेमचंद्र यवनपीडित लोकांवर यथाशक्ति उपकार करण्याच्या कामांत कांहीं काळ गुंतलेला राहिला. नंतर रस्त्यानें जातां जातां एका घरांत कोणी करुणस्वरानें विलाप करीत आहे, असें त्यानें पाहिलें. तेव्हां यवनांच्या जुलुमाला कोणी बळी पडलें असावें, अशी कल्पना करून हेमचंद्र त्या घरांत गेला. पाहतो तों घरांत कोणी यवन नव्हते. त्यांच्या दुष्ट कृत्यांची चिन्हें मात्र जेथें तेथें दृष्टीस पडत होतीं. घरांत पैसा अडका मुळींच राहिला नव्हता. वस्तूंची मोडतोड खूप झालेली होती; आणि एक ब्राह्मण सपाटून मार खाल्लयामुळें विव्हळत जमिनीवर पडला होता. त्याला इतका मार बसला होता कीं, त्यामुळें तो बिचारा आसन्नमरण झाला होता. हेमचंद्राला पाहून त्याला वाटलें कीं, हाहि कोणी यवनच आहे. म्हणून तो त्याला म्हणाला, ' या—

मारा—मारून टाका—माझें शीर तोडून त्या राक्षसीला नेऊन द्या. अयाई! देवादेवा! प्राण जावो कीं रे!—पाणी! पाणी! मला कोणी पाणी देईल का?"

हेमचंद्र म्हणाला, ' घरांत कोठें पाणी आहे काय?"

ब्राह्मण म्हणाला, "ठाऊक नाहीं. बहुधा नसेल. पाणी—पाणी–राक्षसी!—त्या राक्षशीनें माझा प्राण घेतला."

हेमचंद्र घरांत पाणी शोधूं लागला. तेव्हां एका कळशींत थोडेंसें पाणी त्याला आढळलें; पण भांडें कोठें दिसेना. शेवटीं एक द्रोण करून त्या द्रोणांत पाणी घालून तें त्यानें ब्राह्मणाला दिलें; पण ब्राह्मण पाणी पिईना. तो म्हणाला, "नको नको. प्राण गेल्यानें यवनांच्या हातचें पाणी पिणार नाहीं."

हेमचंद्र म्हणाला, "बाबा! मी यवन नाहीं, हिंदु आहें. मग तर पाणी पिण्याल I कांहीं हरकत नाहीं ना?"

ब्राह्मण पाणी प्याला. त्याला अंमळ हुषारी वाटल्यावर हेमचंद्रानें विचारलें, 'बाबा! तुमचें आणखी कांहीं काम करण्यासारखें आहे काय?'

**ब्राह्मणः**—आणखी कोणतें काम? मी मरण्याच्या पंथाला लागलेला! माझें काय काम असणार?

**हेमचंद्रः**—तुमचें नात्यागोत्याचें कोणी आहे काय? असल्यास सांगा. म्हणजे मी त्यांना बोलावून आणीन.

**ब्राह्मणः**—कोण आहे? तसे पुष्कळ आहेत! त्यांतलीच ती एक राक्षसी आहे. तिला—त्या राक्षसीला—सांगा—सांगा—कीं, मा—माझ्या—अपरा—अपराधाचें प्रायश्चित्त—मला—मिळालें.

**हेमचंद्रः**—कोण ती? कोणाला सांगू?

**ब्राह्मणः**—कोण म्हणून काय विचारतां? ती राक्षसी—पापी—चांडाळीण! मृणालिनी!

ब्राह्मण आतां अधिकाधिकच ओरडूं लागला. मृणालिनीचें नांव ऐकतांच हेमचंद्र दचकला आणि त्यानें विचारलें, "मृणालिनी तुमची कोण?"

**ब्राह्मणः**—माझी कोण? यम!

**हेमचंद्रः**—तिनें तुमचें असें काय केलें?

**ब्राह्मणः**—तिनें काय केलें? कांहीं नाहीं! मीच उलटा तिच्या दुर्दशेला कारण झालों. त्याचेंच प्रायश्चित्त भोगतों आहें.

**हेम०**—तुम्हीं तरी तिचें काय केलें ?

**ब्राह्मणः**—माझ्यानें आतां बोलवत नाहीं. तोंडाला कोरड पडली आहे. थोडें पाणी द्या.

हेमचंद्रानें पुनः त्याला पाणी दिलें. त्यानें त्याला थोडीशी हुषारी वाटल्यावर हेमचंद्रानें विचारलें, "तुमचें नांव काय ?"

**ब्राह्मणः**—व्योमकेश.

हेमचंद्राच्या डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या पडूं लागल्या आणि तो दांत-ओठ चावूं लागला. त्याच्या हाताच्या मुठी वळूं लागल्या. तथापि, मनाचा निग्रह करून त्यानें विचारलें, "तुमचें राहणें कोठें आहे ?"

**ब्राह्मणः**—गौडदेशांत. मृणालिनी आमच्याच घरीं होती

**हेमचंद्रः**—बरें मग ?

**ब्राह्मणः**—मग काय ? तिच्यामुळें तर माझी अशी दशा झाली ! ती महापापी-अतिनिर्दय आहे. ती माझ्याकडे ढुंकूनसुद्धां पाहात नसे. तिच्यावर रागावून मी वडिलांच्या जवळ तिची खोटीच नालस्ती केली. तिच्या नांवाला उगाच कलंक लाविला ! त्यावरून वडिलांनीं तिला घरांतून हांकून लाविलें. राक्षसी ! राक्षसी ! आम्हांला सोडून गेली.

**हेम०**—अहो ! तुम्ही तिच्या नांवाला निष्कारण कलंक लावला म्हणतां, आणि तिलाच उलट्या शिव्या देतां हें काय ?

**ब्राह्मणः**—कां नाहीं देणार ? ती माझ्याकडे नुसती पाहीनासुद्धां. मी मात्र तिला आपले प्राण अर्पण करण्यास तयार होतों. ती निघून गेली, तेव्हांपासून मीं घर सोडलें, देशत्याग केला व वण वण करीत हिंडलों; पण कोठेंहि तिचा शोध म्हणून लागला नाहीं. ती भिकारडी पोर—गिरिजाया—येथें नवद्वीपाला आल्याचें कळलें, म्हणून धडपडत येथें आलों. येथें तर तिचा शोध लागला नाहींच, पण फुकट यवनांच्या हातून मात्र मारला गेलों ! माझ्या पापाबद्दलचें प्रायश्चित्त मला मिळालें.

यापुढें व्योमकेशाच्या तोंडून अधिक कांहीं शब्द निघाले नाहींत. येवढयाच श्रमानें तो मरणोन्मुख होऊन पडला. लवकरच त्याची प्राणज्योति निघून गेली. ती निघून गेल्यावर त्याचें तोंड वांकडें होऊन तें भेसुर दिसूं लागलें.

यानंतर हेमचंद्र तेथें उभा राहिला नाहीं. तो तेथून जो निघाला, तो मध्यें यवनांशीं कांहीं भानगड न करतां तडक घराकडे चालता झाला.

---

## प्रकरण आठवें.

# मृणालिनीचें सुख.



ज्या ठिकाणीं तळयाच्या पायरीवर मृणालिनीला सोडून हेमचंद्र निघून आला होता, त्याच ठिकाणीं ती अद्याप पडून होती. तिला जाण्यासारखें पृथ्वीवर ठिकाण नव्हतें. सर्व ठिकाणें तिला सारखींच पारखीं होतीं. रात्र संपून प्रभात झाली. गिरिजायेनें नानाप्रकारें तिला समजाविण्याचा यत्न केला; पण मृणालिनी कांहीं न बोलतां खालीं मान घालून तेथेंच बसून राहिली होती. खाण्यापिण्याची वेळ झाली, तेव्हां गिरिजायेनें तिला स्नान घातलें. स्नान करून मृणालिनी तशीच ओल्या वस्त्रानें तेथें बसून राहिली. गिरिजाया स्वतः भुकेली झाली होती; पण किती म्हटलें तरी मृणालिनी जागची हलेना! गिरिजायेच्यानें मृणालिनीला वारंवार म्हणवेना. शेवटीं निरुपाय होऊन गिरिजाया उठली आणि जवळच्या रानांतून कांहीं फळें आणून तीं तिनें मृणालिनीपुढें ठेविलीं. मृणालिनीनें त्यांना नुसता स्पर्शमात्र केला. तोच तिचा प्रसाद समजून गिरिजायेनें चार दोन फळें खाऊन क्षुधेची शांति केली; पण मृणालिनीला सोडून ती दूर गेली नाहीं.

अशारीतीनें क्रमाक्रमानें पूर्वेकडचा सूर्य मध्याह्नीं डोकीवर आला आणि तेथून कांहीं वेळानें जात जात पश्चिमेकडे मावळला. संध्याकाळ झाली. अजूनहि मृणालिनी घरीं परत जाण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. तेव्हां गिरिजाया मोठ्या विचारांत पडली. आदल्या रात्रीं जागरण झालें होतेंच. आजच्या रात्रींहि तें होणार, असें दिसत होतें. ती कांहीं बोलली नाहीं. तिनें झाडाचीं हिरवीं पानें गोळा करून तिची एक शय्या रचिली. तें पाहून मृणालिनी तिचा उद्देश समजली; आणि म्हणाली, "गिरिजाये! तूं घरीं जाऊन नीज."

मृणालिनी एकदांची बोलली, येवढयानेंच गिरिजायेला आनंद झाला. ती म्हणाली, "आपण दोघी बरोबरच जाऊं."

**मृणालिनीः**—मी येईन, तूं जा.

**गिरिजायाः**—नाहीं, तुम्ही येईपर्यंत मी येथेंच आपली बसून राहीन. माझ्या-सारख्या भिकारणीनें प्रहर दोनप्रहर या पाचोळ्यावर अंग टाकलें म्हणून काय बिघडणार आहे? पण एक गोष्ट धाडस करून विचारत्यें—राजपुत्राशीं जन्माचा संबंध सुटल्यावर आतां थंडीच्या कडक्यांत येथें तिष्ठण्याचे कष्ट कां घ्यावेत?

**मृणा०**—गिरिजाये ! हेमचंद्राशीं असलेला माझा संबंध या जन्मीं तरी खास तुटणार नाहीं. काल मी त्यांची दासी होत्यें, आजहि मी त्यांचीच दासी आहें.

हें ऐकून गिरिजायेला राग आला. ती उठून बसली, आणि म्हणाली, "काय बाईसाहेब ! अजूनहि तुम्ही आपणाला त्या अविचाऱ्याची दासी म्हणवितां आहां ना ! तुम्ही असें म्हणून घ्याल, तर ही मी चाललें ! मला आतां येथें राहण्याचें कारण नाहीं.

**मृणालिनीः**—गिरिजाये ! हेमचंद्रांनीं तुला छळलें असेल, तर तूं दुसरीकडे पाहिजे तर त्यांची निंदा कर. त्यांनीं मला कोणत्याहि प्रकारें त्रास दिला नाहीं; मग मीं त्यांची निंदा कशी ऐकून घ्यावी ? ते राजपुत्र आहेत—माझे स्वामी आहेत—त्यांच्याविषयीं असें भलतेंसलतें बोलूं नकोस !

या भाषणानें तर गिरिजायेचा राग अधिकच भडकला. तिनें मोठ्या परिश्रमानें रचलेली पर्णशय्या अस्ताव्यस्त करून टाकिली; आणि म्हटलें, " भलतेंसलतें कां बोलूं नये ? एक वेळां तर काय, पण—( बोलतां बोलतां ती हातानें त्या शय्येंतलीं पानें रागारागानें पाण्यांत फेंकून देऊं लागली ) दहा वेळां म्हणेन ! ( पुनः पानें फेंकून ) शंभर वेळां म्हणेन ( पुनः पानें फेंकून ) हजार वेळां म्हणेन ! "

असें करतां करतां सगळीं पानें पाण्यांत जाऊन पडलीं. गिरिजाया म्हणाली, " मला काय त्यांची भीति आली आहे ? मीं त्यांचा असा काय गुन्हा केला होता कीं, त्यांनीं माझा तिरस्कार करावा ? "

**मृणालिनीः**—ती माझी चूक आहे. मला सगळ्या गोष्टी नीट जुळवून सांगतां आल्या नाहींत. मी त्यांच्याशीं कांहींच्या बाहींच बोललें !

**गिरिजायाः**—बाईसाहेब ! पदरानें कपाळ पुसून बघा एकदां !

मृणालिनीनें त्याप्रमाणें केलें.

**गिरिजायाः**—पाहिलेंत ?

**मृणालिनीः**—हो, लागलें आहे.

**गिरिजायाः**—कसें लागलें ?

**मृणालिनीः**—तें नाहीं बाई ध्यानांत !

**गिरिजायाः**—तुम्ही हेमचंद्रांच्या अंगावर डोकें टेकलें होतें—नंतर ते तुम्हांला टाकून चालते झाले; तेव्हां तुमचें डोकें दगडावर आपटून खोक पडली. आतां समजलें ?

मृणालिनीनें क्षणभर आठवण करून पाहिलें; परंतु कांहीं स्मरेना. ती म्हणाली, "कांहीं नाहीं बाई आठवत! मला वाटतें मीच आपली पडली असेन!"

हें तिचें उत्तर ऐकून गिरिजाया चकित होऊन म्हणाली, "बाईसाहेब! या जगांत तुमच्यासारखें सुखी कोणीं दिसत नाहीं."

**मृणा०**—मी सुखी! ती कशी?

**गिरि०**—आपणास राग येत नाहीं.

**मृणा०**—मी सुखी तर खरीच! पण तूं सांगत्येस त्या कारणामुळें नव्हे.

**गिरि०**—तर मग कशामुळें?

**मृणा०**—हेमचंद्रांची भेट झाल्यामुळें.

---

## प्रकरण नववें.

# स्वप्न

—०—

गिरिजाया म्हणाली, "घरीं चला." मृणालिनीनें विचारलें, "शहरांत गडबड कसली चालली आहे?" त्या वेळीं यवनसेनेची नगरांत धामधूम चालली होती.

ती धामधूम ऐकून त्या दोघींच्याहि मनांत भीति उत्पन्न झाली. गिरिजाया म्हणाली, "चला. आतांच आपण सावधगिरीनें गेलों तर जातां येईल." त्याप्रमाणें त्या निघाल्या; पण राजमार्गापाशीं येऊन पोंचतांच त्यांना आढळून आलें कीं, जाण्याची सोय नाहीं. तेव्हां परत येऊन त्या तळ्याच्या पायऱ्यांवर पुनः बसल्या. गिरिजाया म्हणाली, "येथेंहि ते मेले यवन आले तर?"

मृणालिनी कांहीं बोलली नाहीं. तेव्हां गिरिजायेनें स्वतःच्या प्रश्नाचें स्वतःच उत्तर दिलें. ती म्हणाली, "येथेंहि ते आलेच, तर शेजारच्या त्या झाडींत लपून राहूं; म्हणजे कोणाला दिसणार नाहीं."

मृणालिनी खिन्न मुद्रेनें म्हणाली, 'गिरिजाये! माझा सर्वस्वी घात होणार असें दिसतें.'

**गिरिजायाः**—तो कसा?

**मृणा०**—हा पहा! आतां एक घोडेस्वार गेला. हेच हेमचंद्र! गडे, शहरांत तर धामधूम चालली आहे! हेहि त्यांत जाऊन मिळाले, तर यांच्यावर कोणचें संकट ओढवेल त्याचा नेम कोणी सांगावा?"

गिरिजायेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तिला झोंपेनें अगदीं घेरलें होतें. थोड्या वेळानें मृणालिनीनें पाहिलें तों तिला झोंप लागली होती.

मृणालिनीला त्या दिवशीं उपास घडला होता आणि झोंपहि मिळाली नव्हती. त्यामुळें ती अगदीं गळाली होती. तशांत, आदल्या रात्रीं तिच्या मनाला सारख्या इंगळ्या लागलेल्या होत्या. मग झोंप कोठली ? पण झोंपेवांचून शरीर चालावें कसें ? अर्थात्च तिला आतां थोडीशी डुकली आली. तेवढ्यांतच तिला एक स्वप्नहि पडलें. स्वप्नांत तिला असें दिसलें कीं, हेमचंद्र एकटा शत्रूंशीं लढून विजयी झाला आहे, आणि आपण त्या विजयी वीराला पाहण्यासाठीं उत्सुकतेनें राजमार्गांत उभ्या आहों. त्या मार्गानें हेमचंद्राची मिरवणूक जात आहे. त्याच्या मागें पुढें किती हत्ती, कितीतरी घोडे, आणि कितीतरी पायदळ शिपाई चालले आहेत ! त्यांनीं आपणाला धक्का मारून रस्त्यांत पाडलें, आणि पायाखालीं तुडविलें. हें पाहून हेमचंद्र आपल्या उमद्या घोडीवरून खालीं उतरला, आणि त्यानें आपला हात धरून उठविलें. तेव्हां आपण त्याला म्हटलें, " प्रभु ! तुमच्यासाठीं आतांपर्यंत मीं फार हालअपेष्टा सोसल्या. आतां तरी या दासीचा त्याग करूं नका. " तेव्हां " यापुढें मी तुझा त्याग करणार नाहीं. " असें हेमचंद्रानें वचन दिलें. त्या शब्दानें तिची झोंप उडाली आणि जागी झाल्यावरसुद्धां तेच शब्द आपण ऐकत आहों, असें तिला वाटलें. तिनें डोळे उघडले आणि पाहते तों खरेंच ! हेमचंद्र समोरच उभा ! तो म्हणत होता, " एक वेळ मला क्षमा कर. आतां पुनः कधींहि मी तुझा त्याग करणार नाहीं. "

अभिमानशून्य व निर्लज्ज मृणालिनी पुनः त्याच्या गळयांत पडली आणि खांद्यावर मस्तक ठेवून बसली !

---

## प्रकरण दहावें.

# प्रेमाचे नाना प्रकार.



मृणालिनीच्या नेत्रांतून आनंदाश्रु सारखे वाहत होते. हेमचंद्र तिचा हात धरून तिला आपल्या वाड्याकडे घेऊन चालला होता. ज्यानें मृणालिनीची पूर्वी विटंबना केली होती. तिच्या मनाला टोंचतील असे शब्द उच्चारले होते आणि तिचा त्याग केला होता. तोच हेमचंद्र आतां आपण होऊन तिला मिठी मारतो,

हें पाहून गिरिजायेला फार आश्चर्य वाटलें ! पण मृणालिनी स्वतः कांहीं बोलली नाहीं आणि तिनेंहि हेमचंद्राला कांहीं विचारलें नाहीं. डोळ्याला पदर लावून ती एकसारखी अश्रु पुशीत होती. तिनें गिरिजायेला 'चल' इतकेंसुद्धां म्हटलें नाहीं. गिरिजाया आपण होऊनच कांहीं अंतरावर त्यांच्या मागोमाग चालली होती.

वाड्याभोंवतालच्या बागेंत बसून हेमचंद्र व मृणालिनी परस्परांपाशीं आपलें अंतःकरण खुलें करून बोलत होतीं. मृणालिनीविषयीं मनाला विरक्ति वाटण्यास काय काय कारणें झालीं व अखेर त्यांचें निरसन कसें झालें, तें सारें हेमचंद्रानें तिला समजावून सांगितलें. मृणालिनीनेंहि हृषीकेशाचें घर आपणास कां सोडावें लागलें व आपण नवद्वीपाला कसे आलों, तें सगळें सांगितलें. भूतकाळाविषयींच्या गोष्टी व भविष्यकाळांतील बेत परस्परांना कळवून त्या दोघांनीं आणाशपथाहि वाहिल्या. डोळ्यांतून अश्रु गाळले. परस्परांच्या तोंडाकडे पाहून मधुर हास्यहि केलें. "अहाहा ! आपलें केवढें भाग्य ! आपण केवढे सुखी प्राणी !" असा त्या हास्याचा अर्थ होता. इतक्यांत प्रभात झाली, असें सुचविणारे पक्ष्यांचे शब्द ऐकूं येऊं लागले. तेव्हां रात्र इतकी जलद कशी गेली, याचेंच त्यांनां नवल वाटलें. नगरांत मोठा कोलाहल चालला होता; पण त्यांच्या अंतःकरणांतल्या कोलाहलापुढें नगरांतला कोलाहल त्यांना ऐकूं येईनासा झाला.

त्या वाड्यांतल्या दुसऱ्या एका भागांत एक निराळेंच प्रकरण उपस्थित झालें होतें. धन्याच्या आज्ञेवरून दिग्विजय घराचें रक्षण करीत बसला होता. हेमचंद्र मृणालिनीला घेऊन घरीं आला, तेव्हां दिग्विजयानें तिला ओळखलें. तिची त्याला कशी माहिती झाली, तें पुढें कळून येईल.

मृणालिनीला पाहून दिग्विजयाला आश्चर्य वाटलें. पण विचारावयाचें कसें ? थोड्या वेळानें गिरिजायाहि आली. तिला पाहून दिग्विजय मनाशीं म्हणाला, "हं ! आतां समजलें ! या दोघीजणी गौडदेशाहून आम्हां दोघांना भेटण्यासाठीं आल्या आहेत. बाईसाहेब युवराजाला आणि ही दासी मला भेटावयाला आली, यांत शंका नाहीं."

असें मनाशीं म्हणत दिग्विजय ऐटीनें मिशांवर ताव देऊं लागला; पण पुनः त्याच्या मनांत आलें कीं ही दासी फार दुष्ट स्वभावाची आहे. माझ्याशीं एकदां सुद्धां गोड शब्द बोलली नाहीं, मग मला भेटण्यासाठीं उत्सुकतेनें कोठची येणार ? कांहींहि असो, आपण हिची थोडीशी परीक्षा तर पाहूं ! रात्र संपत आली आहे. घरधनीहि परत आले आहेत. आतां थोडेंसें अंग टाकण्यास हरकत

नाहीं. पाहूं तर खरी ही माझी प्यारी माझा शोध करते कीं नाहीं तें! असा विचार करून दिग्विजय एका बाजूला निजून राहिला. गिरिजायेनें हें पाहिलें होतें.

ती मनाशीं म्हणूं लागली, "मी बाईसाहेबांची दासी. बाईसाहेब या घरच्या धनीण झाल्याच आहेत अथवा लवकरच होतील. मग या घरचा सगळा कारभार माझ्याच हातीं येणार." असा विचार करून समोर एक केरसुणी पडली होती, ती तिनें हातीं घेतली आणि दिग्विजय निजला होता, त्या खोलींत गेली. दिग्विजय डोळे मिटून पडला होता; पण पावलाच्या चाहुलीवरून गिरिजाया आली, असें त्यानें ताडलें. तेव्हां त्याला मोठाच आनंद झाला. गिरिजायेचें आपल्यावर प्रेम आहे, तेव्हां आतां ती आपल्याशीं कसें बोलते तें ऐकण्यांत मौज आहे, असा विचार करून तो डोळे मिटून तसाच पडून राहिला. इतक्यांत एकाएकीं त्याच्या पाठीवर केरसुणीचे रट्टे पडूं लागले. गिरिजाया मोठ्यानें ओरडून म्हणाली, "किती मेला हा केर घरांत साचला आहे!—पण हें कोण? माणूस? चोर तर नाहीं? भल्या माणासा! राजाच्या घरांत चोरी करायला आलास?" इतकें बोलून पुन: तिनें केरसुणीचे तडाखे दिले.

"अग गिरिजाये! मी आहें! मी आहें!"

"मी! तुझ्यासाठींच तर हा केरसुणीचा बिछाना घालून देत आहें.!" असें म्हणून गिरिजाया ज्यास्तीच जोराजोरानें त्याची पाठ सडकूं लागली. "देवाची शपथ! गिरिजाये! मी दिग्विजय आहें."

"चोरी करूनच्या करून पुन: वर दिग्विजयाचें नांव घेतोस काय?"

केरसुणीचे तडाखे चाललेच होते.

दिग्विजयानें पुन: काकुळतीनें म्हटलें, "गिरिजाये! मला विसरलीस का!"

**गिरिजाया:**—कोणरे तूं? माझ्यासारख्या बायकोमाणसाशीं बोलायला तुला लाज नाहीं वाटत?

दिग्विजयानें पाहिलें कीं, आतां य:पलायन केल्यावांचून सुटका होणार नाहीं! म्हणून, तो अंग चोरून तेथून पळाला. गिरिजायाहि हातांत केरसुणी घेऊन त्याच्या पाठोपाठ धांवली.

---

## प्रकरण अकरावें.

# पूर्वींची ओळख.



पहाट झाल्यावर हेमचंद्र माधवाचार्यांच्या शोधासाठीं निघाला. गिरिजाया मृणालिनीजवळ येऊन बसली.

गिरिजाया मृणालिनीच्या दुःखांत वांटेकरीण होती. विपत्तीच्या काळांत तिनें मृणालिनीच्या दुःखाच्या गोष्टी सहृदयपणानें ऐकिल्या होत्या. मग आज सुखाच्या काळीं मृणालिनीच्या सुखाची वांटेकरीण तिनें कां होऊं नये? आणि तितक्याच सहृदयतेनें सुखाच्या गोष्टी तिनें कां ऐकूं नयेत? गिरिजाया भिकारी होती. मृणालिनी ही थोरा मोठ्यांची मुलगी. दोघींच्या सामाजिक दर्ज्यांत जमीन अस्मानाचें अंतर होतें; पण दुःखाच्या दिवसांत गिरिजाया हीच एकटी मृणालिनीची मैत्रीण होती. त्या काळीं भिकारीण आणि राजकन्या यांच्यांतला भेद नाहींसा झाला होता. त्याच हक्काच्या जोरावर, मृणालिनीच्या अंतःकरणांतल्या सुखावर गिरिजाया आपला हक्क सांगत होती.

त्यांचें जें संभाषण झालें, तें ऐकून गिरिजायेला जितकें आश्चर्य वाटलें, तितकाच संतोषहि झाला. ती म्हणाली, "असें होतें तर इतके दिवस ही गोष्ट लपवून कां ठेवली ?"

**मृणालिनीः**—तसें करण्यास राजपुत्राकडून हरकत होती. आतां त्यांनीं ती हरकत काढून घेतली आहे. म्हणून मी ती तुजपाशीं बोलल्यें.

**गिरि०ः**—बाईसाहेब! सगळी गोष्ट सांगा ना. ती ऐकून मनाला मोठें समाधान वाटेल.

तेव्हां मृणालिनीनें आपली इत्थंभूत हकीकत सांगण्यास सुरवात केली. ती म्हणालीः—

"माझे वडील एक मोठे सावकार होते. ते बौद्धधर्मी होते. अतिशय श्रीमंत असल्यामुळें मथुरेच्या राजाची त्यांच्यावर फार मर्जी असे. राजाची कन्याहि माझी मैत्रीण झाली होती. मी एके दिवशीं नावेंत राजकन्येसह बसून यमुनेच्या प्रवाहांत जलक्रीडा करण्यासाठीं गेल्यें होत्यें. अशा वेळीं एकाएकीं जोराची पर्जन्यवृष्टि होऊन आमची नाव नदींत बुडाली. राजकन्येला व दुसऱ्या कांहीं माणसांना नावा-

ब्यांनीं शिताफीनें वांचविलें. मी मात्र प्रवाहाबरोबर वाहत गेल्यें. दैवयोग असा कीं, त्याच वेळीं एक राजपुत्र नौकेंत बसून फिरत होता. माझी व त्याची त्यावेळीं ओळख नव्हती. तोच राजपुत्र हेमचंद्र हे होत. त्यांनीं वादळाच्या भीतीनें नाव नदीच्या तीराकडे चालविली होती; पण इतक्यांत पाण्यांत माझे केस पाहून त्यांनीं प्रवाहांत उडी घातली आणि मला बाहेर काढलें. माझी त्या वेळीं अगदीं बेशुद्ध अवस्था होती. मी कोण, हेंहि त्यांना ठाऊक नव्हतें. ते त्यावेळीं तीर्थ दर्शनासाठीं मथुरेला आले होते. त्यांनीं मला आपल्या नौकेंत घेऊन घरीं नेलें, आणि माझी उत्तम प्रकारें शुश्रूषा केली. त्यामुळें मी लवकरच शुद्धीवर आलें. नंतर मी कोण, कोठली, याची त्यांनीं चौकशी केली, आणि मला माझ्या वडिलांकडे पाठविण्याची तजवीज केली; पण तीन दिवस पावसाची एकसारखी झड लागली होती. पावसाला मुळीं खळच नव्हता! घराच्या बाहेर तोंड काढण्याची सोय नव्हती. अर्थात्, तीन दिवस मला त्यांच्या येथें राहावें लागलें. येवढया वेळांत त्यांची व माझी ओळख झाली. ही ओळख म्हणजे नुसती कुलाशीलाचीच नव्हती. परस्परांच्या अंतःकरणांची ओळख झाली. तेव्हां माझें वय केवळ पंधरा वर्षांचें होतें. पण येवढया अल्पवयांतहि मी त्यांची दासी झालें. मला त्यावेळीं कांहीं कळत नव्हतें. मी हेमचंद्राला देवासारखी समजूं लागल्यें. त्यांच्या तोंडून निघेल तें ब्रह्मवाक्य, असें मी समजूं लागलें. त्यांनीं म्हटलें, "माझ्याशीं विवाह कर." तेव्हां तसें करणें हें माझें अवश्य कर्तव्य आहे, असें मला वाटूं लागलें. चौथ्या दिवशीं दुर्योग संपून सुमुहूर्त लागला. मीं उपास केला. दिग्विजयानें विवाहाची तयारी केली. राजपुत्राबरोबर तीर्थपर्यटणांत कुलपुरोहित होतेच. त्यांनीं यथाविधी आमचा विवाह लावून दिला."

"अरुंधती नांवाची एक म्हातारी माझ्या आईकडच्या नात्याची मावशीसारखी होती. तिनें माझ्या लहानपणीं माझें लालनपालन केलें होतें. तिचें माझ्यावर फार प्रेम असे. ती त्या गांवांत राहत असे हें मला ठाऊक होतें. मी तिचा पत्ता सांगितल्यावरून दिग्विजयानें तिचा शोध लावून तिला आणिलें. ती समजत होती कीं, मी यमुनेंत बुडून मेलें. मी जिवंत आहें, हें पाहून तिला इतका आनंद झाला कीं, माझ्या प्रत्येक गोष्टीस तिचा रुकार मिळत गेला. तिनें माझें कन्यादान केलें. विवाहानंतर मी तिच्याबरोबर आपल्या बापाच्या घरीं गेल्यें. तेथें सगळ्या गोष्टी जशा खरोखर घडल्या होत्या, तशा मीं

सांगितल्या. फक्त विवाहाची गोष्ट मात्र लपवून ठेविली. मी, हेमचंद्र, दिग्विजय, कुलपुरोहित व अरुंधती मावशी; यांच्याशिवाय दुसऱ्या कोणालाहि ही गोष्ट कळली नव्हती. आणखी आतां तुला ही गोष्ट कळली आहे."

**गिरिजाया:**—माधवाचार्यांना सुद्धां माहीत नाहीं?

**मृणालिनी:**—नाहीं. त्यांना कळती, तर सगळाच घात झाला असता. त्यांना कळली असती, म्हणजे त्यांनीं ती मगधराजाला सांगितली असती. माझे वडील बौद्धधर्मी, आणि मगधराजा म्हणजे बौद्धांचा कट्टा शत्रु!

**गिरि:**—बरें पण, तुम्हीं अजून कुमारी आहां हें ठाऊक असून तुमच्या वडिलांनीं तुमचा विवाह करण्याची कशी कांहीं तजवीज केली नाहीं?

**मृणालिनी:**—त्यांत वडिलांकडे दोष नाहीं. त्यांनीं आपणाकडून पुष्कळ खटपट केली; पण योग्य वरच मिळेना. कारण, बौद्धधर्माचा प्रायः लोपच झालेला आहे; आणि माझ्या वडिलांची तर इच्छा अशी होती कीं, मुलगी द्यायची, तर ती बौद्धधर्मी योग्य वरालाच द्यावयाची. असा एक वर मिळाला होता. लग्नाचा तिथिनिश्चयहि झाला होता. सगळी तयारीहि झाली होती; पण ऐनलग्नाच्या वेळीं मीं ताप आल्याचें सोंग केलें; त्यामुळें लग्नाचा मुहूर्त टळला. तेव्हां वरानें दुसऱ्या एका मुलीशीं लग्न केलें.

**गिरिजाया:**—तापाचें बळेंच सोंग केलेंत?

**मृणालिनी:**—हो. बळेंच केलें. तें असें:—आमच्या बागेंत एक विहीर आहे. तिचें पाणी इतकें विषारी आहे कीं, त्या पाण्यानें स्नान केलें, अथवा तें पाणी प्यालें, म्हणजे ताप ठेवलेलाच! मी रात्रीं गुपचुप त्या विहिरीवर जाऊन तिच्या पाण्यानें स्नान करून आल्यें होत्यें.

**गिरिजाया:**—पुनः दुसऱ्या एखाद्या वराशीं विवाहसंबंध ठरला असता तर तुम्ही असेंच केलें असतें काय?

**मृणालिनी:**—यांत काय संशय? तें साधलें नसतें तर मी हेमचंद्राकडे पळून गेल्यें असत्यें.

**गिरिजाया:**—मथुरेहून मगध देश म्हणजे सुमारें एक महिन्याच्या वाटेवर आहे. इतका लांबचा प्रवास कोणाच्या साहयानें केला असता?

**मृणालिनी:**—माझ्या भेटीसाठीं मथुरेंत हेमचंद्रानें रत्नदास शेट हें नांव धारण करून एक दुकान काढलें होतें. वर्षांतून एक वेळ ते तेथें व्यापाराच्या

निमित्तानें जाऊन रहात. हेमचंद्र तेथें नसत, तेव्हां दिग्विजय त्यांच्या नांवानें दुकानाचा कारभार चालवी. मी सांगेन तें काम त्यानें मुकाट्यानें करावें, अशी हेमचंद्राची त्याला आज्ञा होती. सारांश काय कीं मला कोणाचें साह्य नव्हतें असें नाहीं.

इतकी गोष्ट सांगणें झाल्यावर गिरिजाया म्हणाली, "बाईसाहेब ! माझ्या हातून एक मोठा अपराध घडला आहे, त्याची क्षमा असावी. त्याबद्दल आपण सांगाल तें प्रायश्चित्त करण्यास मी तयार आहें.

**मृणालिनीः**—काय असा मोठा अपराध तूं केला आहेस, तो तर कळूं दे !

**गिरिजायाः**—दिग्विजय तुमच्या इतका उपयोगीं पडणारा आहे, हें मला ठाऊक नव्हतें. मला वाटलें होतें कीं, तो आपला उगाच कोणीतरी आहे. म्हणून मी आज सकाळीं त्याला केरसुणीनें खूप बडविलें ! मीं हें बरें केलें नाहीं, असें माझें मन मला आतां खात आहे.

मृणालिनी हंसून म्हणाली, "मग ? आतां तूं कोणतें प्रायश्चित्त करणार ?"

**गिरिजायाः**—भिकाऱ्याच्या मुलीचें लग्न होतें काय ?

**मृणालिनीः**—( हंसून ) केलें म्हणजे होतें !

**गिरिजायाः**—तर मग मी दिग्विजयाशीं लग्न करीन. दुसरें काय प्रायश्चित्त करणार ?

मृणालिनी हंसून म्हणाली, "बरें आहे तर. तुला हळद लावण्याचा समारंभ आजच होऊंदे !"

---

## प्रकरण बारावें.

# सल्लामसलत.



हेमचंद्र माधवाचार्यांच्या राहाण्याच्या ठिकाणीं जाऊन पाहतो तों, आचार्य जप करण्यांत गुंतलेले होते. हेमचंद्रानें वंदन करून म्हटलें, "आमचे सगळे प्रयत्न फुकट गेले. आतां या दासाला आणखी कोणती आज्ञा आहे ? यवनांनीं गौडदेश पादाक्रांत केला. या भारतभूमीच्या अदृष्टांत यवनांची गुलामगिरी विधात्यानेंच लिहिली आहे, असें दिसतें. नाहींतर, कोणी शस्त्र उचलल्यावांचून यवनांना अनायासेंच गौड देश कसा जिंकितां आला असता ? माझ्या देहपातानें

एका दिवसासाठीं तरी या दरवडेखोर यवनांच्या हातून जन्मभूमीची सुटका होत असेल, तर मी या क्षणींच हा देह ठेवण्यास तयार आहें. त्याच हेतूनें मी रात्रीचा युद्ध करण्यासाठीं नगरांत एकटा पुढें गेलों होतों; पण पाहतों तों काय ? यवन हल्ला करीत आहेत, आणि दुसऱ्या पक्षाचे लोक पळ काढीत आहेत, असें दिसलें !

**माधवाचार्यः**—वत्सा ! दुःखित होऊं नकोस. दैवीं लिहिलेलें असेल तें कधीं चुकावयाचें नाहीं. यवनांचा पराभव होणार, असें भाकीत गणित करून मीं काढलेलें आहे. तेव्हां त्यांचा पराभव झालाच पाहिजे, ही पक्की खात्री तूं बाळग. यवनांनीं नवद्वीप हस्तगत केलें ही गोष्ट खरी ! पण नवद्वीप म्हणजे कांहीं गौड-राज्य नाहीं ! राजाधिराजानें सिंहासनाचा त्याग करून पलायन केलें; पण या राज्यांत पुष्कळ मांडलिक राजे आहेत. ते अद्यापि जिंकिले गेले नाहींत. त्या सर्वांनीं एक होऊन प्राणांपलीकडे यत्न केला, तर काय यवनांचा पराभव होणार नाहीं ?

**हेमचंद्रः**—तसा संभव फार थोडा दिसतो.

**माधवाचार्यः**—ज्योतिषशास्त्राचें गणित चुकावयाचें नाहीं. त्याचें फळ मिळालेंच पाहिजे. आतां माझ्या हातून एक चूक घडली असल्याचा संभव आहे. ती ही कीं, पूर्वदिशेस यवन पराभव पावतील, यावरून नवद्वीपांतच आपण विजयी होऊं, अशा आशेवर मी बसलों होतों; पण गौडराज्य थेट पूर्वदिशेला नाहीं. कामरूपदेश मात्र पूर्वेला आहे. तेव्हां आपली आशा तेथें फलद्रूप होण्याचा रंग मला दिसतो.

**हेमचंद्रः**—पण तूर्त तरी कामरूपाला जाण्याचें यवनांचें कांहीं लक्षण दिसत नाहीं.

**माधवाचार्यः**—अरे ! हे यवन क्षण मात्र सुद्धां स्थिर रहावयाचे नाहींत. गौड देशांत शांतता झाली, म्हणजे हे कामरूपाकडे वळतीलच.

**हेमचंद्रः**—तेंहि कबूल केलें आणि यवनांनीं कामरूपावर हल्ला केल्यावर तेथें त्यांचा पराभव होईल हेंहि घटकाभर गृहीत धरलें, तरी तेवढयावरून माझ्या वडिलांचें राज्य मला परत मिळण्याचा मार्ग कसा खुला होणार ?

**माधवाचार्यः**—अरे, या यवनांना आतांपर्यंत जेथें तेथें जयच मिळत गेल्यामुळें हे आजिंक्य आहेत, अशी लोकांची समजूत झालेली आहे, त्यामुळें सगळे लोक यवनांना वचकतात. त्यांना कोणी विरोधच करीत नाहींत ! त्यांचा

एकदां कोठें पराभव झाला कीं, अजिंक्यत्वाबद्दलचा त्यांचा लौकिक पार नाहींसा होईल ! मग भारतवर्षांतले राजे आपलीं शस्त्रास्त्रें घेऊन त्यांच्याशीं लढाई करण्याला पुढें सरसावतील, आणि इतके राजे एक झाल्यावर यवनांची सत्ता किती दिवस टिकणार आहे ?

**हेमचंद्रः**—गुरु महाराज ! आपण केवळ आशेचा आश्रय करीत आहां ! मींहि आतांपर्यंत तेंच केलें. आतां मीं पुढें काय करावें अशी आपली आज्ञा आहे ?

**माधवाचार्यः**—मी त्याचाच विचार करतों आहें. यापुढें या शहरांत तूं राहणें ठीक नाहीं. कारण, तुला मारण्याचा संकल्प यवनांनीं केलेला आहे. म्हणून मी तुला अशी आज्ञा करतों कीं, तूं आजच्या आज हें शहर सोडून जावें.

**हेमचंद्रः**—कोठें जाऊं ?

**माधवाचार्यः**—माझ्याबरोबर कामरूपाला चल.

हें ऐकून हेमचंद्र खिन्न होऊन खालीं मान घालून मृदुस्वरानें म्हणाला, "मृणालिनीला कोठें ठेवून मीं जावें ?"

विस्मित होऊन माधवाचार्य म्हणाले, "हें काय ? मी समजत होतों कीं, मृणालिनीची गोष्ट तूं आपल्या चित्तांतून अगदीं काढून टाकलीस !"

हेमचंद्र पूर्वीप्रमाणेंच मृदु स्वरानें म्हणाला, "तिचा त्याग मला कसा करतां येईल. ती माझी धर्मपत्नी आहे."

माधवाचार्य आश्चर्यचकित झाले, नंतर रागावले अणि म्हणाले, "मला हें कांहीं ठाऊक नव्हतें !"

तेव्हां हेमचंद्रानें मृणालिनीशीं झालेल्या आपल्या विवाहाचा वृत्तांत त्यांना सविस्तर सांगितला. तो ऐकून माधवाचार्य कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसले. नंतर ते म्हणाले, "दुराचारी स्त्रीचा त्याग शास्त्रविहितच आहे. तिच्या वर्तणुकीबद्दलची शंका कालच मीं तुला उघडपणें सांगितली होती ना ?"

तेव्हां हेमचंद्रानें व्योमकेशाची सगळी हकीकत त्यांना उघड करून सांगितली. ती ऐकून माधवाचार्य आनंद प्रदर्शित करून म्हणाले, "वत्सा ! फार आनंदाची गोष्ट आहे. तुझा आणि तुझ्या प्रिय, गुणवती भार्येचा वियोग करून मीं तुला फार कष्ट दिले ! आतां मी तुला आशीर्वाद देतों कीं, तुम्ही दोघें दीर्घायु होऊन चिरकाळ एकच धर्माचरण करा. ज्या अर्थी तूं आतां पत्नीसह येथें आहेस, त्या अर्थी माझ्याबरोबर कामरूपाला येण्याचा आग्रह मी करीत

नाहीं. मी पुढें जातों. तशी वेळ आलीच, तर तेथील राजाकडून तुझ्याकडे एक दूत पाठवीन. आतां तूं पत्नीला घेऊन मथुरेंत अथवा वाटेल तेथें अन्य ठिकाणीं राहा.''

इतकें संभाषण झाल्यावर हेमचंद्रानें आचार्यांचा निरोप मागितला, आणि माधवाचार्यांनीं त्याला आशीर्वाद देऊन आणि प्रेमपूर्वक त्याला छातीशीं धरून अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्याला निरोप दिला.

## प्रकरण तेरावें.

# महमंद अलीचें प्रायश्चित्त.



ज्या रात्रीं राजधानींत यवनसेना धुमाकुळ घालीत होती, त्याच रात्रीं पशुपति एकटा कारागृहांत बसून राहिला होता. पहाटच्या सुमारास सैन्याचा धुमाकुळ संपला तेव्हां महंमद अली त्याच्याकडे गेला आणि कांहीं गोड भाषण करूं लागला. तेव्हां पशुपति म्हणाला, ' यवना ! आतां गोड बोलणें नको आहे ! तुझ्या गोड बोलण्यावर विश्वास ठेवून बसल्यामुळेंच ही दशा मला प्राप्त झाली आहे. परधर्मी यवनाच्या शब्दावर विश्वास ठेवण्याचें फळ मला मिळालें. आतां याहून मृत्यु बरा असा विचार करून मीं कोणावरहि विश्वास ठेवण्याचें सोडून दिलें आहे. तुमच्या गोड भाषणाचा एक शब्द सुद्धां इतःपर मी ऐकणार नाहीं.''

**महंमदः**—मालकाचा हुकूम मला ऐकिला पाहिजे. त्याच्याच हुकुमावरून मी आलों आहें. तुम्हांला हा यवनाचा पोषाख घातला पाहिजे.

**पशुपतिः**—आतां तुम्ही खूप लक्षांत ठेवा कीं, मी या क्षणीं मरायला तयार झालों आहें. प्राण गेला तरी बेहत्तर, पण यवन धर्म मी स्वीकारणार नाहीं.

**महंमदः**—यवन धर्म घ्या असें तुम्हांला मी तूर्त म्हणत नाहीं. केवळ राजप्रतिनिधीच्या संतोषासाठीं तुम्ही हा यवनाचा पोशाख अंगावर घालावा इतकेंच माझें म्हणणें आहे.

**पशु०**—मी ब्राह्मण आहें. हा म्लेच्छाचा पोशाख मीं काय म्हणून घालायचा ?

**महंमदः**—तुम्ही राजी खुषीनें घालीत नसलां तर जबरदस्तीनें आम्ही तो तुमच्या अंगावर घालूं. 'नाहीं' म्हणण्यापासून तुम्हांला काय लाभ होणार आहे ? व्यर्थ विटंबना मात्र करून घ्याल.

यावर पशुपतीनें कांहीं उत्तर केलें नाहीं. महंमद अल्लीनें आपल्या हातानें त्याच्या अंगावर पोषाख चढविला, आणि म्हटलें, 'चला आतां माझ्याबरोबर.'

**पशुपतिः**—मला कोठें नेणार ?

**महंमदः**—तुम्ही कैदी आहां. नेईन तिकडे आलें पाहिजे. कोठें ? कशाला ? हें विचारण्याचें कारण नाहीं.

महंमदअल्ली त्याला वेशीपाशीं घेऊन गेला. पशुपतीवर पहारा करणारा शिपाईहि त्याच्याबरोबरच गेला.

वेशीपाशीं पहारेवाल्यांनीं चौकशी केल्यावरून महंमद अल्लीनें त्यांना कांहीं सांगितलें आणि कांहीं इषारा केला. तेव्हां त्यांनीं त्यांना जाऊं दिलें. वेशींतून आंत गेल्यावर एका वाटेनें ते थोडेसे दूर गेले. यवनांचे सैनिक शहरांत लूटमार करून आतां स्वस्थ विश्रांति घेत पडले होते. अर्थात् त्या वाटेवर कांहीं गडबड नव्हती. महंमदअल्ली म्हणाला, "धर्माधिकारी ! तुम्हीं मला व्यर्थ दोष दिलात. बख्त्यार खिलजीचा हा विचार मला बिलकुल ठाऊक नव्हता. तो ठाऊक असता तर, मी असल्या ठकाचें दूतत्व पतकरून तुमच्याकडे आलों नसतों. असो; झालें तें झालें ! माझ्या बोलण्यावर विश्वास ठेविल्यामुळें तुमची अशी दशा झाली, त्याबद्दल माझ्या शक्तीप्रमाणें मीं प्रायाश्चित्तहि भोगलें. आतां असें करा. गंगेच्या कांठीं नाव तयार आहे. तिच्यांत बसून तुम्ही हवे त्या ठिकाणीं निघून जा. मी येथूनच तुमचा निरोप घेतों."

हें ऐकून पशुपति आश्चर्यानें अगदीं कुंठित झाला. महंमदअल्ली पुनः म्हणाला, "तुम्ही आतां रात्रींच्यारात्रीं शहर सोडून गेलां नाहींत, तर सकाळीं यवनांनीं तुम्हांला पाहिल्यास मोठा अनर्थ होईल ! खिलजीच्या हुकमाच्या उलट मी वागलों आहें, या गोष्टीची साक्ष हा पाहारेवालाच देईल. याचा जीव वांचविण्यासाठीं यालासुद्धां कोठें तरी देशांतराला पाठवावयास पाहिजे आहे. तुम्हीच याला नावेंत नेत असलां, तर न्या."

इतकें बोलून महंमदअल्ली चालता झाला आणि पशुपतीहि आश्चर्य करीत करीत गंगेच्या तीराकडे निघाला.

---

## प्रकरण चौदावें.

# धातुमूर्तीचें विसर्जन.



महंमदअलीचा निरोप घेऊन पशुपति हळू हळू रस्ता आक्रमीत चालला होता. यवनांच्या कारागृहांतून सुटका झाल्यावरसुद्धां जलद पाऊल उचलण्याची प्रवृत्ति त्याच्याठायीं उत्पन्न झाली नाहीं. रस्त्यावर जो देखावा त्याच्या दृष्टीस पडला होता, त्यामुळें त्याला मरणप्राय दुःख झालें होतें. त्याला पावलांगणिक कोणातरी मृत नागरिकाचें प्रेत आपल्या पायाला लागल्यासारखा भास होई. पावलागणिक माणसाच्या रक्तमांसाच्या चिखलांतून आपण जात आहों असें वाटे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस मोठाले वाडे होते; पण ते सारे जनशून्य झाले होते. कित्येक तर आग लागून भस्मावशेष झाले होते. कोठें कोठें जळालेल्या घरांचे निखारे अजून धगधगत होते. कांहीं वाड्यांची मोडतोड झाली होती. दारें आहेत तर खिडक्या नाहींत, भिंती पडल्या आहेत, छपरें उध्वस्त झालीं आहेत, आणि प्रेतांच्या राशींच्या राशी सर्वत्र पडल्या आहेत व कोणी मरणांतिक वेदनांमुळें हृदयाला पाझर फोडणाऱ्या किंकाळ्या मारीत आहेत, असें पाहून तो मनांत म्हणाला, “आणि या सगळ्या अनर्थाला कारण मी ! मीं लोभाला वश होऊन राजधानीची स्मशानभूमि करून सोडली ! या घोर अपराधाबद्दल खरोखर मला देहांत शिक्षा योग्य आहे. महंमदअलीला कलंक लावून कारागृहांतून मी व्यर्थ पळून आलों ! आतां सरकारी अधिकारी मला धरोत, किंवा हवी ती शिक्षा देवोत, मी परत जाणार.” असा विचार करून त्यानें इष्ट देवतेचें स्मरण केलें. पण तिच्याजवळ मागणार काय ? मागण्यासारखें त्याला कांहीं दिसेना. म्हणून, तो वर आकाशाकडे पाहूं लागला. पण तेथेंहि नक्षत्रें, चंद्र, ग्रह वगैरेंनीं शोभायमान दिसणारी व आनंदानें प्रफुल्लित झालेली आकाशाची पवित्र शोभा त्याच्या डोळ्याला सहन होईना. तिनें त्याचे डोळे दिपून गेल्यासारखे झाले. तो क्षणभर डोळे मिटून उभा राहिला. इतक्यांत त्याच्या स्वभावाला अपरिचित अशा भयानें त्याचें अंतःकरण एकाएकीं व्याकुळ झालें. अकस्मात् प्राप्त झालेल्या त्या भयामुळें त्याच्यानें एक पाऊलहि उचलवेना. त्याचें अंग एकाएकीं लुलें पडल्यासारखें झालें. थोडा वेळ विश्रांति घ्यावी, म्हणून तो वाटेंतच एका ठिकाणीं बसला; पण पाहतो तों, ज्यावर तो बसला

होता, तें माणसाचें प्रेत होतें ! त्या माणसाच्या अंगांतून निघालेलें रक्त त्याच्या अंगाला व कपड्याला लागलें. ही गोष्ट त्याच्या ध्यानांत येतांच त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. तो तत्काळ उठला आणि क्षणभरहि न थांबतां एकदम वेगानें धावत सुटला. एकाएकीं त्याला आपल्या घराची आठवण झाली. यवनांनीं आपल्या वाड्याची काय दुर्दशा केली असेल ? त्या वाड्यांत फुलाप्रमाणें सुकुमार आणि जिवाच्या कलिजाप्रमाणें प्यार, अशा पुतळीला आपण लपवून ठेविलें होतें, तिची—मनोरमेची—काय दशा झाली असेल ? जिनें आपल्यावरच्या प्रेमामुळें, मी पापकर्मांपासून परावृत्त व्हावें म्हणून वारंवार प्रयत्नांची शिकस्त केली होती, तीच स्वतः आतां पापसागरांत बुडून तर गेली नसेल ना ? अथवा, यवनसेनेच्या प्रवाहांत ती कुसुमकलिका कोठच्या कोठें वाहूनहि गेली असेल ! कोणीं नेम सांगावा ? असे विचारतरंग या वेळीं त्याच्या मनांत एकामागून एक उठत होते.

या विचारांनीं वेडा होऊन तो आपल्या वाड्याकडे जाण्यास निघाला, आणि थोड्याच वेळांत तेथें जाऊन उभा राहिला. पाहतो तों, जशी त्याची कल्पना झाली होती, तसेंच घडून आलेलें त्याला दिसलें. पर्वतप्राय उत्तुंग आणि भव्य असा त्याचा वाडा ज्वालामुखीप्रमाणें जळत होता. तो देखावा दृष्टीस पडतांच पशुपतीची खात्री झाली कीं, यवनांनीं मनोरमेला व वाड्यांतील इतर स्त्रियांना मारून वाड्याला आग लावून दिली असली पाहिजे. मनोरमा पळून गेली, ही गोष्ट त्याला ठाऊक नव्हती.

त्याला खरी गोष्ट सांगण्यास जवळपास कोणी माणूसहि नव्हतें. त्यामुळें त्याच्या भ्रमिष्टचित्तानें जी गोष्ट एकदां घेतली ती घेतली. हलाहल विषाचा प्याला कांठोकांठ भरला—त्याच्या हृदयवीणेची शेवटची तार तुटली ! तो कांहीं वेळ डोळे फाडून आपल्या जळत्या वाड्याकडे पाहत उभा राहिला. मरणोन्मुख पतंगाप्रमाणें अल्पकालपर्यंत त्याचें विकल शरीर एकाच जागीं उभें होतें. अखेर अतिशय वेगानें त्यानें त्या आगींत उडी घातली !! त्याच्या बरोबरचा पहारेकरी आश्चर्यानें चकित होऊन पाहतच राहिला !

पशुपतीनें आगींत उडी घालून जळत्या दरवाजांतून वाड्यांत प्रवेश केला. त्याचे पाय भाजले, सगळें अंग भाजलें, तरी तो परत फिरला नाहीं. त्या अग्निकुंडांतून जात जात तो थेट आपल्या शय्यागृहांत गेला; पण तेथें त्याला कोणी दिसलें नाहीं. तेव्हां अंग जळत होतें, तरी त्याची पर्वा न करतां तो प्रत्येक

खोलींतून पाहत पाहत हिंडला. त्याच्या हृदयांत जी भयंकर ज्वाला पेटली होती, तिच्यापुढें या बाहेरच्या आगीमुळें शरीराला होणाऱ्या भयंकर यातनांचें भानच त्याला राहिलें नाहीं.

हां हां म्हणतां वाड्यांतल्या खोल्या एकीमागून एक पेटूं लागल्या. आगीच्या ज्वाळा वर आकाशापर्यंत जाऊन भयंकर ' रो, रो ' आवाज करूं लागल्या. आकाशांतून वीज जशी कडाडून खालीं पडावी, त्याप्रमाणें वाड्याचे वरचे मजले कडाड कडाड आवाज करीत कोसळून खालीं पडूं लागले. धुरानें आणि उडणाऱ्या लक्षावधि ठिणग्यांनीं सर्व आकाश व्यापून टाकलें. रानांत चोहोंकडून वणव्यानें वेष्टिलेल्या जंगली हत्तीप्रमाणें त्या वाड्यांत मनोरमा, तिच्या दासदासी, आणि इतर स्वजन यांचा शोध करीत पशुपति फिरत होता; पण कोणीहि आंत असल्याचें चिन्ह त्याला दिसलें नाहीं. तेव्हां तो निराश झाला. इतक्यांत देवीच्या मंदिराकडे त्याची दृष्टि गेली. पाहतो तों अष्टभुजादेवीचें मंदिर जळत होतें. पशुपतीनें पतंगाप्रमाणें त्या मंदिरांत उडी घातली. तों त्या आगींत देवीची सुवर्णमूर्ति जळाल्यावांचून शाबूत राहिल्याचा चमत्कार त्याच्या दृष्टीस पडला. ती मूर्ति पाहून वेड्या माणसाप्रमाणें तो म्हणाला, " आई जगदंबे ! इतःपर मी तुला ' जगदंबा' म्हणणार नाहीं, तुझी पूजा करणार नाहीं, किंवा तुला नमस्कारहि करणार नाहीं. माझ्या लहानपणापासून कायावाचामनेंकरून मी तुझी सेवा करीत आलों, सारा जन्म तुझें चिंतन केलें, आणि मातुःश्री, माझ्या एका दिवसांच्या पापकर्मामुळें मीं सर्वस्वाला मुकावें ना ? माझी सगळी पूजा व्यर्थ झाली म्हटली पाहिजे ! माझ्या मनांतली पापवासना तूं कां दूर केली नाहींस ?"

मंदिराला आग लागली, तेव्हां आगीच्या ज्वाळा अधिक भडकल्या. तरी पशुपति त्या मूर्तीला उद्देशून बोलतच होता. तो म्हणाला, "हें पहा ! धातुमूर्ति ! तूं आतां केवळ धातुमूर्ति आहेस ! देवी नाहींस. ऐक ही अग्नीची गर्जना ! जिकडे माझी प्राणप्रिया गेली, तिकडे आतां तुलाहि हा अग्नीच घेऊन जाईल; पण नाहीं ! अग्नीला तरी येवढें श्रेय मीं काय म्हणून द्यावें ? मीं ज्या हातानें तुझी स्थापना केली, त्याच हातानें मीं तुझें विसर्जन करीन. चल, इष्टदेवते ! गंगेत तुझें विसर्जन करतों."

इतकें बोलून ती मूर्ति उचलण्यासाठीं पशुपतीनें तिला आपले दोन्ही हात लाविले; तों इतक्यांत अग्नीनें मोठी गर्जना केली. पर्वतावर इंद्राच्या वज्राचा प्रहार होऊन जसा भयंकर नाद उत्पन्न व्हावा, तसा कडकडाट होऊन त्या मंदिरांतून

धुराचे व ठिणग्यांचे लोट आकाशमार्गानें जाऊं लागले. सगळा वाडा भस्माव-शेष झाला. त्यांत त्या देवीची मूर्ति अग्निमय झाली आणि पशुपतीलाहि जीवंत-पणींच अग्निकाष्ठें भक्षण करून देहविसर्जन करावा लागला ! !

---

## प्रकरण पंधरावें.

# अंतकाळ.



पशुपति हा अष्टभुजादेवीचा उपासक होता खरा; तथापि देवीच्या रोजच्या पूजेसाठीं दुर्गादास नांवाचा एक ब्राह्मण पुजारी त्यानें ठेविला होता. शहरांत गडबड झाली, त्याच्या दुसरे दिवशीं दुर्गादासाला बातमी कळली कीं, पशुपतीचा वाडा आग लागून खाक झाला. तेव्हां त्या ब्राह्मणानें मनांत संकल्प केला कीं, वाड्याच्या राखेंतून देवीची मूर्ति शोधून काढून ती आपल्या घरीं न्यावी आणि तिची पुनः स्थापना करावी. शहराची यथेच्छ लूट करून यवनांची तृप्ति झाल्यावर शहरवासी लोकांना इतःपर त्रास देऊं नका, असा बखत्यार खिलजीनें मनाईहुकूम सोडला होता. हा हुकूम सुटल्यावर बंगाली लोक रस्त्यांतून हिंडूं फिरूं लागले. हें पाहून दुर्गादास अष्टभुजा देवीची मूर्ति शोधून आणण्यासाठीं तिसरे प्रहरीं पशुपतीच्या वाड्याकडे जाण्यास निघाला. तेथें गेल्यावर त्याला आढळून आलें कीं, पुष्कळशा विटा इकडच्या तिकडे केल्याशिवाय देवीची मूर्ति बाहेर काढतां येणार नाहीं. तेव्हां त्यानें आपल्या मदतीला आपल्या मुलाला बोलावून घेतलें. विटा तापून त्यांचा रस झाला होता आणि त्यामुळें त्या परस्परांना चिकटल्या होत्या. त्या अद्याप रसरसलेल्या होत्या. पितापुत्रांनीं जवळच्या एका हौदांतून पाणी आणून तें थंड पाणी त्या विटांवर ओतलें आणि त्या थंड झाल्यावर मोठ्या कष्टानें विटांची रास इकडची तिकडे केली. तेव्हां देवीची मूर्ति त्यांना सांपडली; पण त्या मूर्तीच्या पायाखालीं पाहतांत तों काय ? एका मनुष्याचा मृतदेह ! तें प्रेत उचलून बारकाईनें पाहिल्यावर त्यांना दिसून आलें कीं, तें पशुपतीचें प्रेत होतें.

तें पाहून दुर्गादासाच्या तोंडून विस्मयाचे उद्गार निघाले. तो म्हणाला, "मालकाची अशी दशा कशामुळें झाली ? कशामुळें कां होईना; पण आपण त्याचें

अन्न खाल्लें आहे, तेव्हां आपलें कर्तव्य आपण केलें पाहिजे. गंगेच्या कांठीं हें प्रेत नेऊन त्याला अग्निसंस्कार दिला पाहिजे."

इतकें बोलून पितापुत्रांनीं तें प्रेत गंगातीरावर वाहून नेलें. मुलाला प्रेताच्या रक्षणार्थ ठेवून दुर्गादास लांकडें गोंवऱ्या वगैरे आणण्यासाठीं शहरांत गेला आणि चंदनकाष्ठें वगैरे सामान त्यानें आणिलें.

दुर्गादासानें मुलाच्या मदतीनें अग्निसंस्काराची पूर्वतयारी यथाशास्त्र केली, सुगंधिकाष्ठाची चिता रचिली आणि तिच्यावर तें प्रेत ठेवून तो त्याला अग्नि देऊं लागला.

इतक्यांत एकाएकीं त्या स्मशानांत हें कोण बरें आलें ? त्या ब्राह्मणांनीं पाहिलें; तेव्हां एक मळकीं वस्त्रें धारण केलेली, मोकळ्या सुटलेल्या रुक्ष केसाची, राखेनें अंग लडबडलेली, वेड्यासारखी दिसणारी, अशी कोणी स्त्री त्यांच्यापाशीं जाऊन उभी राहिली.

तिला पाहून दुर्गादास भ्याला. त्यानें विचारलें, "तूं ग कोण हडळ ?"

**स्त्रीः**—तुम्ही कोणाला अग्नि देत आहां ?

**दुर्गा०**—धर्माधिकारी पशुपति यांना.

**स्त्रीः**—ते कशानें मेले ?

**दुर्गादासः**—लोक सांगतात कीं यवनांनीं त्यांना पकडून कैद केलें होतें. त्या कैदेंतून रात्रीच्या वेळीं संधि साधून ते पळाले. आज त्यांचा वाडा जळाला असें ऐकून त्यांतून अष्टभुजादेवीची मूर्ति काढण्यासाठीं आम्ही गेलों, तों तेथें हें प्रेत आम्हांला दिसलें.

यावर स्त्रीनें कांहीं उत्तर केलें नाहीं. गंगेच्या तीरीं वाळवंटांत ती बसली. बराच वेळ स्तब्ध बसल्यावर तिनें विचारलें. "तुम्ही कोण ?" दुर्गादासानें उत्तर केलें, "आम्ही धर्माधिकाऱ्याचे आश्रित ब्राह्मण. पण तूं कोण ?"

तरुणीनें उत्तर केलें, "मी त्यांची पत्नी."

दुर्गादास म्हणाला, "त्यांचें कुटुंब तर आज पुष्कळ वर्षें कोठें नाहींसें झालें आहे, त्याचा पत्ता नाहीं ! तूं त्यांची पत्नी कशी ?"

तरुणी म्हणाली, "बेपत्ता झालेली त्यांची स्त्री जी केशवाची कन्या, तीच मी. इतके दिवस भयामुळें माझ्या वडिलांनीं मला लपवून ठेविलें होतें. ब्रह्मदेवानें माझ्या कपाळीं जें लिहून ठेविलें आहे, तें भोगण्यासाठीं मी आज बाहेर पडल्यें आणि येथें आल्यें."

हें तिचें बोलणें ऐकून पितापुत्र आश्चर्यचकित झाले ! ते कांहीं बोलत नाहींत असें पाहून ती विधवा म्हणाली, "आतां स्त्रीचें जें शेवटचें कर्तव्य तें मी करणार आहें. तुम्ही त्याच्या तजविजीला लागा."

दुर्गादास तिच्या मनांतला आशय समजला आणि मुलाकडे पाहून म्हणाला, "कसें कायरे बुवा !"

मुलानें कांहीं उत्तर केलें नाहीं. तेव्हां दुर्गादास त्या तरुणीला म्हणाला, "मातुश्री ! तुम्ही अल्पवयी आहां. अशा बिकट कामांत कशाला पडतां ?"

तरुणीनें भिवया चढवून म्हटलें, "तुम्ही ब्राह्मण असून अधर्माकडे माझें मन वळवितां ? वेळ घालवूं नका. तयारीला लागा."

तेव्हां ब्राह्मण सहगमनाचें साहित्य आणण्यासाठीं पुनः शहरांत गेला. तो जाऊं लागला, तेव्हां ती विधवा तरुणी दुर्गादासाला म्हणाली, "तुम्ही शहरांत जातांना ? तर शहराच्या बाहेरच राजाच्या बगीच्यांतल्या वाड्यांत हेमचंद्र नांवाचा परदेशचा एक राजपुत्र राहतो, त्याला जाऊन सांगा कीं, गंगेच्या कांठीं मनोरमा सती जात आहे. तिला एकवार भेटून जावें, येवढेंच तुमच्याजवळ तिचें शेवटचें मागणें आहे."

मनोरमा ही पशुपतीची पत्नी व त्याच्याबरोबर सहगमन करीत आहे, असें जेव्हां हेमचंद्राला ब्राह्मणाच्या तोंडून कळलें, तेव्हां त्याला त्याचा कांहीं अर्थच कळेना ! तो त्या ब्राह्मणाबरोबर गंगेच्या कांठीं गेला. तेथें मलिनवस्त्र परिधान केलेली, वेड्या माणसासारखी दिसणारी, तथापि स्थिर, गंभीर, व सुंदर मुख-कांति धारण केलेली, मनोरमेची मूर्ति पाहून हेमचंद्राच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तो म्हणाला, "मनोरमे ! माझी ताई ! कोण हा तुझ्यावरचा प्रसंग !"

चंद्राच्या प्रकाशानें उज्ज्वळ दिसणाऱ्या सरोवराप्रमाणें स्थिर, मृदु व गंभीर अशा स्वरानें मनोरमा म्हणाली, "भाऊ ! ज्या कार्यासाठीं हा प्राण ठेविला होता, त्याची आज परमावधी झाली. मी आतां माझ्या स्वामीबरोबर सहगमन करत्यें."

मनोरमेनें अगदीं थोडक्यांत दुसऱ्या कोणाला ऐकूं न जाईल अशा हलक्या स्वरानें हेमचंद्राच्या कानांत आपला पूर्ववृत्तांत सांगितला आणि म्हटलें, "माझ्या पतीनें अमर्याद धनसंचय करून ठेविला आहे. त्यावर आतां माझी सत्ता आहे. मी तें सारें धन तुम्हांला देत्यें. तुम्ही तें घ्या, नाहींतर तें चांडाळांच्या-यवनांच्या—हातांत पडेल. त्यांतला कांहीं थोडा पैसा खर्चून जनार्दनशर्मा ब्राह्मणाला

काशींत नेऊन ठेवा. त्यांच्याजवळ फारसा पैसा देऊं नका; नाहीं तर यवन तो लुटून घेतील. आम्हांला अग्निसंस्कार दिल्यावर तुम्ही माझ्या पतीच्या वाड्याकडे जा आणि द्रव्याचा शोध लावा. मी सांगतें त्या ठिकाणीं शोधा. तें ठिकाण माझ्यावांचून दुसऱ्या कोणालाहि माहीत नाहीं."

इतकें बोलून पैसा ठेविलेलें ठिकाण मनोरमेनें हेमचंद्राच्या कानांत सांगितलें. नंतर तिनें निरोप घेतला. जनार्दनभट्ट व त्याची स्त्री यांना दुरूनच नमस्कार करून "मी त्यांना फारफार विचारलें आहे" असें सांगण्याविषयीं हेमचंद्राला तिनें बजाविलें.

नंतर ब्राह्मणांनीं तिच्याकडून सतीचें व्रत यथाशास्त्र घेवविलें. तिला नवें वस्त्र नेसविलें, तिच्या गळयांत पुष्पांचे हार घातले आणि पशुपतीची चिता पेटवून तिला तीन प्रदक्षिणा घातल्यावर मनोरमेनें तिच्यावर आरोहण करून हसतमुद्रेनें त्या पेटलेल्या चितेंत—उन्हाळ्यांत सूर्याच्या उष्णतेनें जळून जाणाऱ्या पुष्पकलिकेप्रमाणें—अग्नीच्या दाहानें प्राणत्याग केला.

## उपसंहार.



मनोरमेनें सांगितल्याप्रमाणें हेमचंद्रानें द्रव्याचा शोध करून त्या द्रव्याचा कांहीं भाग जनार्दन भट्टाला काशीला पाठविण्यांत खर्च केला. राहिलेलें द्रव्य आपण घेणें योग्य होईल कीं नाहीं, याविषयीं त्यानें माधवाचार्याला विचारलें. आचार्य म्हणाले, " या द्रव्याच्या बळावर पशुपतीचा नाश करणाऱ्या बख्त्यार खिलजीचा सूड उगविण्याच्या उद्देशानें त्या द्रव्याचा स्वीकार करण्यास कांहीं हरकत नाहीं. दक्षिण समुद्राच्या किनाऱ्यावर पुष्कळ प्रदेश ओसाड पडला आहे. त्या ठिकाणीं वसाहत करून राज्य स्थापावें आणि यवनांची खोडकी जिरवील अशी सैन्याची तयारी करून पशुपतीच्या शत्रूंचा निःपात करावा. "

असा विचार ठरून माधवाचार्यांनीं त्याच रात्रीं हेमचंद्राला नवद्वीपाहून दक्षिणेकडे रवाना केलें. पशुपतीचें धन त्यानें बरोबर घेतलें होतें. मृणालिनी, गिरीजाया आणि दिग्विजय हेहि त्याच्या बरोबर गेले. हेमचंद्राला नवीन राज्यावर स्थापित करण्यासाठीं आचार्यहि त्याच्या बरोबर गेले होते. नव्या राज्याची स्थापना करण्याचें काम त्यांना सोपें गेलें. कारण, यवनांच्या धर्मद्वेषामुळें पीडित व भयभीत झालेले शेकडों लोक यवनराज्याचा त्याग करून हेमचंद्राच्या राज्यांत

जाऊन राहिले. माधवाचार्यांच्या खटपटीनें ठळकठळक श्रीमंत लोक व शेट सावकार नव्या राज्यांत राहण्यास गेल्यामुळें त्या राज्याला लौकरच मोठी शोभा आली. हळू हळू सैन्य जमविण्यांत आलें. लवकरच टोलेजंग व रमणीय राजधानी निर्माण झाली आणि मृणालिनी तेथची राणी म्हणून तेथें राहूं लागली.

गिरिजाया व दिग्विजय यांचें लग्न झालें. गिरिजाया मृणालिनीची व दिग्विजय हेमचंद्राची सेवा पूर्ववत् करूं लागली. लोक सांगतात कीं, गिरिजाया व दिग्विजय यांचें लग्न जुळेपर्यंत एकहि दिवस असा गेला नव्हता कीं, ज्या दिवशीं गिरिजायेच्या हातांतल्या केरसुणीचे तडाखे दिग्विजयाला मिळाले नाहींत. त्यालाहि त्या मारापासून दुःख वाटत असे असें नाहीं. उलट एके दिवशीं मार देण्यास गिरिजाया कोठें विसरली, तर दिग्विजयाला चैन पडेना ! तो तिला विचारी कीं " गिरे ! आज तूं माझ्यावर रागावलीस काय ? " असा त्यांचा प्रेमकलह चालत असे. अर्थात त्यांचा संसार यावज्जन्म सुखाचा झाला.

हेमचंद्राची नव्या राज्यावर स्थापना करून माधवाचार्य कामरूपाला निघून गेले. हेमचंद्र मुसलमानांचा द्वेष करूं लागला. बख्त्यार खिलजीला पराभव पावून कामरूपाहून माघार घ्यावी लागली आणि तेथून परत येतांना अपमान व कष्ट असह्य होऊन त्यानें प्राण सोडला ! या सगळ्या गोष्टींचें वर्णन करणें हा या ग्रंथाचा उद्देश नाहीं.

रत्नमयीनें एका श्रीमंत कोळ्याशीं विवाह केल्यावर तें जोडपें हेमचंद्राच्या नव्या राज्यांत जाऊन राहिलें. तेथें मृणालिनीच्या कृपेनें तीं सुखांत राहिलीं आणि गिरिजाया व रत्नमयी या चिरकाल मैत्रिणी राहिल्या.

मृणालिनीनें माधवाचार्यांकडून हृषीकेशाला आग्रह करवून मणिमालिनीला आपल्या राजधानीला आणविलें. तेथें ती मृणालिनीची मैत्रीण म्हणून राहिली. तिच्या नवऱ्याला राजवाड्यांत पुरोहिताचें काम देण्यांत आलें.

शांतशीलाला आतां दिसून आलें कीं, हिंदूंना त्यांचें राज्य परत मिळण्याचा संभव नाहीं; तेव्हां चातुर्य व कर्तृत्वशक्ति दाखवून यवनांची तरी मर्जी संपादावी, अशाविषयीं तो प्रयत्न करूं लागला. हिंदुलोकांवर अत्याचार करावे आणि विश्वासघाताचीं कर्मे करावीं, अशा वर्तनानें त्याच्या मनांतली इच्छा लवकरच पूर्ण होऊन मुसलमानी सत्तेंतल्या राज्यकारभारांत एका मोठ्या उच्च अधिकाराच्या जागीं त्याची नेमणूक झाली.

समाप्त.

# बंकिमचंद्र
## यांचा संकीर्ण लेख संग्रह.

बंकिमचंद्र यांनीं अनेक विनोदी लेख, विचारपरिप्लुत निबंध व मार्मिक संवाद, लिहिले असून रसिक व विद्वान वाचकांनीं हे लेख प्रकाशित करण्याविषयीं विशेष आग्रह दर्शविल्यावरून बंकिमचंद्र यांच्या अशा कांहीं निवडक लेखांचा अनुवाद यापुढें दिला आहे.

# लोक-रहस्य !



१

## इंग्रजस्तोत्र



( महाभारतावरून )

हे इंग्रज ! मी तुम्हाला प्रणिपात करतों.

अहो इंग्रज ! आपण अनेक गुणांनीं विभूषित आहां. आपल्या शरीराच्या वर्णात वैशिष्ठ्य आहे, आपण संपत्तिसंपन्न आहां, अतएव मी आपणास प्रणाम करतों.

आपण शत्रूचे संहारक आहां, कायद्यांचे कर्ते आहां, नोकरीचाकरीचे विधाते आहां, अतएव हे इंग्रज मी आपणास नमस्कार करतों.

आपण युद्धांत दिव्यशस्त्रें धारण करतां, शिकारीला जातांना बंदुक व भाला धारण करतां, न्यायकचेरींत जातांना फिरण्याची काठी धारण करतां, आणि भोजनाच्या वेळेस हातांत कांटे चमचे धारण करतां, यासाठीं अहो इंग्रज, मी आपणास साष्टांग नमस्कार करतों.

आपण एका शरीरानें राज्य करतां, एका शरीरानें घीनो पसो आणि पैसा नो घी अशा रीतीनें व्यापार करतां आणि एका शरीरानें आसाम वगैरे प्रातांत चहाचीं शेतें करतां; हे त्रिमूर्ते ! मी आपणास दोन्ही हात जोडून नमस्कार करतों.

आपला सत्वगुण आपल्या ग्रंथांतून दिसून येतो. आपला रजोगुण युद्धांतून दिसून येतो. आणि आपला तमोगुण हिंदुस्थानांतल्या वर्तमानपत्रांतून नित्य प्रकाशित होत आहे; तेव्हां हे त्रिगुणात्मक, आपणाला माझा नमस्कार असो.

आपण विद्यमान आहां यासाठीं सत् आहां, आपले शत्रू रणांगणावर चित् आहेत आणि आपण उमेदवारांना आनंद स्वरूप आहां; तेव्हां हे सच्चिदानंद, मी आपणास नमस्कार करतों.

आपणच ब्रम्हदेव आहां, कां तर आपण प्रजापति आहां, आपणच विष्णु आहां, कां तर लक्ष्मी तुमची दासी आहे, आणि आपणच महादेव आहां, कां तर आपली गृहिणी गौरी आहे; अतएव हे इंग्रज, मी आपणास प्रणाम करतों.

आपण इंद्र आहां—तोफ हें आपलें वज्र होय. आपण चंद्र आहां—इनकम ट्याक्स हा आपला कलंक आहे. आपण वायु आहां—आगगाडी आपली गति आहे. आपण वरुण आहां—समुद्रावर आपली सत्ता आहे. अतएव हे इंग्रज, मी आपणास नमस्कार करतों.

आपल्या ज्ञान दिवटीनें आमचा अज्ञानांधकार दूर होत आहे, तेव्हां आपण दिवाकर आहां, सर्व कांहीं आपण स्वाहा करीत आहां, तेव्हां आपण अग्नी अहां, आणि आपण यमस्वरूपहि आहां; तेव्हां अहो इंग्रज, मी आपणास नमस्कार करतों.

आपणच मला वेद आहां आणि म्हणून ऋक्, यजु वगैरे कोणत्याहि वेदाला मी मानीत नाहीं. आपणच मला स्मृति अहां, आणि म्हणून मनु इत्यादिकांना मी विसरून गेलों आहें. आपणच दर्शन अहां, कारण न्याय-मीमांसा आपण अगदीं मुठींत आणून ठेवली आहे; यासाठीं अहो इंग्रज, मी आपणास प्रणाम करतों.

अहो श्वेतांग ! आपल्या अमल धवल द्विरद—रद शुभ्र महाश्मश्रु शोभित मुखमंडलाला पाहून आपलें स्तुति-गान करावें, अशी साहजिक इच्छा होते. म्हणून अहो इंग्रज, मी आपणास नमस्कार करतों.

आपली हरित कपिशापिङ्गल लोहित कृष्णशुभ्रादि नाना वर्ण शोभित अतियत्नरंजित ऋक्ष मेदमार्जित कुन्तलावली पाहून आपलें गुणगायन करावें असें वाटतें. हें इंग्रज, यासाठीं मी आपणास प्रणाम करतों.

कलिकाळांत आपण गौरांगाचे अवतार आहां, यांत कांहीं शंका नाहीं. मुकुटाप्रमाणें टोपी आपल्या मस्तकावर शोभत आहे, वैजयंतीप्रमाणें तुमचा कमरपट्टा शोभत आहे, आणि हातांतल्या मुरलीच्या जागीं चाबुक शोभत आहे. अतएव हे गोपीवल्लभा ! मी आपणास प्रणाम करतों.

अहो वरद ! मला आपण वरदान द्या. आपण सांगाल तें मी करीन, आपण मला नौकरी द्या. मी आपणास नमस्कार करतों.

हे शुभंकर ! माझें शुभ करा. कल्याण करा. मी आपली खुशामद करीन. फलपुष्पांनीं आपली पूजा करीन, आपण सांगाल तसें करीन; पण मला आपण 'बडा आदमी' करा. मी आपणास प्रणाम करतों.

अहो महत ! मला एकादी खिताब, पदवी, उपाधि द्या. आपला कांहीं तरी प्रसाद देऊन मला भूषित करा. मी आपलें पादवंदन करीत आहें.

अहो भक्तवत्सल ! आपलें उच्छिष्ट हाच महा प्रसाद. लोक पाहतील अशा वेळीं माझ्या हाताशीं आपण आपला हात मिळवा, तोच आपला वरदहस्त. आपलीं चार दोन पत्रें दाखवून माझ्या बांधवांना मी हिणवीन, हींच आपलीं अभय पत्रें. अतएव हे इंग्रज, मी आपणास प्रणाम करतों.

अहो अंतर्यामी ! मी जें काय करतों तें सर्व आपल्या मनस्तुष्टीसाठीं करतों. आपण दाता म्हणावें म्हणून मी दान करतों. आपण परोपकारी म्हणावें म्हणून मी परोपकार करतों. आपण विद्वान म्हणावें म्हणून मी शिकतों. अतएव हे इंग्रज, माझ्यावर प्रसन्न व्हा. मी आपणास नमस्कार करतों.

आपण आज्ञा करा म्हणजे मी पाहिजेतर एकादा दवाखाना उघडतों, अथवा एकादी शाळा स्थापन करतों, अथवा आपल्या आवडत्या संस्थेला मोठीशी वर्गणी देतों; पण माझ्यावर आपण प्रसन्न व्हा. मी आपणास प्रणाम करतों.

अहो गौरांग ! आपली जशी इच्छा असेल, तसेंच मी वागत जाईन. मी माझा पोषाक टाकून कोटपाटलोण घालीत जाईन, डोळ्यांना चष्मा लावीन आणि काटा चमचांनीं जेवीन; पण आपण मला प्रसन्न व्हा. मी आपणास नमस्कार करतों.

हे मिष्टभाषी ! मी माझ्या मायभाषेचा त्याग करून आपल्या भाषेंत व्यवहार करीन. स्वतःचा धर्म सोडून आपल्या धर्माचा स्वीकार करीन. राजेश्री न राहतां मिस्टर होईन. म्हणून आपण माझ्यावर प्रसन्न व्हा. मी आपणास प्रणाम करतों.

अहो तामसी भोजनप्रिय ! आपल्या संतोषासाठीं मीहि भाकरी टाकून पाव खातों, भात सोडून मांसान्न खातों, कोंबडी देखील सोडीत नाहीं; अतएव हे इंग्रज, आपल्या चरणाजवळ मला स्थान द्या, मी आपणास प्रणाम करतों.

अहो संकरप्रिय ! मी विधवांचीं लग्नें करीन, जातिभेद मोडून टाकीन आणि आपणास आवडतील अशा अनेक गोष्टी करीन; तेव्हां आपण माझ्यावर प्रसन्न व्हा. मी आपणास नमस्कार करतों.

अहो सर्वद ! मला आपण संपत्ति द्या, मान द्या, यश द्या, माझ्या सर्व इच्छा पुऱ्या करा. मला मोठी नोकरी द्या, मोठा खिताब द्या, आणि कौन्सिलचे मेंबर करा. मी तुम्हाला साष्टांग नमस्कार करतों.

प्रभो ! आपणास एवढें देतां येत नसेल, तर मोठमोठ्या मजलसीला आणि पार्ट्यांना मला आमंत्रणें पाठविण्यास विसरूं नका. कांहीं कमेट्यांचा मला मेंबर करा. सिनेटचा मला मेंबर करा. मला असेसर करा. निदान अनाडी म्याजिस्ट्रेट तरी मला करा. मी आपणास प्रणाम करतों.

अहो दयार्णव ! कोणी कितीहि माझी निंदा केली, तरी मी भिणार नाहीं; पण आपण मात्र माझें भाषण ऐकून टाळ्या वाजवा, माझे लेख वाचून माझी प्रशंसा करा. मी आपणास नमस्कार करतों.

अहो भगवान् ! मी अकिंचन आहें, आपल्या दरवाजाजवळ श्वानासारखा उभा आहें. मला विसरूं नका. मीहि तुम्हांला विसरणार नाहीं. नाताळच्या सणांत मेवामिठाईचीं ताटें मी आपल्या भेटीला पाठवीन. म्हणून म्हणतों माझी आठवण ठेवा. मी आपणास कोटि कोटि प्रणाम करतों.

२

## देशी साहेब !



एकदां जन्मेजयराजा महर्षि वैशंपायन यांना म्हणाला, हे महर्षे ! आपण एके वेळीं म्हणालां होतां कीं कलियुगांत पृथ्वीवर देशी साहेब या नांवाचे प्राणी निर्माण होणार आहेत; तर या मनुष्यांना ओळखण्याचीं लक्षणें कोणतीं आणि हे मानव प्राणी पृथ्वीवर जन्म घेतल्यावर काय काय उद्योग करतील, तें मला एकवार कथन करण्याची कृपा करावी. वैशंपायन म्हणाले, हे राजा ! आहारनिद्राकुशल आणि विचित्रबुद्धिसंपन्न अशा देशी साहेबांची कथा मी तुला कथन करतों, ती श्रवण कर. चष्मा घालणाऱ्या उधारचरित्र, बाष्कळ पण पुष्कळ बोलणाऱ्या व मिष्टान्नप्रिय अशा देशीसाहेबांचें चरित्र मी तुला सांगतों, तें ऐक. हे राजा ! ज्यानें चित्रविचित्र कपडे घातले आहेत, ज्याच्या हातांत सुंदर छडी आहे, गवत वाढलेल्या रानांतल्या पाऊलवाटेप्रमाणें ज्याच्या डोक्यावर भांग आहे, ज्याच्या पायांत चकचक करणारे बूट आहेत, अशा अपूर्व मानवप्राण्याला देशी अथवा गांवठी साहेब असें म्हणतात. लांबलांब गप्पा मारण्यांत जे कोणाला हार जात नाहींत, बोलतांना जे परकीय भाषेचा अभिमान दर्शवितात आणि मातृभाषेचा जे तिरस्कार व्यक्त करतात; तेच देशी साहेब

होत. हे राजा ! कलियुगाचे ठिकाणीं असे अनेक देशी साहेब निर्माण होतील कीं, त्यांना आपल्या मातृभाषेंत धड बोलतां देखील येणार नाहीं. हे राजन ! ज्यांचीं दहाहि इंद्रियें सदा स्वतंत्र असल्यामुळें जे अपरिशुद्ध अवस्थेंत असतील आणि उच्छिष्टामुळें ज्यांची रसना नेहमीं पवित्र राहील, तेच हे देशी साहेब होत. सुकलेल्या लांकडाप्रमाणें मांसरहित ज्यांचे पाय असूनहि जे पळण्यांत मोठे तरबेज असतात, हात ज्यांचे दुबळे व कमजोर असूनहि लेखणी धरण्यांत व पगाराचे पैसे घेण्यांत जे मोठे चतुर असतात, शरीर ज्यांचें नुसतें अस्थिपंजरवत असलें, तरी जे सातसमुद्रापलीकडून येणाऱ्या वस्तूंचा मार खाण्यांत मोठे समर्थ असतात, आणि ज्यांच्या इंद्रियांची अशी प्रशंसा करावी लागेल, ते हे देशीसाहेब होत. जे कांहीं उद्देश असल्यावांचून पैसा सांठवितात, जे पैसा सांठविण्यासाठीं म्हणून तो मिळविण्याचा प्रयत्न करतात, जे पैसा मिळावा म्हणून परीक्षा देतात आणि परीक्षेंत पास व्हावें म्हणून प्रश्नांची चोरी करतात, त्यांनाहि देशीसाहेब असें म्हणतात.

हे राजन् ! देशी साहेब असें म्हटलें म्हणजे त्यापासून अनेक अर्थ उत्पन्न होतात. कलियुगांत भारतवर्षांत जेव्हां आंग्ल राजे येतील; तेव्हां ते देशी साहेब म्हणजे—बाजारहाट करून स्वयंपाकाच्या धंद्यावर व कचेरींत कारकुनाच्या नौकरीवर पोट भरणारा—असा अर्थ करतील. निर्धन लोक देशी साहेब म्हणजे श्रीमंत लोक, असा अर्थ करतील. मोलमजूर, देशी साहेब ह्मणजे मालक असा अर्थ करतील. याशिवाय कलियुगांत किती तरी मानव प्राणी केवळ देशीसाहेब होण्याचाच धंदा करतील. देशीसाहेब याचा जे कोणी उलटा अर्थ करतील, त्यांना या देशीसाहेब पुराणश्रवणाचें पुण्य लाभणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांना गाईचा जन्म प्राप्त होऊन ते या देशीसाहेबांच्या भक्ष्य स्थानीं पडतील. हे नराधिप ! दुसऱ्या अगस्त्य ऋषीनें जसा समुद्र शोषून घेतला, त्याप्रमाणें हे देशीसाहेब कांचपात्रांत सांठविलेल्या मदिरारूपि समुद्राचें प्राशन करतील. अग्नी यांच्या आज्ञेंत राहील. चिरुट, तंबाखू व सिगारेट, या खांडववनाच्या साहाय्यानें अग्नि नेहमीं यांच्या मुखाची सेवा करील. हा अग्नि नेहमीं यांच्या मुखांत राहून शिवाय पोटांतहि धगधग करील आणि उत्तर रात्रीपर्यंत यांच्या गाडीच्या कंदिलाचीहि तो सेवा करील. यांनीं आलोचन केलेल्या काव्याला आणि संगीतालाहि अग्नीचा वास येईल; तेव्हां या अग्नीला लोक मदनाग्नि आणि हृदयाग्नि असें म्हणतील. वारविलासमतावलंबी

या देशी साहेबांचीं वदनमंडळें नेहमीं जळत राहतील. त्या अग्नीचें नांव ईर्षाग्नि. हे देशीसाहेब वायूचेंहि भक्षण करतील. त्याला हवा खाणें असें म्हणतील. चंद्रमा या देशीसाहेबांच्या घरांत आणि बाहेर असा दोन्ही ठिकाणीं राहील आणि कधीं कधीं तो बुरखाहि घेईल. कोणी कोणी पूर्व रात्रीं कृष्ण पक्षांतला आणि कोणी उत्तर रात्रीं शुक्लपक्षांतला चंद्र पाहतील. कांहीं याच्या विरुद्धहि करतील. सूर्य या देशी साहेबांचें केव्हांहि दर्शन घेणार नाहीं. यमराज तर यांना विसरून जाईल. हे देशीसाहेब अश्विनीकुमारांची मात्र पूजा करतील. अश्विनीकुमारांच्या मंदिराचें नांव अस्ताबल किंवा तबेला असें हे ठेवतील !

हे नरश्रेष्ठा ! जे काव्यरसापासून दूर दूर राहतील, संगीताचें जे श्राद्ध करतील, लहानपणीं वाचून टाकलेल्या पुस्तकावरून जे आपलें पांडित्य गाजवीत राहतील, आणि अशा स्थितींतहि जे आपणास परमज्ञानी समजतील, तेच देशीसाहेब होण्यास योग्य होत. काव्यांत काडी इतकीहि गति नसतां जे कवी आणि कविता यांचा समाचार घेण्यास धावतील, वारयोषितांच्या मद्योन्मत्त कंठांतून निघणाऱ्या किचकाळण्याला जे संगीत समजतील, जे स्वतःला सर्वज्ञ व अभ्रांत समजतील, तेच स्वदेशी साहेब होत. जे रूपानें कार्तिकेयाचे कनिष्ठ बंधु, गुणानें जे निर्गुण पदार्थ, कर्मानें जे जडभरत आणि वाणीनें जे वाचाळ तेच देशी साहेब होत. व्रत-उत्सवांत जे शिवरात्र पाळतील, गृहिणीच्या संकेताबरोबर जे दिवाळी करतील, उपपत्नीच्या मर्जीसाठीं होळी करतील आणि मांसान्नाच्या लोभानें जे दसरा करतील, ते देशी साहेब होत. गमनासाठीं जे विचित्र रथाचा उपयोग करतील, निजण्यासाठीं जे साधारण घर शोधतील, पिण्यासाठीं जे द्राक्षारस मागवितील, आणि खाण्यासाठीं बिनदेठाची सफेत फळें जे उकडून खातील, ते देशी साहेब होत. जे महादेवाप्रमाणें मादक प्रिय, ब्रह्मदेवाप्रमाणें प्रजोत्पादनप्रिय, आणि विष्णूप्रमाणें लीलाप्रिय, तेच देशी साहेब होत.

हे कुरुकुलभूषणजनमेजय ! पुष्कळ बाबतींत या देशी साहेबांचें विष्णूशीं साम्य राहील. विष्णूप्रमाणें यांच्या येथेंहि लक्ष्मी आणि सरस्वती या दोघीहि राहतील. विष्णूप्रमाणें हेहि अनंतशय्याशायी असतील. विष्णूप्रमाणें, यांचेहि दहा अवतार होतील. जसें–कारकून, मास्तर, संपादक, वकील, मुत्सद्दी, न्यायाधीश, अध्यक्ष, कौन्सीलर, ऑनरेबल आणि निष्कर्म ( बेकार ). विष्णूप्रमाणें हेहि दहा अवतारांत असुरांचा नाश करतील. कारकुन असतांना चिरीमिरीचा, मास्तर असतां विद्यार्थ्यांच्या बुद्धीचा, संपादक असतां राष्ट्राच्या अब्रूचा, वकील असतां पक्षका-

रांचा, मुत्सद्दी असतां सार्वजनिक फंडाचा, न्यायाधीश असतां न्यायाचा, अध्यक्ष असतां सौजन्याचा, कौन्सिलर असतां जनतेच्या विश्वासाचा, ऑनरेबल असतां स्वतःच्या दानतीचा आणि निष्कर्म अवस्थेंत घरादारांचा संहार करतील.

हे राजा! आणखी सांगतों ऐक. जे मनांत एकपट असलें तर दहापट बोलून दाखवितील, शतपट लिहून काढतील, आणि वादविवादाच्या वेळीं हजारपट देखील करतील, तेच देशी साहेब होत. तसेंच ज्यांचें बळ हातांत एकपट, मुखांत दहापट, पाठींत शतपट आणि प्रसंगीं शून्यपट; तेच देशीसाहेब होत. लहानपणीं ज्यांची बुद्धिमत्ता पुस्तकांत दिसून येते तारुण्यांत ज्यांची बुद्धिमत्ता मद्याहारांत दिसून येते आणि वृद्धपणीं ज्यांची बुद्धिमत्ता गृहिणीच्या पदरांत दिसून येते, तेच देशीसाहेब होत. ज्यांची इष्ट देवता इंग्रज, ज्यांचा गुरु ब्राह्म-धर्मनेता, आंग्लोइंडियन वर्तमानपत्रें ज्यांचे वेद, नाट्यमंदिरें हींच ज्यांचीं तीर्थ-स्नानें, त्यांना देशीसाहेब असें म्हणतात. पाद्र्याजवळ जे ख्रिस्ती, समाजिस्टा-जवळ जे ब्राह्म, पित्याजवळ जे हिंदू, आणि पुरोहिताजवळ जे नास्तिक तेच देशीसाहेब होत. जे स्वतःच्या घरीं पाणी पितात, दोस्तांच्या घरीं दारू पितात, वेश्येच्या घरीं जे शिव्या खातात आणि साहेबांच्या बंगल्यावर जे धक्के खातात, तेच देशीसाहेब होत. स्नानाला टब नसल्यामुळें ज्यांना घंगाळाचा तिरस्कार वाटतो, जेवतांना कांटेचमचे नसल्यामुळें ज्यांना आपल्या बोटांचा तिरस्कार वाटतो, आणि बोलतांना ज्यांना मातृभाषेचा तिरस्कार वाटतो, तेच देशीसाहेब होत. ज्यांची सर्व दक्षता पोशाकांत तेवढी दिसून येते, जे आपल्या प्रयत्नाची शिकस्त नौकरीच्या उमेदवारीसाठीं करतात, ज्यांची भक्ति पत्नी आणि उपप-त्नीच्याठायीं दिसून येते, आणि सद्ग्रंथांचा जे तिरस्कार दर्शवितात, तेच देशी-साहेब होत.

हे राजन्! ज्या देशीसाहेबांची कथा मीं तुला सांगितली, ते देशीसाहेब आपल्या भारतवर्षाच्या उद्धारासाठींहि प्रयत्न करतील. खूप बडबड करावी, बुद्धिभेद करावा, प्रतारणेनें वागावें, ऐष आराम सोडूं नये आणि स्वार्थाला टाकूं नये, अशा भगीरथ प्रयत्नानें हे देशीसाहेब भारताचा उद्धार करतील!!

ही कथा ऐकून जन्मेजय म्हणाला, अहो ऋषिवर्य! ही देशीसाहेबांची कथा ऐकून मोठी प्रसन्नता वाटली. आतां दुसरी एखादी कथा कथन करावी.

---

३

# गर्दभ !

—०—

अहो गर्दभ ! आपणासाठीं मीं नवें गवत आणलें आहें, तें भक्षण करावें.

गायरानासारख्या अगम्य स्थानांतून नुकतेंच पाणी शिंपडलें आहे असें हिरवें-चार कोंवळें गवत मोठ्या कष्टानें कापून आणलें आहे. आपण आपल्या सुंदर मुखमंडळांत तें घ्या आणि मौक्तिकासहि लाजविणाऱ्या अशा दांतांनीं त्याचें चर्वण करा.—

हे महाभाग ! आपली पूजा करण्याची इच्छा झाली आहे. कां तर आपण सर्वत्र विराजमान आहां. अतएव हे विश्वव्यापी, माझी पूजा ग्रहण करा.

अहो ! मी पूज्यव्यक्तींच्या शोधासाठीं नानादेश हिंडलों; पण सर्वत्र आपणच मला दिसून आलां आणि सर्वत्र आपलीच पूजा चालली आहे, हेंहि मीं पाहिलें. यासाठीं हे लंबकर्ण ! माझीहि पूजा आपण ग्रहण करा.

गर्दभ महाराज ! आपले पाय लहान आहेत असें कोणी म्हणतात; पण मला तर जिकडे तिकडे आपलेच मोठाले पद आढळले. उंच आसनावर बसून आपण गवताच्या पेंढयाच्यापेंढया गिळंकृत करीत आहां आणि स्तुतिपाठक आपल्या भोंवतीं गोळा होऊन आपल्या कानांची स्तुति करीत आहेत; हें तर मी नित्य पहात आहें.

आपणच न्यायासनावर बसून आपले दोन्ही लांब कान इकडे तिकडे हलवीत आहां. आपल्या कानाचा हा गंभीर खोलपणा पाहून वकील नांवाचे कवी नानाप्रकारच्या काव्यांचा रस त्यांत ओतीत आहेत आणि अशा वेळीं या रसस्वादानें मुग्ध होऊन आपण झोंप घेऊं लागतां.

हे बृहन्मुंड ? अशा वेळीं काव्यरसपानानें मुग्ध होऊन आपण दया दाखवितां आणि दयावश होऊन आपण गोम्याची संपत्ति तिम्याला आणि तिम्याची संपत्ति राम्याला देऊन टाकतां. या दयावृत्तीचें काय वर्णन करावें !

हे रजकगृहभूषण ! आपलें सामर्थ्य एवढेंच आहे, असें नाहीं तर सरस्वती मंडपांतहि उच्चासनावर आपणच विराजमान आहां. आपल्या गर्दभलोकांत तरुणांचा प्रवेश व्हावा म्हणून 'एन्ट्रन्सएट्रन्स' म्हणून मोठ्यानें आपण कल्लोळ करतां. हा कल्लोळ ऐकून मला भय वाटतें. हे विशालोदर ! मस्तकाला त्रिपुंड्र

लाबून आणि हातांत कोष घेऊन संस्कृत पाठशाळेच्या कुशासनावरहि आपणच विराजमान आहां. आपली शास्त्रांवरील टीका जेव्हां आम्ही ऐकूं लागतों, तेव्हां आम्ही धन्य धन्य म्हणतों. अतएव हे महापशु! मीं आणलेलें हें कोंवळें गवत खा.

लक्ष्मीची कृपाहि आपणावरच आहे; कारण आपण नसाल, तर कोणावर लक्ष्मीची कृपा होणार नाहीं. लक्ष्मी आपणाला केव्हां सोडून जाऊं इच्छित नाहीं; पण आपणच आपल्या बुद्धिबळानें तिचा त्याग करण्याचा नेहमीं प्रयत्न करीत असतां आणि यामुळेंच लक्ष्मीला चंचल हा कलंक लागला आहे. अतएव हे सुपुत्र! माझें हें गवत खाण्याची कृपा करा.

गायकहि आपणच आहां. ऋषभ, षड्ज, गांधार, वगैरे सातहि सूर आपल्या गळ्याच्या ठिकाणीं वास करीत आहेत. आपलें अनुकरण करण्यासाठीं आपल्या सारख्या मोठमोठाल्या दाढी मिशा वाढवून व नानाप्रकारच्या खोकण्या खांकरण्याचा अभ्यास केला असतांहि कोणालाहि आपल्यासारखें गातांना मीं पाहिलें नाहीं. अतएव हे भैरव कंठ, माझें हें गवत आपण खा.

हे लंबकर्णावतार! या पृथ्वीवर आपला फार वर्षांपासून वास आहे. श्रीरामावतारांत आपण दशरथ होतां. तसें नसतें तर मग रामचंद्रांना वनवास कां प्राप्त झाला असता. महाभारतांत आपला उल्लेख युधिष्ठिर या नांवानें केला आहे. तसें नसतें तर द्यूत खेळलां नसतां आणि मग स्त्रीसह राज्य गमावून वनवासहि भोगावा लागला नसता. आणि कलियुगांत आपणच पृथ्वीराज होतां, तसें नसतें तर यवन हिंदुस्थानांत आले नसते. तेव्हां अहो गर्दभ! आणलेलें गवत भक्षण करा.

युगायुगाचे ठिकाणीं अनेकरूपानें अनेक देशांत आपण प्रगट झालेले आहां. भारतवर्षांत कलियुगांत आपण आपल्या तपोबलानें आणि ब्रह्मदेवाच्या वरप्रसादानें वर्तमानपत्रांचे सम्पादक म्हणून प्रगट झाले आहां. हे लोमशावतार! मीं आणलेले कोमल दुर्वांकुर आपण खा.

हे महापृष्ठ! केव्हां आपण राज्यधुरा वागवितांना दृष्टीस पडतां, केव्हां आपण पुस्तकांच्या ओझ्यानें ताठ झालेले दिसतां, तर केव्हां धोब्याच्या कपड्याच्या बोजानें वांकलेले दिसतां, यापैकीं कोणतें ओझें विशेष जड आहे, एवढें सांगण्याची कृपा करावी.

अहो ! आपण मोठे इच्छाभोजी आहां. केव्हां आपण गवत खातां, तर केव्हां दंडुके खातां आणि केव्हां केव्हां ग्रंथकाराचें मस्तक खातां. हे गर्दभ ! यापैकीं विशेष रुचकर आणि गोड कोणतें खाद्य आहे ?

हे सुंदर! आपलें रूप पाहून मी अगदीं मोहून गेलों आहें. वर्षाऋतूंत एखाद्या झाडाखालीं उभे राहून वरून पडणाऱ्या पावसाच्या धारांनीं आपण स्नान करीत असतां जेव्हां मुखारविंद खालीं करतां, कान पाडतां; केव्हां डोळे मिटतां, तर केव्हां बंद करतां आणि पावसाला आपल्या अंगावर बिनतकरार क्रीडा करूं देतां, त्या वेळीं आपल्या स्वरूपाचें काय वर्णन करावें ! हे लोकमनमोहन ! घ्या घ्या, माझें थोडें गवत खा.

हे सर्वव्यापी! आपण मोठे शांत आहां, कारण ब्रह्मदेवानें आपणास तेज दिलें नाहीं आपण मोठे सुधीर आहां, कारण आपणांस देवानें वेगवान केलें नाहीं. आपण मोठे विद्वान आहां, कारण आपणास बुद्धि दिलेली नाहीं, आणि आपण मोठे परोपकारी आहां, कारण पोटाची विशेष फिकीर न करतां आपण ओझीं वाहतां. गर्दभराज ! यासाठीं मी आपलें गुणानुवाद गातों. एवढें आणलेलें गवत खाऊन मला उपकृत करा.

४

## खास बातमीदाराचें पत्र.



युवराज प्रिन्स ऑफ वेल्स हिंदुस्थानांत आले होते, त्या वेळीं त्यांच्या बरोबर अनेक वर्तमानपत्रांचे खास बातमीदारहि हिंदुस्थानांतली नानाविध बातमी आपापल्या पत्रांना कळविण्यासाठीं आले होते. अशाच एका खास बातमीदाराचें पत्र खालीं देत आहों. हा बातमीदार कोण आणि त्याचें तें वर्तमानपत्र कोणतें, त्याची आतां आम्हांस आठवण नाहीं. असो. तो बातमीदार म्हणतो—

युवराजबरोबर येऊन मला बंगालप्रांतासंबंधानें जी माहिती मिळाली आहे, ती मननीय व मनोरंजक असल्यामुळें मुद्दाम देत आहें. या प्रांतासंबंधानें खरी माहिती मिळावी म्हणून मीं इतके परिश्रम केले आहेत कीं, तितके या प्रांतांतल्या कायमच्या रहिवाशांनीं देखील आजपर्यंत केले नसतील. म्हणून माझ्या या पत्रानें जेवढी खरी माहिती मिळणार आहे, तेवढी दुसऱ्याच्या पत्रांतून

मिळणार नाहीं. या प्रांताचें नांव बंगाल असें आहे. हें नांब कां पडलें ? येथल्या लोकांना विचारलें, तर यासंबंधानें धड कांहीं त्यांना सांगतां येत नाहीं. न सांगतां येणेंच साहजिक आहे. ते जरी येथले रहिवाशी आहेत, तरी त्यांना आपल्या देशाची कांहीं देखील माहिती नाहीं. जे आपणास मोठे ज्ञाते म्हणवितात. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, या देशाचें नांव पूर्वी बंग असें होतें, त्यावरून बंगाल-बंगाला असें नांव पडलें; परंतु हें म्हणणें सर्वथा चुकीचें आहे. या देशाचें नांव बेंगाल आहे, हें आपणास माहीत आहेच. मीं असा शोध लावला आहे कीं, कोणी बेंजामीन गॉल नांवाच्या पाश्चात्यानें पूर्वी ही भूमि शोधून काढली आणि त्यावरून 'बेंजामीन गॉल' असें नांव पडलें. पुढें 'जामीन' या शब्दाचा लोप होऊन बेंगाल हें नांव चालू झालें आणि तेंच अद्याप कायम आहे.

राजधानीचें नांव ' कालकाटा ' आहे. काळ ( वेळ ) आणि काटा ( घालविणें ) या दोन बेंगाली शब्दांवरून हें नांव पडलें आहे. यावरून कालकाटा म्हणजे वेळ घालविणें, असा अर्थ होतो. ज्या शहरांत वेळ सहज गमतीनें जातो, त्या शहराचें नांव कालकाटा, असें समजावें.

येथल्या रहिवाशांपैकीं बहुतेक लोक खूप काळे आहेत, आणि थोडेसे गोरे आहेत. जे काळे आहेत त्यांचे पूर्वज आफ्रिकेंतील असावेत आणि त्यांनीं इकडे येऊन वसाहत केली असें दिसतें. यांचे केस निग्रो इतके जरी रांठ नाहींत तरी केसांना त्यांच्याच सारखे वळू आहेत. ज्यांच्या ज्यांच्या केसांना वळू असतात, ते मूळचे आफ्रिकन आहेत असें मानव तत्वविज्ञांचें म्हणणें आहे. जे थोडे गोरे आहेत ते वरील बेंजामिन गॉलचे वंशज असावेत.

इकडे सर्व लोक म्यांचेस्टर वगैरे भागांतून येणारें कापड वापरतात. यावरून हें उघड दिसतें कीं बाहेर देशाहून कापड या प्रांतांत येऊं लागण्यापूर्वी येथले सर्व लोक नग्न स्थितींत आपापले व्यवहार करीत होते. आतां म्यांचेस्टरच्या कृपेनें या लोकांना आपली लज्जा निवारण करतां येऊं लागली आहे; तथापि अजून पुष्कळांना कपड्याचा उपयोग चांगला करतां येत नाहीं आणि ही गोष्ट यांच्या पूर्वीच्या नग्नावस्थेची साक्ष आहे. आपला पोषाख कसा असावा, हें अजूनहि यांना निश्चित ठरवितां येत नाहीं. कांहीं आमच्या सारखी कोटप्यांट घालतात तर कांहीं मुसलमानासारखे पायजामे वापरतात, आणि बाकीच्या लोकांना यापैकीं कशाची नक्कल करावी हें ठरवितां येत नसल्यामुळें कापड फाडल्यावांचून व शिवल्यावांचून नुसतेंच कसें तरी कमरेच्या भोंवतीं गुंडाळतात.

इंग्रजांनीं आपलीं पावलें प्रथम बंगाल्यांतच रोवलीं; तेव्हां इतक्या वर्षांच्या परिश्रमानें त्यांनीं येथल्या असभ्य लोकांना परदेशी कपड्यांचा उपयोग करण्यास शिकविलें ही कांहीं थोडी सुधारणा केली नाहीं. यांत इंग्लंडचा स्वार्थत्याग व दुसऱ्यासाठीं परिश्रम करण्याची आवड हे दोन सद्गुण स्पष्ट दिसून येतात. यामुळें हिंदुस्थानचें ऐश्वर्य व सांपत्तिक स्थिति इतकी वाढली आहे कीं तिचें वर्णन करणें अशक्य आहे; आणि वर्णन करूनहि आम्हां इंग्रजांप्रमाणें बंगाली लोकांना ती समजेल कीं नाहीं याची शंकाच आहे.

खेदाची गोष्ट ही कीं मला अजून या लोकांची भाषा चांगली समजली नाहीं; तथापि पुष्कळ वर्षांच्या अभ्यासानें जें स्वतः एकाद्या बंगाल्याला समजणार नाहीं, तें मी अगदीं थोड्या अवधींत शिकलों आहें, ही गोष्ट इंग्रज या दृष्टीनें कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. गुलिस्तां आणि बोस्तां हीं बंग वाङ्मयांतलीं दोन प्रसिद्ध पुस्तकें मीं फार काळजीपूर्वक वाचलीं आहेत. या दोन्हींचा सारांश असा कीं, युधिष्ठर नांवाच्या राजानें रावण नांवाच्या दुसऱ्या एका राजाला युद्धांत मारून त्याची स्त्री जी मंदोदरी, ती पळविली. पुढें मंदोदरीला वृंदावन येथें ठेवल्यावर ती कृष्ण नांवाच्या कोणा एका राजाबरोबर क्रीडा करूं लागली. शेवटीं लोकलज्जेस्तव तिनें दक्षयज्ञांत आत्महत्या केली.

बंगालीलोक हायकोर्टाला हायकोर्ट, गव्हरमेंटला गव्हरमेंट, डिक्रीला डिक्री, डिसमिसला डिसमिस, रेलवेला रेलवे, पोस्टाला पोस्ट, मास्टरला मास्टर, डबलला डबल म्हणतात, यावरून बंगाली भाषा ही इंग्रजी भाषेची शाखा आहे, ही गोष्ट अगदीं उघड होय.

आतां यावर अशी एक शंका आहे कीं, बंगाली ही जर इंग्रजी भाषेची शाखा आहे, तर इंग्रज लोक येण्यापूर्वी बंगाली लोक कोणती भाषा बोलत असावेत ? अथवा त्यांना भाषाच नव्हती ? ख्रिस्त या नांवावरून त्यांनीं आपल्या मुख्य दैवताचें नांव कृष्ण असें ठेवलें आहे. अर्थात भगवद्गीता ही बायबलवरून उतरून घेतली आहे, असें मला वाटतें; आणि युरोपांतल्या माझ्यासारख्या विद्वानांचेंहि तसेंच मत आहे. यावरून बायबलच्यापूर्वी या लोकांना कोणतीहि भाषा नव्हती हें उघड होय. यानंतर भाषेचा प्रचार यांच्यांत केव्हां सुरू झाला, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. पंडित मोक्षमुल्लर कांहीं प्रयत्न करतील तर थोडा फार शोध लागण्याचा संभव आहे. अशोकाच्या पूर्वी आर्य

लोकांना लिहिण्याची कला अवगत नव्हती, हा ज्यांनीं शोध लावला आहे, त्यांना हाहि शोध लावणें मोठेसें कठिण नाहीं.

आणखी एक गोष्ट. वुइलियम जोन्स, मोक्षमुल्लर वगैरे पंडितांचें असें म्हणणें आहे कीं हिंदुस्थानांत अर्थात् बंगाल्यांतहि संस्कृत या नांवाची भाषा आहे, परंतु या म्हणण्यावर माझा विश्वास नाहीं. कारण एवढया प्रवासांत मीं कोणाहि बंगाल्याला संस्कृत भाषेंत बोलतांना आणि लिहितांना पाहिलें नाहीं. मला वाटतें वुइलियम जोन्सनें ही एक थाप मारली असावी.

हिंदु जात ही चार श्रेणीनें विभक्त आहे, असें सांगतात; पण या म्हणण्यावर विश्वास ठेवूं नये. त्यांच्यांत पुष्कळ जाती आहेत. त्यांतील कांहीं नांवें विशेष प्रयत्नानें मिळालीं, तीं अशीं—१ ब्राम्हण, २ कायस्थ, ३ शूद्र, ४ कुलीन, ५ वंशज, ६ वैष्णव, ७ शाक्त, ८ राय, ९ घोशाळ, १० टेगोर, ११ मुल्ला, १२ फराजी, १३ रामायण, १४ महाभारत, १५ आसाम, १६ गौळीपाडा, १६ कुलंगी-कुत्रा, वगैरे.

बंगाली लोक चरित्रसंपन्न नाहींत. कारणावांचून देखील ते खुशाल खोटें बोलतात. राजेंद्रलाल मित्र या नांवाचा एक मोठा विद्वान गृहस्थ बंगाली लोकांत होऊन गेला, असें सांगतात. मीं पुष्कळांना त्याची जात कोण म्हणून विचारलें, तेव्हां सगळ्यांनीं कायस्थ म्हणून सांगितलें; परंतु मी अशानें फसतें थोडाच ! मीं लागलीच पंडित मोक्ष मुल्लर यांचें पुस्तक काढून पाहिलें तेव्हां राजेंद्रलाल मित्र ब्राम्हण होता, असें मला दिसून आलें. आणि हें खरेंहि आहे. कारण Mitra हा शब्द Mitre या शब्दाचा अपभ्रंश असला पाहिजे. अर्थात मित्र हा पुरोहितच असला पाहिजे.

बंगाली लोकांत अनेक दोष असले, तरी एक गुण मात्र माझ्या चांगल्या रीतीनें नजरेस आला. ते मोठे राजभक्त आहेत. अनेक हाल अपेष्टा सोसून केवळ युवराजांना पाहण्यासाठीं म्हणून लाखों लोक आले होते. असे राजनिष्ठ लोक यांच्याशिवाय साऱ्या जगांत दुसरे कोणी असतील, असें मला वाटत नाहीं. ईश्वरानें आम्हाला जर यथेच्छ ऐश्वर्य दिलें, तर त्यांतला चतकोर नितकोर शिळा तुकडा या राजभक्तीबद्दल त्यांना देण्याला आम्ही बहुतकरून कृपणपणा करणार नाहीं.

बंगाली स्त्रियांत गोषाची चाल आहे, असें मीं ऐकिलें होतें; पण ही गोष्ट सर्वथा खरी नाहीं; कारण युवराजांच्या अभ्यर्थनेसाठीं पुष्कळ बंगाली स्त्रिया गोषा

टाकून सभास्थानीं आलेल्या मीं पाहिल्या. यावरून असें दिसतें कीं, लाभ हानीच्या हिशेबानें गोषाची रचना केलेली आहे. जेव्हां कांहीं लाभ नसेल, तेव्हां स्त्रियांना पडद्यांत ठेवतात; पण कांहीं फायदा असला कीं तत्क्षणीं त्या पडद्याच्या बाहेर येतात. आम्ही शिकारी बंदुकीचा जसा उपयोग करतो, तसाच बंगाली लोक स्त्रियांचा उपयोग करतात. शिकार दिसतांच आम्ही जशी झटकन बंदुक बाहेर काढतों आणि शिकारीचा संभव नसला म्हणजे पेटींत ठेवून देतों, त्याप्रमाणें बंगाली लोक बायकांच्या बाबतींत सावधगिरी घेतात. बंगाली स्त्रियांच्या नयनबाणानें कोणाचे किती पंख गळून पडतील, हें कांहीं मला सांगतां येत नाहीं; पण मी माझ्या बंदुकीला कांहीं सुवर्णाचे अलंकार करणार आहें. पाहूं या, कांहीं बंगाली मैना तिच्यावर येऊन झडप घालतात कीं नाहीं !

नयनबाणच काय; पण पुष्पबाण सोडण्यांतहि बंगाली स्त्रिया फार चतुर आहेत, असें ऐकतों. हिंदु वाङ्मयांतले पुष्पबाण आणि बंगाली स्त्रियांनीं टाकलेले पुष्पबाण एकाच प्रकारचे आहेत कीं काय, हे मला माहीत नाहीं; असेल, तर त्या दुराकांक्षिणी आहेत, असें म्हटलें पाहिजे. पण तें कसेंहि असलें तरी या पुष्पबाणांचा प्रचार न होईल तितकें बरें. नाहीं तर हिंदुस्थानांत इंग्रजांना राहणें मोठें कठिण होईल. मला तर नेहमीं अशी भीति वाटते कीं या माझ्या फाटक्या तंबूतून एखादा पुष्पबाण शिरून माझें काळीज खाऊन न टाको. तसें झालें, तर मी अगदीं मातीला मिळून जाईन. आणि कोणत्याहि कामाला योग्य राहणार नाहीं. मी बिचारा मारवाड्याचा मुलगा, दोन पैसे कमावण्यासाठीं म्हणून इकडे आलों, फुकट मरणावांचूनच मरून जाईन. मग माझी काय दशा होईल ! तोंडांत पाणी तरी कोणी घालील कीं नाहीं कोणाला माहीत !

आतां इतकें खरें कीं सगळ्याच बंगाली स्त्रिया कांहीं शिकारी बंदुकीप्रमाणें नाहींत आणि पुष्पबाण सोडण्यांतहि सगळ्या चतुर नाहींत. आणि मुख्य गोष्ट ही कीं, हें सगळें मीं ऐकलें आहे. असें सांगतात कीं पतीच्या प्रेरणेनेंच स्त्री या सर्व गोष्टी करीत असते आणि पतीहि हें सर्व शास्त्रविहित म्हणून करितो. वस्तुतः तसेंच असलें पाहिजे. हिंदूंचे चार वेद आहेत. त्यांतल्या चाणक्यश्लोक नांवाच्या वेदांत असें लिहिलें आहे कीं—

आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि

याचा अर्थ असा कीं, हे पद्मपलाशलोचन श्रीकृष्ण ! मी माझ्या कल्याणासाठीं ही रानफुलांची माळ तुम्हाला देतों ती गळ्यांत धारण करा ! हें सांगायला विसरलोंच कीं वेदवेदांगविद्येंतहि मी मोठा पारंगत झालों आहें. असो.

---

५

## लंबपुच्छ व्याघ्राचार्य !

एकदां सुंदरबन नांवाच्या प्रसिद्ध अरण्यांत वाघांची सभा भरली होती. सभेच्या वेळीं मोटमोठ्यानें तर्जनगर्जनकरून, दांत बाहेर काढून व मोटमोठाल्या फलांगा मारीत जंगलाच्या नाना भागांतून वाघ सभास्थानीं येत होते. आल्यावर आपल्या योग्य अशी जागा पाहून तेथें आपल्या शेपटीचें आसन करून तीवर ते बसले. सगळे जमल्यावर त्यांनीं एका मतानें एका वृद्ध व मोठ्या पोटाच्या वाघाची योजना अध्यक्षस्थानीं केली.

लंबोदरव्याघ्र अध्यक्षस्थानीं विराजमान झाल्यावर म्हणाले, "आजचा दिवस मोठ्या आनंदाचा व शुभ आहे. आपण जेवढे अरण्यवासी मांसाभिलाषी व्याघ्रकुलतिलक आहों, तेवढे आज एकनेकांचें कल्याण साधण्यासाठीं येथें एकत्र जमलों आहों. अहाहा ! केवढें या अरण्याचें भाग्य ! दुष्ट आणि निंदक स्वभावाचीं जीं दुसरीं जनावरें आहेत तीं आपणा व्याघ्रांना, असभ्य म्हणून निंदा करतात व आणखीहि अन्यप्रकारानें आमचा तिरस्कार दर्शवितात. त्यांनीं आज येथें येऊन पहावें म्हणजे वाघाची जात अनादिकाळापासूनच कशी सुधारलेली आहे, हें त्यांना दिसून येईल. इतकेंच नव्हे तर सभ्य या दृष्टीनें आम्हीच सर्वांच्या शीर्षस्थानीं बसण्यास योग्य आहों, हें त्यांना कबूल करावें लागेल. ब्रह्मदेवाजवळ माझी हीच प्रार्थना आहे कीं, परजीवहत्याकांडाच्या आमच्या संस्कृतीचें जर कांहीं पारितोषिक आम्हास तो देणार असेल, तर त्यानें सर्व जगांत आमचाच जयजयकार घडवून आणावा. ( सर्व वाघ कुल्यावर पंजे मारून संमति व्यक्त करतात. ) भगिनी आणि बांधव हो ! आपण ज्यासाठीं येथें एकत्र जमलों आहों, त्याचा उद्देश आपणाला थोडक्यांत सांगतों. आज आपण एक संस्था स्थापन करूं या. सगळ्या जगांत आपापल्या स्वार्थ सिद्धीसाटीं विद्यार्जनाचे नानाप्रकार

अस्तित्वांत येत असून नानाप्रकारचीं हत्याप्रसारक उपकरणेंहि निर्माण होत आहेत. अशा वेळीं स्वस्थ बसून आपण जगाच्या मागें राहणार काय ? ( नाहीं नाहीं. ) सगळेच विद्वान होत आहेत, तेव्हां आपणहि विद्वान होऊन आपलें हिंसाशास्त्र अधिक सुधारलें पाहिजे. तसें आपण केलें नाहीं, तर आपण जगाच्या अगदीं मागें पडूं. अशा प्रकारची हिंसाशास्त्रचर्चा करण्यासाठीं असल्या सभा वारंवार भरविल्या पाहिजेत आणि तींत अनेक विद्वानांचीं भाषणें वारंवार झालीं पाहिजेत. यासंबंधानें आपणा सर्व सभासदांचें एक मत होईल, अशी आशा आहे."

अध्यक्षांचें असें भाषण झाल्यावर घुर्र घुर्र गर्जना करून अनेक वाघांनीं अनेक सूचना केल्या. अनेकांनीं अनेक शंका घेतल्या आणि अखेरीस एक लांब शेंपटीचा वाघ अध्यक्षाजवळ जाऊन राहिल्यावर सर्व सभा कांहींशी शांत झाली. अध्यक्ष म्हणाले, "सभासदहो ! हे लंबपुच्छव्याघ्र तुमच्या इच्छेप्रमाणें मनुष्य प्राण्यासंबंधानें एक निबंध वाचून दाखविणार आहेत, तो तुम्ही शांत चित्तानें ऐकून घ्या."

मनुष्याचें नांव ऐकतांच कांहीं अडाणी सभासदांची क्षुधा एकदम प्रदीप्त होऊन कांहींच्या तोंडांना पाणी सुटलें. इतक्यात लंबपुच्छ व्याघ्रानें आपला निबंध वाचण्यास सुरुवात केली. त्यावेळीं आपलें शेपूट हालवून तो जेव्हां डुरकाण्या फोडूं लागला, तेव्हां त्या सुंदरबनांत लपून बसलेले इतर प्राणी भयभित झाले. तो म्हणाला, "अध्यक्षमहाराज, वाघीणी आणि वाघहो ! मनुष्य हें एक दोनपायांचें जनावर आहे. त्याला पंख नाहींत, तेव्हां तो पक्षी नाहीं, ही गोष्ट उघड होय. तो कांहींसा चतुष्पाद प्राण्यासारखाच आहे. चार पायांच्या जनावरांना जितकीं हाडकें आणि जितके अवयव असतात, तितके अवयव व हाडकें या द्विपाद जनावरास आहेत. यावरून हा त्याच वर्गातला प्राणी आहे, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. फरक असेल तर तो एवढाच कीं चतुष्पाद प्राण्याचा जसा आकार असतो, तसा या द्विपाद पशूचा आकार नाहीं; तथापि जरी मनुष्यांना दोन पाय आहेत, तरी त्यांचा तिरस्कार करणें हें बरोबर नाहीं.

चतुष्पादांतील वानराच्या बरीच जवळ अशी मनुष्यांची जात आहे. विद्वानांचें असें म्हणणें आहे कीं कालेंकरून सर्व प्राणिमात्रांची सौंदर्याभिवृद्धि होत आहे. पुष्कळ वर्षांनीं अवयवांची पूर्णता होते. न्यून असलेलीं इंद्रियें हजारों वर्षांनीं मिळतात; तेव्हां या न्यायानें मला असें वाटतें कीं कांहीं वर्षांनीं मनुष्यांस शेंपूट फुटून ते वानराबरोबर येतील आणि नंतर जवळ जवळ चतुष्पादासारखे होतील.

आपणाला माहीत आहे कीं मनुष्य हें जनावर खाण्याला मोठें स्वादिष्ट व रुचकर आहे. त्यांच्या मांसाला मोठी लज्जत आहे. ( हें ऐकून पुष्कळ वाघ आपल्या जिभा बाहेर काढतात व ओंठ चाटतात. ) हें द्विपाद जनावर सहज मरतें. हरिणाप्रमाणें त्याला लांब लांब फलांगा मारून पळतां येत नाहीं. ठोणग्या-प्रमाणें तो बळवानहि नाहीं. शिंगाचें हत्यारहि त्याच्याजवळ नाहीं कीं मोठाले दांत देखील नाहींत. यावरून हा प्राणी देवानें वाघांच्या सुखसोयीसाठींच निर्माण केलेला आहे. कारण या जनावराला पळतांहि येत नाहीं व आत्मरक्षणहि करतां येत नाहीं. हें दोन पायाचें जनावर इतकं कमजोर आहे कीं, त्याला पाहून फार आश्चर्य वाटतें. या जनावराला देवानें कां निर्माण केलें, हं आतां तुम्हीच सांगा. त्याला नाहींत शिंगें नाहींत कीं रानडुकरासारखे सुळे नाहींत ! बरें, हा चालतोहि फार हळू हळू ! स्वभावानेंहि कोमल असा आहे. तेव्हां आम्हां वाघांच्या भक्षस्थानीं पडावें यापेक्षां या जनावराचा दुसरा कांहींहि उपयोग दिसत नाहीं.

या मनुष्यजनावराचें मांस कोमल असून मिष्ट असल्यामुळें आपण या प्राण्यांना मोठ्या आवडीनें खातों. यांना खाण्यांत कांहींच भानगड नाहीं. सहज गट्ट करतां येतें. त्यांत आणखी आश्चर्याची गोष्ट ही कीं माणसेंहि मोठीं व्याघ्रभक्त असतात. तुम्ही ही गोष्ट खोटी समजत असाल, तर मी आपला स्वानुभव तुमच्यापुढें मांडतों.

आपणाला माहितच आहे कीं मीं पुष्कळ देशपर्यटन करून फार ज्ञान संपादन केलेलें आहें. माझें राहण्याचें ठिकाण या सुंदरबनाच्या उत्तर दिशेला आहे. हिंसाशास्त्रांत पूर्ण अज्ञान अशीं बैल, गाई, मनुष्य वगैरे लहान लहान जनावरें तिकडे पुष्कळ आहेत. तिकडे मनुष्य जनावराचे दोन प्रकार आहे. हीं जनावरें कांहीं काळीं आहेत व कांहीं गोरीं आहेत. अशा भागांत मी एकदां सांसारिक कार्यासाठीं गेलों होतों."

इतक्यांत एक दोन धीट वाघ मोठ्यानें गर्जना करून म्हणाले, "सांसारिक कार्य ह्मणजे काय ?"

लंबपुच्छ व्याघ्र म्हणाला, " आहारान्वेषण ! अर्थात भक्ष्य शोधण्यासाठीं आपण जो प्रयत्न करतों, त्याला सांसारिक कार्य असें म्हणतात. जे सभ्य आहेत, ते उदरंभरणाच्या प्रयत्नाला सांसारिक कर्म असें म्हणतात. या पोटभरी धंद्याला सगळेच सांसारिक कर्म म्हणत नाहींत. याचें कारण त्यांना तसा अधिकारच नाहीं. जसा अधिकार असेल, तशी भाषा वापरावी लागते. अगदीं भिकार प्राणी

सांसारिक कार्याला भिक्षा असें म्हणतात. त्याहून थोड्या वरच्या दर्जाचे सांसारिक कार्याला मोलमजुरी असें म्हणतात. त्याहून वरिष्ठ दर्जाचे सांसारिक कार्य धूर्तांचें, त्याला चोरी असें म्हणतात. सांसारिक कार्यांत याहून अधिक थोडें साहस असेल, तर त्याला दरवडा म्हणतात, आणि अनेक दरवडे पचवून ज्यांच्या ऐश्वर्याचा विस्तार होत असतो त्यांच्या सांसारिक कार्याला शौर्य असें म्हणतात. असो. या बाबतींत विशेष कांहीं सांगितलें तर तें तुम्हाला समजणार नाहीं. कारण जों जों सभ्यपणा अधिक वाढतो, तों तों या बाबतींत विशेष ज्ञान प्राप्त होतें. आतां मीं चालू विषयावर बोलतों. मनुष्यप्राणी मोठा व्याघ्रभक्त आहे, हें तुम्हाला मीं सांगितलेलें लक्षांत असेलच? अशा मनुष्यप्राण्यांच्या वस्तींत मी सांसारिक कार्यासाटीं एकदां गेलों होतों. आपणाला हें ऐकून माहीत असेलच कीं सुंदरबनाचा अरण्यपणा घालवून टाकावा म्हणून कंपनी या मानवी जनावरांनीं एक पोर्ट कॅनिंग उभी केली आहे."

एक मोठ्या दांताचा वाघ म्हणाला, "कॅनिंग कंपनी हें कशा प्रकारचें जनावर आहे?"

लंबपुच्छ व्याघ्र म्हणाला, "हें जनावर मीं डोळ्यानें पाहिलें नाहीं; पण तें कांहीं मनुष्य जनावरांनीं निर्माण केलें होतें. हें जनावर चांगलें वाढल्यावर तें माणसाचें रक्त पिऊं लागलें व त्या रक्ताची चटक त्याला इतकी लागली कीं रक्त पिऊन तें हळू हळू लट्ठ होऊं लागलें व शेवटीं त्याचें पोट फुटून तें मरण पावलें, असें सांगतात. याचें कारण दुसरें कांहीं नाहीं, मनुष्यप्राण्याचा स्वभावच मुळीं परिणामविचारशून्य आहे. हें मानव जनावर आपलें मरण आपणच घडवून तयार करतें. त्या प्राण्याचीं जीं शस्त्रास्त्रें आहेत, त्यावरून ही गोष्ट उघड दिसते. ज्या शस्त्रांनीं आपला नाश होईल असलीं शस्त्रें हा प्राणी तयार करतो आणि तीं आपल्या संग्रहाला ठेवतो. आणि हीं वेडीं जनावरें एखाद्या मैदानांत हजारोंनीं समोरासमोर उभीं राहून एकमेकांस आपणच तयार केलेल्या शस्त्रांनीं मारून टाकतात; आणि आश्चर्य हें कीं मग तीं मृतांच्या शरीराचा कांहींहि सदुपयोग करीत नाहींत. मांस खात नाहींत कीं रक्त पीत नाहींत. मला वाटतें या द्विपाद जनावरांचा संहार होण्यास सोईचें व्हावें म्हणून पोर्टकॅनिंग कंपनी नांवाचा पशु तयार केला होता; पण तो अधाशीपणानें मध्यंतरींच मेला. असो; आपण कोणी आतां मधून मधून असले प्रश्न विचारूं नका. त्यामुळें व्याख्यान बेरंग होतें.

मी एकदां पोर्ट कॅनिंग कंपनी पशूंच्या राहण्याच्या ठिकाणाकडे सांसारिक कार्यांसाठीं गेलों होतों तेथें बांबूच्या मडपांत बकरीचें एक अगदीं कोवळें पोर बांधलें होतें. व मोठ्या गमतीनें बागडत होतें. त्याचें तें उडणें बागडणें पाहून त्या कोंकराला पोटांत आश्रय द्यावा व त्याचें जन्मसाफल्य करावें, अशी परोपकारबुद्धि मला साहजिक झाली व अशा सदिच्छेनें मीं त्या मंडपांत प्रवेश केला. तो मंडप जादूचा होता. मनुष्य प्राणी या असल्या जादूच्या मंडपाला खोडा म्हणतात, हें मला पुढें समजलें. मी त्या मंडपांत जातांच— ज्या दारानें आंत गेलों—तें दार आपोआप बंद झालें. तो दाराचा झालेला आवाज ऐकून कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें माझ्या त्या मंडपाभोवतीं अकस्मात् माणसें गोळा झालीं. हीं सर्व माणसें माझ्या दर्शनासाठीं गोळा झालीं होतीं, हें मीं तेव्हांच ओळखलें. मला पाहून त्यांना फार आनंद झाला व ते मोठ्यानें हसूं लागले. ते सगळे माझी स्तुति व तारीफ करीत आहेत, हेंहि मीं ओळखलें. कोणी माझ्या चेहऱ्याची तारीफ करीत होते, तर कोणी माझे दांत पाहून खुष झाले होते. कोणी माझ्या नखाची प्रशंसा करीत होते, तर कोणी माझी लांब शेंपूट पाहून आश्चर्य करीत होते. बायकोच्या भावाची जशी सगळे टर उडवितात, तसे ते माझें कौतुक करीत होते. त्यानंतर मोठ्या भक्तिपूर्ण हृदयानें त्यांनीं तो मंडप माझ्यासह उचलून बैल जोडलेल्या गाडीवर ठेवला. त्या गाडीला दोन पांढरे शुभ्र व लठ्ठ बैल होते. त्या बैलांना पाहून माझ्या तोंडाला पाणी सुटलें; पण त्या पिंजऱ्याच्या बाहेर पडण्यास मार्ग नसल्यामुळें माझा निरुपाय झाला. शेवटीं त्या पिंजऱ्यांत असलेल्या लहानग्या बकऱ्यावर मीं आपली क्षुधा कशीतरी शमविली. वास्तविक त्या कोंवळ्या कोकराचें मांस मोठें लज्जतदार होतें. व खातांना मोठा आनंद होत होता; पण तेवढयानें पोट भरलें नाहीं एवढेंच. थोड्या वेळानें माझी गाडी मनुष्यप्राणी राहतात, अशा एका घरापुढें आली. घराचा मालक स्वतः मला सामोरा आला व माझें स्वागत करून पिंजऱ्यासह मला घरांत घेतलें. तेथें माझा सत्कार फारच चांगल्या रीतीनें करण्यांत आला. मला राहण्यासाठीं नवें घर दिलें. त्या घराला सगळीकडून लोखंडाचे लठ्ठलठ्ठ गज बसविलेले होते आणि भोंवतालीं लांबवर मोठा सुंदर बगीचा होता. माझ्या त्या घरांत रोज नियमितपणें मेलेल्या जनावराच्या मांसाची टोपली येऊन पडे. पाणी वगैरे सर्व कांहीं वेळच्या वेळीं मिळूं लागलें. अशा रीतीनें माझी सेवा करण्यांत मनुष्यांचा कांहीं तरी चांगलाच हेतु असला पाहिजे. मला वाटतें, आबालवृद्धांना

माझें दर्शन घडावें म्हणून ही योजना केली असावी आणि तें खरेंहि. रोज किती तरी माणसें माझ्या दर्शनासाठीं येत आणि कृतार्थ होऊन परत जात.

मी पुष्कळ दिवस त्या लोखंडी घरांत राहिलों. माझे दिवस तेथें मोठ्या सुखानें चालले होते. तें सुख सोडून कोठें जावें असें वाटेना; परंतु स्वदेशाच्या प्रेमामुळें मला तेथें राहतां येईना. अहाहा ! जन्मभूमीची जेव्हां आठवण होई, तेव्हां मी म्हणें, हे मातृस्वरूप सुंदरबना, मी तुला केव्हांहि विसरणार नाहीं. मायभूमीची आठवण झाली म्हणजे खाणें देखील गोड लागत नसे. त्यावेळीं हाडकें आणि कातडें न खातां नुसतें मांस मांस तेवढें मी खात असें. देशभक्ति मी आपली शेपूट आपटून व्यक्त करीत असें. स्वदेशप्रेम ही काय वस्तु आहे आणि या प्रेमानें अंतःकरणांत काय होतें, हें तुम्हांला समजणार नाहीं. हे जन्मभूमि, जोंपर्यंत तुला मीं पाहिलें नाहीं, तोंपर्यंत भूक लागल्यावांचून खाल्लें नाहीं. झोंप लागल्यावांचून झोंपलों नाहीं. फार काय; पण पोटांत जेवढें मावण्यासारखें असें त्यापेक्षां फार तर चार दोन शेर मांस जास्त खाऊन तुझ्या चिंतनांत येरझार घालून दिवस कंठित असें.''

हें जन्मभूमीच्या प्रेमाचें असें वर्णन करतां करतां लंबपुच्छ वाघोबा क्षणभर डोळे मिटून गप बसला. त्याचा चेहरा विव्हळ झाला, डोळे डबडबले आणि खालीं कसले थेंबहि पडले. कोणी म्हणाले, ते अश्रू आहेत; परंतु तीक्ष्ण डोळ्याची तरुण मंडळी म्हणाली, ते अश्रू नाहींत. श्रमावांचून मांस खायला मिळत होतें, त्याची आठवण होऊन तोंडांतून पाणी गळत आहे.

अशा रीतीनें मन स्वस्थ करण्यासाठीं थोडा वेळ स्तब्ध राहून वाघानें पुन्हां आपला निबंध वाचण्यास सुरुवात केली. तो म्हणाला, “ तें सुंदर घर—तो लोहपिंजरा सोडून मी येथें कसा आलों, हें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. एके दिवशीं पिंजरा स्वच्छ करीत असतां झाडू मारणाऱ्या माणसानें चुकून दार उघडें टाकलें. तत्क्षणीं त्या झाडूवाल्याला उचलून मीं आपल्या पाठीवर टाकलें आणि जों तडक निघालों तों सुंदरबनांत येऊन उभा राहिलों. मनुष्य प्राण्यांत राहण्याचा हा जो मला सुयोग प्राप्त झाला होता, त्या वेळीं या प्राण्यासंबंधानें मीं अनेक प्रकारची माहिती मिळविली आहे आणि तीच आतां मी तुम्हाला सांगत आहें. तिच्या संबंधानें शंका घेण्याचें अर्थातच कांहीं कारण नाहीं. मनुष्य प्राणि हा अत्यंत क्षुद्र आहे. पांच सहा हात लांबीरुंदीच्या बिळांत, झाडाच्या ढोलींत, नाहीं तर डोंगराच्या खबदडांत तो सहज राहूं शकेल, परंतु तो आपल्या वेळेचा दुरुपयोग

करून डोंगरासारखीं उंच उंच घरें आपल्या राहण्यासाठीं तयार करतो. अथवा असें असावें कीं देवानें निर्माण केलेले हे पोकळ डोंगर असावेत आणि त्याचा राहण्याकडे मनुष्यप्राणी उपयोग करतो. हे डोंगर लहानमोठे असे अनेक आकाराचे असतात आणि आंतून पोकळ खोल्या असतात. या खोल्यांतून हीं द्विपाद जनावरें राहातात. हें जनावर मांसहि खातें आणि फळें व मुळेंहि खातें. मोठमोठालीं लांकडाचीं खोडें व झाडें तें खात नाहीं हें खरें, पण अगदीं लहानलहान झाडें झुडपें खाण्याची या प्राण्यांना मोठी आवड आहे. तेवढयासाठीं जमिनींत नाना लहान झाडांचीं शेतें पिकवितात. यांना खाण्यासाठीं म्हणून जेथें वनस्पति लावतात त्या जमिनीला हे शेत किंवा मळा म्हणतात. आणि दुसऱ्या झाडा झुडपांच्या जागेला बागबगीचा म्हणतात. मनुष्य फळें, फुलें, पानें, देंठ व मुळया देखील खातात; पण ते गवत खातात कीं नाहीं, याचा मला चांगलासा शोध लागला नाहीं. मीं केव्हां कोणाला गवत खातांनां पाहिलें नाहीं; परंतु हा द्विपाद पशु गवत खात असावा, असा मला जबरदस्त संशय आहे. कारण गोरे व काळे मानवप्राणी आपापल्या बागबगीचांतून हिरवेंचार कोवळें गवत राखण्याविषयीं फार परिश्रम घेतात आणि तें वाढलें म्हणजे कापून नेतात. यावरून ते गवत खात असावेत हें निश्चित होय. तसें नसतें तर यःकश्चित् गवताची एवढी निगा त्यांनीं राखली नसती. गवताला घास असेंहि म्हणतात. एकदां एक गरीब मानव म्हणाला कीं, हे मोठमोठे लोक बसल्याबसल्या आमच्या गरीबांच्या तोंडचा घास काढून आपण खातात. हें मीं माझ्या कानानें एकिलें आहे, तेव्हां मानवप्राणी घास खात असावा हें उघड होय. परंतु घास खाणें त्यांना लज्जास्पद वाटतें आणि म्हणून ते गवत चोरून खात असावेत.

या मानव पशूंच्या ठिकाणीं विश्वबंधुत्व आहे आणि ह्मणून ते चतुष्पादांना पूज्य मानून त्यांची पूजा करतात. माझा त्यांनीं कसा सत्कार केला, हें मीं तुह्मांला सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें ते घोड्याचीहि पूजा करतात. घोड्यांना राहण्याला जागा देतात, त्यांना स्नान घालतात, त्यांचें आंग दाबतात आणि त्यांना चण्यांचा नैवेद्य देतात. यावरून घोडापशु मनुष्यपशूपेक्षां श्रेष्ठ आहे आणि म्हणून मनुष्य त्याची सेवा करतो. तो बैल, गायी, बकऱ्या यांचाहि सत्कार करतो. गायीचें दूध तो पितो. शोधक व्याघ्रांनीं असा शोध लावला होता कीं फार प्राचीन काळीं मनुष्य गायीचा बच्चा असावा. मला त्या वेळीं याचा अर्थ कळला नाहीं; परंतु या प्राण्याला गायीचें दूध पितांना पाहून ही गोष्ट खरी, असें मला सहजच वाटलें. याचमुळें बैलांच्या आणि मनुष्यांच्या बुद्धींत समानता

आली आहे. मनुष्य ज्याप्रमाणें आपल्या सुख सोयीसाठीं गायी, बैल, म्हशी, बकऱ्या, कोंबडीं वगैरे पाळतो, त्याप्रमाणें आपणहि आपल्या सोयीसाठीं माणसें पाळावींत अशी माझी सूचना आहे

गायी बैला शिवाय हत्ती, उंट, गाढवें, कुत्रीं, मांजरें इतकेंच नव्हे तर नानाप्रकारच्या पाखरांना देखील हे भोजन घालतात. यावरून सर्व पशुपक्ष्यांची सेवा करावी, हाच मनुष्यांचा धर्म दिसतो. मनुष्यांत वानरहि पुष्कळ आहेत. त्यांत दोन जाती आहेत. कांहींना शेंपूट आहे व कांहींना शेंपूट नाहीं. ज्यांना शेंपूट आहे, ते व उच्चासनावर दिसून यावेत, हें साहजिक होय, असो. मी आतां या द्विपादपशूंत विवाह कशा रीतीनें होतो, याची मनोरंजक हकीकत तुम्हाला सांगतों."

पण इतक्यांत अध्यक्ष महाराजांनीं लांब पाहिल्या सारखें केलें व कोणाच्या अनुमतीवांचून एकदम उड्डाण मारून सभास्थानाच्या पार होऊन वेगानें धांवत सुटले. त्याबरोबर बाकीचे वाघहि भराभरा त्या दिशेला धांवूं लागले. बिचारा वक्ता वेड्यासारखा इकडे तिकडे पाहूं लागला. तेव्हां एक वाघ त्याला म्हणाला, 'अहो, आपण नाखुष होऊं नका. सभापतिमहाराज सांसारिक कार्यासाठीं पळत आहेत. तो दूर हरिणांचा कळप पळत आहे. त्या हरिणांना पाहून माझ्या तोंडाला तर पाणीच सुटलें.' असें म्हणून तो वाघहि तिकडेच पळाला. तीं हरिणें दृष्टीस पडतांच त्यालाहि सांसारिक कर्माची जागृति झाली व तोहि त्या दिशेला धांवला. अशा रीतीनें त्या दिवसाची सभा विसर्जन झाली. दुसऱ्या दिवशीं सभेला पुनः आरंभ झाला. पूर्वोक्त, आपापल्या आसनावर सर्व बसल्यावर लंबपुच्छ व्याघ्र म्हणाला, "काल मीं आपणांस मनुष्यांच्या विवाहासंबंधानें सांगण्याचें अभिवचन दिलें होतें. त्याप्रमाणें आज त्या विषयाला आरंभ करतों. मनुष्यासंबंधानें आरंभींच एक गोष्ट आपणांस सांगावयास पाहिजे होती; पण मी ती सांगावयास विसरलों. मनुष्यप्राण्यांत भला बुरा हे प्रकार आहेत. आपलें वचन जो मोडील, प्रतिज्ञेचा जो वारंवार भंग करील, बोलेल एक आणि करील दुसरेंच, अशा मनुष्याचा दर्जा श्रेष्ठ असतो. आपल्या वचनभंगाच्या हातचलाखीनें तो सर्व मनुष्यसमाजाच्या शीर्षस्थानीं जाऊन बसतो व सर्व मनुष्यहि त्याला मान देतात, हें मीं पाहिलें आहे.

विवाह कशाला म्हणतात, हें आपणाला माहीत आहेच. कारण पडेल तेवढ्यापुरता आपण सर्वत्र प्रसंगानुसार विवाह करतों. आपलाच विवाह असा होतो, असें नाहीं, तर सर्व पशुपक्ष्यांचे विवाह जरूरीपुरतेच होतात; परंतु मनुष्यांत

अशी चाल नाहीं. त्यांच्यांत जन्मभर चालणारे विवाह होतात. या विवाहांना नित्य विवाह असें आपण म्हणूं. याशिवाय नैमित्तिक विवाह त्यांच्यांत होतात. होत नाहींत असें नाहीं. आतां नित्य आणि नैमित्तिक विवाह म्हणजे काय, तें मी सांगतों. नित्य विवाह म्हणजे पौरोहित विवाह. याच विवाहाला मनुष्य सन्मानानें पाहतात. अर्थात जो विवाह पुरोहिताच्या मध्यस्थीनें होतो, त्या विवाहाला पौरोहित विवाह, असें आपण म्हणूं."

एक मोठ्या दांताचा वाघ मध्येंच म्हणाला, "पुरोहित कशाला म्हणतात?" व्याख्याता म्हणाला, "कोषामध्यें पुरोहिताची व्याख्या धूर्त आणि लाडू खाणारा मनुष्यविशेष, अशी केली आहे. परंतु ही व्याख्या अगदीं बरोबर आहे, असें मला वाटत नाहीं. कारण पुष्कळ पुरोहित दारू पिऊन कबाबहि खातात आणि कांहीं तर सर्व खातात. आणि दुसरें असें की, केवळ लाडू खाणारांना पुरोहित म्हणतां येणार नाहीं. नाहीं तर काशीच्या विश्वेश्वराच्या देवळाजवळ लाडू खाऊन खाऊन मस्त झालेले सांड आहेत, त्यांनाहि पुरोहित म्हणावें लागेल. तेव्हां धूर्त असून जो लाडू खातो, आणि लाडू खाण्यासाठीं जो विवाह लावतो, त्याला पुरोहित म्हणतां येईल. पौरोहित विवाहांत हा पुरोहित वर आणि कन्या यांच्या मध्यें बसतो आणि खूप बडबड करतो. बडबडीला माणसें मंत्र म्हणतात. या मंत्रांचा अर्थ तुम्हांला कांहीं कळणार नाहीं; परंतु मीं त्यांच्यांत राहून पुष्कळ पंडित झाल्यामुळें मला त्या मंत्रांचा अर्थ समजला आहे. तो पुरोहित म्हणतो, 'हे वर कन्या, मी तुम्हाला आज्ञा देतों कीं तुम्ही दोघें विवाह करा. तुमच्या लग्नामुळें मला रोज लाडू खाण्यास मिळतील, यासाठीं लग्न करा. या कन्येच्या गर्भाधान प्रसंगीं, गरोदरावस्थेंत आणि प्रसूतिगृहांत मला लाडू खाण्यास मिळावेत यासाठीं विवाह करा. पुढें मुलाच्या षष्ठीचे पेढे मिळावेत, अन्नप्राषनाचे लाडू मिळावेत, कर्णच्छेदनाची घीशक्कर मिळावी, आणि उपनयनाची श्रीखंडपुरी मिळावी, म्हणून तुम्हीं विवाह करा. तुमचा विवाह झाल्यानंतर तुमच्या घरीं वारंवार सण, उत्सव व हव्य कव्य होऊन मला वारंवार लाडू मिळतील यासाठीं विवाह करा. तुम्ही विवाह करा आणि हा विवाह संबंध केव्हांहि मोडूं नका. मोडला तर माझे लाडू बुडतील. माझे लाडू बुडाले, तर तुम्हां दोघांचींहि श्रीमुखें मी माझ्या चपराकीनें रंगवीन. यासाठीं माझी आज्ञा पाळा आणि विवाह करा.' या मंत्रावरून हें अगदीं उघड दिसतें कीं, पौरोहित विवाह केव्हांहि मोडला जात नाहीं. आतां आपणा सभ्य व्याघ्र मंडळींत जी विवाहाची रीत

आहे, ती नैमित्तिक आहे. आपणा पशूप्रमाणें सुसभ्य होण्याची लालसा माणसांत हळू हळू वृद्धिंगत होत असल्यामुळें त्यांच्यांत नैमित्तिक विवाहहि वाढत्या प्रमाणांत होत आहेत; तथापि त्यांना अजून तेवढें धैर्य होत नाहीं. हा नैमित्तिक विवाह झाला, तरी स्त्री किंवा पुरुष दोघेहि ती गोष्ट साफ नाकबूल करतात. इतकेंच नव्हे तर हा नैमित्तिक विवाह ते इतक्या गुप्त रीतीनें उरकून घेतात कीं, तिसऱ्या कोणालाहि तो ते समजूं देत नाहींत. चोरी केली, तर एकवेळ ती ते कबूल करतील, पण या नैमित्तिक विवाहाची गोष्ट ते प्राणांतींहि फुटूं देत नाहींत. आणि इतका बंदोबस्त असूनहि, जर हा विवाह षट्कर्णी झाला, तर खरोखरच प्राणांतिक अवस्था प्राप्त होते. वास्तविक या नैमित्तिक विवाहांत वाईट असें काय आहे ? परंतु या पुरोहितानें हा विवाह आपल्या लाडूचें नुकसान होईल, म्हणून पाप कर्मांत घातला आहे. कारण या नैमित्तिक विवाहांत कोणालाच लाडू मिळत नाहींत. मला असें वाटतें कीं, माणसें जर धैर्य धरून हे विवाह सर्वांसमक्ष करतील व त्यांतहि सर्वांना लाडू खाण्यास देतील, तर हळू हळू पुरोहित या विवाहाला संमति देतील. मग नित्यविवाह नाहींसे होऊन नैमित्तिक विवाहच चालू होतील व माणसाची जात सुसभ्य होईल. आश्चर्य हें कीं हे नैमित्तिक विवाह जे घडवून आणतात, ते देखील या विवाहाच्या विरुद्ध बोलतात व तसा कोणी उमगून आल्यास त्याला शिक्षाहि करतात.

सारांश नैमित्तिक विवाह व्हावेत असें पुष्कळांना वाटतें; परंतु पुरोहिताच्या भीतीनें कांहीं थोडे विवाह न कळत होतात. मनुष्य प्राण्यांचा मला जो कांहीं सहवास झाला, त्यावरून मला ही गोष्ट कळून चुकली आहे कीं, श्रीमंत व सत्ताधीश नैमित्तिक विवाहाचे मोठे चहाते आहेत व ते पुरोहिताला एवढे भीत नाहींत. ते आपणास सुसभ्य म्हणवितात. आम्हा पशूंचें हें अनुकरण करावें म्हणून ते मोठ्या धैर्यानें पुढें येत आहेत. माझा असा विश्वास आहे कीं, मनुष्यप्राणी सुसभ्य होण्याचा हाच एक उपाय आहे आणि मानवीप्राण्यांत जे ज्ञाते आहेत, त्यांना ही गोष्ट पटली आहे. कांहीं झालें तरी या नैमित्तिक विवाहाचा हळूहळू मानवांत प्रसार होऊन ते थोड्याच वर्षांच्या अवधींत आपणा पशूप्रमाणें सुसभ्य होतील. पुष्कळ विद्वान यासंबंधानें ग्रंथ लिहीत आहेत. ते स्वज्ञातिहितैषी आहेत, यांत संशय नाहीं. अशा विद्वानांना आपल्या व्याघ्रसमाजाचा प्राथमिक मेंबर करून घेण्यास कांहीं हरकत नाहीं. जर कोणी असा मनुष्य स्वोन्नतीसाठीं आला तर त्याचा खिमा करण्याचा कोणी प्रयत्न करूं नये, अशी माझी आपणास

विनंति आहे. मनुष्यांत आणखी एक प्रकारचा विवाह प्रचारांत आहे. तेथें पुरोहिताचें काम रुपया करतो. या विवाहाला मुद्राविवाह म्हणतात. पुरुष स्त्रीला रुपये देतो आणि लागलीच तो तिचा हात धरतो. झाला विवाह !

मोठ्या दांताचा वाघ म्हणाला, "रुपया हें काय आहे?"

रुपया ही एक मनुष्याची पूज्य देवता आहे. या देवतेची कथा ऐकण्यासारखी आहे. मनुष्य जितक्या देवतांची पूजा करतो, त्यांत या देवतेवर त्याची विशेष भक्ति आहे. ही देवता जरी साकार आहे, तरी ब्राह्म व सनातनी सगळे तिची पूजा करतात सुवर्ण, रुपें व तांबें या धातूंची या देवतेची मूर्ति घडवितात. या मूर्तीला कोणी लोखंडाच्या, तर कोणी लांकडाच्या मंदिरांत ठेवतात. मूर्तीला कापडाचें अगर कातड्याचें आसन बसण्यासाठीं देतात. मनुष्य या मूर्तीचें ध्यान रात्रंदिवस करतो तिचें दर्शन व्हावें म्हणून तो नानाप्रकारचे प्रयत्न करतो. कोणी अरण्यांत जाते तर कोणी सप्तसमुद्र ओलांडतात. जेथें या मूर्तीचा वास आहे असें समजतें तेथें तिचे भक्त नानाउपायानें घुसतात व ती मूर्ति पूजेसाठीं आपल्या घरीं आणतात. क्वचित् प्रसंगीं त्यासाठीं मारामारी होते व खून होतात. या मूर्ती ज्यांच्या घरांत पुष्कळ असतात, तो महान भक्त होय व त्याला सगळे पूज्य मानतात. बहु मूर्ति संग्राह्य अशा भक्तानें कोणाकडे पाहिलें, तर त्या दुसऱ्या मनुष्याला पावन झालों असें वाटतें.

असें कोणतेंहि मनुष्याचें कार्य नाहीं कीं तें रुपया असल्यावर होणार नाहीं या सुवर्ण रौप्य मूर्तींचा प्रभावच असा विलक्षण आहे. वाटेल ती वस्तु या मूर्तींच्या प्रसादानें मिळते. वाटेल तें दुष्कर्म या मूर्तींच्या सहाय्यानें सहज साधतें. तुम्ही वाटेल तें निंद्य कृत्य केलें, तरी या मूर्तीचें अभय असलें म्हणजे तें निंद्य कृत्य कालत्रयीं उघडकीस येत नाहीं. ज्याच्या जवळ ही रौप्य मूर्ति नसेल, तो मनुष्य कितीहि गुणी असला, तरी त्याला कोणी गुणज्ञ म्हणणार नाहीं. आणि ज्याच्या जवळ रौप्य मुद्रा आहे, अशा मूर्खाला कोणीहि मूर्ख म्हणणार नाहीं. ज्याच्या जवळ रौप्य मुद्रा आहे, तोच धर्मध्वजी आहे, रौप्य मूर्तीचा अभाव हाच अधर्म होय. आपल्या समाजांत मोठ्या दांताचा, मोठ्या नखाचा, मोठ्या पोटाचा, मोठ्या जबड्याचा, मोठ्या शेपटीचा यावरून आपण मोठेपणा ठरवितों; परंतु मनुष्याचा सारा मोठेपणा रौप्य मूर्तीवर अवलंबून आहे. शारीरिक डामडौलाला मानव समाजांत कवडीची देखील किंमत

नाहीं. यावरून परमेश्वराचें दान ते पायाखालीं तुडवून धातु मूर्तीलाच सर्वस्व मानतात. अजून मनुष्याची जात शेंकडों वर्षांनीं पशूंच्या मागें आहे.

या रौप्यमूर्तीचें स्तोम माजलेलें पाहून मलाहि वाटलें कीं आपल्या व्याघ्रसमाजांत रौप्यमूर्तीचा प्रसार करावा; परंतु हा विचार मला सोडावा लागला. कारण लवकरच मला समजलें कीं मनुष्याच्या सर्व अनिष्टाला ही रौप्यमूर्तीच कारण आहे. पशु केव्हांहि स्वज्ञातीची हत्या करीत नाहीं; परंतु माणसें माणासांची हत्या नित्य करीत असतात. या रौप्यमूर्तींच्या भक्तीमुळेंच हे असले अनर्थ होतात. काल मी आपणास सांगितलेंच आहे कीं एखाद्या मैदानांत हजारों माणसें एकत्र होऊन एकमेकांचीं हिंसा करतात. याचें करण ही रौप्य मूर्तीच आहे. या रुपयाच्या भक्तीनें मनुष्य उन्मत्त होतो आणि मग तो कोणाला मारतो, कोणाची अब्रु खराब करतो तर कोणाला बांधून ठेवतो. सर्व अनिष्ठांच्या मुळाशीं ही रौप्य मूर्तीच आहे. त्यामुळें या रुपयाला मीं दुरूनच प्रणाम केला आणि त्याचें प्रचलन आपल्या व्याघ्र समाजांत मुळींच करावयाचें नाहीं, असें ठरविलें. आश्चर्य हें कीं रौप्यमूर्तीच्या भक्तीनें एवढाले मोठे अनर्थ होतात, हें मनुष्य समाजाला माहीत असूनहि या मूर्तीच्या संग्रहाची एवढी विलक्षण धडपड त्यांच्यांत चालू आहे कीं, तितकी खटपट आपण हरिणाच्या छाव्यासाठीं देखील कधीं करणार नाहीं. एकंदरींत मनुष्यसमाज अजून पशुसमाजाच्या पुष्कळ मागें आहे. लक्षांत ठेवण्यासासारखे मुद्दे हे कीं माणसें आपल्याच बांधवांना खुशाल मारतात; मारल्यावर मांस वगैरे न खातां तसेंच वांया घालवितात, अखंड विवाह करतात, नैमित्तिक विवाहाची सुधारणा त्यांच्यांत अजून झाली नाहीं आणि अनर्थकारक अशा रौप्यमूर्तीचे ते उपासक आहेत. एवढयावरून मानवपशूंचा समाज कितीं आश्चर्यकारक आहे, याची कल्पना तुम्हाला येईल. मनुष्य समाजासंबंधानें सांगण्यासारख्या आणखीहि पुष्कळ गोष्टी आहेत; परंतु आतां वेळ बराच झाला आहे. आपल्या सांसारिक कार्यालाहि आपणाला जावयाचें आहे, म्हणून माझें हें व्याख्यान मी येथेंच संपवितों. आपली इच्छा असेल तर या विषयासंबंधानें आणखी एकादे दिवशीं मी आपल्या ज्ञानाचा लाभ तुम्हास देईन."

याप्रमाणें लंबपुच्छ व्याघ्राचार्यानें व्याख्यान संपवून तो अध्यक्षाशेजारीं जाऊन बसला. नंतर एक तीक्ष्णनखाचा तरुण वाघ उभा राहिला व म्हणाला, "सज्जन व्याघ्रहो ! लंबपुच्छ व्याघ्राचार्यानें एवढें लांबलचक व्याख्यान दिल्याबद्दल आपण सर्व त्यांचे आभार मानाल, अशी मला आशा आहे; परंतु त्याबरो-

बरच हेंहि सांगणें माझें कर्तव्य आहे कीं, व्याख्यान अगदीं रद्दि झालें. व्याख्याता मोठा मूर्ख आहे, कारण त्यानें सगळ्या खोट्या गोष्टी आपणास सांगितल्या आहेत."

तितक्यांत अध्यक्ष म्हणाला, "हां ! आपण हें काय करतां ? सभ्य व्याघ्र-समाजांत अशी स्पष्ट शिवीगाळ होतां कामा नये. शिव्या देऊं नका, असें मी म्हणत नाहीं; पण त्या सभ्य भार्षेत द्या."

तो तीक्ष्ण नखांचा तरुण वाघ म्हणाला, "अध्यक्ष महाराज, या बाबतींत माझी चुक झाली, मी समाजाची क्षमा मागतों. व्याख्याता मोठा सत्यवादी आहे. तो खोटें बोलेल असें मला वाटत नाहीं. आणि मी म्हणतों, तसा तो मूर्खहि नसेल. त्यानें आपणास बहुतेक गोष्टी अस्वाभाविक सांगितल्या; पण त्यांतली क्वचित एकादी खरीहि असेल. त्यानें सांगितलें त्यांत कांहीं तथ्यांश नाहीं, असें आपणास वाटत असलें, तरी तो मोठा विद्वान आहे, हें आपण विसरूं नका. माहीत नसलेल्या गोष्टी सांगणें हेंच विद्वत्तेचें लक्षण होय, असें जर असेल, तर त्याच्या विद्वत्तेबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं; तथापि त्याचा असत्यवादीपणा त्याच्या पदरांत घातला तर तो रागावणार नाहीं. मनुष्यांच्या विवाहासंबंधानें त्याला कांहींहि माहीत नाहीं. आपणांत जे क्षणमात्र विवाह होतात, ते केवळ वंशवृद्धीसाठीं होतात; परंतु मनुष्य प्राणी अत्यंत दुर्बळ असल्यामुळें केवळ संरक्षणासाठीं विवाह होतात. स्त्री आपल्या संरक्षणासाठीं एकादा पुरुष नौकर ठेवत्ये. आणि या कराराला साक्षिदार म्हणून पुरोहिताला बोलावतात. त्या प्रसंगाला विवाह म्हणतात. त्या वेळीं पुरोहित वराला विचारतो कीं 'मला काय साक्ष दिली पाहिजे ?' वर म्हणतो, 'ही स्त्री आतां जन्मभर माझी मालकीण झाली आहे आणि मी तिचा गुलाम झालों आहें, याचे आपण साक्षिदार रहा.'

**पुरोहितः**—बरें पुढें ?

**वरः**—मी जन्मभर हिच्या चरणाची सेवा करीन. आहार सामग्री आणण्याचें काम माझें आणि आणलेलें बसल्याबसल्या गिळंकृत करण्याचें तिचें. याला आपण साक्षिदार आहां.

पुरोहित मग कन्येला विचाररतो, 'तुझें काय म्हणणें आहे ? ' ती म्हणते, या नोकराची नौकरी मी संतोषानें कबूल करतें. माझी इच्छा असेल, तोंपर्यंत याला माझी चाकरी करूं देईन. नाहीं त्या दिवशीं लाथ मारून घालवून देईन.' यावर पुरोहित तथास्तु म्हणून म्हणतो आणि विवाह होतो. ही संरक्षक सेवा पद्धति

मनुष्यांत फार प्रचारांत आहे. स्त्री पुरुषाला संरक्षक ठेवते, पुरुष दरवानाला आणि दरवान लठ्ठ काठीला ! वक्त्यानें रुपयाला देवता बनविलें आहे; पण ती त्याची चूक आहे. रुपया ही देवता नसून तें एक विषचक्र आहे. मनुष्यें नानाप्रकारचीं विषें वापरतात आणि त्या व्यसनांत गुंग असतात. पुष्कळ त्यांतच मरतात. रुपया हा विषचक्र असल्यामुळेंच पुष्कळ माणसें जखमी होऊन लंगडीं पांगळीं होतात आणि पुष्कळ मरतात. ही रौप्य मूर्ति स्वादिष्ट आहे कीं विषारी आहे, याचा मी अनुभव घेतला आहे. विद्याधरी नदीच्या कांठानें एकदां एक प्रवासी चालला होता. मी तत्क्षणीं त्याच्यावर झडप घालून त्याची चटणी उडविली. त्याच्या खिशांत तीन चार रुपये होते, तेहि गट्ट केले; पण दुसऱ्या दिवशीं माझें पोट भयंकर दुखूं लागलें. यावरून रुपया हें विषयचक्र आहे, ही गोष्ट उघड होय."

यानंतर दुसऱ्या कांहीं वक्त्यांनीं मनुष्यप्राण्यासंबंधानें थोडीशी टीका केली. शेवटीं अध्यक्षानें समारोप केला. तो म्हणाला, " आतां ही सभा बरखास्त केली पाहिजे. रात्र बरीच झाली आहे. आपलें सांसारिक कर्म अजून व्हावयाचें आहे. हरिणांचे कळप बाहेर पडण्याची हीच वेळ, तेव्हां सभा बरखास्त केली पाहिजे. एकंदर दोन दिवस जी चर्चा झाली, ती मोठी सुबोधक झाली. याबद्दल लंब-पुच्छ व्याघ्राचार्यांचे आपण आभार मानले पाहिजेत. आपणाला या वादविवादानें एवढें कळून चुकलें कीं आम्ही जसे सभ्य आहों, तसे मनुष्य सभ्य नाहींत. ते असभ्य आहेत. तेव्हां त्यांना सभ्य बनविण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. देवानें तेवढयासाठींच हें सुंदरबन आम्हाला दिलें आहे. मनुष्य सभ्य झाल्यावर त्याचें मांस अधिक रुचकर होईल आणि माणसांनाहि ही जाणीव होईल कीं, वाघांच्या भक्षस्थानीं पडण्याला आपण योग्य आहों. याचा उघड अर्थ असा आहे कीं, आपण माणसांना प्रथम सभ्य करावें आणि नंतर त्यांना भक्षण करावें.''

सभा बरखास्त होऊन तें अरण्य व्याघ्रशून्य झाल्यावर मोठमोठाल्या वृक्षांच्या ढोलींत लपून बसलेलीं माकडें भीत भीत झाडांच्या खांद्यावर येऊन बसलीं आणि झालेल्या व्याख्यानावर टीका करूं लागली. माकडांचा हा धर्मच आहे. या टीकेचें तात्पर्य हें कीं माणसांचें अगोदर भक्षण करून मग त्यांना सभ्य बनवावें !



# ग्रंथमालेच्या दोन अपूर्व कादंबऱ्या.

## प्रणयपंक.

आपण आजपर्यंत पुष्कळ सामाजिक कादंबऱ्या वाचल्या असतील; परंतु प्रणयपंक ही कादंबरी आपण वाचून पहा म्हणजे आपल्या लक्षांत येईल कीं इतकी मनोहर कादंबरी आजपर्यंत एकहि वाचण्यांत आली नाहीं. महाराष्ट्र भाषेंत आजवर प्रकाशित झालेल्या सामाजिक कादंबऱ्यांत सर्वश्रेष्ठ अशी जर एखादी कादंबरी असेल, तर ती प्रणयपंक ही एकच होय, असें महाराष्ट्र वाङ्मयभक्तांनीं मोकळ्या मनानें कबूल केलें आहे. मनुष्याच्या मनोभावनांचें शब्दचित्र यथातथ्य रंगविण्यांत लेखकाच्या लेखणींत जी जादू आहे, तिचा चमत्कार पाहून या शब्दसृष्टीच्या ईश्वराविषयीं मोठें विलक्षण कुतूहल उत्पन्न होतें आणि खरोखरच जादुगारानें भारल्याप्रमाणें प्रत्येक वाचक मंत्रमुग्ध होतो. ही कादंबरी वाचली म्हणजे पूर्वीच्या मोठमोठ्या लेखकांच्या कादंबऱ्या शिळ्या व निरस वाटूं लागतात. ही कादंबरी जितकी मनोरंजक आहे, तितकीच ती सदुपदेशकहि आहे. समाजांतले अनेक गुंतागुंतीचे प्रश्न व समाजरचनेंतले अनेक दोष या सगळ्यांची आलोचना लेखकानें इतक्या कुशलतेनें केली आहे कीं, ती वाचतांना वाचक मोहवश होऊन लेखनाच्या ओघाबरोबर सारखा वहात जातो. गोष्ट अद्भुत किंवा असंभवनीय नसून प्रपंचांतल्या रोजच्याच घडामोडी आहेत; परंतु हें संसारचित्र इतकें स्पष्ट व चित्ताकर्षक झालें आहे कीं, जणूं काय या सांसारिक घडामोडी पहावयाला आम्हांस नवी दृष्टि मिळाली आहे, असें वाटतें. तीन खंडांत संपूर्ण. पृष्ठसंख्या ६२०. तिन्ही खंड एकत्र करून मजबूत जाड व अत्यंत मोहक बांधणी केली आहे. साध्या प्रतीस तीन रुपये. कापडी प्रतीस साडेतीन रुपये.

## जाईचा मंडप.

लेखकः—**डॉ० नारायण दामोदर सावरकर.** ( जातिहृदय. )

मातृभूमीसाठीं तिच्या निस्सीम पुत्रांना भोगाव्या लागलेल्या अपेष्टा, त्यांची अढळ कर्तव्यनिष्ठा, त्यांचें जन्मभूमीवरील प्रेम आणि त्यांचा सात्विक स्वाभिमान यांचें अत्यंत मनोहर व परिणामकारक चित्र या ऐतिहासिक कादंबरींत फारच दक्षतेनें रेखाटलें आहे. कादंबरीची भाषा काव्यसूत्राप्रमाणें सुरस व प्रतिभायुक्त

असून निसर्गाचीं वर्णनें फारच बहारीचीं आहेत. ज्यांचीं हृदयें नानाप्रकारच्या उपाधींनीं तप्त झालीं असतील, निराश झालीं असतील, उदासीनतेनें व्यापून गेलीं असतील त्यांनीं निदान एकवार तरी या जाईच्या मंडपांत प्रवेश करावा, म्हणजे तीं शांत, कर्तव्यतत्पर, व आशेनें प्रफुल्ल होतील. ही ऐतिहासिक कादंबरी किती उत्कृष्ट, किती मनोरंजक व किती उपदेशपूर्ण आहे, हें ती वाचून पाहिल्याशिवाय लक्षांत येणार नाहीं. महाराष्ट्रीयांची ही अत्यंत आवडती कादंबरी असून अगदीं अल्पावधींत तिची पहिली आवृत्ति संपली; आणि महाराष्ट्रीयांच्या आग्रहावरून या कादंबरीची द्वितीयावृत्ति प्रकाशित करीत आहों. पूर्वी ही कादंबरी स्वतंत्र दोन खंडांत प्रसिद्ध केली होती; परंतु आतां दोन्ही खंड एकत्र केले आहेत. पृष्ठें चारशेंपेक्षां अधिक, कागद उंची, छपाई सुंदर, बांधणी मजबूत व मनोहर. साध्या बांधणीच्या प्रतीस दोन रुपये. कापडी प्रतीस अडीच रुपये. किंमतीशिवाय टपाल, व्ही. पी. खर्च निराळा.

सर्व पत्रव्यवहार खालच्या पत्त्यावर करावा.

**प्रभाकर श्रीपत भसे,**

व्यवस्थापक–भारत–गौरव–ग्रंथमाला,

गिरगांव–मुंबई.

